मनोहर ग्रंथमाला प्रकाशन ६८ वें

साम्यतेच्या वाटेवरील

# उद्यांची संस्कृति

लेखक

दत्तात्रेय केशव केळकर



किंमत ६ रुपये

# प्रस्तावना

मानवी सस्कृति ही मानवाने आपल्या राहणीवर व विचारसरणीवर केलेल्या सस्काराची सहिता होय ही सस्कृति आज नवयुगाच्या उबरठ्यावर उभी आहे या उबरठ्यावरून उद्याच्या साम्यवादी जीवनाच्या प्रागणात प्रथमच पावले टाकीत असता, आजवर आपण आक्रमीत असलेल्या मार्गावर एकीकडे भूमातेला सुजला सुफला करीत असता, दुसरीकडे मानवी मातेपुढे सतीचा आदर्श माडण्याला आणि अस्पृश्य जनतेस घृणास्पद जीवनास जुपण्याला मागे पाहिले नाही, ही दोन भिन्न दृश्ये आपल्यापुढे उभी ठाकतात ती पाहत असता ' कुटुबाची जिदगी ती कुटुबाच्या समाईक मालकीची ' हे साम्यवादी तत्त्व मानवाने फार प्राचीनकाळीच अमलात कसे आणले व तेच अधिक व्यापक करून आज सर्व राष्ट्राला कसे लागू करणे योग्य होईल ह्याचा विचार पहिल्या प्रकरणात केला आहे एका कुटुबाने अथवा सामुदायिक कुटुबानी दुसऱ्यास जिकून आणले म्हणजे विजेत्याला जयाचा कैफ न चढला तरच नवल या कैफातून जिकून आणलेल्याना गुराढोराप्रमाणे कसून काम करण्यास जुपण्याची गुलामगिरी कशी बद्धमूल झाली यावर दुस-या प्रकरणात नजर टाकली आहे वर्चस्व गाजविण्याची वृत्ति पोसली गेली म्हणजे ती गुलामावर कुरघोडी करण्यावरच न थाबता आपल्या अर्धांगी पत्नीवर गुरगुरण्यास, स्त्रियाना सतीचे आमिष दाखविण्यास, व निर्धनांना वेश्यागारात लोटण्यास कसे मागे पहात नाही याकडे तिसऱ्या प्रकरणात लक्ष वेधले आहे

पण बहुजन समाज हे सगळे जुलूम चालू कसे देतो व मूठभर समाज अफाट जनतेला काबूत ठेऊ कसे शकतो ? तर मिळते ते अन्न मिळविण्याकरिता भटकत फिरण्याची अवस्था सपून शेतीवर हमखास पीक उत्पन्न करण्याची विद्या मानवाला हस्तगत झाली त्यामुळे ! म्हणजे असे झाले की, काहीनी शेतीवर राबावे आणि त्याचे शेत शत्रूनी लुबाडू नये म्हणून बलिष्ठ शूरवीरानी शत्रूच्या टोळधाडीचा निपात करावा असे दोन वर्ग निर्माण झाले शूराची शेतीवर राबण्यापासून सुटका झाल्यावर इतरावर वर्चस्व गाजविण्याची कल्पना त्याच्यात उत्कट व्हावी हे स्वाभाविक यातूनच राजसत्ता निर्माण

झाली आणि तिने उनगाना कावाडकष्टाम जुपून व 'गजा हा ईश्वरी अवतार होय' हे विचार त्याच्या कानी ठोकत ठेवून आपले वर्चस्व कायमचे बळकट कसे केले त्याची रूपरेखा चौथ्या प्रकरणात आखली आहे

पण राजात जर ईश्वरी अश असला तर सामान्य माणसातहि तो का नसावा ? ही शका मधूनमधून तिला डिवचेच तिला मागील जन्मीचे पाप आणि पुढील जन्मी मिळणारे सुख व जीवनमागन्य अशा रेशमी काढणीत गुफून टाकून स्त्री न। ।न न न श्रेष्ठ कवीकडूनही हतबुद्ध कसे केले जाते ते 'धर्माची रेशमी काढणी' या पाचव्या प्रकरणात दर्शविले आहे पुढील सहाव्या प्रकरणात ही काढणी बळकट करण्याकरिता प्रथम समाजघटनेवर सनातनत्वाचे जे वळसे देण्यात आले ते कसे कच्चे आहेत हे विवाहाच्या प्राचीन अष्ट प्रकारावरून स्पष्ट केले आहे तसेच त्यातील रुतू लागणारे वळसे पारमार्थिक क्षेत्रात तरी ब्राह्मणापासून अत्यजापर्यंत सर्वांना एका समान भूमीवर उभे करून भागवत धर्माने पुढील काळात कसे हलके केले त्याकडे त्रोटक नजर फेकली आहे पण नुसत्या आध्यात्मिक क्षेत्रात सर्वांना एका पातळीवर उभे केल्याने व्यावहारिक जीवनातील कष्ट कमी होत जात नाहीत ते होण्याकरिता सत्तेचा अधिकार हा नृपतीच्या मगरमिठीतून सोड-वून बहुजन समाजाने निवडलेल्या लोकशाहीच्या खुल्या हातावर आणून सोडणे हा उद्याच्या सस्कृतीने गाठावयाच्या पुढच्या टप्प्याचे दिग्दर्शन सातव्या प्रकरणात केले आहे आपल्या भारतानेहि एके काळी छोटी प्रजासत्ताक राज्ये चालविण्याचे प्रयोग केले व मोठी साम्राज्येहि उभारली पण यापुढील प्रौढ लोकसत्तेची पायरी तो नुकतीच पाच वर्षांपूर्वी चढला आहे शस्त्राच्या वाढी-बरोबर व्यापाराची धावती वाढ होऊन नृपसत्तेला लोकसत्तेच्या वळणावर आणून सोडण्याचे ध्येय गेल्या शतकातच प्रत्यक्षात उतरविले गेले पण तीच लोकशाही बहुसख्य लोकाना विसरून धनाढ्याची कसबीण कशी झाली आणि नाझीशाहीत न।मन्गी-नागिन। कुकुमतिलक लावून ही श्रीमताची वारागना कशी बनली याचे दिग्दर्शन केले आहे

लोकशाहीने सामाजिक वैषम्याचे प्रश्न सुटतील याविषयी ज्याची खात्री नव्हती त्यानी साम्राज्यशाही व धनाढ्यशाहीतील वैषम्य आजच्या इतके वाढले नव्हते त्या काळी जी छोटी अल्पसख्य प्रजासत्ताक राज्ये होती तशी पुन्हा

स्थापित करावीत असा पक्ष रूसो या फ्रेंच तत्त्वज्ञान्याने सुचविला बहुसंख्य लोकशाहीतून अल्पसंख्य शाहीकडे वळणे हे वळचणीचे पाणी आढ्याला नेण्यासारखे वास्तविकतेस सोडून होते उत्क्रांतीबरोबर वैषम्य काही प्रमाणात वाढत गेले असले तरी मानवतेने विकासवादाच्या मार्गाने पाऊल पुढे टाकले आहे हे आठव्या प्रकरणात दर्शविले आहे पण लोकशाहीची मजल गाठली तरी मोठ्या माशाने छोटया माशाला आपल्या तोंडी टाकावे त्या प्रमाणे धनाढ्य हा गरीबाला पिळून काढण्याचे सोडून देत नाही. त्या दिशेने पावले टाकावयाची म्हणजे समाजसत्ताकशाहीत मध हा फुलाला धक्का न लावता त्यातील मध चोखणाऱ्या मधुमक्षिकापद्धतीने चाखला पाहिजे हे प्रकरण नवव्यात प्रतिपादिले आहे पण त्याहि पुढे पाऊल टाकून मधमाशाच्या पोळयाप्रमाणे सर्व संपत्ति एकत्रित राष्ट्रीय मालकीची करण्याचा प्रयोग रशिया, चीन वगैरे राष्ट्रात कसा केला जात आहे, व तो करीत असता त्यांनी पावले किती धीटपणे पुढे टाकली आहेत व ती टाकीत असता पायाला बोचलेले किती काटे त्याना उपटून काढावे लागलेले आहेत याचे धावते दर्शन दहाव्या व अकराव्या प्रकरणात करून दिले आहे

रशिया, चीन व निम्मा अधिक युरोप यानी मळवलेल्या या वाटेवरूनच आपल्या उद्याच्या संस्कृतीला पावले टाकावयाची आहेत म्हणूनच रशिया–चीनच्या प्रयोगातील व्यक्तिस्वातंत्र्याच्या गळचेपीसारख्या व अजस्र संहाराच्या काही खाचखळग्याकडे लक्ष वेधले आहे पण या खाचखळग्यापैकी धर्माला कायमचा गाडून टाकण्याकरिता जो खोल खड्डा मार्क्सवादी रशियाने खणला आहे त्याकडे दुर्लक्ष केल्यास रशियाच्या पाउलावर पावले टाकीत जाताना हजारो वर्षांची अखंड परंपरा चालविणारा आपला भारत या खोल खड्डयात कायमचा पुरला तर जाणार नाही ना अशा धास्तीने काही प्रबुद्धाची छाती कशी धडधडते हयाची ओळख पुढील बाराव्या प्रकरणात करून दिली आहे साम्यवाद हा भारतीय परंपरेला सोडून मुळीच नाही. कार्ल मार्क्सने धर्माला अफूच्या गोळीची उपमा दिली ती वैषम्य नैर्घृण्याचे काही प्रकार तरी समाजनिर्मित असून ते दूर करण्याचे सोडून धर्माच्या अफूत समाजाने गुंगून राहू नये म्हणून ! एरवी 'सर्वेन सुखिन सन्तु' या सर्वांना एका पातळीवर आणणाऱ्या धर्माला साम्यवादी मार्क्स विरोध कसा करील ? मात्र संतानी

उपदेशिलेली समानता नुसती अध्यात्माच्या चौकटीतच न राहता खऱ्या अर्थाने व्यवहारात उतरावयाची तर आर्थिक क्षेत्रातहि ती उतरविली पाहिजे हे त्याने समाजाला पटवून देण्याचा धडाका चालविला येवढेच म्हणजे मार्क्स हा 'सर्वेन सुखिन सन्तु' या उदात्त धर्मभावनेच्या विरुद्ध नाही ती भावना मायावाद अथवा ईश्वराची लीलाकैवल्ये वगैरेत गुरफटून जाऊन वैषम्य नैर्घृण्याचे समर्थन करू लागली म्हणजे मात्र ती अफूची गोळी झिडकारून टाका असें सागण्यास तो कचरत नाही एवढेच प्राचीन कालाप्रमाणे दान, दया, परोपकार वगैरे कल्पनाची भागवत धर्मानुरूप आळवणी करीत बसण्याचे सोडून राष्ट्राची सपत्ति ही समाईक मालकीचीच होय या बदलऱ्या काळातील नव्या कल्पनेचे ओझरते दर्शन घेतले आहे

शेवटच्या प्रकरणात सस्थाने व जमिनदारी बरखास्त करून, आगगाड्या व मोटारी सरकारी मालकीच्या ठरवून आणि गिरणी कामगाराना प्रॉव्हिडट फडाच्या रूपाने सक्तीने शिल्लक टाकण्यास लावून साम्यवादाच्या दिशेने पाउले टाकण्यास आपल्या भारताने जो प्रारभ केला आहे त्याकडे लक्ष वेधले आहे मात्र ज्या धिटाईने रेल्वे-मोटारीही सरकारमालकीची करण्यात आली त्याच धिटाईने गिरण्या, बँका आणि सस्यश्यामला भूमी या ज्या दिनी राष्ट्रीय मालकीच्या करण्यात येतील त्याच दिनी उद्याच्या साम्यवादी सस्कृतीची मुहूर्तमेढ रोवली गेली असे अभिमानाने म्हणता येईल

समाईक मालकीचे तत्त्व कुटुबापुरते आपल्या भारताने जे स्वीकारले त्याला हजारो वर्षे होऊन गेली आज तेच समाईक मालकीचे तत्त्व कुटुबाचे सकुचित कवच फोडून अखड राष्ट्राला व्यापून टाकील इतके सामुदायिक करावयाचे आहे मात्र ते केल्याने सामाजिक वैषम्यातील सर्वच प्रश्न सुटतील अशा कल्पनातरगात रगून जाणेहि इष्ट होणार नाही हे स्पष्टपणे नमूद केले पाहिजे साम्यवादाच्या प्रागणातहि सुरूप-कुरूप, सबल-दुर्बल, वरिष्ठ-कनिष्ठ, सुष्ट-दुष्ट, बुद्धिवान्-बुद्धिहीन असे भेद राहतीलच, पण या जन्मजात वैषम्यात खाजगी मालकीच्या व वशपरपरेच्या व्यवस्थेने जी भर टाकली आहे ती दूर करून सहक राज्या तत्वानुरूप सर्वांना समान सधि देण्याच्या मार्गाने पाउले टाकीत जाणें व जीवनाकडे जुन्या भोळसट भावाने न पाहता भावनाचे महत्त्व

लक्षात ठेवूनही तर्कशुद्ध दृष्टीने अवलोकन करणे हेच उद्याच्या सस्कृतीचे ध्येय होय असा पक्ष माडून समारोप केला आहे

ऐतिहासिक उदाहरणे व वाङमयीन वचने उद्धृत केली आहेत ती प्रामुख्याने आपल्या भारतातील होत हे वाचकाच्या लक्षात येईलच असा. शेवटचे गोड काम आभाराचे मुद्रिते तपासताना अनेक खोडाखोडी चालवून घेण्याची सहनशीलता दाखविल्याबद्दल आदर्श मुद्रणालयाचे श्री **न वि. सरदेशपांडे** याचे व अनेकवार आठवण देऊन लेखन पूर्ण करून घेऊन प्रकाशित करण्याबद्दल मनोहर–ग्रथ–मालेचे श्री **मनोहर महादेव केळकर** याचे आभार मानावेत तेवढे थोडेच !

रुइया कॉलेज, मुबई १९
शके १८७४
२४ आगस्ट १९५२

**द के केळकर**

# अनुक्रमणिका

## प्रकरण पहिलें

# नवयुगाच्या उंबरठ्यावर

### लोभमूलानि पापानि लोभं वित्तसमुद्भवम्

मानवी संस्कृतीच्या शतकानुशतके चाललेल्या विकसनावस्थेत हल्ली असा समय प्राप्त झाला आहे की, या विकसनाच्या प्रौढावस्थेकडे काहींशा अभिमानाने पहात असताही या संस्कृतीची गोड फळे जी सुखसाधने ती समाजाच्या सर्व थरात पोचती झालेली नाहीत हे पाहून मानवतेला हुरहूर वाटावी. मानवी संस्कृतिवेलीला शास्त्र, कला, वाङमय याचा उत्कृष्ट फुलोरा येत चाललेला आहे, पण या फुलोऱ्याचे नैसर्गिक पर्यवसान जें सुखशांतीचे मधुर फल ते मात्र अद्याप या वेलीवर धरू लागले नाही यामुळे या संस्कृतीवेलीचा जीवनरस जी सामाजिक घटना तीतच काही जबर दोष असला पाहिजे असा संशय उत्पन्न होण्यासारखी स्थिति प्राप्त झाली आहे.

धार्मिक व अध्यात्मिक दृष्टया सर्व मानवजात ही समान होय, ही घोषणा होऊन शतकानुशतके लोटली तरी अध्यात्मज्ञानाचे शिखर गाठलेला हिंदु समाज आता कोठें अस्पृश्यतेस गुडाळू पाहू लागला आहे आणि 'एका गालावर चापटी मारली असता दुसरा पुढे कर' असा उपदेश करणारे ख्रिस्ताचे अनुयायी तर आजहि परकीय राष्ट्रास साखसुरत फाडून खात आहेत. एकीकडे प्राचीन अवशेषाचा अभ्यास करून अखिल मानवजातीच्या इतिहासाचे धागे-दोरे विणले जात आहेत, तर दुसरीकडे मानव जातीचा संहार करणारी नवी नवी शस्त्रे आयुधागारात समाविष्ट केली जात आहेत सात मजली नव्हे तर शंभर मजली प्रासाद उठविण्याइतकी वास्तुकलेची प्रगति झाली आहे पण शेंकडा नव्वद टक्के जनतेच्या कपाळी कोंदट, खुजट खोपटयात राहण्याचेच येत आहे. साथीच्या रोगाचा प्रतिकार यशस्वी रीतीने करण्याइतकी वैद्यकाची प्रगति झाली असताही केवळ दारिद्र्यातर्गत गलिच्छ राहणीमुळे यमसदनास जाणाराची संख्या थोडी नाही. कापडाचे पर्वतप्राय

ढीग न खपल्यामुळे गिरण्या बद कराव्या लागण्याइतकी निपज होत असून-सुद्धा लज्जारक्षणाला लागणारे वीतभर धडुत मिळण्याची भ्रात पडणारे दैन्यही पृथ्वीच्या पाठीवरून अद्याप नष्ट झालेले नाही. पृथ्वीवरील तसून् तसू जमीन नागरून काढतील इतकी प्रचड आउते व पृथ्वीच्या एका टोकास पिकलेले धान्य दुसऱ्या टोकास नेण्यासारखी वाहतुकीची साधने साध्य झाली असताही वर्षानुवर्षे मृत्यूला दुष्काळी सावजे सापडतच आहेत अर्थात् सुख-सोयीची लयलूट करण्याची कतबगारी मानवास वश झाली असूनही ही सुखसपत्ति सर्व समाजात खेळती राहील अशी समाजाची रचना मात्र अस्तित्वात आलेली नाही असाच याचा अर्थ नाही का ?

माणमाने सामाजिक जीवनास प्रारभ केल्यापासून अगदी प्राचीन काल सोडला तर त्याने समाजरचनेचे कुटुब, राष्ट्र, साम्राज्य, चातुर्वर्ण्य व जाति-सस्था वगैरे ज प्रकार रचिले आहत, त्या सर्वाची उभारणी मूलत खाजगी मालमत्तेवर केलेली आहे समाजाचे नियमन करणारे जे कायदे-कानू, त्यात ही गोष्ट स्पष्टपणे नजरेस येते मारामारी, खून वगैरे काही फौजदारी बाबी सोडल्या तर कायद्याची प्रचड नियमावलि ही खाजगी मालमत्तेची जपणूक कशी होईल याचीच काळजी वाहत असलेली आढळून येते हिदु धर्मशास्त्रात कायद्याचे एकदर अठरा विषय वर्णिलेले आहेत, त्यापैकी ऋणादान, निक्षेप, अस्वामिविक्रय, सभयसमुत्थान, दत्तस्यानपकर्म, वेतनस्यादान, क्रयविक्रया-नुशय, स्वामिपालविवाद, सीमाविवाद, स्तेय, द्यत वगैरे बारा तेरा प्रकार हे निव्वळ खाजगी मालमत्तेची सुरक्षितता प्रस्थापित करण्या-विषयी बद्धपरिकर झालेले दिसून येतात. आणि खाजगी मालकी हेच विद्यमान समाजघटनेचे मुख्य सूत्र म्हणून आजवर मान्य करण्यात आलेले आहे अर्थशास्त्रात जसे खुल्या व्यापाराचे तत्त्व प्रतिपादण्यात येत असे तसेच समाजशास्त्रातही सपूर्ण खाजगी मालकीचे तत्त्व हे गृहीत कृत्य म्हणून स्वीकारण्यात आले आहे बलिष्ठ व कनिष्ठ अशा सवच राष्ट्रानी एकमेकाशी खुला व्यापार करावा, मग त्यात कोणाला अधिक फायदा मिळो वा कोणाचे नुकसान होवो, एकदरीत खुल्या व्यापाराने जगाचा व्यापार–व्यवहार हा सुव्यवस्थितच होईल, हे तत्त्व अर्थशास्त्रज्ञानी, म्हणजे बलिष्ठ राष्ट्रातील अर्थशास्त्रज्ञानी स्वत.सिद्धतत्त्व म्हणून माडले, तसेच समाजव्यवस्थापकानीही

म्हणजे समाजातील आधीच धनवान् असलेल्या समाजनेत्यानीही समाज-व्यवस्थेचे एक अनाद्यनत व स्वत प्रमाण असे तत्त्व म्हणून मानले आहे ते म्हणजे खाजगी मालमत्तेचे पावित्र्य हे होय. या खाजगी मालमत्तेच्या तत्त्वाचा अर्थ हा कीं, बुद्धि, ऐपत, परिस्थिति वगैरेची जशी ज्याला अनुकूलता असेल तशी त्याने कमाई करावी व या गुणाची प्रतिकूलता असलेल्यानी आपले कमनशीब ओळखून कपाळावर हात मारून स्वस्थ रहावे अशा रीतीने ज्याला त्याला आपल्या मगदुराप्रमाणे अर्थसचय करू देण्याची मुभा ठेवली गेली म्हणजे समाजाला स्थैर्य येऊन अर्थसचयामुळे कला, वाङमय, शास्त्रे वगैरे मानवी सस्कृतीच्या विविध अगाचे अभिवर्धन होते व समाजात सुखशाति नादते असे खाजगी मालमत्तेच्या अर्थाचे स्वरूप सागण्यात येते

हे तत्त्व समाजघटनेचे आद्य मूलभूत व स्वत प्रमाण असे तत्त्व मानून समाजातील शासक सत्ता व वर्ग हा आज शतकानुशतके या तत्त्वाचे म्हणजे खाजगी मालमत्तेचे सरक्षण हेच आपले आद्यकर्तव्य होय अशा कल्पनेने आपल्या सत्तेचा उपयोग करीत आलेला आहे

ज्याने त्याने आपआपला मगदूर, बुद्धि, चातुर्य असेल त्या मानाने कमाई करावी व इतरानी तिचा अपहार करू नये आणि तीवर आपला हक्क सागू नये हें तत्त्व सामान्यत न्याय्य, प्रामाणिक व सत्यनिष्ठ आहे. खाजगी मालमत्तेच्या या तत्त्वाला अखड वारसाहक्काच्या तत्त्वाची जोड मिळाली नसती व खाजगी मिळकतीची मर्यादा स्वत च्या कमाईपुरतीच मर्यादित राहती तर खाजगी मालमत्तेच्या तत्त्वाने आज समाजव्यवस्थेत उत्पन्न झाला आहे इतका तीव्र असतोष उत्पन्नही झाला नसता. पण खाजगी मालमत्तेची सागड अखड वारसदारीशी घालण्यात आली, की चारदोन पिढ्यात सपत्तीची इतकी विषम वाटणी होऊन बसते की, पुढे गरीब कुटुबात जन्मास आलेल्या व्यक्तीला अगी कर्तबगारी व बुद्धिचातुर्य असले तरीही आधीच धनवान् होऊन बसलेल्या गर्भश्रीमताशीं स्पर्धा करणे अवघड होऊन बसते. कारण बुद्धीच्या विकासाला पोषक अशा शिक्षणादि सोयी व व्यापाराउदिमाला लागणारे भाडवल हे धनाधीन असल्याने गरीब पितराच्या दारिद्र्याचे पाप पुढच्या अनत पिढ्यावर कायमचे लादले जाते अशा रीतीने श्रीमतानी आपल्या श्रीमतीमुळे मिळणाऱ्या अनेकविध साधनानी अधिक श्रीमती जोडीत

जावी व गरिबानी त्याच साधनाच्या अभावी दारिद्र्यात अधिकाधिक रुतत जावे असा क्रम सुरू व्हावा हे समाजरचनेच्या शास्त्रशुद्धतेचे लक्षण खास नव्हे! अशाही प्रतिकूल परिस्थितीशी झगडत स्वत च्या बुद्धिसामर्थ्याने दारिद्र्यावर विजय मिळविणाऱ्या लोकोत्तर व्यक्ति आढळत नाहीत, असे नाही; पण त्यामुळे समाजघटना निर्दोष ठरत नाही उलट अशी उदाहरणे ही अपवादात्मक असल्याने समाजघटनेची सदोषता या उदाहरणानी सिद्धच होत असते

ज्याने त्याने आपआपल्या मगदुराप्रमाणे कमवावे व इतरानी त्याचा हेवा करू नये हे तत्त्व प्रामाणिक व न्याय्य होय पण केव्हा ? तर जेव्हा कमाई करण्यास लागणारी साधने सर्वाना सारखीच उपलब्ध असतील तेव्हा शर्यती, खेळ व धर्मयुद्धे यातही अशा प्रकारची साधनाची समानता ही गृहीत धरलेली असते, आणि त्यामुळे त्यात विजयी होणाऱ्या वीराचे पारितोषिक ही न्याय्य कमाई समजली जाते धर्मयुद्धात रथीने रथीबरोबर सामना करावा, पदातीने पदातीशी झुजावे, अश्वारूढाने अश्वारूढाशी भिडावे, असा आदर्श पूर्वी माडण्यात येत असे; व तो पाळून एका वीराने दुसऱ्या वीराचा पाडाव केल्यास विजयी वीराला उघड प्रामाणिकपणे आपली विजयश्री मिरविता येई व पराजिताला आपल्या पराभवाबद्दल तक्रार करण्यास जागाही उरत नसे पण हातातील कोयता परजून येणाऱ्या रागड्यावर एका मैलावरून तोफ डागणाऱ्या वीराला आपल्या विजयश्रीचे प्रामाणिकपणे समर्थन करता येईल काय ? पण आजची समाजरचना काहीशी अशाच तत्त्वावर प्रस्थापित झालेली नाही का ? शिक्षण, स्वास्थ्य, भाडवल व सामाजिक दर्जा या चतुरग साधनानी युक्त असा गर्भश्रीमत व अज्ञान, काबाडकष्ट, नीच मानलेल्या जातीत जन्म अशा विपत्तीत पिचणारा जन्मजात निर्धन या दोघानीही, ज्याने त्याने आपापल्या मगदुराप्रमाणे कमाई करणे हे न्याय्य होय असे सागणे म्हणजे न्यायीपणाची थट्टा होय तुझ्या बापजाद्यानी कमाई केली नाही हे तुझे कमनशीब असा निर्धनाचा अधिक्षेप करणे हे तर तू नाही तुझ्या बापाने शिव्या दिल्या असतील असे प्रवाहाच्या खालच्या भागात पाणी पिणाऱ्या कोकरास वरच्या भागातील वाघोबाने मगरूरीने उत्तर देण्यासारखेच नाही का? अर्थात् बलिष्ठ राष्ट्रानी आधीच गबर होऊन बसल्यावर निर्धन राष्ट्राना

खुल्या व्यापाराचे तत्त्व प्रतिपादन करावे, तसाच प्रकार ज्याने त्याने आप-आपल्या मगदुराप्रमाणे कमाई करावी व ती वारसाहक्काने अखड कायम राखावी आणि तशी ती राखू देणे हेच न्याय्य व समाजधारणेला पोषक होय असे श्रीमतानी प्रतिपादावे, हा होय

असे उघडपणे प्रतिपादन करणाऱ्या बुद्धिवान् पडिताची चालू समाज-घटनेत कधीच उणीव पडत नाही एक तर सत्ताधारी वर्गाने आपल्या सत्तेचा मूलाधार जे धन ते कायमचे आपल्या ताब्यात जेणेकरून राहील अशी समाज-रचना कायम राखण्याचा अखड व अव्याहत प्रयत्न केला असल्याने, हजारो वर्षे चालू असलेली व खाजगी मालमत्तेच्या व वारसाच्या तत्त्वावर उभार-लेली समाजाची विद्यमान घटना ही मृष्टीतील पर्वतसागराप्रमाणे अचल, अनाद्यनत व ईश्वरनिर्मित अशी भासू लागलेली आहे आणि दुसरे म्हणजे विद्यमान समाजघटना बदलण्याचा खटाटोप करण्यापेक्षा तिचे समर्थन केल्याने जीवनयात्रा मुखकर होणारी असल्यामुळे बुद्धिमानाची बुद्धि विद्य-मान घटनेचे समर्थन करण्यातच खर्ची पडत आली तर नवल कसले ? याचे निदर्शक म्हणजे अनक सामाजिक आपत्तीच्या मुळाशी असणारी आर्थिक विषमता ही मनुष्यकृत, परिवर्तनक्षम असताही ती मनुष्याच्या सूकृत-दुष्कृता-वर अधिष्ठित दैवी व सनातन होय असे मत दृढमूल झालेले आहे हे होय ही विचारसरणी जन्मजन्मान्तरीच्या सस्कारानी अत करणात पूर्ण खिळल्या-मुळे, मनुष्याने विकृत समाजघटनाद्वारा स्वत च्या हातानी आपणावर ओढ-वून घेतलेल्या दारिद्र्यादि आपत्ति या आपल्या कर्मविपाकाचे ईश्वरनिर्मित अपरिहार्य असे फल होय. या आपत्ति दूर होणे असल्यास फक्त स्वर्गात होतील, अशा समजुतीने आपल्याच हाताने निर्माण केलेल्या दारिद्र्य, गुलाम-गिरी वगैरे नरकात तो खितपत पडला आहे. -स्थिति अशी आहे की, ईश्वर मनुष्याला जन्मास घालतो तो स्वतत्र प्राणी म्हणून घालतो, पण जन्मास आलेला हा मनुष्य आपल्या हातानी दास्याच्या शृखला निर्माण करून अज्ञानाने त्यानी आपणासच गुलामगिरीच्या आपत्तीत जखडून टाकतो आणि शतकानुशतके तो जखडला गेला म्हणजे आपत्ति हीच प्रकृति व स्वातत्र्य ही विकृति असे मानण्याची त्याची मनोवृत्तीच बनून जाते या ठिकाणी वाचकाला ' आपद. सन्तु न. शश्वत् ' या कुतीच्या उक्तीची ' मरण

प्रकृति शरीरिणा विकृतिर्जीवितमुच्यते बुधै ' या रघुवशातील वसिष्ठाच्या भाषेची व ' ठेविले अनते तैसेचि रहावे ' या तुकोबाच्या वाणीची आठवण साहजिकच होईल

पण ही स्थिति वाजवी नव्हे याची जाणीव मधूनमधून डोकावत असतेच धनाच्या अनावर तृष्णेमुळे समाजात नगा नाच घालणारी जुलुमाची भुते त्याच्या दृष्टीस पडत असतात. गुन्हेगारीच्या बहुतेक प्रकाराची सूत्रे धना-विषयी अतिरिक्त लोभच हलवीत असतो हे त्याला उमगत असते शिवाय तो दैववादी बनून स्वत ची निर्धनता व तज्जन्य विपत्तिपरपरा याविषयी स्वत च्या कर्माम कितीही दोष देत असला तरी समाजरचनेचा एक महत्त्वाचा घटक जो कुटुब त्यात या आपत्ति काही प्रमाणात तरी मनुष्यानेच प्रेमाच्या तत्त्वावर दूर केलेल्या तो पहात असतो अर्थात् सर्व राष्ट्र एक मोठे कुटुब मानल्यास कुटुबातील प्रेमाचे तत्त्व राष्ट्रास लावून हीनदीनाची दु खे का दूर केली जाऊ नयेत अशी शकाही त्याच्या अत:करणापुढे अनेक वेळा उभी राहिल्यावाचून राहात नाही कुटुबात चार भाऊ असले व त्यातला एखादा अपग असला तर आईबाप त्याला, ज्याच्या त्याच्या मगदुराप्रमाणे ज्याने त्याने कमवावे हा नियम लागू करून त्याची हेळसाड तर करीत नाहीतच. पण उलट त्याच्यावर प्रेमाची पाखर घालून त्याला आपल्या अपगत्वाची जाणीव होऊ न देण्याविषयी जपतात खाणेपिणे, कपडालत्ता, वगैरे अत्यावश्यक गोष्टीत इतरापेक्षा त्याचे अधिक लाड पुरवितात व इतर मुले स्वत च्या पायावर उभी राहण्यासारखी असल्यास अपग मुलापुरती विशेष तरतूद करून ठेवतात पूर्वसचितामुळे त्यास अपगत्व प्राप्त झाले असे मानून देखील त्याची मातापितरे ही त्याच्या पूर्वसचिताचा दोष आपल्या प्रेमामृताने जितका धुऊन काढता येईल तितका काढण्याचा प्रयत्न करीत असतात आणि हे त्याचे प्रेम ईश्वरी सूत्राच्या विरुद्ध झगडणे होय असे मानले न जाता त्याचा गौरवच केला जातो तर मग राष्ट्र हे एक मोठे कुटुब व त्यातील शासनसस्था अथवा सरकार हे माता–पितराच्या पूज्य स्थानी का मानू नय ? ' स पिता पितर: तासा केवल जन्महेतव ' हे ध्येय कविकुलगुरु आपणापुढे माडीत आहेच ना ? तर मग या शासनसस्थेने, ज्याने त्याने आपल्या मगदुराप्रमाणे कमवावे व ते कायमचे आपल्या वशजास बहाल

करावे, त्याचे सदैव रक्षण करण्यातच मी आपली सत्ता खर्ची घालीन, ज्याना स्वत च्या कर्तबगारीच्या अभावी किंवा वडिलार्जित निर्धनता व तज्जन्य शिक्षणादि कर्तबगारीचा विकास करणाऱ्या साधनाच्या अभावी जीवनकलहात टिकाव धरता येत नसेल त्याची काळजी वहाण्याचे मला कारण नाही अशी वृत्ति का स्वीकारावी ? उलट राष्ट्रपित्याने असे म्हणावे की, "मूळ बुद्धीचे देणे ईश्वरा हाती त्यातील विषमता नाहीशी करणे हे आपल्या हाती नाही, पण मूळच्या गुणाना योग्य व समान संधि देणे हे सर्वस्वी आपल्या हाती आहे ते तरी आपण करू या मनाला स्वास्थ्य देणाऱ्या अन्नवस्त्र वगैरे प्राथमिक गरजा, व बुद्धीला उत्तेजक अशी शिक्षणादि साधने ही तरी आपण सर्वांना सारखी पुरवू या मग ज्याचा तो!" आणि नतर जरी, कोणाला बुद्धीचे देणे अधिक उज्ज्वल प्रकारचे लाधले असले तरी कुटुबातील मिळविता भाऊ आपल्या कमाईचा उपयोग आपल्या इतर बधूच्या सुख-सोयीकडेही करीत असतो ना ? तसेच बुद्धिवानाने आपल्या बुद्धीचा उपयोग स्वार्थाकडे न करता एकदर समाजाच्या सुखाकडे का करू नये ? निदान समाजरचनेचे ध्येय तरी असेच असले पाहिजे की, ज्यात व्यक्तिस्वार्थाला वाव न मिळता समाजातील बुद्धिशाली व कर्तबगार व्यक्तीचे परिश्रम समाजातील सर्वच व्यक्तीच्या सुखसोयीची अभिवृद्धि होण्यात खर्ची पडावे

आणि असे करण्याने कर्तबगार व्यक्तीच्या स्वत च्या सुखसोयीत काही उणे पडेल असेही नाही कारण परमेश्वरी सृष्टीत 'अनत हस्ते कमलावराने देता किती घेशिल दो कराने' अशी सपत्ति मूळचीच असून, भौतिकशास्त्राच्या प्रगतीने ती म्हण सहस्रश खरी ठरली आहे अमर्याद मालकी-हक्काची आशा सोडल्यास आणि क्रोडो अब्जादि किंवा खर्व निखर्व पैका शस्त्रास्त्रावर व सहारावर उधळला जात आहे तो मानवी सुखसोयीवर पेरता आल्यास अखड मानवी समाजास भरपूर सुखसोयी मिळणें शक्य होत चालले आहे अर्थात् बुद्धिमान् व कर्तबगार व्यक्तीचे व राष्ट्राचे परिश्रम आपल्या स्वत च्या स्वार्थी चैनीत अमर्याद सुखाची भर टाकण्यात खर्च न होता सर्व समाजाच्या सुखसोयीत भर टाकण्याच्या कामी लागावे असेच समाज-रचनेचे ध्येय पाहिजे ना ?

ज्याने त्याने आपआपल्या मगदुराप्रमाणे कमवावे व खर्चावे हे तत्त्व वरवर प्रामाणिक, न्याय्य व सोज्वळ दिसले तरी त्याचे खरे अतरग म्हणजे ' बळी तो कान पिळी ' हे तत्त्वच होय कारण मगदुरी म्हणजे बळीची सत्ता, व तिच्या जोरावर इतराना ढोरासारख राबवून उत्पन्न होईल ती सपत्ति अचानक गट्ट करण्याची कला ही त्याची मर्दुमकी ! अर्थात् हे तत्त्व स्वीकारावयाचे म्हणजे ' बळी तो कान पिळी ' हेच समाजघटनेचे ध्येय असे मानण्यासारखेच होय हे ध्येय उघडपणे मान्य करणे कठीणच आहे अशा प्रकारचे ' जीवो जीवस्य जीवनम् ' हे तत्त्व पशूसृष्टीचे. मात्स्यन्याय हा उत्क्रान्तीच्या कनिष्ठ पायरीवरच्या प्राण्याचा न्याय तोच न्याय आपल्या विवेकशक्तीचा व सस्कृतीचा अभिमान बाळगणाऱ्या मानवी समाजास लागू होय व तोच समाजरचनेचे आद्य तत्त्व होय असे मानणे विचारवतास अशक्यच होते. यामुळे मानवी समाजघटनेतील या ढळढळीत अन्यायाची जाणीव आजवर अनेक विचारवताना झालेली आढळून येते

इतिहासाची दृष्टि जेथवर लाब पोहोचते तेथपर्यंत पाहिले असता असे आढळून येते की, मानवाला भोगाव्या लागणाऱ्या अनत आपत्तीपैकी पुष्कळशा आपत्ति धनलोभ व तन्मूलक सपत्तीची विषम वाटणी याच्या पोटी निर्माण होत असतात, याची जाणीव समाजघटनेचा विचार करणाऱ्या शास्त्रकाराना फार प्राचीन काळीच झालेली आहे प्राचीन काळी समाजघटनेचा अन्तर्भाव धर्माच्या कक्षेतच होत असून धर्माचार्य हेच त्या काळचे समाजशास्त्रज्ञ होत या सर्व धर्माचार्यांनी एकमताने, कठरवाने प्रतिपादिले आहे की समाजातील सर्व अन्याय, आपत्ति व जुलूम याचे आदिकरण म्हणजे कनक व काता त्यातही कनकाचा प्रभाव अधिक ! कारण गुन्हेगारीची प्रवृत्ति घेऊनच जन्माला आलेला प्राणी सोडल्यास कनकाच्या प्रभावाने अमर्याद सत्ता हाती उसळू लागल्याशिवाय काताविषयक प्रमादास माणूस इच्छा असताही धजत नाही म्हणून सर्व धर्मांनी धनलोभाची शक्य तेवढ्या कठोर भाषेत निर्भर्त्सना केली आहे ' अर्थं अनर्थं भावय नित्यम् ' हे सर्व धर्मांचे मुख्य सूत्रच आहे तसेच एका हाती जमलेल्या अमर्याद सपत्तीला पाट जेणेकरून फुटतील अशाप्रकारची व्रतवैकल्ये, धर्मशाळा, अन्नछत्रे वगैरे दानधर्म लावून दिलेले असून सपत्तीच्या सग्रहाचे मुख्य केंद्र जो राजा त्याच्या

बाबतीत सुवर्णतुला वगैरेचे महत्त्व गायिले आहे हिंदुधर्माने तर सर्वश्रेष्ठ अशा चक्रवर्तीने अपार संपत्ति जमल्यावर विश्वजित् नावाचा यज्ञ करून स्वत स फक्त एक मृण्मय पात्र म्हणजे मातीचे मडके ठेवून सर्व संपत्तीचा दानधर्म करावा असे उदात्त ध्येय प्रतिपादिले आहे !

• तसेच संपत्तीची विषमता शिक्षणासारख्या पवित्र कार्याच्या आड येऊ नये हे तत्त्वही गुरुगृही कृष्ण व सुदाम अशा सधन व निर्धन शिष्यानी सारखेच वागावे, दोघानीही पाणी आणणे, लाकूडफाटा गोळा करणे, समिधा व फुले तोडणे ही कामे सारखीच करावीत असे आश्रमाचे दृश्य रंगवून प्रतिपादिले आहे

पाश्चात्यातही प्लेटोसारख्या तत्त्ववेत्याने समाजाची आदर्शभूत घटना कशी असावी याविषयी जो ग्रंथ लिहिला आहे त्यात सांपत्तिक विषमतेचे निर्मूलन करणे यालाच प्राधान्य दिले आहे अर्थात् राष्ट्रातील संपत्ति ही काही मूठभर लोकांच्या जामदारखान्यात कोंडली न जाता तिचा उपयोग सर्वांस खुलेपणाने व्हावा हे तत्त्व नवे नाही, पण पूर्वीच्या काळी ते कृतीत उतरविण्याचा मार्ग म्हणजे धनाधीशाची विनवणी करणे, पापपुण्याची भीति घालणे, दानधर्माचा उपदेश करणे हा होता त्याऐवजी अधिक शास्त्रशुद्ध मार्ग म्हणजे अमर्याद संपत्ति एकत्र साचणार नाही अशी समाजाची घटनाच करणे हाच नाही का ? समाजघटनेचा हा प्रयोग प्रत्यक्ष करून पाहणे खेड्यापाड्यात विखुरलेल्या पूर्वीच्या समाजात कठीण होते यामुळे सत्ताधीशाला उपदेश करण्यापलीकडे आपल्या तत्त्वाला मूर्त स्वरूप त्याना देता आले नाही तथापि समाजनियमनाचे मुख्य साधन जें कायदे ते करण्याचा हक्क राजाच्या व धनवानाच्या हाती न ठेवता एका स्वतंत्र निस्पृह अशा वर्गाच्या हातीं असावा, या वर्गाने लोभाने स्वार्थांधता येऊ नये म्हणून उञ्छ वृत्तीने रहावे व तीन दिवस लागणाऱ्या अन्नापेक्षा अधिकाचा संग्रह करू नये अशी ध्येये तत्कालीन धर्मशास्त्रकारानी समाजातील मनाधीशापुढे मांडण्यात कसूर केली नाही पण नुसत्या उपदेशाने हाती असलेली सर्व सुखसोयींची कामधेनू जी संपत्ति ती कोणी सुखासुखी सोडून देईल अशी कल्पना करणे म्हणजे वाघोबाच्या जबड्यात मान गेलेली शेळी जिवानिशी सुटेल अशी आशा करण्यासारखेच होते पैसा हाती जमा झाला असतां तो टाकून द्या हें सांगणे

व्यर्थ. खरा शास्त्रशुद्ध मार्ग म्हणजे पैसा कोणत्याही विशिष्ट व्यक्तीच्या वा वर्गाच्या मालकीचा होणारच नाही, अशी समाजाची घटनाच बनविणे हा होय. त्यावर जोर न देता उपदेशावर भर दिल्यामुळेंच धर्माचार्यांनी रंगविलेला स्वर्ग पृथ्वीवर अवतरला नाही व प्लेटोच्या अन्तराळातील वसाहतींना भूतलावर खेचण्यास गुरुत्वाकर्षण समर्थ झाले नाही.

पण समाईक मालकी हे ध्येय मनाला पटल्यामुळे ते ध्येय कृतीत उतरविण्याचे प्रयोग थोडया प्रमाणात का होईना पण प्राचीन कालीही करण्यात आलेच याची आठवण जागविली पाहिजे आपल्यातील अविभक्त अथवा समाईक कुटुंबपद्धति हा एक या प्रकारचाच छोटा प्रयत्न होय. कुटुंबातील सर्वच व्यक्तींनी आपआपल्यापरी राबावे, कोणी औत हाकावा, कोणी बाजारहाट करावा, कोणी सावकारी करावी, कोणी देवपूजादि धार्मिक कृत्ये करावी, पण सणावाराचे गोड-धोड अन्न व वस्त्रें-भूषणे सर्वांनी सारखीच उपभोगावी अशी ही पद्धत असे या पद्धतीत कोण किती मिळवितो याचा फारसा हिशेबच नसे ज्याला जें होण्यासारखें असेल ते त्याने करावे, पण एकाच पंक्तीला सगळयांनी जेवावे अशी ही शिस्त असे कुटुंबाच्या पुढची पायरी म्हणजे बलुतेप्रधान गावगाडा ही संस्था होय ही संस्थाही बरीचशी समाईक मालकीच्या तत्त्वावर उभारलेली असे गावात राहणाऱ्या सर्व ग्रामघटकांनी म्हणजे कारू–नारूंनीच नव्हे तर भिक्षेकऱ्यांनीही एकमेकांच्या सर्व गरजा पुरवाव्या, गावच्या ग्रामदेवतांचा उत्सव, विहिरी, सडका, मंदिरें वगैरे सर्वांनी मिळून बांधावी, परचक्राचे सर्वांनी मिळून निवारण करावे व गावचे कारागीर, मल्ल, शाहीर वगैरेचा समाईक अभिमान बाळगावा अशी ग्रामघटना असे

ग्रामाची मोठी राष्ट्रें किंवा महाराष्ट्रें वा साम्राज्ये झाली तेंव्हाही समाईक मालकीचे तत्त्व काही प्रमाणात जीव धरून राहिलेच राष्ट्रें निर्माण झाल्यावर समाईक मालकीची मिळकत शासनसंस्था आपल्या हाती राखू लागली आजच्या तीव्र जीवनकलहाच्या कालीही आपल्या लक्षात न येता अनेक संस्था सरकारी खर्चाने म्हणजेच समाजाच्या समाईक मालकीच्या अशा अस्तित्वात आहेत सार्वजनिक रस्ते, पूल, पाणोठे आणि मोफत रुग्णालयें ही त्याची अगदी ठळक उदाहरणे होत राजरस्त्यावरून कोणीही

हिंडावे, पूलावरून कोणीही नदीपार व्हावे व रुग्णालयात कोणीही औषधोपचार करून घ्यावा आज या वास्तविक सार्वजनिक मालकीच्या सस्थाचा व्हावा तसा सर्वांना उपयोग होत नाही म्हणजे रुग्णालये निर्धनाकरिता असली तरी सधनाचीच तेथे प्रथम दाद घेतली जाते किंवा सार्वजनिक पाणोठे हे सर्वांकरिता असले तरी कोठे कोठे अस्पृश्याना मनाई होत असे हे खरें आहे पण याचे कारण समाईक मालकीचे जे तत्त्व याच्या बुडाशी आहे ते सरसकट धिटाईने लागू करण्यात आलेले नाही हे होय आणि ते करणार तरी कोण ? कारण, समाजाची समाईक मालमत्ता धारण करणारी जी शासनसस्था ती ज्याच्या ताब्यात जाईल तो शिरजोर होतो, लोकाच्या श्रमावर ऐतखाऊपणाने चैन करण्याचा त्याला मोह पडतो व ही चैन अखड कायम जेणेकरून चालेल, इतराना त्यात प्रवेश मिळणार नाही अशा प्रकारच्या कायदेकानूचे कुपण तो आपल्याभोवती निर्माण करीत असतो यामुळेच कुटुबसस्थेत पुरुष शिरजोर होऊन स्त्रियाचा वारसाहक्क त्यानी बुडवून टाकला, ग्रामसघटनेत ग्रामकटक निपजून त्यानी गावगुडी आरभिली व राष्ट्रातील बड्या शासनसस्थानी तर या गावगुडीला मुलुखगिरी, दिग्विजय, सस्कृतिप्रसार अशी सोज्ज्वल नावे देऊन आपल्या आश्रित, मिध्या अथवा अज्ञानी भाटाकडून आपले पोवाडेही रचविले 'दिल्लीवल्लभपाणिपल्लवतले नीत नवीन वय ।' असे अभिमानाने उद्‌गार काढणाऱ्या जगन्नाथ पडिताचे उदाहरण सुप्रसिद्ध आहे !

पण हे पोवाडे कितीही मोठ्याने गाइले जात असले तरी अमर्याद सपत्ति मूठभर लोकाच्या हाती सचित झाल्याने या अमर्याद सपत्तीस वश असलेला सत्तेचा मद, उच्छृखल व पापी सुखलालसा, काबाडकष्ट करणारी अफाट जनता ही केवळ आपल्या सुखमोयीची पैदास करणारी यत्रे असे मानण्याची प्रवृत्ति, व लोकानी शरीर झिजवून निर्माण केलेली सपत्ति ही व्यापार–दिवाळ्याच्या प्रच्छन्न रूपाने किंवा मुलुखगिरीच्या प्रगट रूपाने आपल्या कोठारातून कुजत पडली असता, तेच लोक दुष्काळाने उपाशी मरत असता स्वत वरची जबाबदारी नाकबूल करणारी बेफिकीर वृत्ति वगैरेचा अमगल बदसूर अगदीच बुडून कसा जाणार ? सपत्तीच्या विषम वाटणीचे हे रडगाणे आज शतकानुशतके रडले जात आहे, सपत्तीच्या

विषम वाटणीचा हा प्रयोग प्राचीन काली शास्त्र, कला, तत्त्वज्ञान याच्या वाढीस उपकारकही कसा झाला हे पुढे पाहू पण प्रस्तुत काली सपत्तीच्या विषम वाटणीचे हे स्वरूप इतके भेसूर अवस्थेप्रत प्राप्त झाले आहे की, खाजगी–मालकीप्रधान समाजाची पुनर्घटना अमलात न आली तर सापत्तिक वैषम्य उत्तरोत्तर तीव्रतर होत जाऊन परस्पराविषयी प्रेम, विश्वास व सहकारिता हा जो समाजघटनेचा पाया तोच दुभगला जाईल.

प्रस्तुत काली सापत्तिक वैषम्याला व तज्जन्य अन्याय व दुःखपरपरेला विशेष उग्र स्वरूप प्राप्त होण्याचे कारण म्हणजे प्रस्तुत काळचो आश्चर्यकारक शास्त्रीय प्रगति हे होय ही शास्त्रप्रगति हे चालू कालचे व्यावर्तक असे युग-लक्षणच होय या शास्त्रप्रगतीने मानवी जीवनाच्या हरएक व्यवहारात खळ-बळ उडविलेली असून, सपत्ति अथवा सुखसाधने निर्माण करण्याच्या शक्तीत तर अभूतपूव क्रान्ति करून सोडली आहे जी जमीन नागरावयास पूर्वी शेकडो नागऱ्याना अनेक दिवस खपावे लागत असे तेवढी हजारो एकर जमीन एकटा वाफेचा नागर चारदोन दिवसात नागरू लागला आहे जेवढे सणग विणण्यास साळ्यास हातमागावर महिनाभर खपावे लागे तेवढेच सणग तोच साळी यात्रिक शक्तीच्या मागावर एका दिवसात विण लागला आहे कालवा खणण्याला सध्या जी प्रचड राक्षसी यत्रे वापरली जात आहेत ती पाचपन्नास माणसाच्या साहाय्याने पाच हजार माणसाइतके काम अह-र्निश करीत आहेत. आणि ही कामे करण्याला वाफ व विद्युत् या ज्या दोन प्रचड शक्ति आज उपलब्ध आहेत, त्याच्या जोडीला किबहुना त्यानाही जुन्यापुराण्या व दुर्बल ठरविणारी अशी विराट् शक्ति, सूक्ष्म अदृश्य अशा परमाणूचे विघटन करून हस्तगत करता येईल अशीही सुखस्वप्ने शास्त्रज्ञाना पडू लागली आहेत या प्रचड दाबाखाली परमाणूचे विघटन व पुन-र्घटन करून लोखडाचे सुवर्ण करण्याच्या ज्या परिसाचा ध्यास मनुष्याने शतकानु-शतके घेतला होता तोही, आर्थिक दृष्ट्या नसला तरी, शास्त्रीय दृष्ट्या हस्तगत झालाच आहे आणि खुद्द आजमितीस तर लाकडातून रेशीम, डाबरातून अत्तरे व मुद्दाम लावणी केलेल्या शिपल्यातून कल्चर मोत्ये प्रत्यक्ष मिळू लागली आहेत

पण सपत्ति निर्माण करणारी ही अजस्र साधने सर्व समाजाच्या

सेवेस सादर केली न जाता श्रीमान् सत्ताधीश व्यक्ति वा राष्ट्र याच्या भाडवलात डाबली गेल्याने सपत्तीच्या विषम वाटणीचे स्वरूप आधुनिक शास्त्रीय शोधाच्या पूर्वकाली होते त्यापेक्षा शतपटीनी भेसूर झाले आहे ! पूर्वीच्या कालीही दुष्काळ पडला तर दूधभात का खात नाही म्हणणारे बादशहा व झाडपालाही पोटात कोंबण्यास न मिळाल्यामुळे उपाशी मरणारी रयत, अथवा नवी नवी पक्वान्ने शोधून काढण्यासाठी ग । ॥ म्.।.। हाल करणारे रोमन सम्राट व दळण दळीत असता चुकून पसाभर पीठ पोटात ढकलील म्हणून मुसक्या घालून चक्की पिसणारा गुलाम, असले समाजाच्या अन्याय घटनेचे हृदयद्रावक मासले राजरोसपणे वावरत होतेच आज त्यात शास्त्रीय प्रगतीने अनेक पटीनी भरच टाकली आहे गुलामगिरीची पद्धति उजळ माथ्याने मिरवीत होती तेव्हा गुलामाच्या हातून कामे उठली पाहिजेत या स्वार्थी बुद्धीने तरी गुलामास पोसण्याची जबाबदारी मालकावर पडे, पण यत्रशक्तीच्या प्रभावाने दहा मजुराचे काम एक मजूर करू लागल्याने नऊ मजूर बेकार झाल्यास त्याची पोटापाण्याची व्यवस्था लावण्याची जबाबदारी आज पूर्वीच्या मालकावरही पडत नाही. व शासनसस्थाही सर्वस्वी ती स्वीकारीत नाही यामुळें अन्नान्नदशेस लागलेल्या माणसास तुरुगात अन्न मिळत असल्याने तुरुगवासही सुखकर वाटावा, तसे आजच्या बेकाराना पूर्वीची गुलामगिरी बरी म्हणण्याची पाळी आल्यास नवल नव्हे. यातच भरीस भर म्हणून शहराच्या गलिच्छ, कोंदट व अनीतिप्रेरक वातावरणात सक्तीने राहावयास भाग पडणे हे मिळविले म्हणजे आजच्या खाजगी मालकीच्या समाजघटनेचे विकृत चित्र स्पष्टपणे डोळ्यापुढे उभे राहते हे चित्र पहात असता समाजाच्या घटनेत आमूलाग्र फरक घडवून न आणला तर विद्यमान वैषम्य, अन्याय, असतोष ही वाढत जाऊन सामाजिक जीवनातील रसच नाहीसा होईल, अशी साधार भीति वाटू लागते.

चालू काळ हा अशा रीतीने सक्रमणाचा, पुनर्घटनेचा, युगातराचा काळ होय मानवी सस्कृति आज अनेक शतके एका मार्गाने चालत आली असून आज ती एका नव्या मार्गाच्या देहलीवर उभी आहे. या नव्या मार्गावर प्रवास करावयाचा झाल्यास पूर्वीची साधने निरुपयोगी होत. पूर्वीचा प्रवास खुष्कीवरचा होता असे म्हटले तर येथून पुढचा समुद्रावरचा आहे असे

म्हणावे लागेल. समुद्रावरचा प्रवासही पूर्वीइतकाच किंबहुना अधिकही मनोरम होण्यासारखा आहे, पण त्याला वेगवेगळया डब्यातून माणसे बसणारी आगगाडी निरुपयोगी असून एकाच प्रशम्त दालनात प्रवासी सहभोजन करीत असलेली आगबोट हवी. जुन्या साधनानीच म्हणजे खाजगी मालमत्तेच्या समाजघटनेने पुढचा प्रवास करावयाचा म्हणजे वैषम्याच्या वाढत्या अफाट सागरात उडी घेणेच होय. अशा स्थितीत दोन मार्ग दिसू लागतात एक म्हणजे आलेल्या मार्गाने शक्य तितके परत फिरणे किंवा नवसाधनाचा उपयोग करून दूरत भयाण दिसणाऱ्या सागरावर स्वच्छद आरूढ होणे मानवी सस्कृति आज या नवमार्गाच्या सीमेवर उभी असल्याने या दोन मार्गापैकी कोणता मार्ग स्वीकारावयाचा याचा विचार केल्याशिवाय तिला गत्यतरच नाही

या विचारमग्न स्थितीत एक मनोवृत्ति तिला म्हणते की, "फीर ! मागे फीर ! जोवर सर्व सत्यानाश झाला नाही तोवर मागे फीर ! आज समाजातील वैषम्यनिष्ठ अन्यायाना इतके हिडीस स्वरूप आणले ते या मायिक यात्रिक सुधारणेने हो सुधारणा नसून अधोगति होय हे तू वेळीच ओळखावयास हवे होते परमेश्वराने मनुष्याला दोन हात, दोन पाय दिले तेव्हाच त्याच्या कर्तबगारोला नैसर्गिक अशी मर्यादा घातली ही दैवी मर्यादा उल्लघन मनुष्याने दोन हाताच्या ऐवजी दहा हजार हाताची शक्ति असलेली प्रचड यत्रपिशाच्चे निर्माण केली तेव्हाच आपल्या अधोगतीचा खदक त्याने आपल्या हातानी खणला. आता ही अवाढव्य पिशाच्चे आवरता येत नाहीशी झाली असून ही भूते उठवणारा माणूस वेळीच सावध झाला नाही तर अती ती त्याच्या उरावर बसून हैड्रोजन बाँबसारखी लाखो लोकाचा प्राण घेणारी शस्त्रे वापरून त्याचा सत्यानाश केल्याशिवाय राहणार नाहीत तर वेळ गेली नाही तोच विद्यमान अन्याय-वैषम्याच्या मुळाशी असलेल्या मायावी यत्रशक्तीचा मोह सोड, देवाचे नाव घेऊन फीर माघारी आणि कर सुरू आपला पूर्वीचा साधासुधा आयुष्यक्रम ! "

दुसरी प्रवृत्ति म्हणते, " का उगीच यत्रशक्तीवर दात ओठ खातेस ? यत्रशक्तीने वैषम्याचे स्वरूप तीव्रतर केले येवढेच काय ते, पण वैषम्याचा रोग हा यत्रयुगाच्या पूर्वीच समाजशरीरी ठाणे देऊन बसला होता ना ? मग

यंत्राचा मोह सोडला तरी मूळ रोग कायमच राहणार अर्थात् उपचार करा-वयाचा तर नुसती तीव्र लक्षणे कमी होतील असा न करता मूळ आर्थिक वैषम्यातील रोगबीजच नष्ट होईल असा मूलगामी करणेच अधिक श्रेयस्कर नाही का? शिवाय यंत्रशक्तीने रोगलक्षणे तीव्र केली असली तरी तिचा उपयोग होमिओपाथिक औषधासारखा का करता येऊ नये? या औषधाने मूळ लक्षणे प्रथम किंचित् काल तीव्रतरच होतात, पण त्यानी न घाबरता चिकित्सा चालू ठेवली असता सपूर्ण रोगाचा नाश होतो त्याप्रमाणेच यंत्र-शक्तीने सामाजिक अन्याय अधिक भडकलेले आज आढळत असले तरी कष्टाची व गलिच्छ अशी कामे स्वत उरकून मनुष्याला मुबलक फुरसत मिळवून देण्याचे काम कोणी करणार असेल तरी ती यंत्रशक्तीच ना? शभर माणसाचे काम एकटा माणूस यंत्राच्या सहाय्याने करू लागल्यामुळे वस्तुतः इत-राना काम कमी पडून अधिक स्वास्थ्य लाभावे काय म्हणतेस? स्वास्थ्य कमीच होत चालले आहे! खरे आहे, पण याचे कारण हे स्वास्थ्य सर्व समाजात वाटले न जाता आजच्या खाजगी मालमत्तेच्या काळात काही भाग्यवताच्या पदरी मात्र पडते पण हा दोष यंत्राचा नसून यंत्रशक्तीने भरपूर स्वास्थ्य मिळवून दिले असता ते समाजाच्या ज्या सदोष रचनेमुळे सर्वांत वाटले जात नाही त्या समाजाच्या सदोष रचनेचा होय एखाद्या उदार धनिकाने दान करण्याकरिता मोठी रक्कम आपल्या मुनिमाजवळ द्यावी व त्या मुनिमानें ती मधल्यामध्यें दाबून टाकावी असाच हा प्रकार नाही का? उपमा बदलून असे म्हटले असता अधिक शोभेल की, नदीला पूर आला असता त्याचे कालवे काढून आपल्या जमिनीत सोने पिकवावे त्याऐवजी करटया शेतकऱ्या-ने त्या पुराने आपले शेत वाहून गेलेले पाहून नदीसच दोष द्यावा, तसा प्रकार या यंत्रशक्तीच्या नावे बोटे मोडण्याचा तुझा होय तेव्हा यंत्रशक्तीच्या बागुलबोवाने भिऊन जाऊन परत फिरण्याचा विचार तू सोडून दे"

नवयुगाच्या देहलीवर विचारमग्न उभी असलेली मानवी सस्कृति वरील दोन्ही प्रकारची विचारसरणी ऐकून दुसरीचाच स्वीकार करील यात शका नाही. काही तरी निश्चय हा तिला केलाच पाहिजे. यंत्रशक्तीच्या योगाने खाजगी मालमत्तेने उत्पन्न होणाऱ्या अन्याय-जुलुमाचे स्वरूप इतक्या भडक रीतीने आविष्कृत केले आहे की, मानवी सस्कृतीने एक यंत्रशक्तीला मूठ-

मातो तरी दिली पाहिजे किंवा यंत्रशक्तीचे दोष टाळून तिचे फायदे पदरात पाडून घेता येतील अशी समाजाची पुनर्घटना तरी केली पाहिजे, असा समय प्राप्त झाला आहे आजच्या बाष्पविद्युतादि प्रचंड शक्तींनी चालणाऱ्या यंत्राचा त्याग करण्याचा तिने निश्चय केला तरी ज्याला ज्याला यंत्र म्हणून म्हणता येईल असे लहानसहान जिन्नसही टाकून देऊन वनातील निसर्गनिर्मित कंदमूलफले खाऊन दिगंबरावस्थेत काळ कंठणे मानवी संस्कृतीला आता शक्य नाही, व कोणत्याही दृष्टीने इष्ट नाही असे झाल्यास मानवी संस्कृतीचे मानवत्व नष्ट होऊन तिला पाशवी अवस्था प्राप्त होईल

मानव व मानवेतर प्राणी यातील व्यवच्छेदक रेषा म्हणजे मानवाची यंत्रनिर्माणशक्ति ही होय मनुष्याची सर्व संस्कृति ही त्याच्या यंत्रसामर्थ्यावर आणि त्यामुळे मिळालेल्या निवांत विचारविकासावर उभारलेली आहे अर्थात् यंत्राचा संपूर्ण संन्यास शक्य नाही व युक्त नाही आणि यंत्रे अस्तित्वात आहेत तोपर्यंत ती हितप्रद होणे किंवा अहितप्रद होणे हे ती यंत्रे विशिष्ट व्यक्तीच्या मालकीची असणे वा समाजाच्या मालकीची असणे यावर अवलंबून आहे यामुळे प्रचंड शक्तीने यंत्रे चालणाऱ्या आजच्या कालापूर्वीही खाजगी मालमत्तेच्या सामाजिक घटनेत जुलूम, अन्याय, आपत्ति ही कसा धुमाकूळ घालीत आली आहेत, या धुमाकुळीला धनलोभ व अमर्याद धनसंचयामुळे हाती येणाऱ्या सत्तेचा मद हीच कशी मुख्यत कारणीभूत झालेली आहेत, तसेच ही अन्यायी घटना शतकानुशतके टिकली का व कशी, तिचे स्वरूप बदलण्यासाठी पूर्वीच्या लोकनायकानी कोणते उपाय योजले व योग्य परिस्थितीच्या अभावी ते फलद्रूप का झाले नाहीत आणि आज सामाजिक पुनर्घटनेला अनुकूल असा समय कसा प्राप्त झाला आहे, व ही पुनर्घटना अस्तित्वात आल्यास समाजाचे पाऊल सुखशांतीच्या मार्गावर काही पाऊले तरी पुढे कसे पडेल हे सर्वच डोळ्यापुढे ठेवले पाहिजे

या दृष्टीने पाहू लागले असतः समानतेच्या तत्त्वावर उभारलेल्या समाजघटनेचा पहिला प्रचंड प्रयोग करणारा रशिया आणि त्या प्रयोगातील काही एकांतिक घटनांवर संतापून व्यक्तिस्वातंत्र्याचा व खाजगी मालमत्तेचा उच्चरवाने पुरस्कार करणारी अमेरिका या दोन राष्ट्रांकडे दृष्टि साहजिकच वळते व ही दोन प्रचंड विराट राष्ट्रे एकमेकासमोर दण्ड थोपटीत असता

त्याच्या प्रचड अॅटम् बॉबनी अखिल मानव जात तर नष्ट होणार नाहीना अशा भीतीच्या चमका मानवतेच्या शरिरातून निघत असाव्यात यात नवल काय ? अॅटम् बॉबला हजारो पटीने मागे टाकील असा हायड्रोजन बाब हस्तगत होण्याच्या मार्गावर असून त्याचे प्रयोग झाल्यास अखिल मानवजाती नष्ट वा दुर्बल होणे अशक्य नाही असे आइन्स्टाईनसारख्या युगप्रवर्तक शास्त्रज्ञाने गेल्या वर्षीच नभोवाणीवरून जाहीर केले. पण कोरियन युद्धाचा वणवा पेटल्यावर अमेरिकेत आइन्स्टाईनसारख्याची मुस्कटदाबी झाली आणि रशियाने आपल्याभोवती गुडाळलेला तांबडा पट्टा अधिक घट्ट आवळूनच घेतला. अशा परिस्थितीत भारताने सावधपणे वागणे हेच त्याचे आद्य कर्तव्य होय. ही सावधता त्याला टिकविता येईल की नाही हे भविष्य, काळपुरुषच सागू शकेल. पण ही तटस्थता म्हणजे काळाबाजार उघडपणे नगानाच घालीत असता डोळ्यावर झापड घालून घेणे नव्हे, हे आपला समाज जितक्या लवकर उमगेल तेवढे थोडे ऐतिहासिक जगातील आपले एके काळचे श्रेष्ठ स्थान पुन्हा प्रस्थापित करावयाचे असेल तर 'सर्वेऽत्र सुखिनः सन्तु' हे वैदिक काळापासून कठरवाने माडलेले ध्येय प्रत्यक्ष जीवनात उतरविण्याच्या मार्गावर पुढे पावले टाकण्यास स्वतंत्र भारताने आता कबर कसली पाहिजे

तीन शतकापूर्वी राज्याभिषेक करून घेऊन शिवाजीने आत्मविश्वास जागृत केला आज लोकसत्तेचा पुरस्कार करून स्वतंत्र भारताने त्यापेक्षा एक पाऊल पुढे टाकलेच आहे पण युगमानाची पावले याहीपुढें पडत चाललेली दिसत असता लोकसत्तेच्या स्थानावरच सतुष्ट न होता काळ्या बाजाराच्या काळसर्पाची दती उपटून काढून राष्ट्राची सपत्ति ही व्यक्तीची नसून अखड राष्ट्राची होय या दिशेने पावले टाकण्यास प्रारभ केला पाहिजे. व ती पावले टाकीत असता शक्य तोवर मनमिळाऊ मार्गाने जात असता प्रतिकार अडथळा आणू लागल्यास त्याच्याशी कणखरपणाने वागण्याची तयारीही ठेवली पाहिजे. ज्या निष्ठुर वृत्तीने रशियाने प्रतिगामी शक्तीला ठोकर दिली त्याच पद्धतीने फक्त साम्यवादाकडे जाता येते असे कार्ल मार्क्स हाही प्रतिपादन करीत नाही. जर्मनीने हाकून लावल्यावर मार्क्स हा इंग्लडमध्येच ठाण माडून बसला होता व त्या राष्ट्राची साम्यवादाकडे झुकणारी पावले

पाहून त्याने १८७२ मध्ये हेग येथील परिषदेंत उद्‌गार काढले की ‘ कामगार वर्गाला सत्ता ही केव्हाना केव्हा तरी हस्तगत करावीच लागेल. पण ती करण्याचा मार्ग मात्र एकच असतो असे नाही. इंग्लंड व अमेरिका यांसारख्या देशांमध्यें शांततेच्या मार्गानेंही ध्येय गाठणें अशक्य नाही. ’ शांततेच्या मार्गाने साम्यवादी समाजघटना घडवून आणण्याचा मार्ग अवश्य चोखाळला पाहिजे मात्र शांततेचा मार्ग म्हणजे काळ्याबाजाराकडे हतबुद्ध दृष्टीने पाहणे नव्हे, तर बहुजन समाजामध्यें स्वत्वाची जाणीव उत्पन्न करणे हा होय.

विखुरलेल्या समाजात ही जाणीव जागृत राखणे कठीण असल्याने आजवर समाजात वैषम्य थैमान घालीत आले आहे ते कसे याचाच थोडा आढावा पुढील प्रकरणी घेऊ या

## प्रकरण दुसरें

# अजापुत्राचें बलिदान

मानवाच्या पाठीशी ज्या अनेक विपत्ति हात धुवून लागलेल्या आहेत त्यात माणसाने माणसावरच लादलेल्या आपत्तीची कहाणी फारच करुण आहे. अतिवृष्टि, अनावृष्टि, भूकप, ज्वालामुखी, टोळधाड, रोगराई, वगैरे अनेक नैसर्गिक आपत्ती माणसास ग्रासण्यास तयार आहेतच पण माणसांतील लोभाने त्याच्या स्वत च्याच बाधवावर जाणूनबुजून गुजरलेल्या आपत्ती पाहिल्या म्हणजे या निसर्गनिर्मित आपत्तीहि लाजेने खाली मान घालतील ! अतिवृष्टि अनावृष्टीमुळे दुष्काळ ओढवतो तेव्हा ईश्वरी कोप म्हणून माणूस हतबुद्ध होऊन इद्राची प्रार्थना करीत बसतो पण दामाजीच्या ताब्यात असलेल्या धान्याच्या कोठारासारखी कोठारे गडगज भरली असता ती खुली न करता दुष्काळाने देह टाकणाऱ्या आपल्या बाधवाकडे जेव्हा आसुरी लोभ निर्विकारपणे पाहात बसतो तेव्हा वरून पाहणाऱ्या इद्रालाहि लज्जा वाटत असली पाहिजे. आणि लाज वाटावी अशीच स्थिति आहे. यदा मे १९५१ मध्यें आपण अमेरिकेहून धान्य मागविण्याची खटपट दोन महिने केल्यानतर आता उत्तर गुजराथ किसान परिषद जाहीरपणे सागते की मणाला रु. ३ अधिक भाव मिळाल्यास आपण दशलक्ष मण गहू विकण्यास तयार आहो ! हे दशलक्ष काय आकाशातून पडणार आहेत ? छे ! ते दशलक्ष मण गहू या पुजीपतीनी दडपून टाकले होते ते आतां कुजून फुकट जाऊ नयेत म्हणून बाहेर काढणार आहेत ! लक्षावधि लोक याना मनात शिव्या देत असतील पण या लक्षाधीशाना त्याची काय फिकीर ! भूकप अथवा ज्वालामुखीरूपाने अग्नि मानवाची आहुती कधीमधी घेतो, पण पृथ्वीच्या पाठीवर मानवी समाजात कोठे ना कोठें चालू असलेल्या युद्धात ॲटम् बॉंब उडवून माणूस आपल्या मानवबधूचाच हेतुपुर:सर सहार करीत असतो ते पाहून अग्नीलाही आपल्या दाहक शक्तीचा पश्चात्ताप होत असावा. क्वचित् केव्हातरी टोळधाडीने समग्र पीक उच्छादून जाण्याचा प्रसग शेतकऱ्यावर येत असतो, पण

जबर साऱ्याच्या रूपाने नित्य होत असलेला उच्छाद पाहून टोळानाहि आपल्या सर्वभक्षतेचा संशय उत्पन्न झाला तर नवल काय ? नैसर्गिक आपत्ति त्या नैसर्गिक आपत्तीच ! तेथे कोणाचा इलाजच नसतो त्याची तीव्रता शास्त्रीय ज्ञानाने जेवढी सौम्य करता येईल तेवढी करणे येवढेच मानवाच्या हाती असते. पण साथीने मृत्युमुखी पडणाऱ्या लाख माणसाच्या जोडीला माणूस महायुद्धात दहा लाख माणसे आपण होऊन मृत्युमुखी लोटतो हे पाहिले म्हणजे माणसाला गाजणाऱ्या असुरात मनुष्याने स्वतःच्या हाताने निर्माण केलेल्या भस्मासुराची संख्या केवढी प्रचंड आहे याची कल्पना येईल. या भस्मासुराने विद्यमान समाजरचनेत कसा कहर उडविलेला आहे हे आधी पाहू या या कहराचे स्वरूप जगातील राष्ट्राराष्ट्रात, राष्ट्रातील जाती-जातीत व जातीतील स्त्रीपुरुषात असे सर्वत्र आढळून येते

पैकी लोभांध होऊन एक राष्ट्र दुसऱ्याला कसे लुबाडते किंवा तैमूरलंग, चेंगिझखान, शिकंदर, नेपोलियन, वगैरे रणगाजी सर्व जगाला पादाक्रांत करण्याचा कसा हव्यास बाळगीत व ह्या हव्यासापायी लाखो दीनदुबळी प्रजा क्षुद्र कीटकाप्रमाणे कशी चिरडली जाई हे येथे वर्णन करण्याची आवश्यकता नाही मुलुखगिरी अथवा दिग्विजय हा सत्ताधीशाचा आवडता खेळ नेहमीच असे व आहेही या मुलुखगिरीतील सैनिकावर कशा आणि किती आपत्ती ओढवत याची सत्ताधीशाला क्षितीही नसे मनूचीने औरंगझेबाच्या दक्षिणेतील स्वारांविषयी लिहिले आहे की एकदा साथीने सैन्यातील हजारो माणसे मृत्युमुखी पडली ही बातमी बादशहास कळविली असता बादशहा उद्गारला, ' अशी भयंकर प्राणहानि होत असते तेव्हाच दिग्विजय प्राप्त होत असतो ! ' खुद्द स्वतःच्या सैनिकाविषयी ही बेपर्वाई, मग ज्या प्रदेशातून ही सेनाधाड जात असेल त्या प्रदेशातील दीन रयतेची काय दुर्दशा उडत असेल याची कल्पनाच करावी थोडी कल्पना येण्याकरिता मराठे-मोगलाच्या लढाईत दोन्ही पक्षाकडील रयतांची कशी दुर्दशा उडे याचे खरेशास्त्री यानी केलेले वर्णन पहा.

## तुडविलेली रयत

१७६३ साली मोगल व मराठे यांच्यामध्यें वर्षभर झोंबाझोंबी चाललेली

होतो त्या झोबाझोबीत सामान्य प्रजेची जी दुर्दशा उडे त्याचें वर्णन करताना खरेशास्त्री लिहितात की, ' दक्षिणेत मोठी राज्ये पेशवाई आणि मोगलाई. या दोन राज्यात राहाणाऱ्या कोटयवधी गरीब रयतेची वाताहत, दैना व सहार करण्याकरिता प्रत्यक्ष कलीनेच मोगल व पेशवे या जबरदस्त राजाच्या मनात संचार केला होता व सारा दक्षिणदेश हे एक प्रचड समरागण त्यासाठी तयार केले होते तेथे या दोघाची झोबाझोबी चालू होती व त्याच्या पाया-खाली असख्य अनाथ रयत तुडविली जात होती (सध्या १९५०–५१ साली कोरियातील जनतेची चीन व अमेरिका याचेकडून अशीच ससेहोलपट चालू आहे येवढे जाता जाता आठवून देणे आवश्यक ! ) मोगल दरमजल चालून येत असल्याच्या बातम्या जेव्हा पुणेकराच्या कानी पडू लागल्या तेव्हा त्याची जी त्रेधा उडाली ती काही पुसू नये जितकी जिनगी बरोबर नेववेल तितकी घेऊन ज्यास जिकडे वाट फुटली तिकडे ते पळून गेले कोणी तोरणा, लोह-गड, राजमाची वगैरे घाटबथारीच्या किल्ल्याच्या आश्रयास गेले कोणी माव-ळात जाऊन जागोजाग दडून बसले कोणी घाट उतरून तळकोकणात भटकू लागले खुद्द पुण्यात मोगलानी इतका गोधळ घातला की शहरातील सर्व देवळा-तून जितक्या म्हणून मूर्ति सापडल्या तितक्या मुद्दाम छिन्नविच्छिन्न केल्या. मोठमोठाल्या कित्येक हवेल्या पाडून टाकिल्या व कित्येक पेठांच्या पेठा जाळून टाकिल्या. तोफखान्याचे पानशाचे वाड्यास आग लागली ती नागझरीस येऊन मिळाली पर्वतीचाही विध्वस झाला सातारकडचा एक माहितगार गमाजीबाबा मोगलास मिळाला व त्याने वाई, भोर व नीरथडीचे एकदर गाव लुटून बराच पैका गोळा केला इकडे पेशव्याचे सैन्यही साऱ्या मोगलाईभर धिगाणा घालीत होते त्यामुळे त्या राज्यावरही पुरी साडेसाती ओढवली होती मराठ्यानी या स्वारीत लुटण्याची व जाळण्याची पराकाष्ठा केली, आणि क्रोडो रुपये गोळा केले या खेपेस लुटण्यापेक्षा नासाडी करण्याकडेच त्याचे लक्ष विशेष होते पुण्याची मोगलानी काय दुर्दशा केली हे दादासाहेबा-च्या कानी येताच त्याना पराकाष्ठेचा राग आला व जेथें मोगल असेल तेथे जाऊन त्यास गाठून त्याशी युद्ध करावे हे वारे त्याच्या डोक्यात भरले "

त्या काळी युद्धाची व मुलुखगिरीची टोळधाड केव्हां येईल याचा मुळी नेमच नसे नेहमी जीव मुठीत घेऊनच वावरावयाचे वर्षभर उन्हापावसात

राबून शेते पिकवावी, जनावरापासून व पक्षापासून रक्षण करण्यासाठी रात्रीच्या रात्री आलोचन जागणे करावीत, आणि शेते सोन्यासारखी पिवळी रसरसलेली पाहून समाधानाचा सुस्कारा टाकावा न टाकावा तोच एकाद्या सरदाराच्या लष्करी छावणीची टोळधाड अचानक यावी आणि वर्षभर अत्यंत निगोतीने जोपासना केलेल्या उभ्या पिकाची धूळदाण निमिषार्धांत आपल्या डोळ्यासमोर झालेली पहावयास सापडावी असल्या अनुभवाचा कडवट घोट उभ्या आयुष्यात गिळावा लागला नसेल असा भाग्यवंत अग-दीच दुर्मिळ असे! शत्रूच्या टोळधाडीपासूनच असला उपद्रव होत असे असे नसून ज्याच्या कृपाछत्राखाली रयत विश्वासाने नादत असे त्याच्याकडूनही तो होई, ही विशेष उद्वेगकारक गोष्ट असे

युद्धजन्य आपत्तीचे स्वरूप पूर्वीपेक्षा सौम्य होण्याऐवजी दिवसेंदिवस इतके उग्र होत चालले आहे की युद्धाच्या वणव्याने अखिल मानवजातच होरपळून नष्ट होईल की काय अशीही शंका विचारवंताच्या डोक्यात डोकावू लागली आहे गेल्या दोन महायुद्धात मानव्याचा जो प्रचंड होम झाला, विषारी धूर, व ॲटम्बाँब व इतर आसुरी आयुधे यानी प्राण शिल्लक राहिलेल्याना ज्या नरकयातना भोगाव्या लागल्या त्याची वर्णने सर्वांच्या परिचयाची आहेत सांगावयाचा मुद्दा येवढाच की युद्धाची ही हिडीस व राक्षसी आपत्ति सर्वस्वी माणसाने आपल्या लोभाने आपणावर ओढवून घेतलेली आहे. या लोभाला धिंगाणा घालण्यास क्षेत्र जेणेकरून मिळणार नाही अशी समाजाची पुनर्घटना केली तरच हे संकट टळेल.

## गुलामगिरी

युद्धाची आपत्ति ही नैमित्तिक आपत्ति होय. पण या युद्धातून एक कायम-ची नित्य आपत्ति जी लोभाने निर्माण केली ती तर अधिकच भेसूर होय. ही आपत्ति म्हणजे गुलामगिरी होय. ती आजहि संपूर्ण नष्ट झालेली नाहीं. निर-निराळ्या रूपाने ती वावरते आहे येवढेच

माणसानें स्वहस्तानें आपल्या बांधवावर ओढवून आणलेल्या आपत्तीचें यथार्थ चित्र पहावयाचे असल्यास निरनिराळ्या देशातील गुलामगिरीचें परीक्षण करावे. गुलामगिरीच्या संस्थेबद्दलचे उल्लेख बाबिलोनमधील हमुर-

म्बीचें कोड व हिंदुस्थानातील वैदिक वाङमय ज्या काळी लिहिले गेले त्या कालापासून तहत आजपर्यंतच्या अनेक ग्रथात वावरतात व या सस्थेचा काही अवशेष आजसुद्धा प्रत्यक्ष पहावयास सापडतो खमुरब्बीच्या काळी म्हणजे ख्रिस्तपूर्व तेविसाव्या शतकात बाबिलोनमध्ये गुलामाची खरेदीविक्री चाले, हे खमुरब्बीचे जे कायद्याचे कोड उपलब्ध झाले आहे त्यावरून दिसून येते त्यातील ११८ व्या कलमात असे सागितले आहे की ऋणकोने आपला नोकर धनकोकडे काम करून ऋण फेडण्यासाठी पाठविला असता धनकोने त्यास विकून टाकल्यास कोणासही हरकत करता येणार नाही तसेच ११६ व्या कलमामध्ये सागितले आहे की एकाद्याने धान्य किंवा पैसा कोणाजवळून येणे असल्यामुळें त्यास अडकवून ठेवून मारहाण केल्यास व तो त्यामुळे मरण पावल्यास मृत मनुष्याच्या मालकाने मारहाण करणाऱ्या व्यापाऱ्याला जबाबदार धरावे मृत मनुष्य स्वतत्र मनुष्याचा पुत्र असल्यास त्या व्यापाऱ्याच्या मुलाला ठार मारावा, पण मृत मनुष्य स्वतत्र मनुष्याचा गुलाम असल्यास त्या व्यापाऱ्याने चादीच्या मिनाचा तृतीयाश द्यावा।

युरोपाकडे लक्ष वळविल्यास गुलामगिरीचे खरे उग्र स्वरूप लक्षांत येते. ग्रीसचा जुना इतिहास पाहिल्यास त्या देशात एकदर लोकसख्येचा फार मोठा भाग दास्यात डाबून टाकलेला आढळून येतो ख्रिस्ती शकापूर्वी चौथ्या शतकात केलेली खानेसुमारी उपलब्ध आहे त्यावरून त्या काळी नागरिकाची सख्या २१ हजार, परकीयाची १० हजार आणि गुलामाची ४ लाख आढळते। युद्धात जिकलेल्या कैद्याना गुलाम म्हणून वागविण्याची पद्धत पूर्वी सर्व देशात जारी होती. हीच पद्धत ग्रीसमधील त्या प्रचड सख्येच्या मुळाशी होती स्पार्टासारखे काही ग्रीक समाज तर सर्वस्वी लष्करी पेशाचे असत, व मर्दुमकीच्या कामाशिवाय बाकीची सर्व कामें ते गुलामाकडून करून घेत. युद्धांतील कैद्याना गुलाम करण्याची पद्धति ग्रीकेतरांनाच तेवढी लागू नसून ग्रीक सस्थाने आपापसात लढून एकमेकांनाहि दास्यत्वात काळ कठावयास लावीत गुलामगिरीची ही पद्धति अरिस्टॉटलसारख्या प्रज्ञावतालाहि त्या काली स्वाभाविक वाटली सेंट पॉल या ख्रिस्ती सतानेंही गुलामगिरी नैसर्गिक आहे असेच मत दिले आहे. युद्धाप्रमाणेच चाचेगिरी म्हणजे समुद्रावरून व किनाऱ्यावरून लोकाना पकडून पळवून नेणे व परराज्यात नेऊन विकणे

यामुळेहि गुलामाच्या सख्येत भर पडे अशा लोकाच्या तडाख्यात सापडून कोण केव्हा गुलामगिरीत पडेल याचा काहीच नियम नसे. इग्लडमधील दुसरा चार्लस राजा चाचेगिरीला फूस देऊन त्याच्याकडून पैसे उपटीत असे दास्यत्व येण्याचे आणखी एक कारण म्हणजे कर्जाचा बोजा वाढवून दरिद्री ऋणकोस सपन्न सावकारास स्वत ला विकावे लागे हे होय

शिवाय परप्रातातून गुलाम आणून विकण्याचा राजरोस व्यापारहि चाले. सायप्रस, सॅमॉस वगैरे ठिकाणी अशा गुलामाच्या विक्रीचे बाजार भरत. या बाजारात ईजिप्त, इथिओपिया या देशातून गुलाम आणून विकले जात. मात्र या सर्वांपेक्षा आशियातून आणलेल्या गुलामाना ते आज्ञाधारक व कला-कौशल्यात निपुण असल्यामुळे फार मोठी मागणी असे पण त्याची किंमत किती ? तर घोड्याला १०० तर गुलामाला ३८ ! गुलामाची सख्या फार मोठी असल्याने प्रत्येक मालकाचे गुलाम ओळखता यावे म्हणून त्यांच्या कपाळावर निळ्या किंवा तांबड्या रगाने मालकाचे नाव गोदवीत. ब्रिटन-मधील चाल तर याहीपेक्षा रानटीपणाची होती ती म्हणजे कुत्र्याच्या माने-भोवती पट्टा असतो तसा गुलामाच्या मानेभोवती धातूचा पट्टा मालक अडकवीत, त्या पट्ट्याची पुढची टोके पक्की झाळून टाकीत व त्यावर मालकाचे नाव कोरीत !

पुढे पुढे मात्र ग्रीसमध्यें गुलामाना काही सवलती मिळाल्या. पहिली सवलत म्हणजे त्याना खाजगी मिळकत करण्याची सवड मिळाली व पैसे देऊन गुलामगिरीतून स्वत.स मुक्त करून घेण्याचा अधिकार त्याना मिळाला.

रोममध्ये गुलामगिरीचे स्वरूप अधिकच हिडीस आढळते त्यांची सख्याहि प्राचीन रोममध्ये प्रचड असे क्लॉडिअस राजाच्या कारकिर्दीत इटलीमध्ये एकदर गुलामाची सख्या २ कोटीवर होती असे इतिहास सागतो रोमचे साम्राज्य जसजसे वाढत गेले तसतसे प्रत्येक लढाईमध्ये हजारो कैदी गुलाम म्हणून आणले जाऊ लागले. रोमन लोकानी टचूटन लोकाना जिंकले तेव्हा ९० हजार व सिब्री लोकाना जिंकले तेव्हा ६० हजार गुलाम विक-ण्यात आले. सीझरनें गॉलमध्ये एका वेळी ६३ हजार कैदी गुलाम म्हणून विकले व एमिलियस् पॉलनें एपायरस्मध्यें दीड लाख कैद्यांचा व्यापार केला असे इतिहासकार गिबन सागतो गुलामाचा एवढा प्रचड माल उपलब्ध

असल्यामुळे गुलाम थोडया किमतीस मिळे व सामान्य नागरिकासही क्षुल्लक हरएक कामासाठी गुलाम ठेवता येत. रियासतकार गिबनने कोष्टक दिले आहे कीं एक लष्करी घोडा तीन गुलामाच्या किमतीबरोबर विकला जाई यावरून गुलामाच्या किमतीची कल्पना येईल ही किंमत म[illegible] तीन शिलिंगा-इतकी असे प्रसिद्ध होरेस कवी हा गरीब नागरिक होता तरीहि त्याला जेव-ताना चार गुलाम दिमतीस लागत ऑगस्टस्च्या कारकिर्दीत एका इसमा-च्या मृत्युपत्रात आपल्या वारसास मिळावयाच्या अनेक जिनसात गुलाम मिळावे म्हणन लिहिलेले आहे व त्याची सख्या ४११६ अशी दिली आहे !

'मोठमोठ्या उमरावाच्या जवळ गुलामाची येवढी मोठी सख्या असे की त्यांच्या जन्ममृत्यूची आणि खरेदीविक्रीची नोद ठेवण्यास स्वतत्र काम-गारच लागत ! सर्वच कामे गुलामानी करावयाची अशी पद्धत होती निर-निराळ्या कामाकरिता निरनिराळ्या देशचे गुलाम मुद्दाम निवडण्यात येत आफ्रिकन गुलामाना पालखीपुढे धावावे लागे व धिप्पाड जर्मन गुलामांना द्वद्वयुद्धात प्राण अर्पण करून लोकाची करमणूक करावी लागे !! गुलामाची सख्या फार मोठी असल्यामुळे बडया लोकाच्या घरी तर त्याच्या घरची सर्व कामे गुलामानी वाटून घेतलेली असत पाहुण्यास दार उघडण्यास चाकर निराळा, वर्दी देण्यास चाकर निराळा, आत नेण्यास निराळा, पडदा बाजूस सारण्यास निराळा, जेवण्याची ताटे आणणारा निराळा, अन्नाची चव आधी घेणारा निराळा '

हजारो गुलाम पदरी असल्याने इष्टमित्राना व राजाला नजराणे म्हणून सुदर दासदासी नजर करण्याचाही प्रघात होता गिबन सागतो की हा लुस-लुशित नजराणा एका ठिकाणाहून दुसरीकडे पाठविताना उन्हाच्या तिरपीने काळवडू नये म्हणून या दासदासीच्या तोडाना मुद्दाम तयार केलेल्या औषधाचें रोगण फाशीत. असल्या सुदर व भोग्य वस्तु म्हणून उपयुक्त असलेल्या दास-दासीचीच काय ती निगा राखली जाई.

## गुलाम कीं गुरेंढोरें ?

इतर सामान्य गुलामाच्या स्थितीचे वर्णन कोणत्या शब्दानी करावें ? कायद्याचें सरक्षण प्रथम प्रथम तरी त्यांना कोणत्याही प्रकारचे नसे कायदा

च्या कोडात त्याचा उल्लेख आला तर येवढ्याचकरिता येई की एकादा गुलाम पळून गेल्यास त्याला पकडता यावा व शिक्षा ठोठावता यावी. गुलाम पळून गेल्यास ओळखता यावा म्हणून त्याला तापलेल्या साडसाने डाग देण्याचीही चाल होती. गुलामाच्या व गुराच्या स्थितीत काहीमात्र फरक नव्हता गुलामाना रहाण्यास जागा असे ती गोठ्याच्याच तोडीची ! नाठाळ जनावराच्या गळ्यात लोढणे घालतात तसे मगरूर गुलामाच्या हातापायात अहर्निश बेड्या घालीत, काम कसून करून घेण्याकरिता गुराना आसुडाचे फटकारे लगावीत तसे गुलामानासुद्धा लगावीत, आणि गुरामधील व गुलामांमधील हे साम्य पुरे करण्याकरताच की काय मळणीच्या वेळी गुराच्या तोंडाला मुसक्या घालतात त्याप्रमाणे धान्य दळीत असलेल्या गुलामाच्या तोंडाला मुसक्या घालीत !! गुराची अवलाद निपजविण्याच्या बाबतीत असे प्रयोग केले जात तसे गुलामाची अवलाद भरपूर व सशक्त मिळावी म्हणून प्रयोग केले जात त्याना शिक्षा द्यावयाची तीही बेगुमान क्षुल्लक अपराधाकरिताहि घरातील गुप्त तळघरात त्याना उपाशी ठेवले जाई मालकाच्या मगरूरपणाविषयी गिबनने एमिएन्सचा अभिप्राय उद्धृत केला आहे की 'धन्याने पाण्याचे भांडे मागितले आणि गुलामाने तें आणून देण्यास पळाचाही विलंब झाला की त्याच्या पाठीवर तीनशे फटके तेव्हाच उडत धनी रथात बसून दौडत चालला म्हणजे असंख्य गुलामाना रथाच्यापुढे धापा टाकीत पडत झडत सारखे दौडावे लागे अशा वेळी त्यातला एकादा गुलाम रथाच्याखाली चिरडून मेला तरी त्याकडे कोणी ढुकूनही पाहात नसे ! '

गुलाम लोक असल्या नरकमय स्थितीत खितपत असता त्याच्या डोळ्यासमोर वावरणारे अमीरउमराव ज्या ऐषआरामात लोळत तो पाहून तर गुलामाना काय वाटत असेल याची कल्पनाच करा गिबनने रोमन ऐषआरामाचे वर्णन अनेक ठिकाणी केले आहे. उमरावाचे पोशाख एकजात रेशमी असत पण यातील खरी खोच लक्षात येण्यास हे सांगितले पाहिजे कीं रेशीम त्या काळी इतके कमालीचे महाग असे की तें सोन्याच्या भारभार विकले जाई एलागाबालस् ह्या बादशहास दासी बाळगण्याचे वेड होतें व मठातील एका जोगिणीशीहि त्याने जुलुमाने लग्न केले होते. त्याचें जिव्हालौल्य येवढं जबर होते की नवनवी पक्वान्नें शोधून काढण्याकरितां

खास तज्ज्ञाची नेमणूक केलेली असे. नवे पक्वान्न पसत न पडले तर ते पसत होईल अशी सुधारणा करीपर्यंत शोधकास उपाशी कोंडून ठेवण्यात येई! थिओडोडिअस्च्या कारकिर्दीतील अमीरउमरावाच्या ऐश्वर्याचे वर्णन करताना गिबन म्हणतो की, येथे कवीची कल्पनासुद्धा थिटी पडेल रोममध्ये उमरावाचे १७८० प्रासाद होते प्रत्येक प्रासाद इतका विस्तीर्ण व सुखसोयींनी समृद्ध असे की त्याला एक स्वतत्र नगरच म्हटले तरी चालेल त्यात हिपोड्रोमस, पोर्टिको, स्नानगृहे, वगैरे सर्व साधने विपुल असत. एखाद्याला प्रीटरचा अधिकार मिळाला म्हणजे तत्प्रीत्यर्थ उत्सवानदात लाखो पौंडाची चदी उडत असे. जमीनजुमला एवढा विस्तीर्ण असे की, सेनेका सागतो, देशाच्या सरहद्दी म्हणून समजल्या गेलेल्या नद्या सध्या रोमन उमरावाच्या जमिनीतून वाहात आहेत खुद्द सेनेकानेच तीन लाख पौंड लोकास कर्जाऊ दिले होते

तोंड मोकळे सोडले तर चार दाणे अधिक खर्च होतील म्हणून गुलामाना मुसक्या घालीत आणि नवी पक्वान्ने शोधून काढण्याकरिता पगारी तज्ज्ञ नेमीत असे हे भीषण वैषम्य उघडपणे नगा नाच घाली! इकडे गुलामांच्या लग्नावरही कर बसविला होता आणि तिकडे उमराव वेश्येच्या पायी लाखो रुपये उधळीत आपल्या मृच्छकटिकातील वसतसेनेच्या राजवाड्याचे वैभव पाहून डोळे दिपणाऱ्या मैत्रेयाचे वर्णन हे निव्वळ कविकाव्य नव्हे बुद्धग्रथातील प्रसिद्ध धन्वतरी जो जीवक त्याची आई सालवती ही वेश्या असून एका रात्रीकरिता शभर सुवर्णमुद्रा घेत असे असा उल्लेख आहे हिरोडोटस् सागतो की, ग्रीक वेश्या होडोपिस ही ईजिप्तमध्ये जाऊन इतकी श्रीमत झाली की तिच्या पैशाने एक पिरॅमिड बाधला गेला असा प्रवाद आहे

ऐषआरामात अहर्निश लोळणाऱ्या या बड्या उमरावाकडे पाहून गोठ्यात कोंडल्या गेलेल्या गुलामाना काय वाटत असेल याची कल्पनाच करावी. पण त्याची कल्पना त्यावेळच्या बुद्धिवानानाही झालेली नव्हती. किंबहुना गुलामगिरीची सस्था समाजाच्या इतकी हाडीमासी खिळली होती कीं प्लेटोच्या आदर्शभूत समाजातहि तिचे स्थान अढळ होते, व अरिस्टॉटलने तर गुलामगिरीची सस्था ही निसर्गनिर्मित होय असा आपला अभिप्राय दिला होता.

## शेतांत राबणारा गुलाम

रोमन साम्राज्याला उतरती कळा लागल्यावर या प्राचीनकालीन गुलाम-गिरीचे उग्र स्वरूप नष्ट होऊन त्याच्याऐवजी कृषिदासपद्धति सुरू झाली म्हणजे पूर्वीच्या गुलामाना आता खडाने शेती करता येऊ लागली. पण त्याची गुलामगिरी पूर्ण नष्ट झाली नाही. याचे कारण असे की या खडकरी शेत-कऱ्यावर जी बधने घालण्यात आली ती अशी होती की त्यात पूर्वीच्या गुलामगिरीचेच प्रच्छन्न स्वरूप होते पहिली अट म्हणजे कुळाला जो जमीन एकदा खडाने देण्यात आली तीच त्याने जन्मभर कसली पाहिजे. एका मालकाची जमीन सोडून दुसऱ्या मालकाचा खड घेण्याची त्यास स्वतत्रता नव्हती दुसरी अट म्हणजे दुसऱ्या जमीनदाराच्या कुळाशी त्याने सोयरीकही करता कामा नये आणि तिसरी म्हणजे मालकाला जमीन विकावयाची लहर आली म्हणजे जमिनीवरील झाडें-झडोरा, शेतीचे बैल-औते, याच्याबरोबर जमीन कसणाऱ्या कूळाचे सबध कूळही विकले जाई ! जमीन कसणारे कूळ ही जमिनदाराची मालमत्ता समजली जाई जमिनीवरील झाडें, विहीरी, यांच्या-प्रमाणे कुळ ही एक स्थावर मालमत्ता मानली जाई तथापि या पद्धतींत पूर्वीच्या उत्तान गुलामगिरीतील मारहाणीचा प्रकार बद पडला. पुढें दहाव्या अकराव्या शतकात क्रुसेड्स् नावाची धर्मयुद्धे उपस्थित झाली त्यात ही प्रच्छन्न गुलामगिरीही नष्ट झाली व युरोपात गुलामसस्था काही काळ स्मृति-शेष झाली म्हटले तरी चालेल.

## गुलामगिरीचा नवा हैदोस

पण दोन तीन शतके गाडून टाकलेले हे भूत अगदी अभाविनपणे पधराव्या शतकात पुन्हा मोकळे सुटले ! आणि दोन तीन शतके गाडलें गेल्याचा सूड म्हणूनच की काय इतक्या भीषण व निर्घृण तऱ्हेने ताडवनृत्य करू लागलें की पूर्वीच्या रोमनकालीन गुलामगिरीनेहि गर्भगळित व्हावे ! ! हा वेताळ एकदम जागा होण्याचे कारण म्हणजे अमेरिका खडाचा शोध हे होय ! अमेरिका खडाच्या शोधाने जगाच्या उलाढालीत जे कित्येक फरक घडवून आणले त्यात या गुलामगिरीच्या वेताळाला जागे केले, हा एक महत्त्वाचा होय. स्थिति अशी की अमेरिकेसारखा प्रचंड सुपीक देश हाती आलेला पाह-

ताच भरपूर व स्वस्त मजूर मिळाल्यास या देशातून अगणित संपत्ति लुटता येईल या कल्पनेने गोऱ्या वसाहतवाल्यांचे डोळे फाटून गेले, व आसुरी धनतृष्णेला बळी पडून गुलामदेवतेची त्यानी पुनश्च अराधना केली, व तिला संतुष्ट करण्याकरिता तिच्यापुढे लाखो बळी दिले ! या नव्या गुलामगिरीपासून मिळणारा फायदा येवढा अफाट होता की पायघोळ झगे घालणारे जे पाद्रीबुवा पूर्वी गुलामगिरीच्या विसर्जनप्रसंगी मंत्र म्हणण्यास व गुलामगिरी नष्ट केल्याचे श्रेय घेण्यास हजर होते, तेच पायघोळ संत या आवाहनप्रसंगी आपल्या भक्तगणास आपल्या व्यापारात बरकत येवो म्हणून आशीर्वाद देण्यास हजर होते !

अमेरिकेत पाहिजे असणाऱ्या गुलामाची खाण स्पॅनिश व्यापाऱ्याना आफ्रिकेत सापडली. या खाणीतील माल म्हणजे निग्रो ! खाण म्हटले खरे पण खाणीमधील निर्जीव मालालाही अधिक हलक्या हाताने वागविले जात असेल, अशा क्रूरतेने या जिवंत मालाची व्यवस्था करण्यात येई निग्रोंना पकडण्याची रीत ही तर व्याघ्र सिंहादि हिंस्रपशूंना पकडण्याच्या रीतीपेक्षाही क्रूर होती म्हणजे अशी की ज्या खेड्यात निग्रो राहात त्या खेड्यावर अचानक छापा घालून त्यांच्या खोपटांना सरसकट आग लावून द्यावयाची या आगीच्या डोंबात काही निग्रो जागच्या जागीच होरपळून जात बाकीचे जीव बचावण्याकरिता धावू लागले म्हणजे सशस्त्र नरपशूंकडून त्याना पकडावयाचे पकडीत असतानाही झटपटीमुळे काही तेथेच मरत उरल्यासुरल्यांना अर्धनग्न स्थितींतच जहाजात कोंबीत थंडीवाऱ्याची कसल्याही प्रकारची तरतूद नसल्याने या व्यापारी मालापैकी जहाजावर वाटेतच काही माल नासून जाई व त्याला समुद्रात फेकून द्यावा लागे ! अशा रीतीने शेकडा वीस पंचवीस टक्के नष्ट झाल्यावर बाकीचे गुलाम बाजारात मांडले जात. विक्रीचा प्रकार गुरांच्या विक्रीप्रमाणेच चाले. ते विकत घेताना घोड्याप्रमाणे त्यांच्या तोंडातील दांत व सांधे तपासून मालक घेई. इतकी खबरदारी घेतली तरी अमेरिकेचे हवापाणी न मानवल्यामुळे तेथें गेल्यावर शे ३० मृत्युमुखी पडत. असे असले तरी या निग्रो गुलामाची काम करण्याची शक्ति अजब असल्याने ते एकंदरीने फार स्वस्त पडत व गुलामाचा व्यापार करणाऱ्या कंपन्यानाही भरपूर नफा मिळे.

हा व्यापार सतराव्या अठराव्या शतकात इतका किफायतशीर होऊ

लागला की सर्व युरोपियन राष्ट्रांमध्यें या बाबतीत चुरस लागून गुलामांची व्यापारपेठ काबीज करण्याकरिता युद्धेंहि झाली. इंग्लंडच्या इतिहासांत ऑस्ट्रियन वारसाचे युद्ध व सप्तवार्षिक युद्ध म्हणून जी नावे आढळतात त्या युद्धांना खरी नावे द्यावयाची म्हणजे 'गुलाम–व्यापार युद्धे' म्हणणेच योग्य होय! वरपांगी काहीतरी दिखाऊ कारण दाखविले जाते व इतिहासकार युद्धांना ओंगळ नावे देऊं इच्छित नाहीत ही गोष्ट वेगळी!

हा व्यापार केवढ्या मोठ्या प्रमाणावर चाले याविषयी ज्ञानकोशांत काही आकडे दिले आहेत त्यावरून असे दिसते की १७९० मध्ये एलिझा-बेथ राणीच्या नावाने वसविलेल्या व्हर्जिनिया नावाच्या एकट्या वसाहतीत गुलामांची संख्या दोन लाख होती १६८० ते १७०० या वीस वर्षांच्या दरम्यान तीन लाख गुलाम विकले गेले सालोसालच्या या मानवी मालाच्या व्यापाराकडे पाहिले तर दरसाली इंग्रजांनी ३८ हजार, फ्रेंचांनी २० हजार, डचांनी ४ हजार, डेन्सांनी २ हजार व पोर्तुगीजांनी १० हजार असे निग्रो गुलाम आफ्रिकेतून पकडून आणून अमेरिकेत विकण्याचा सपाटा सुरू केला होता हवापाण्यामुळें निग्रो स्त्रिया लवकरच राम म्हणत यामुळे पुरुषापेक्षा स्त्रियांची संख्या कमी होई. उदाहरणार्थ, जमेकामध्यें १७८९साली स्त्रियांपेक्षा पुरुष निग्रोंची संख्या तीस हजाराने जास्त होती यामुळें निग्रोंचे नवीन पीक जितके यावयास पाहिजे तितके येत नसे! अर्थात् दरसाल आफ्रिकेहून नवे निग्रो आणणे जरूर पडे. इ. स. १७१३ मधील युट्रेक्ट तहाने इंग्लंडने गुलाम-गिरीचा मक्ता मिळविला.

पण या निग्रो गुलामगिरीचे भीषण चित्र पहावयाचे असल्यास अमे-रिकेकडेच वळले पाहिजे असे टॉनबी स्पष्टपणे सांगतो (स्टडी ऑफ हिस्टरी खंड १; पृ २१२) आणि एका अमेरिकन स्त्रीवर बलात्कार केल्याबद्दल सात निग्रोंना फाशी दिल्याचे व निग्रोंचे घर जाळल्याचे सध्याही आपण वर्तमानपत्रांत वाचतोच ना?

गोऱ्या वसाहतवाल्यांच्या संख्येत व नीग्रोंच्या संख्येंत केवढें अंतर असे हे सेंट डॉमिंगो नावाच्या फ्रेंच वसाहतीतील १७९१ सालच्या संख्येवरून दिसून येते. त्या साली गोऱ्या लोकांची संख्या ३० हजार, त्यांच्या लेकावळ्यांची संख्या २४ हजार व गुरांपेक्षाही अधिक काबाडकष्ट करणाऱ्या निग्रोंची

संख्या ४ लाख ८० हजार होती म्हणजे प्रत्येक मालकाजवळ गुलामाची खिल्लारेच्या खिल्लारे असत म्हणा ना ! अठराव्या शतकाच्या अतापर्यंत हा व्यापार इतका किफायतशीर होता की, १७८८ पासून १८०६ पर्यंत हा व्यापार बद करण्याची बिले ब्रिटिश पार्लमेंटमध्यें अनेक वेळा फेटाळली गेली. एकोणिसाव्या शतकात यत्रशक्तीची वाढ झाल्यामुळे गुलामाच्या कैवाऱ्याचा जय होऊन युरोपियन राष्ट्रानी हा व्यापार कायद्याने बद केला पण खुद्द अमेरिकेतील वसाहतवाल्याना गुलामाकडून कामे करून घेण्याची इतकी चटक लागली होती की तेथे गुलामगिरीच्या पद्धतीला मूठमाती देण्यासाठी आपापसात युद्ध पुकारण्यापर्यंत मजल गेली व शेवटी गुलामगिरी ही कायद्याने रद्द ठरविली गेली ती १८६५ मध्ये

## गुलामगिरीचा नवा प्रकार

तथापि जगाच्या पाठीवरील गुलामगिरी अद्यापहि नष्ट झालेली नाही. परकीय लोकाना धरून आणून त्याच्याकडून जुलूमजबरदस्तीने मन मानेल तसे काम करून घेऊन अफाट नफा उकळण्याची आसुरी वृत्ति मानवी स्वभावात इतकी खोल रुजलेली आहे की ती एका दाराने गुलामगिरीला बाहेर हाकून लावीत असता त्याच वेळी दुसऱ्या दाराने बुरखा घालून तिला आत आणण्याचा प्रयत्न नेहमी करीत असते गुलामगिरीचे शव एकीकडे पुरले जात असतानाच त्यातून निघालेला प्राण दुसऱ्या कुडीत शिरून पहिलीचा दफनविधि पाहण्यास हजर ! ही नवी गुलामगिरी हिंदू लोकाना महात्मा गाधींच्या दक्षिण आफ्रिकेतील सत्याग्रहाच्या इतिहासावरून परिचितच आहे. तिला गुलामगिरी असे ओगळ हिडीस नाव नसून ' मुदतबदीची मजूरपद्धती ' असे सोवळे नाव देण्यात आले होते ! आता जुन्या गुलामगिरीइतकी ही पद्धति हिडिस नाही कारण ह्या पद्धतीप्रमाणे काम करून घेण्याला कालमर्यादा आहे व कायद्याने मालकावर अनेक नियत्रणेही आहेत पण या करारबद्ध मजूरपद्धतीस प्रच्छन्न गुलाम म्हणण्याचे कारण कायद्याने मालकावर घातलेली नियत्रणे कायद्याच्या कोडातून व्यवहारांत उतरत नाहीत हें होय. कराराच्या मुदतींत मजुरास स्वातत्र्य नसून तो मालकाची केवळ मालमत्ता समजला जातो. आणि कित्येक वेळा मुदतीनतरहि खोटे हिशेब,

कर्जबाजारीपणा वगैरेनी दीर्घकाल जखडला जातो. करार सपल्यावर शेकडा पाच मजूरसुद्धा पुन्हा कराराने बाधले जाण्यास तयार असत नाहीत यावरून त्याच्या स्थितीची कल्पना येईल करार-मुदतीनतर ते तेथे स्थायिक होऊ लागले तर जबर डोईपट्टी बसविणे, त्याची लग्ने बेकायदेशीर ठरविणे वगैरे प्रकारानी त्याची कुचबणा सुरू होते कराराच्या मुदतीत तर मजुरावर होणाऱ्या जुलुमाची दाद क्वचितच लागते.

फार जुनी हकीगत नव्हे १९०७ साली एका रेल्वे बाधणाऱ्या कपनीने नेटलमधील करारमुक्त हिंदू मजुराना भरपूर पैशाची लालूच दाखवून हिंदुस्थान सरकारच्या अनुमतीने नेटल सरकारच्या नजरेखाली दोन वर्षाचा करार करून दोन हजारावर मजूर रेल्वेकामाकरिता नेले हे मजूर करारमुक्त असले तरी नावाचेच स्वतत्र होते. कारण नेटल सरकारने वार्षिक तीन पौंडाची पट्टी बसविलेली होती ती थकल्याने ते पेचातच होते यामुळे ते पुन्हा दोन वर्षे कराराने स्वातत्र्य विकण्यास तयार झाले ! नतर रेल्वे कपनीने या मजुराना अशा निर्दय रीतीने वागविले की एका वर्षाच्या आत शेकडोनीं मृत्यूची वाट धरली व शेकडो पळून गेले. शिवाय कपनीने करार पाळला नाही तो नाहीच ! वर्षाच्या शेवटी दोन वर्षांचा करार धाब्यावर बसवून व परत नेटलमध्ये आणून सोडण्याच्या अटीला सोडचिठ्ठी देऊन कपनीने मजुराना कामावरून बडतर्फ करून हाकून लावले येवढ्यानेच त्याची दुर्दशा सपली नाही बेकार झालेले मजूर परत नेटलमध्ये येऊ लागले तेव्हा नेटल सरकारास त्याचे आगमन इष्ट वाटत नसल्याने कायद्याचा कीस काढून त्या सर्व बेकार मजुराना जबरदस्तीने बोटीवर चढवून हिंदुस्थानात पाठविण्यात आले. रेल्वे कपनीच्या कामावर जाताना पुष्कळानी आपलीं बायकामुले नेटलमध्येंच ठेवली होती. त्याना बरोबर घेण्याचीही किंवा भेटण्याचीही सवड या मजुराना देण्यात आली नाही. आणि हा इतका प्रकार घडला असता साम्राज्य सरकारने किंवा हिंदुस्थानातील इग्रज सरकारने या बाबतीत नुसती चौकशीही केली नाही ! मग रेल्वे कपनीला जाब विचारणे किंवा शिक्षा करणे तर दूरच ! !

कराराची मुदत चालू असतां या मजुराना किंवा गुलामावा आसुरी स्वार्थ व पापी द्रव्यलालसा कशी वागविते ह्याचा नमुना म्हणून युरोपियन कपन्या-

तील सिलोनमधील मजुराची स्थिति पाहू या हिंदुस्थानच्या पायथ्याशींच असलेल्या सिलोनमध्यें रबराच्या व चहाच्या मळ्यात गोरे मळेवाले हिंदुस्थानांतून पुष्कळ मजूर नेत असत तेथील मजुराची स्थिति प्रत्यक्ष डोळ्यानी पाहून त्याविषयी कुरुमुलु थिअगराज ह्या गृहस्थानी १९१७ मध्ये इडियन रिव्ह्यू ह्या मासिकात एक लेख लिहिला आहे प्रथम त्याच्या राहात्या घराविषयी लेखक सागतो की, जेथे चार मजूर ठेवावे असा कायद्याचा नियम आहे त्या जागेंत पाच सहा मजूर मुलाबाळासह कोबले जातात त्याच्या आरोग्यासबधाने डॉ लून नावाच्या तपासणीवरील अधिकाऱ्याने लिहिले आहे की, 'ज्याचे साधे धरलेले नाहीत असा एकही इसम मला आढळला नाही. हगवण, अतिसार, त्वग्रोग वगैरेचा प्रसारही कमी नाही. औषधोपचार करणारावर मजुरांचा मुळीच विश्वास नाही कारण औषध एकच वापरले जाते व ते म्हणजे कडूजहर कोयनेल! कायद्याप्रमाणे डॉक्टरने एक दिवसाआड फेरी टाकली पाहिजे पण आठवड्यातून एकदा डॉक्टरचे दर्शन होण्याचीही मारामार. आजारी मजुराला दवाखान्यात न पाठविणे हा कायद्याच्या दृष्टीने गुन्हा ठरविलेला आहे पण मजूर बेफाम आजारी असूनही खोलीतच पडलेले मी समक्ष डोळ्यानी पाहिले आहेत मृत्यूचे प्रमाण पाहता गेल्या वर्षाचा रिपोर्ट मला असा समजला की जन्मास आलेल्या ६० नूतन अर्भकापैकी ४५ मृत्युमुखी पडली ! आजारी मनुष्यास तादूळ फुकट द्यावे असेही कायदा सागतो पण कायद्याची वागी पुराणातच राहातात. आस्थापूर्वक केली जात असेल तर ती एकच सोय ! ती म्हणजे मळ्याजवळच ताडीचे दुकान उघडणे ही होय ! !' मजूर सकाळी ६ वाजता कामावर जातो तो घरी परत येईपर्यंत सध्याकाळ होते मध्यतरी जेवणासही मोकळा वेळ दिला जात नाही आजारीपणाबद्दल खाडे मात्र आकारण्यात येतात त्यामुळें महिन्याच्या शेवटी जी मजुरी पदरात पडते ती साध्या निर्वाहास पुरेशी नसते कर्जबाजारीपणा इतका असतो की हिंदुस्थानात परत येण्याचे मनात आल्यास बायकामुलाना ओलीस ठेवून काही दिवसांपुरते यावे तेव्हा. मजूर कामास नालायक झाला की त्याला मळ्यातून हांकून देतात राहिलेल्या आयुष्यात त्याने आपल्या पोटापाण्याची व्यवस्था वाटेल ती करावी. ती करण्याचे त्याला पूर्ण स्वातत्र्य आहे ! कोर्टांत गेल्यास न्याय मिळण्याची

आशा करणेच मूर्खपणा, कारण मारहाण झाली असल्यास डॉक्टरचे सर्टि-फिकेटास पैसा नाही, वकील देण्यास छदाम नाही, आणि मालकाच्या विरुद्ध साक्षी देण्यास साक्षीदार तर नाहीच नाही ! असा सर्व नन्नाचा पाढा ! आणि कायदा पाहिला तर इतका अमानुष व कडक की कामात खड पाड-णाऱ्या मजुरास सक्तमजुरीची कैद तो ठोठावतो, इतकेच नव्हे तर कोणी त्यास आश्रय देईल तर त्यासही तीच शिक्षा देण्यासही कचरत नाही थिअग-राजानी वस्तुस्थिति निरखून रेखाटलेले हे चित्र पाहाता करारबद मजूर-पद्धती ही गुलामगिरीचे प्रच्छन्न स्वरूप कसे आहे हे लक्षात येईल

परक्याना हीनपणे वागविण्याची ही पाशवी वृत्ति युरोपियनेतराना समान हक्क नाकारणाऱ्या आफ्रिकेत आजही १९५१ साली चालू आहेच !

## भरतखंडांतील दास पद्धति

पाश्चात्य गुलामगिरीचे हे हिडीस स्वरूप अवलोकिल्यावर आपणा भारतीयाना या बाबतीत अधिक उच्च नीतिमत्तेचा अभिमान बाळगण्यास जागा आहे असे म्हणता येईल. कारण गुलामगिरीला हिंदुस्थान सर्वस्वी परका नसला तरी पाश्चात्यातील उग्र स्वरूपाची गुलामगिरी मात्र हिंदु-स्थानात केव्हाही जारी नव्हती इ सनाच्या दुसऱ्या शतकातील ग्रीक ग्रथकार एरिअन याने तर स्पष्ट लिहिले आहे की, हिंदुलोक कोणासच गुलाम करीत नाहीत मात्र हे विधान भावार्थानेच घेतले पाहिजे. कारण दाससस्था अथवा गुलामगिरी पाश्चात्यापेक्षा सौम्य स्वरूपात हिंदी इतिहासातहि नमूद आहे. परकीय ग्रथकार एरिअनपेक्षा हिंदु ग्रथकार कौटिल्य याचे मत अधिक विश्वसनीय तो सागतो की, " न तु एव आर्यस्य दासभाव " म्हणजे आर्याना मात्र कधीहि दास्य प्राप्त होत नसे ( अ ७० ) म्लेच्छाने आपणास विकले किंवा गहाण टाकले तरी तो अपराधी नाही. आर्यांच्या अदास्यत्वाविषयी इतके निक्षून सागितले असले तरी कौटिल्याने दासवर्गाविषयी घालून दिलेल्या नियमावरून त्याच्या वेळी आर्यांतहि दाससस्था काही प्रमाणात होती हें निर्विवाद बहुतेक दास हे मुदतबदीचे म्हणजे गहाण फिटेपर्यंत दास्यत्व स्वीकारलेले असत त्यानें कर्जाची रक्कम परत केली की तो मुक्त होई. पण काही विशिष्ट परिस्थितीत जन्मदास्यत्वहि भोगावे लागे. कौटिल्य

सांगतो की, ज्याने आपल्या राजीखुषीने स्वतः एकदा दासपणा पत्करला आहे तो जर गुन्हेगार ठरला तर त्याने जन्मभर दासच राहिले पाहिजे. तसेच ज्यास दुसऱ्याने गहाण टाकले तो जर दोनदा गुन्हेगार ठरला तर तोहि जन्मभर दासच राहिला पाहिजे हे दोघे परदेशास पळून जाण्याच्या बेतात आहेत असे एकदा जरी आढळण्यात आले तरी त्यानी जन्मभर दास्यत्व भोगले पाहिजे हे कायमच्या दास्यत्वाचे प्रसग सोडले तर दासाला मालकास पैसे देऊन स्वतःची दास्यत्वातून सुटका करून घेण्याचा हक्क असे कौटिल्य सांगतो की योग्य रक्कम घेऊन दासास जो दास्यातून मुक्त करणार नाही त्यास बारा 'पण' दड द्यावा लागे.

दास्यविमोचनाचा काही विशिष्ट विधीही प्रचलित असावा असे नारद-स्मृतीवरून दिसते नारद म्हणतो, दासाला मुक्त करण्याची इच्छा करणाराने खांद्यावरून पाण्याने भरलेला कुभ आणून त्यातील पाणी अक्षता व फुले याचे बरोबर दासाच्या मस्तकावर ओतावे व 'तू मुक्त झालास' असें त्रिवार उच्चारून त्याला मुक्त करावे

स्व दासमिच्छेद्य. कर्तुमदास प्रीतमानस· ।
स्कधादादाय तस्यासौ विद्यात्कुभ सहाम्भसा ॥
साक्षताभि सपुष्पाभिः मूर्धन्यद्भिः अवाकिरेत् ।
अदास इत्यथोक्त्वा त्रि प्राङमुख त अवासृजेत् ॥

( मिताक्षरा )

कौटिल्याच्या ग्रथात गहाणाकरिता दास्यत्व स्वीकारणे हाच दास्यत्वाचा मुख्य प्रकार वर्णिला आहे पण स्मृतिग्रथामध्ये इतरहि अनेक प्रकार दिलेले आढळतात मनुस्मृतीत सात प्रकार दिलेले आहेत ते म्हणजे रणागणात जिंकलेला, आपण होऊन दास झालेला, दासीपुत्र विकत घेतलेला, लोकानी दिलेला, वारसाने मिळालेला, किंवा दडाची भरपाई म्हणून दास झालेला, असे दिलेले आहेत

ध्वजाहृतो भक्तदासो ग्रहज क्रीत दत्रिमौ ।
पैत्रिको दण्ड दासश्च सप्तैते दासयोनय ॥

(८।४१५)

' अभ्युपेत्या शुश्रूषा ' या प्रकरणावरील याज्ञवल्क्य स्मृतीच्या मिताक्षरा टीकेत तर दासाचे बरेच प्रकार दिले आहेत.

गृहजात तथा क्रीतो लब्धो दायादुपागत ।
अनाकाल भृतः तद्वत् आहित स्वामिना च य ॥
मोक्षितो महतश्चरणात् युद्धप्राप्त पणे जित ।
तवाहमित्युपगत प्रव्रज्यावसित कृतः ॥
भक्तदासश्च विज्ञेयः तथैव वडवाहृत ।
विक्रेता चात्मन. शास्त्रे दासा पञ्चविधा स्मृता ॥

या दासाविषयी विज्ञानेश्वर पुढें लिहितो की वरीलपैकी गृहजात, क्रीत, लब्ध, दायप्राप्त व आत्मविक्रयी, याची सामान्यत मुक्तता होत नाही. आपल्या धन्यावरील प्राणसकट वाचविणे किंवा अशाच प्रकारचे महत्कृत्य हातून घडेल तेव्हाच त्याची मुक्तता व्हावयाची कौटिल्याने, दास असून गुन्हेगार असेल तेव्हाच त्यास कायमचे दास्यत्व येते असा नियम दिला आहे. पण विज्ञानेश्वराचा वरील अभिप्राय पाहाता गृहजात, क्रीत वगैरे दासास विशेष प्रसगाव्यतिरिक्त मुक्त होता येत असे की नाही याची शका येते.

## वैदिक कालची दास पद्धति

गुलामगिरीची ही सस्था नुसत्या स्मृतिकालीच नव्हे तर थेट वैदिक कालापासून आजतागायत अस्तित्वात असलेली आढळते. जिकलेल्याना दास म्हणन राबवून घेण अथवा मारून टाकणे हे प्रकार वैदिक वाङ्मयातील इद्राच्या चारित्र्यात विशेष भपकेबाजपणे माडले गेले आहेत. ऐतरेय ब्राह्मणात इद्राने अरुर्मघाला, विश्वरूपाला, वृत्राला ठार मारून यतीना तर कुत्र्याना खाऊ घातले असे आरोप देवानीच इद्रावर घेतल्याचा उल्लेख आहे. ऐतरेय ब्राह्मणात असे सागितले आहे की हरिश्चद्राने आपला पुत्र रोहित यास वरुणास अर्पण केले होते पण रोहिताने आपल्याऐवजी अर्पण करण्यास शभर गाई देऊन शुन.शेपास विकत घेतले कौषीतकी उपनिषत्कारानेही इद्राने यतीना सालवृकेभ्य म्हणजे कुत्र्याच्या तोडी दिले हे नमूद केले आहे. (३–१) लढाईत जिकलेल्याना गुलाम म्हणून राबविण्याचा प्रकार इतर देशाप्रमाणे हिंदुस्थानातही रूढ होता. ज्या लढाईनतर अशोकाला उपरती झाली त्या

कलिंगाच्या लढाईत दीड लाख लोक गुलाम केले गेले असे स्वतः त्यानेच आपल्या शिलालेखात नमूद केले आहे वैदिककाळी आर्यांनी अनार्यांशी युद्धे केली त्या युद्धात त्यानी बरेच गुलाम जिकले असले पाहिजेत. ऋग्वेदाच्या पहिल्या मडलातील एक सूक्तकार ऋषि उषेची प्रार्थना करतो की, 'हे उषे, यशाने भरलेली, सुवीरानी युक्त व अनेक दासगणाने परिपूर्ण अशी सपत्ति मला दे '(९२।८) आठव्या मडलातील दुसरा एक ऋषि सुप्रसन्न होत्साता देवतेस म्हणतो की, 'शभर गर्दभ, शभर मेंढरे, आणि शभर **दास** आणि शिवाय शभर माळा तू मला दिल्यास—' (५६।३)

द्यूतात जिकल्याने दास्यत्व आलेल्याची हकिकत हे महाभारताचे तर मुख्य कथासूत्रच आहे. युधिष्ठिर, नल, वगैरेच्या काळी राज्य, आप्तबाधव, स्त्री यानाहि पणाला लावता येत असे असे दिसते, व पण हरला म्हणजे त्याना दास्यत्व प्राप्त होई. दुःशासनाने द्रौपदीला वेणीला धरून फरफटत ओढीत सभेंत आणले ते दासी म्हणूनच. द्यूतामुळें दास्यत्व आलेल्याचा उल्लेख मृच्छकटिकातहि आहे

व्याकरणग्रथ काशिका यातहि 'द्वाभ्या पुरुषाभ्या क्रीता द्विपुरुषा' (४।१।२४) असा दास्यत्वाचा उल्लेख आढळतो. तसेच आर्यभट्टाच्या गणितग्रथात सोळा वर्षांच्या दासीला ३२ निष्क पडतात तर वीस वर्षांच्या दासीला किती पडतील अशी उदाहरणे आहेत ! बौद्धग्रथात सघात प्रवेश मिळण्यास ज्या गोष्टी वर्ज्य सागितल्या आहेत त्यात ऋण, राजसेवा, रोग, याच्याबरोबर दास्यत्वाचा अतर्भाव आहे, राजतरगिणीवरून पाहाता गुलामाचा विक्रय काश्मीरात राजेलोकहि करीत असें दिसते. कल्हण सागतो सातव्या शतकातील वज्रापीड राजाने पुष्कळसे लोक पकडून गुलाम म्हणून म्लेच्छ राजास विकून टाकले !

राजस्थानचा इतिहासकार टॉड याच्या ग्रथावरून राजस्थानात **गोला** व **वासी** असे दोन प्रकारचे गुलाम असत असे दिसते. तो सागतो की, ह्या प्रातात दुष्काळ हे गुलामगिरीचें मुख्य कारण होय मोठ्या दुष्काळाच्या प्रसंगी हजारो लोक स्वत ला दास म्हणून विकतात दासीची अपत्यें नेहमी दास म्हणून गणली जातात. रजपूत राजाच्या दासीपुत्राना दास म्हणूनच गणण्यात येते. त्याची सांपत्तिक स्थिति पुष्कळ वेळा चागली असते, पण

सामाजिक दृष्टया त्याची गणना दासात होते. जन्मजात दासाना **गोल** ही सज्ञा आहे. टॉड सागतो की, देवगडचा राणा दरबारात बसला म्हणजे त्याच्याभोवती दास्यत्वाचे चिन्ह म्हणून पायात सोन्याचे कडे असलेले तीनशे गोले उभे असत ! सामान्य रजपूत कुलातील दासाची मुख्य खूण म्हणजे डाव्या पायात रुप्याचे कडे घातलेले असे राजस्थानातील दासाचा दुसरा प्रकार **वासी** हा होय. गोल हा आजन्म दास होय वासीला पैसे भरून आपली मुक्तता करून घेता येते. कारागृहातून मुक्त केले असता कृतज्ञतेने अथवा शत्रूपासून बचाव करून घेण्याकरिता शरण आलेले लोक वासी होतात वासी लोकाचे वैशिष्टयदर्शक चिन्ह म्हणजे डोक्यावरील केसाचा लहानसा झुबका होय

## मौलानी अमलांतील गुलाम

मुसलमानी अमदानीत गुलामाचे अनेक प्रकार होते अबुल फाजल लिहितो की, या दुर्दैवी लोकाना गुलाम या नावाने सबोधणे पादशहाना पसत नसल्यामुळे त्याना 'चिल्हा' या नावाने ओळखावे असा त्याचा हुकूम आहे अबुला फाजलचा ग्रथ जो ऐन-इ-अकबरी त्यामध्ये गुलामाचे पाच प्रकार सागितले आहेत पहिला म्हणजे लढाईत जिकलेला गुलामाचा वर्ग याचा राजरोस क्रयविक्रय होई काही आपण होऊन दास्यत्व स्वीकारीत त्याचा दुसरा वर्ग. दासाची सततीही दासच गणली जाई, हा तिसरा प्रकार. चोर चोरीच्या मालाच्या मालकाचा गुलाम समजला जाई,हा चोथा प्रकार आणि रक्तपात वगैरे केल्याबद्दल दास्यत्व येई हा पाचवा प्रकार.

महाराष्ट्रात दासी व पोरगे विकत घेण्याची प्रथा पेशवाईतही होती असे कल्याणच्या सुभेदाराचा जमाखर्च प्रसिद्ध झाला आहे त्यात दासी व कुळबिणी विकत घेतल्याचा खर्च दाखविला आहे त्यावरून दिसून येते. दास्यत्वाची प्रथा पेशवेकालीही पूर्वापार चालत आलेल्या सौम्य प्रकारात कायम होती दासी व पोरगे विकणे हा चारण वगैरे लोकाचा धदा असून तो इतर धद्यासारखाच राजमान्य होता, व सरकार त्यावर करही बसवीत असे. गाई म्हशीची वासरे विकत घेऊन पावसाळी चार सहा महिने मोकळया मैदानात चारून धष्टपुष्ट करून विकावी असा जसा

काहीचा धदा असतो, तसाच दुष्काळात कोडाभाकर देऊन मुले विकत घ्यावी व पुढे मोठी झाल्यावर विकून टाकावी हाही एक एकेकाळी धदाच होता. गुराढोराप्रमाणे त्याना राहण्याला जागाही काही वेळा गोठ्यातच दिली जाई राजरोसपणे विकत घेण्याबरोबर चोरून, फूस लावून, पळवून विकण्याचा प्रयोग होणारच कोकण प्रातातील काही मुसलमानाचा हा धदाच होता अशा प्रकारची तक्रार पेशवेसरकारकडे आलेली होती. गुलामाचा हा माल बाजारात राजरोसपणे मिळत असल्याने श्रीमताना त्याविषयी हव्यास असणे साहजिकच होते पेशव्याच्या खाजगीकडे १७६२–६३ साली १९० कुणबिणी होत्या अशी नोद सापडते. शाहूमहाराजाच्या एका राणीस एके वेळी कुणबिणी, चा हवा तेवढा ताफा मिळाला नसावा म्हणून ती पेशव्यास एका पत्रात लिहिते- 'बटकी पचवीस देतो म्हणून तुम्ही मान्य केले, अद्यापि आल्या नाहीत यावरून काय समजावे ? या उपर पचवीस बटकी उत्तम सेवायोग्य पाठवावी' खुद्द शाहूमहाराजनीही आपल्या एका अधिकाऱ्यास कोकणातून बटकी आणण्याविषयी लिहिलेले आढळते की, 'बटकीच्या पोरी दोन बहुत चागल्या, दहा अकरा वर्षांच्या निरोगी, नाचावयास लायक, लाविलीयाने उपयोगी पडतील अशा पाठवाव्या' सरदारानी एकमेकाना देणग्या देताना इतर वस्तूच्या जोडीला सुदर बटकी देण्याचीहि वहिवाट होती ! सरदार मोहीम जिंकून आले म्हणजे अनेक बटकी सरकारास नजराणा म्हणून पाठवून देत गुलामगिरीची ही चाल गेल्या महिन्यापर्यंत म्हणजे नोव्हेंबर १९५१ पर्यंत आपल्या देशात चालू होती हे सागितले तर तुम्हास खरेही वाटणार नाही. दारिद्र्यामुळे मुले गुलाम म्हणून विकण्याची चाल हैद्राबाद सस्थानात रूढ असे ती गेल्या महिन्यात कायद्याने उखडून काढून तीस हजार मुलामुलीना गुलामगिरीतून बधमुक्त करण्यात आले !

जुन्या इजिप्त देशातील राजाच्या दफनविधीची चाल तर अत्यत भीषण म्हणजे असे की मृताला इहजीवनातील सर्व सुखसोयी परलोकीहि मिळाव्या म्हणून मृताच्या प्रेताबरोबर त्याच्या पत्न्या, नोकर, गुरेढोरे ही सर्व मारून त्याची प्रेते मृतराजाच्या प्रेताच्या गुहेत ठेवीत ! !

परदेशच्या व स्वदेशच्या गुलामगिरीचा हा जो त्रोटक वृत्तात दिला आहे त्यावरून गुलामाच्या जीवनाची थोडीशी कल्पना येण्यास हरकत नाहीं.

सर्वच गुलामाचे जीवन खडतर होते असे सूचित करण्याचा इरादा नाही गुलामाच्या जीवनाला कोणता रग चढवावयाचा हे धन्याच्या स्वभावावर अवलबून असे धनी ममताळू असला तर गुलामाच्या जीवनाला गुलाबाचा रग चढणेहि अशक्य नसे. आपल्या देशात तरी बटीक–बटकिणीचे जीवन सामान्यत मोलाने मजुरी करणाऱ्या मजुरापेक्षा फारसे वाईट नसे पेशवे रियासतीत जेन्किन्स याचे नागपूरकडील बटकीसबधाने जे उद्गार उद्धृत केले आहेत ते नमूद करण्यासारखे आहेत. तो म्हणतो, 'बटकीना धन्याच्या पदरी नोकर म्हणून रहावे लागते पण खाणेपिणे, कपडालत्ता या बाबतीत धनी त्याना मुलाप्रमाणे वागवितो.' युरोपातसुद्धा जेथे दासदासीची सख्या पदरी मोठी असे तेव्हा त्याना योग्यायोग्यतेप्रमाणे गाणेबजावणे वगैरेसारखी कलाकौशल्या-ची कामे मिळत, व सुखाचे जीवन वाट्यास येई पराक्रमी पुरुषाला बधन कोणीच घालू शकत नाही असा पुरुष दासाच्या पोटी जन्मास आला तरी आपले पौरुष प्रकट केल्याशिवाय रहात नाही या न्यायाने गुलामाचे राजे झाल्याची उदाहरणेही इतिहासाला माहीत आहेत दक्षिणेत बहामनी राज्याचा सस्थापक किंवा उत्तरेस ज्याच्या कीर्तीची ध्वजा फडकविण्यास मिनार उभा आहे तो कुतुब याची आठवण या ठिकाणी सुशिक्षित वाचकास करून देण्याचे कारण नाही. युरोपात रोमन साम्राज्याच्या काळी म्हणजे ज्या काळी गुलामगिरी अगदी ओगळ स्वरूपात वावरत होती त्या काळीही युसेबियस् नावाचा गुलाम पराक्रमी म्हणून गाजून गेला. अर्थात् गुलामाचे जीवन नेहमीच कष्टमय असे असे नाही शिवाय गुलामाना पोसण्याची जबाब-दारी मालकावर असल्याने गुलामाना अन्नवस्त्राची घोर चिंता पडण्याचेही कारण नसते अमेरिकेमध्ये गुलामगिरी नष्ट करण्याकरिता जेव्हा मोठी मोहीम सुरू झाली तेव्हा आपल्या तोडचा घास जाणार या चिंतेचा गोळा गुलामाच्या पोटात उभा राहिला व ते या दास्यमोचन–चळवळीकडे साशक व सकटग्रस्त भावनेनें पाहू लागले ते याचमुळे

पण अशा रीतीने गुलामगिरीचे भीषण स्वरूप थोडेसे उजळ करणाऱ्या काही बाबीचा निर्देश करता आला तरी स्वत.ची स्वत वर हुकमत नसणे व सर्वस्वी दुसऱ्याच्या ओजळीने पाणी पिण्याशिवाय गत्यतर नसणे हे जे गुलामगिरीचे सर्वस्व ते माणसातील माणुसकीच नष्ट करणारे आहे. बैय-

क्तिक आवडनिवड व वैयक्तिक भावना यात माणसाची माणसकी, व्यक्ति-मत्व असते पण गुलामाच्या आयुष्यात या विषयाना स्थानच उरत नाही. एका धन्याने दुसऱ्या वाटेल त्या धन्याला आपल्या गुलामास विकावे, त्यात गुलामाच्या इच्छेचा प्रश्नच येत नाही प्रश्न जास्त किमत कोण देईल त्याच्या इच्छेचा अर्थात् इच्छा, भावना, वगैरेसारख्या चैनीच्या वस्तू गुलामानी बाळगू नयेत अशीच त्याच्या धन्याची समजूत अशा प्रकारे समाजातील एका वर्गास माणुसकीस पारखे होऊन पुच्छविषाणहीन पशुसारखे जीवन कठण्याचा प्रसग यावा हे समाजाच्या सुव्यवस्थेचे लक्षण कोण म्हणेल ?

## खालच्या वर्गांवरील जुलूम

आता गुलामगिरीचा हा उघडा जुलूम व अन्याय सोडून समाजाच्या निरनिराळ्या थरात अन्याय कसा चालतो ते पाहू त्यात विशेष लक्षात घेण्यासारखी गोष्ट म्हणजे तरवार गाजविणाऱ्या वरिष्ठ वर्गाने उत्पादक धद्यात निरत असणाऱ्यावर केलेली कुरघोडी ही होय या उत्पादक वर्गातील आजचा आपला धनाढ्य गिरणी मालक वैश्य वर्ग हा इतराना कुटिल मार्गाने कसा लुबाडतो हे आपण पुढे पाहू पण प्राचीन काली प्रत्यक्ष दास म्हणून ज्याची गणना केली जात असे तो वर्ग सोडला तरी चातुर्वर्ण्यात अतर्भूत असलेले वैश्य व शूद्र हे जे वर्ग त्यानाही ब्राह्मण व क्षत्रिय या दोन वर्गाच्या हुकमतीत वागावे लागे. सर्व सत्ता ब्राह्मण व क्षत्रिय याच्यामध्यें साठविली गेलेली असे, व ती कायम ठेवण्याबद्दल वरिष्ठ वर्गाचा अट्टाहास चाले, हे वैदिक वाङ्मयातील ब्राह्मणग्रथाच्या कालापासून दिसून येते वर्णवैशिष्ट्य कायम राखण्याच्या अनेक क्लृप्त्या लढविल्या जात त्यात भिन्न वर्णांनी अग्न्यायानात मत्र म्हणावयाचे ते भिन्नभिन्न असावेत, व त्यानी घ्यावयाची पेयेंही भिन्नभिन्न असावीत असेही नियम आढळतात. ऐतरेय ब्राह्मणात निर-निराळ्या वर्णांची निरनिराळी पेयें सागितली आहेत त्यात असे आढळते कीं सोम हें पेय फक्त ब्राह्मणानी प्यावे. क्षत्रियानी उबर, पिंपळ, किंवा पिंप्री याच्या फळाचा व वडाच्या मुळाचा रस प्यावा. वैश्यानी आपल्या पेयाची तहान दह्यावर भागवावी व शूद्राना योग्य पेय म्हणजे पाणी होय ! वैश्याचा त्रैवर्णिकात अतर्भाव होत असल्याकारणाने त्यास यज्ञयागाची मुभा होती. पण

सामाजिक सत्तेच्या दृष्टीने पाहिल्यास शेती, वाणिज्य वगैरे करून धन उत्पन्न करावे व राजा मागेल तेवढा कर द्यावा ही त्याची स्थिति. ऐतरेय ब्राह्मणातील राजसूय यज्ञात अभिषिक्त झालेल्या राजाला ' विषामत्ताजनि ' म्हणजे ' प्रजाभक्षक जन्माला आला ' असे म्हटले आहे ! त्याच वेळी त्या राजाला जो उपदेश केला आहे तो तर वैश्य वर्गाच्या स्थितीवर लख्ख प्रकाश पाडणारा आहे " हे राजा, यज्ञात दही भक्षण करू नको, कारण दही हे वैश्याचे भक्ष्य जर दही भक्षण करशील तर तुझी प्रजा वैश्यासारखी म्हणजे दुसऱ्याला कर देणारी, दुसऱ्याकडून खाल्ली जाणारी वाटेल त्यानी भेवडावली जाणारी, व वाटेल त्यानी केलेला अपमान सहन करणारी अशी निपजेल ! ! "

शतपथ ब्राह्मणात तर वैश्याला गाढव ही संज्ञा लावली आहे अग्निचितीमध्यें घोडा, गाढव व बकरा इकडून तिकडे हिंडवितात. त्यात एकदा घोडा पुढे असतो व एकदा बकरा त्यात बकरा हा ब्राह्मणाचा प्रतीक व घोडा हा क्षत्रियाचा ऋषिवर्य लिहितात की, वैश्य व शूद्र हे दोन वर्ग ब्राह्मण व क्षत्रिय यांच्यामध्यें पकडले गेले म्हणजे मग जातात कुठे ? वैश्याला कायमचा जरबेत ठेवलाच पाहिजे अशाप्रकारचा कटाक्ष याच ग्रथात अन्यत्रही आढळतो. अग्निष्टोम नावाच्या यज्ञामध्ये मरुत्वतीय ग्रह घ्यावयाचा असतो. त्या ठिकाणीं ग्रथकार सागतो की तो मरुत्वतीय असूनही इद्रायमरुत्वते असा दिला जातो. मरुद्भ्य असा दिला तर वैश्य क्षत्रियाला डोईजड होईल व वेळी बड करील म्हणून इद्रायमरुत्वते असाच ग्रह दिला पाहिजे ! कारण अशानेच वैश्य सागकामे व चोपटमार्गे राहातात अश्वमेध यज्ञात १७ पशु मारावयाचे असतात त्यात अश्वासबधी प्राजापत्य नावाचा स्वतत्र मत्र असून इतरासबधीं नुसता देव–सामान्य मत्र असतो ग्रथकार बजावतो कीं या इतर पशूच्या करिता निरनिराळ्या देवताचे मत्र म्हणू नयेत कारण हे इतर पशु म्हणजें गोळाबेरीज. त्याना सर्वसाधारण मत्रच घ्यावेत. विशिष्ट मत्र म्हटला असतांना ते जोरावतील व त्रास देतील हे इतर पशु म्हणजे वैश्य ! अश्व म्हणजे राजा. त्याच्या ताब्यात यानी राहिले पाहिजे, तो करील ते केले पाहिजे, व तो सागेल त्या मार्गाने गेले पाहिजे वैश्य हा कमी दर्जाचा हे दर्शविण्याकरिता काही बिभित्स उपमाही दिलेल्या आढळतात उदाहरणार्थ, याच ग्रथात म्हटले

आहे की, " वैश्य हे जवस राष्ट्र म्हणजे राजा हे हरिण. हरिण जसे जवस खाते तसे राष्ट्र वैश्याला खाते राजा जनावरे पाळीत नाही, ते काम वैश्याचे होय म्हणूनच वैश्य कधीही राजा होऊ शकत नाही " हे शेवटले वाक्य नसते तर वैश्य हे जवस व राष्ट्र हे हरिण याचा वैश्याने शेत पिकवावे व इतरानी खावे असा सौम्य अर्थ करिता आला असता. पण वैश्य राजा होऊ शकत नाही या वाक्यावरून वैश्याचा कमीपणा दर्शविण्याचा उद्देश दिसतो वैश्य राजा का होऊ शकत नाही याचे आणखी एक कारण दिले आहे की आर्याशी व्यभिचार करणारी शूद्रा हिने कितीही जरी पैसा मिळविला तरी तो तिजपाशी राहात नाही, कोणीतरी यजमान तो घेऊन जाणारच जशी शूद्रा स्त्रीची धनावर मालकी नाही तशी वैश्याची. म्हणून वैश्याचा पुत्र कधीही राजा होऊ शकत नाही ! पुढील कालात वैश्याच्या हाती राजसत्ता जाणार आहे याची प्राचीनाना कल्पनाही नसेल !

## शूद्रांवरील दडपण

शेवटचा वर्ण जो शूद्र याविषयीही असेच उतारे देता येतील तैत्तिरीय ब्राह्मणामध्यें महाव्रत सांगितले आहे त्या व्रतामध्ये पूर्वी आदित्य मिळविण्या-करिता देवासुराची झटपट झाली होती तिची नक्कल करावयाची असते. त्यात ब्राह्मण हा दैव्य वर्ण व शूद्र हा आसुर्य वर्ण असे समजून ब्राह्मण हा वेदीमध्ये व शूद्र वेदीच्या बाहेर असे उभे राहातात, व हातात एक वाटोळे चामडे धरून हिसकाहिसकी करितात. ब्राह्मण म्हणतो, 'ह्या यज्ञकर्त्या यज-मानानी उत्तम काम केले म्हणून त्याना जेथे जावे तेथे जय प्राप्त होतो.' शूद्र म्हणतो,' ह्यानी देश उध्वस्त केला व आम्हाला घालवून दिले ! ! ' या उताऱ्या-वरून शूद्र हे जित वर्णाचे लोक होत असे स्पष्ट दिसते व जेते जित्याविषयी ज्या प्रकारच्या कल्पना सामान्यपणे प्रसृत करितात तशाच येथेही आढळतात. शूद्र हा पायापासून जन्मास आला म्हणून शूद्रानी इतर जातीचे पाय धुवावे. पाणी हे भक्ष्य खास शूद्राचे यज्ञपानसमयी क्षत्रियाला बजाविले जाते की तो जर पाणी पिईल तर त्याची प्रजा शूद्रासारखी होईल आणि शूद्रासारखी म्हणजे कशी तर ज्याना नेहमी इकडून तिकडे हेलपाटे घालावयास लावावे, हवे त्याने वाटेल तेव्हा गचाडी देऊन घालवावे, पाहिजे तर ताडन करावे

किंवा ठारसुद्धा मारावे ! शूद्र हा चालते बोलते स्मशानच, म्हणून त्याला ऐकू येईल इतक्या जवळ वेदाध्ययन करू नये जर मुद्दाम होऊन त्याने श्रुति ऐकली तर त्याचे कानात लाख किंवा कथील वितळवून ओतावे अग्निहोत्रातल्या गाईचे शूद्राने दूधही काढू नये, कारण त्याचा जन्म असत्पासून होतो

असे उल्लेख अनेक असले तरी प्राचीन काळी सुधारक वर्ग जागृत होता याचीही आठवण ठेवली पाहिजे अथर्ववेद व्रात्याच्याविषयी लिहितो की, ' प..'णा: ?गन आलेल्या व्रात्याला नृपाने आपल्यापेक्षा वरिष्ठ या दर्जाने वागवावे. (१५-९-१) संहिता व ब्राह्मणकाळी ग्रन्थनिर्माण काही शूद्रालाच नव्हेतर चातुर्वर्ण्याबाहेरील निषादानाहि यज्ञाचा अधिकार मिळालेला होता, हे ' निषादस्थपतिं याजयेत । ' अशासारख्या उल्लेखावरून व कवष ऐलूषाच्या कथेवरून दिसून येते हे अधिकार प्राप्त करून घेण्यास त्याना झगडावे लागले असले पाहिजे पण काही काल यज्ञादिकाचे अधिकार प्राप्त झालेले असले तरी पुढील स्मृतिकालात फिरून ते नष्ट झालेले आढळतात.

धर्मसूत्रे व स्मृति याच्या काळी शूद्राविषयी तुच्छ बुद्धि उघडपणे आढळून येते वशिष्ठ धर्मशास्त्रात म्हटले आहे की शूद्रा स्त्रीचे साधारण नाव रामा का तर तिचा जन्म लोकाना रमवावे म्हणून ! वसिष्ठ धर्मसूत्रकार यमाचे श्लोक उद्धृत करतो की, शूद्रजाति म्हणजे जातिवत स्मशान म्हणूनच शूद्राच्या देखत वेद म्हणू नयेत स्मशानप्रेतप्रत्यक्षा: ये शूद्रा पापचारिण । प्रायश्चित्तविधी सागतानाही गुराढोराच्या हत्येबद्दल जे प्रायश्चित्त सांगितले आहे तेच शूद्रहत्येबद्दल सांगितले आहे. अत्रि लिहितो की,

> शरभोष्ट्रहयान्नागान्सिंहशार्दूलगर्दभान् ।
> हत्वा च शूद्रहत्याया प्रायश्चित्त विधीयते ॥

मनुस्मृतीतही सांगितले आहे—

> मार्जारनकुलौ हत्वा चाष मण्डूकमेव च ।
> श्वगोधोलूककाकाश्च शूद्रहत्याव्रत चरेत् ॥

मनुस्मृतीत शूद्राविषयी जे अनेक उल्लेख आढळून येतात त्यावरून इतर वर्णांची शुश्रूषा करणे हा एवढाच धंदा त्याना लावून देण्यात यावा असा धर्मशास्त्रकाराचा आग्रह दिसतो. मात्र नाइलाज झाला म्हणजे आपत्प्रसंगीं इतर किरकोळ धंदे करण्याची त्याना मुभा ठेवण्यांत आली होती.

शूद्राने सामान्यपणे दासभावानेच राहिले पाहिजे असा कटाक्ष आढळतो. शूद्राला दास्याकरिताच ब्रह्मदेवाने जन्माला घातला म्हणून त्याला विकत घेतलेला असो वा नसो, दासाप्रमाणेच वागवावा असे स्पष्ट सांगितलेले आहे.

शूद्र तु कारयेत् दास्य क्रीतमक्रीतमेव वा ।
दास्यायैव हि सृष्टोऽसौ ब्राह्मणस्य स्वयंभुवा ॥ ८-४१३

पुढें सांगितले आहे की शूद्राना दास्यातून मुक्त केले तरीही तो मुक्त होऊ शकत नाही, कारण त्याचा जन्मच दास्याकरिता होय

न स्वामिना निसृष्टोऽपि शूद्रो दास्याद्विमुच्यते ।
निसर्गज हि तत्तस्य कस्तस्मात्तदपोहति ॥ ४१४.

दास म्हटला म्हणजे त्याला धनसंचयाचा अधिकार नसे व त्याने मिळविलेले धन त्याच्या मालकाच्या धनात समाविष्ट होई

भार्यापुत्रश्च दासश्च त्रय एवाधना स्मृताः ।
यत्ते समधिगच्छन्ति यस्य ते तस्य तद्धनम् ॥ ४१६

यामुळे जरूर पडल्यास ब्राह्मणाने शूद्राचे द्रव्य खुशाल हिरावून घ्यावें असेहि सांगण्यास स्मृतिकार कचरला नाही

विस्रब्ध ब्राह्मणा शूद्राद्रव्योपादानमाचरेत् ।
नहि तस्यास्ति किञ्चित्स्व भर्तृहार्यधनोहि स ॥

शूद्राच्या निर्धनत्वाविषयीचा कटाक्ष दहाव्या अध्यायात अधिक स्पष्ट शब्दात मांडला आहे की, धनसंचय करण्याची शक्ति असताहि त्याने धनसंचय करिता कामा नये. कारण अर्थोष्म्याने तो गरम झाल्यास कदाचित् ब्राह्मणावर हात उगारावयाचा !

शक्तेनापि हि शूद्रेण न कार्यो धनसंचय ।
शूद्रो हि धनमासाद्य ब्राह्मणानेव बाधते ॥ —१२९

खालच्या वर्णांतील लोकानी वरच्या वर्णांतील लोकाचे धंदे आपत्कालीही करू नयेत असा नियम शूद्राप्रमाणे सर्वसामान्यच होता वशिष्ट सांगतो की, ' अजीवन्त. स्वधर्मेण अनन्तरा पापीयसी वृत्ति आतिष्ठेरन् न तु कदाचिज्ज्यायसीम् । ' वर्णाच्या अनुलोम्याविषयी कटाक्ष दास्यत्वाविषयीही होता. म्हणजे वरच्या वर्णाचा माणूस खालच्या वर्गाचा केव्हाही दास होऊ नये

असा नियम स्मृतिकारानी दिला आहे याज्ञवल्क्याचे वचन असे आहे की 'वर्णानामानुलोम्येन दास्य न प्रतिलोमत ।' असे अनेक उतारे देता येतील.

कनिष्ठ वर्णाला कनिष्ठपणाची जाणीव कायम राहील अशा रीतीने कनिष्ठ वर्णावर अनेक सामाजिक व औद्योगिक बधने घातलेली अर्वाचीन काळी-ही आढळतात उदाहरणार्थ, मराठी रियासतीत तिसाहाताखाली पागोटे न बाधणे, लग्नात वराने घोड्यावर न बसणे, किंवा त्याच्यावर अबदागीर न धरणे वगैरे निर्बंध खालच्या वर्गावर होते. मद्रासकडेही एकेकाळी सोनाराना वरात काढण्याची मनाई होती

## कारागिरांवर कुऱ्हाड

विद्यासेवक जून १९२६ च्या अकात पिल्ले नावाच्या मद्रासी विद्वान् ब्राह्मणेतराच्या एका लेखाचे भाषातर दिले आहे त्यात कारागीर वर्गावर एकेकाळी लादलेले अपमानकारक निर्बंध व त्यापासून उदभवणारे तटे याचे वर्णन आले आहे

तो लेखक म्हणतो, 'उत्तरेकडील प्रदेशात तामीळ राजाचे पुष्कळदा पराभव झाले या पराभवाचे एक महत्त्वाचे कारण असे होते की या तामीळ राजानी उत्तरेकडे जातिनिर्बंध पाळले नाहीत तेव्हा या पराजित राजाना असे वाटले की, जय मिळविण्यासाठी आपण दक्षिणेत तरी जातिनिर्बंध अमलात आणावेत. त्यामुळे आपल्या राज्यास बळकटी येईल अर्थातच त्याची दृष्टि कम्माल म्हणजे सोनार, कासार, लोहार, सुतार, व पाथरवट या पाच कारागीर जातीकडे वळली. वस्तुतः हा कारागीरवर्ग म्हणजे देशातील अत्यत उपयुक्त वर्ग होय पण या कम्मालाविषयी इतर जातीनी विलक्षण नियम केले व त्याना ग्रामचाडाल हे नाव दिले. त्याना गावच्या वस्तीतून काढून लावण्याचा प्रयत्न केला त्याचे दर्शन अपवित्र गणले जाऊ लागले, त्याना स्पर्श करणे धर्मबाह्य मानले जाऊ लागले. त्याच्या हत्याराच्या दर्शनापासून किंवा आवाजापासूनहि विटाळ होऊ लागला ' युद्धातील पराभवाचा आणि जातिनिर्बंधाचा काय बादरायण सबध असेल तो त्या राजासच माहीत ! पण राजाची लहर फिरल्याने कम्मालावर अपमानकारक निर्बंध मात्र लादले गेले. पुढे कम्मालानीहि एकजूट करून प्रतिकार करण्याचा प्रयत्न

केला त्यामुळे तटे, मारामाऱ्या माजल्या व काची कुंभकोणम् वगैरे ठिकाणी लढाया होऊन प्राणहानीहि झाली

कम्माल वर्गावर घातलेल्या निर्बंधाचे दुसरे एक मासलेवाईक उदाहरण ही एक कहाणीच आहे नवव्या शतकामध्ये मलबारमध्ये चेरमन पेरुमाळ नावाचा राजा राज्य करीत होता या राजाचा धोबी कपडे धूत असता एका सुताराच्या मुलीने कपडे नीट कसे धुवावे हे त्याला समजावून सांगितले त्या दिवशीचे कपडे विशेष स्वच्छ निघालेले पाहून धोब्याने राजाला विनंति केली की ती सुताराची मुलगी आपणास बायको करून द्यावी. राजाने परवानगी दिली व दुसऱ्या दिवशी धोब्याने सुताराची मुलगी पळविली सुताराने तक्रार केली राजा म्हणाला, तुमचे भांडण तुम्हीच भांडा सुतारादि पाच कारागीर जाती एक झाल्या पण त्याना यश आले नाही तेव्हा त्रासून शेवटी ते देश सोडून इझुवाद्वीपाला निघून गेले देशातील सर्व कारागीर निघून गेल्याने राजाचे हरघडी अडू लागले तेव्हा कालांतराने त्या कारागीराना परत या म्हणून बोलाविणे पाठविले व ते अनेक सवलती मिळवून परत आलेडी या कहाणीतील महत्त्वाचा भाग म्हणजे ते कारागीर ज्या सवलती मिळवून परत आले त्या सवलती होत त्यावरून असल्या सवलती पूर्वी नव्हत्या हे स्पष्ट होते त्या सवलतीची यादी वाचण्यासारखी आहे ती येणेप्रमाणे –(१) घराना तक्तपोशी करणे (२) मजल्याची घरे बांधणे (३) एका खांबावरचा जिना उपयोगात आणणे (४) घराला देवडी ठेवणे (५) चार खांबाच्या मंडपात लग्नविधी लावणे (६) लग्नसमारंभाच्या शेवटी अर्पू नावाचा समारंभ करणे (७) समारंभाच्या प्रसंगी तांब्याच्या भांड्यातून भात शिजविणे व मेजवानीत साखर वाढणे (८) मिरवणुकीतून पुढे छत्री धरणे (९) टाळ्या वाजविणे–नाचणे (१०) स्वतःकरिता दुभत्या गाई बाळगणे (११) कमरपट्टा,बांगड्या, वाळे, माळा वगैरे दागिने वापरणे या यादीवरून क्षुल्लक बाबींतही निर्बंध असावे असे दिसते

---

* विद्यासेवकाच्याच ऑक्टोबर १९२५ च्या अंकात थर्स्टनच्या ग्रंथाधारे दिले आहे

# प्रभूंवर प्रतोद

किरकोळ धार्मिक हक्काची भाडणे व ग्रामण्ये यांनीही मानवी विपत्तीना हातभार लावला आहे याचे एक प्रसिद्ध उदाहरण म्हणजे पेशवाईं-तील प्रभु समाजाकडून लिहून घेतला गेलेला नऊ कलमी कतबा हे होय. प्रभूना वेदोक्ताचा अधिकार आहे की नाही याचा वाद मुसलमानी अमदानीत उपस्थित झाला होता. त्यावेळी काशीक्षेत्री प्रभूस अनुकूल निकाल मिळाला, शिवाजीच्या काळी बाळाजी आवजीच्या मुलाच्या मुंजीच्या वेळी वेदोक्त प्रश्नाने पुन उचल खाल्ली. त्यातही त्याच्या पक्षाचा जय झाला. पुढे नानासाहेब पेशव्यानीही प्रभूची जुनी वहिवाट मान्य केली पण कोत्या मना-च्या नारायणरावाने मात्र जुनी वहिवाट तोडून प्रभूकडून एक कतबा लिहून घेतला त्यात पुढील निर्बंध प्रभूवर घातले होते (१) वैदिक मत्रे करून काहीच कर्मे करणार नाही. ( २ ) वैदिक मत्र येत असतील तर त्याचा उच्चार करणार नाही ( ३ ) भाताचे पिंड करणार नाही ( ४ ) देव-पूजादिक विहितकर्मे वेदोक्त मत्रानें करणार नाही व ब्राह्मणभोजन आपले घरी ठेवणार नाही ( ५ ) शालग्राम पूजा करणार नाही ( ६ ) ज्या देवास शूद्र जातात त्या देवास आम्ही जाऊ ( ७ ) ब्राह्मणाना दडवत मोठ्याने म्हणत जाऊ व आपले जातींतही दडवतच म्हणत जाऊ ( ८ ) वैदिक ब्राह्मण, आचारी, पाणके व शागिर्द ब्राह्मण व ब्राह्मण बायका चाकरीस ठेव-णार नाही व आपले घरीही ठेवणार नाही ( ९ ) आमच्या जातीमध्ये सतोषे पाट लावतील त्याना आम्ही अडथळा करणार नाही. या सर्व कलमावरून क्षुल्लक बाबतीतही सत्ताधीशाच्या लहरीला कसे निग्रहाचे स्वरूप येते हे दिसून येते. नारायणरावाच्या वधानतर सवाई माधवरावानेही हा कतबा कायम केला पुढें दुसऱ्या बाजीरावाने प्रभूनी राघोबाला केलेली मदत स्मरून हा कतबा रद्द केला

साध्या व किरकोळ अशा आपआपसात नमस्कार करण्याच्या, निऱ्या घालून धोतरे नेसण्याच्या पद्धतीवरही निर्बंध घालण्यात येत असत सांगितले तर आजच्या वाचकवर्गाला ते खरेही वाटणार नाही पण ते सागण्याला इतिहास उभा आहे. मुंबईस इग्रजाचे

राज्य सुरू झाल्यावर तेथील सोनारानी आपआपसात नमस्कार करण्यास सुरुवात केली ती ब्राह्मणाना न रुचल्यामुळें त्यानीं इग्रज सरकारकडे तक्रार केली, त्यावर तपास करून २८ जुलै १७७९ रोजी सरकारने ठराव केला की, " सोनाराना नमस्कार करण्याचा अधिकार नसल्याने तो करण्याने हिदूशास्त्र विधीची अवगणना होते असे पेशव्यानी गान्हाणे माडले आहे. म्हणून सरकारने असा ठराव केला आहे की सोनारानी नमस्कार करू नये. सोनार मुकादम दामूल शेठ त्र्यबक शेट यास सरकारतर्फे तसे कळविण्यातही आले आहे " (जनता, मार्च १९३५). पेशवाईतील धाकजी परभचे उदाहरणही याच प्रकारचे आहे त्याची सून विधवा झाली तेव्हा पाट लावू नये असा ठराव झाला व पाठारे परभूनी शूद्राचार सोडून गायत्री मत्र शिकावा असे ठरले पळसे ब्राह्मण त्याचे धर्मकार्य करण्यास तयार झाले नाहीत तेव्हा गोसावी खेडकर वगैरे भट्टाकडून गोत्रे लावून पाट करण्याची मनाई व गायत्री मत्र पठण करण्याची सवलत मिळविली पण हा निर्णय धाब्यावर बसवून केशवजी दामाजी चौलकर याने पाटाची स्त्री केली तेव्हा त्यास वाळीत टाकण्यात आले ! हे भाडण आठ वर्षे चालून पेशव्यापर्यंत गेले व त्यानी इ स १७४० साली निर्णय दिला की 'पाताणे परभू यानी घरचे कर्म गर्भाधानापासून अत्येष्टीपर्यंत शूद्रवत् चालवीत जाणे.' (जनता कित्ता)

आपल्याच भारतात हा प्रकार रूढ आहे अशी मात्र समजूत करून घेऊ नका इतर देशातहि हाच प्रकार होता व आहेही. सातव्या शतकात खलिफाच्या कारकीर्दीत काही वर्गांना देवळें बाधण्याची व घोड्यावर बसण्याचीहि बदी होती. आणि आधुनिक काळात अमेरिकेत मुक्त झालेल्या नीग्रोवरही अनेक प्रकारची बधने होती. १८२० च्या कायद्याने मुक्त नीग्रोनीही गहू, औषधें, तमाखू विकणे किंवा एखादी नाव बाळगणे हा गुन्हा ठरविला होता आणि ती जुन्याकाळी नव्हेत तर गेल्या शतकात. पण एक शतकापूर्वीच्या काळी जाण्याचेहि कारण नाही आजहि आफ्रिकेत भारतीयाना अस्पृश्यासारखे वागविले जात आहेच ना ? त्या विरुद्ध सत्याग्रह करण्याचें तेथील भारतीयानी ठरविले असल्याचे आपण वर्तमानपत्रात वाचलेच असेल आणि एका अमेरिकन स्त्रीवर बलात्कार केल्याबद्दल पाच निग्रोना देहाताऐवजीं दीर्घकाल कारागृहाची शिक्षा देण्याची शिफारस तुच्छ मानून त्या निग्रोना

अमेरिकन ट्रुमनने फाशीची शिक्षा फर्मावल्याचे आपण पाहत आहोच ना? उलट आपल्या पूर्वजानी शूद्राने आर्य स्त्रीशी गमन केले असता त्याचा लिगच्छेद करावा येवढीच शिक्षा सागितली होती

मनुष्याने आपल्या हाताने आपल्यावर ओढविलेल्या आपत्तीत धर्मानेहि भाग घेतला आहे हे आश्चर्यकारक होय धर्मच्छलाचा युरोपातील इतिहास सुशिक्षिताच्या परिचयाचा आहे धर्मच्छलाच्या तितक्या अघोर प्रकारापासून आपला देश बराच अलिप्त राहिला ही समाधान मानण्यासारखी गोष्ट होय पण हिंदुस्थानातहि धर्मच्छलाने कधी डोकावूनच पाहिले नाही किवा धर्माच्या विकृत स्वरूपाने मानवनिर्मित आपत्तीत मुळीच भर टाकली नाही असे मात्र नाही रामायणातील शबूक कथेची वाचकास ह्या ठिकाणी आठवण होईलच शूद्राना वेदाध्ययनाचा किंवा तपाचरणाचा अधिकार नव्हता या नियमाची कडक अमलबजावणी करण्याकरिता रामाने शबूकाचा वध केला अशी कथा रामायणात व उत्तररामचरितात आली आहे व लघुस्मृतिपैकी अग्निसंहितेने ' वध्यो राज्ञा सवै शूद्र ' असे प्रतिपादिले आहे अर्काटजवळील तिरुवत्तुर येथील मदिरलेखावरून पाड्या घराण्यातील सुदर नावाच्या राजाने जैनावर शस्त्र धरले होते असे दिसते हा राजा प्रथम जैनधर्माभिमानी होता पण त्याची पत्नी जी चोल राजाची कन्या तिच्या शिकवणीने त्याने शैवधर्म स्वीकारला व आपल्या प्रजेसहि धर्मांतर करण्याबद्दल तो फर्मावू लागला पुष्कळानी जुना धर्म सोडण्याचे नाकारले. त्यामुळे सुमारे आठ हजार लोकाना भितीत चिणून मारण्यात आले, असे म्हणतात (स्मिथ) अशाप्रकारे धर्मच्छलाने हिंदुलोकानाहि आपले अस्तित्व थोडेंबहुत जाणविले आहे.

धर्मातीत म्हणविणाऱ्या ब्रिटिश राजवटीने रानटी जातीवर बधने लादली नाहीत असे नव्हे नवी लादली इतकेच पूर्वीची सरकारे जगलाकड व तेथील पडीत जमिनीकडे फारसे लक्ष देत नसत, पण इग्रजसरकारने जगल खाते निर्माण करून या दूर जगलात राहणाऱ्या आदिवासीना पडीत जमीन पिकविण्याची व तेथील झुडपाचा उपयोग करण्यासही मनाई केली. अलीकडे त्यांच्यातहि जागृती उमलू लागल्याने गेल्या ५ नोव्हेंबर १९५१ रोजी चार हजार आदिवासी नाशिक कलेक्टर कचेरीसमोर येऊन उभे राहिले व पडीत जमीन लागवडीस द्यावी अशी त्यानी मागणी केली. परकी सरकारने या

आदिवासीना पिळून काढले ते परकीय धोरणास अनुसरून होते. पण आता स्वतंत्र भारताने या "ं: "ं । मार्गांत परकीयानी पेरलेले काटे काढून टाकणे इष्ट नाही का ? वारली, भिल्ल, लमाण वगैरे जाती पूर्वी जगलातून माल आणून पोट भरीत. त्याची सोय आता अन्य रीतीने केली पाहिजे ! काही जाती भटक्या व गुन्हेगारीत मुरलेल्या आहेत हे मान्य केलेच पाहिजे. क्रिमिनल ट्राइब्ज सेटलमेंट (गुन्हेगार वसाहती)च्या रूपाने इग्रजानी त्याची जी सोय केली होती ती आता अधिक सुधारली पाहिजे व ज्याची वन्य जाती म्हणून निवळ उपेक्षा झाली त्याना हळू हळू वळणावर आणून कामास जुपून समाजातर्गत केले पाहिजे मात्र हे करताना वन्य जातीना शहरातल्या कुद वातावरणात न आणता खेड्यापाड्यातील मोकळ्या हवेतच त्याना उद्योगधद्यास जुपणे इष्ट होईल काही वन्यजाती अद्यापहि अत्यत कल्पनातीत वन्य स्थितीत आहेत. उदाहरणार्थ, मध्यप्रातातील बस्तरमधील अबुजमाड पहाडाच्या दक्षिणेकडील खालच्या भागातील आदिवासी अद्यापहि सपूर्ण नग्नावस्थेत राहतात असे म्हणतात. पाश्चात्यानी अमेरिका व ऑस्ट्रेलिया येथे वसाहती स्थापन केल्या तेव्हा तेथील वन्यस्थाना त्यानी जाळून मारून टाकले. तो भीषण प्रकार आपण टाळला हे अभिमानास्पद होय पण आता त्याना आपसात मिळवून घेतले पाहिजे यापैकी काही जाती क्रूरही आहेत हे विसरता कामा नये. बिलासपुरातील कोरवा ही पहाडी जात दिसण्यात व वागण्यातही राक्षसी डाकूगिरी हा तिचा धदाच ! अशा सारख्या लोकानाच प्राचीनकाळी 'अस्पृश्य' म्हणून गावाबाहेर ठेवण्यात येत असावे निर्वासित व अनिर्वासित अशा दोन प्रकारच्या शूद्राचा पाणिनीने उल्लेख केला असून निर्वासित म्हणजे 'बहिष्कृत' असा पतजली भाष्यकाराने खुलासा केला आहे. उलट मुसलमानी धर्म स्वीकारण्याचे नाकारल्यामुळे काही रजपुतावर भग्याचा धदा लादण्यात आला, व तो आजतागायत अनेक ठिकाणी चालू आहे. हा भग्याचा धदा नामशेष करणारे कृमी शास्त्रज्ञानी हस्तगत केले आहेत. त्याच्या साहाय्याने हा घृणास्पद धदा ज्या दिवशी गाडला जाईल तो सुदिन ! अशाना योग्य मार्गावर आणण्याच्या वाटेने योग्य पावले टाकीत गेले पाहिजे व स्वतत्र भारताने त्या दिशेने पावले टाकण्यास सुरुवात केली आहे

---

## प्रकरण तिसरें

# अर्धांग गेलेली अर्धांगी !

गेल्या प्रकरणात समाजातील बलिष्ठ वर्गाने कनिष्ठावर लादलेल्या आपत्तीचे दिग्दर्शन केले. आता मोठ्या समाजाचे प्रतिबिंब ज्या छोटया समाजात पडते त्या कुटुबातही बलिष्ठाच्या लहरीने कनिष्ठाचा खेळखंडोबा कसा होतो हे थोडेसे पाहू

कुटुबसस्था ही विराट समाजव्यवस्थेचे सूक्ष्म अथवा लिंगशरीरच होय. समाजातील अनेक घटनाची बीजे येथेंच प्रथम उगवू लागतात. या कुटुबसस्थेंतील प्रेमरज्जू ही समाजव्यवस्थेतील एक अमोलिक चीज होय समाजाची पुनर्घटना [illegible] या प्रेमरज्जूने सर्व समाज बाधला जावा हेच साध्य आहे कुटुबापुरतेच पाहिले तर ज्या कुटुबात सर्व माणसे एकमेकावर प्रेम करीत आहेत अशी काही थोडी आदर्श कुटुबे कोणालाही दाखविता येतील म्हणजे समाजघटनेचे अतिम ध्येय मर्यादित क्षेत्रात का होईना कुटुबसस्थेने व्यवहारात उतरवून दाखविले आहे पण ही आदर्श कुटुबें सोडल्यास सर्वसामान्य कुटुबात बलिष्ठाच्या छदानुवर्तित्वाने कनिष्ठाना आपले जीवन कठावे लागत असल्याचाच देखावा दृष्टीस पडतो.

कुटुबात कर्ता पुरुष हा मालक, व पत्नी आणि मुले ही त्याच्या हुकमतीत, अशी सामान्यपणे व्यवस्था असते. शिस्तीच्या दृष्टीने पाहिले तर एकाने दुसऱ्याच्या हुकमतीत वागावे हे गैर नाही. पण ह्या हुकमतीचा अर्थ प्राचीन काली कर्त्या पुरुषाची मालकी स्त्रिया व मुले याच्यावर अनिर्बंध आहे असाही समजण्यात येई. प्राचीन काळी जेव्हा शेतीचे काम करण्यास स्त्रिया व मुले या घरच्या विश्वासू व हुकमी नोकराची जरूर मोठी भासे, त्या काळी कुटुबातील कर्ता पुरुष हा स्त्रिया व मुले ही आपली खासगी जिदगीच समजे; व त्याचा गुलामाप्रमाणे क्रयविक्रय करण्याची सत्ताही गाजविल्याशिवाय राहात नसे. सर्व देशांतील जुन्या कायदेकानूतून ही सत्ता उघडपणे मान्य केलेली असे. आपल्या धर्मग्रथापुरते पाहिले तर स्मृतीतून निरनिराळे पुत्राचे

जे प्रकार सांगितलेले आहेत त्यात क्रीतपुत्र असाही एक प्रकार आहे व तो मुलाचा क्रयविक्रय करण्याच्या रूढीविषयी साक्ष देण्यास समर्थ आहे हा प्रकार राजमान्य असून वसिष्ठ स्मृतीने त्याचे समर्थनही स्पष्ट शब्दात केले आहे ते असे की, 'शुक्रशोणितसभवो पुत्रः मातापितृनिमित्तकः तस्यप्रदान-विक्रयत्यागेषु मातापितरौ प्रथवत ।' म्हणजे पुत्र हा मातापित्याच्या शरिरा-पासूनच साक्षात् निर्माण होत असल्याने त्याचे दान करण्याचा किंवा विकून टाकण्याचा मातापितराना साहाजिकच हक्क आहे ! हा हक्क बजावलाही जाई. अशाविषयी ऐतरेय ब्राह्मणातील हरिश्चद्राने आपला पुत्र रोहित यास विकून टाकल्याचा किंवा कठोपनिषदातील नचीकेताच्या बापाने नचीकेताला मृत्यूला देऊन टाकल्याचा असे दाखलेही प्राचीन वाङमयात जागते आहेत.

पण कुटुबाची अधिष्ठात्री देवता जी गृहस्वामिनी तिच्या चित्रणाकडेच वळले असता वेदातील यमी, लोपामुद्रा, उपनिषदातील मैत्री, गार्गेयी, थेरी गाथेत उल्लेखिलेल्या खेमा, रेवती वगैरे भगवान् बुद्धाच्या साठसत्तर विदुषी शिष्यिणी व इतिहासातील शातवाहनाची माता गौतमी, व मराठ्याची अहल्याबाई डोळ्यापुढे उभ्या राहतील. त्याना प्रथम नमन करूनच सामान्य हलाखीकडे वळू या

कुटुबव्यवस्थेकरिता कुटुबातील एका व्यक्तीकडे निर्णायक हक्क असावा हे स्वाभाविक. पण ह्या हक्काचा दुसऱ्यास सर्वस्वी असहाय करून सोड-ण्यात, त्याला आपल्या स्वच्छदलहरीप्रमाणे नाचू लावण्यात, किबहुना त्याच्या जीविताचीहि विल्हेवाट लावण्यापर्यंत कसा दुरुपयोग करण्यात येऊ शकतो हे पाहण्यासारखे आहे.

हल्लीच्या काळीही सुनेला डागून, हालहाल करून, रॉकेल ओतून पेट-वून देऊन जिवत जाळण्याचे एखादें उदाहरण क्वचित् कानावर येते. एके काळी तर राजाच्या प्रेतदहनाबरोबर त्याच्या स्त्रियाचा ताडाही बळजबरीने जाळण्याची सर्रास चाल होती. इराणातील गुहाच्या उत्खननात राजाच्या प्रेताशेजारी अनेक राण्याची, नोकराची व आवडत्या पशूची प्रेतेंही व्यवस्थित रीतीने ठेवलेली उपलब्ध झाली आहेत, याचा उल्लेख मागें केलाच आहे. निवळ सशयावरून स्वतःच्या पुत्रासच आपल्या मातेचा वध करावयास सागणाऱ्या कोपिष्ट जमदग्न्याची आज्ञा शब्दशः मानून आपल्या

मातेचा खून करणाऱ्या परशुरामाची, किंवा अंतर्यामीं दयाघन असता समाजनियंत्रणामुळे बाह्यतः कोपिष्ट बनून स्वभार्येचा त्याग करणाऱ्या रामचंद्राची उदाहरणे आपल्या पुराणांतहि आहेतच ना? पण ही अपवादात्मक उदाहरणे सोडून सर्वसाधारण मानवीसंसाराकडे पाहिले तरी संसारशकटास सारखेच अवश्य असणाऱ्या पति व पत्नी या दोहोंच्या संसारातील दर्जांत किती तरी अंतर कायद्याने राखले जात असे नुसता देखावा पाहिला तर दोहोंचा दर्जा समान दिसेल असा होमहवन करताना पत्नीस पतीच्या जोडीने बसण्याचा अधिकार, पण पत्नीचा त्याग केल्यावर तिची हिरण्मयी प्रतिकृति तिच्या स्थानी स्थापून रामचंद्रास अश्वमेधयज्ञ जसा करता आला तसे पतीची हिरण्मयी प्रतिकृति जवळ बाळगून स्त्रीने यज्ञ केल्याचे उदाहरण इतिहासाला सापडले तर सापडो! आणि सापडणार कोठून? कारण तात्त्विक दृष्टया स्त्रियांचा दर्जा समान मानला व स्त्रीपुरुष-देवतांना नमन करिताना लक्ष्मीनारायणाभ्यां नमः, उमामहेश्वराय नमः, शचीपुरंदराय नमः, वगैरे द्वंद्वसमासांत त्यांना पहिले स्थान देण्यात आले किंवा कविकुलगुरूने त्यांना 'सचिव' किंवा 'मिथः' सखा म्हणून लाडिकपणे संबो-धले तरी प्रत्यक्ष आचरणाशी व तत्त्वमसीशी गाठ आली असता, राजा तो राजा व सचिव तो सचिव हेच नाते कायम उरे राजाने सचिवास खुशीने किंवा मतलबाने काही काळ कितीही डोक्यावर चढविले तरी राजाच्या नुसत्या क्षणिक भृकुटिपाताने सचिवाचे वैभव विरून गेल्याचे इतिहास सांगतोच ती स्थिति स्त्रियांची. स्त्री पतीच्या तंत्राने वागत आहे तोपर्यंत हौशी पती तिला गृहस्वामिनी म्हणून संबोधील पण हे विशेषण बहाल करण्यात आपण मोठे औदार्य दाखवीत आहो याची जाणीव स्त्रीला दाखविल्याविना राह-णार नाही आणि या जाणिवेतच परवशतेचे विष साठविलेले आहे 'यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवता' असे ज्या शास्त्रकाराने स्त्रियाविषयी गौरवून लिहिले आहे त्यानेच स्त्रिया या स्वभावतःच उच्छृंखल वृत्तीच्या असून त्यांना नेहमी नियंत्रणाखालीच ठेवले पाहिजे असे प्रतिपादण्याचे बाकी ठेवलेले नाही. स्त्रियाविषयी मनु लिहितो की,

नैता रूपं परीक्ष्यन्ते नासां वयसि संस्थितिः।
सुरूपं वा विरूपं वा पुमानित्येव भुञ्जते ॥

पौश्चल्याच्चलचित्ता च नैस्नेह्याच्च स्वभावत ।
रक्षिता यत्नतोऽपीह भर्तृष्वेता विकुर्वते ।।
एव स्वभाव ज्ञात्वासा प्रजापति निसर्गजम् ।
परम यत्नमातिष्ठेत् पुरुषो रक्षण प्रति ।। ९। १४-१७

मनूच्या मते स्त्रियाचा उपजत स्वभाव असा की, निषिद्ध वस्तूकडे त्याचे नेमके लक्ष जावे त्या रूपाकडे पाहात नाहीत, वयाकडे पाहात नाहीत. कसलाही पुरुष त्याना चालतो, तो पुरुष असला म्हणजे झाले ! त्याचे चित्त अस्थिर असल्याने त्या पतीवर केव्हा अरिष्ट ओढवतील याचा नेम नाही. तेव्हा स्त्रियाचे हे स्वभावगुण लक्षात बाळगून त्या नेहमी आपल्या कह्यात वागतील अशी पतीने खबरदारी घ्यावी !

## स्त्रियांवरील नियंत्रण

लग्नविधीचे वर्णन करताना आदर्शकुटुबातील स्थितीचे चित्र म्हणून मनु वर्णन करतो की,

यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः ।
यत्रैतास्तु न पूज्यन्ते सर्वास्तत्राफलाः क्रिया ।।
तस्मादेता सदा पूज्या भूषणाच्छादनाशनै ।
भूतिकामैर्नरैर्नित्य सत्कारेषूत्सवेषु च ।।
सन्तुष्टो भार्यया भर्ता भर्त्रा भार्या तथैव च ।
तस्मिन्नेव कुले नित्य कल्याण तत्र वै ध्रुवम् ।। ३।५६-६०

स्त्रियाना खूष ठेवल्या तरच घरात आनद नादतो, ज्या कुलात भर्ता व भार्या ही दोन्ही सतुष्ट असतात त्या कुलात कल्याण कायमचे वास्तव्य करून राहते. पण पुढे हाच शास्त्रकार प्रत्यक्ष व्यवहाराचे वर्णन करताना लिहितो की,

अस्वतत्रा· स्त्रिया कार्या· पुरुषै स्वैर्दिवानिशम् ।
विषयेषु च सज्जत्य सस्थाप्या आत्मनो वशे ।। ९।२

स्त्रियाची प्रवृत्ति विषयभोगाकडे असल्याने त्याना पुरुषानीं नियंत्रणात वागवावे जन्मापासून मृत्यूपर्यंत स्त्री ही कोणा ना कोणा पुरुषाच्या ताब्यातच वागली पाहिजे. मनु लिहितो,

पिता रक्षति कौमार्ये भर्ता रक्षति यौवने ।
रक्षन्ति स्थविरे पुत्राः न स्त्री स्वातन्त्र्यमर्हति ।।

प्रत्यक्ष व्यवहारात कालमानाप्रमाणे उच्च वर्णातील स्त्रियाना स्वातत्र्य, शिक्षण व सत्ताहि मिळालेली होती हे इतिहासावरून स्पष्ट आहे वैदिक वाङ्मयात मन्त्रदृष्टया या नात्याने यमी, घोषा, अपाला वगैरे स्त्रिया चमकतांना आढळून येतात आणि उपनिषत्काली गार्गी, मैत्रेयी, ब्रह्मविद्येसबधी निर्भीड चर्चा करीत असलेल्या दिसतात तसेच राजघराण्यातील स्त्रिया राजकीय उलाढालीत कित्येक वेळा प्रमुख भाग घेत व काश्मीरच्या राण्या सुगधा व दिद्दा आणि मराठ्याच्या राज्यातील लक्ष्मीबाई व अहिल्याबाई यानी राज्येहि चालविली. पण ही विशेष कर्तबगार स्त्रियाची उदाहरणे सोडली तर सामान्य स्त्रीवर्गाविषयी अनुदारबुद्धि व स्त्रियाची परवशता ही हजारो वर्षे सर्व देशात कमीअधिक प्रमाणात कायम आहे मात्र त्या परवशतेचे चित्र रगविण्यापूर्वी हेही नमूद करून ठेवले पाहिजे की पितृसत्ताक कुटुबाप्रमाणे मातृसत्ताक कुटुबपद्धति ही एके काळी आपल्या देशात विद्यमान होती व ती आजकालही दक्षिणेकडे रूढ आहे प्राचीन दाक्षिणात्य दानपत्रातहि नृपाच्या नावाबरोबर त्याच्या श्रेष्ठ मातेचा गौरवपूर्वक उल्लेख असे

स्त्रीविषयक अनुदार बुद्धीला व स्त्रियाच्या परवशतेला सुरुवात जन्मापासूनच होते बाळतिणीला मुलगी झाली की ती बातमी इतराना सागणारीचा चेहरा असा अबुसलेला असावयाचा की, मुलगीऐवजी आपत्तीच जन्मास आली असे पाहाणारास वाटावे मुलगी अनिष्ट आपत्ति समजून जन्मतःच तिच्या नरडीला नख लावण्याची चाल काही रानटी जातीतून आढळते असे समाजशास्त्रज्ञ सागतात या दिव्यातून ती वाचली म्हणजे तिच्यावरील पुढील आपत्ति म्हणजे विवाह ही होय. विवाहाचे जे अष्ट प्रकार स्मृतीग्रथातून वर्णिले आहेत ते निरनिराळ्या काळी व निरनिराळ्या समाजात प्रत्यक्ष अस्तित्वात होते. त्यापैकी राक्षस नावाचा प्रकार म्हणजे मुलगी जबरदस्तीने पळवून नेण्याचा प्रकार मुलगी व तिचे आप्त या दोहोवर ही एक मोठी आपत्तीच असे. महाभारतातील सुभद्राहरण हे ह्या राक्षसविवाहपद्धतीचे प्रसिद्ध उदाहरण होय. अर्जुनाने सुभद्रेला प्रेमाने वश केले व नतर पळविले हा कथाभाग मागून तयार झालेला मूळ कथेत कृष्ण अर्जुनास म्हणतो की

'क्षत्रियानी स्वयवरविधीने विवाह करावा हे उत्तम. पण स्वयवर केल्यास सुभद्रा कोणास माळ घालील कोण जाणे तेव्हा स्त्रीस बलात्काराने हरण करावे हाच मार्ग शूर क्षत्रियास उचित आहे' काशी राजाच्या तीन कन्या अबा, अबिका, अबालिका या स्वयवर करीत असता स्वयवरपद्धती धाब्यावर बसवून भीष्माने त्याचे जबरदस्तीने हरण केले, व दोघीचा विचित्रवीर्याशी विवाह लावून दिला विवाहित स्त्रीलाहि जबरदस्तीने पळवून नेण्याचा प्रकार त्याकाळी प्रचलित होता हे जयद्रथाने द्रौपदीस हरण केले यावरून दिसते या प्रसगी द्रौपदीच्या वतीने धौम्य ऋषीनी जयद्रथास विनविले की, 'महारथ असे जे पाडव त्याना जिकल्याखेरीज तुला या द्रौपदीला नेता येणार नाही. कारण पुरातन कालापासून चालत आलेल्या क्षत्रिय धर्माकडे दृष्टि दे' यावरून पुरातनकालापासून चालत आलेल्या क्षत्रिय धर्माप्रमाणे दुसऱ्याच्या विवाहित स्त्रीस जिकून नेणे, क्षत्रियास गर्ह्य समजले जात नसे स्त्रियास जिकून पळवून नेण्याची ही चाल रजपूत राजातहि जारी होती, व त्यामुळे कृष्णाकुमारीसारखी राजकन्या विष खाऊन मृत्यूही स्वीकारी

## राक्षस व असुर विवाह

रानटी लोकात तर परक्या टोळीतील मुलगी पळवून आणणे हाच लग्नाचा प्रशस्त व एकमेव प्रकार मानला जाई व त्याचा अवशेष अनेक जातीत काही ना काही रूपाने आजही शिल्लक राहिला आहे उदाहरणार्थ, बिहार, ओरिसातील गडा नावाच्या कोष्टी जातीत असा विधी आहे की लग्न करून वधूवर घरी आले म्हणजे गवताचा हरीण करून वधूच्या कानामागे ठेवतात नतर वराने गवताच्या बाणाने सात बाणात त्याला उडवावा न उडाल्यास वधूचा भाऊ तो हरिण घेऊन पळतो व वराने त्याला धरून आणावा लागतो. क्षत्रिय जातीत विवाहप्रसगी वराच्या हाती तलवार किंवा सुरा देण्याची चाल अद्यापही आहे ती या कन्या जिकून आणण्याच्या पद्धतीचेच रूपक होय.

मुली पळवून नेल्याचा हा प्रकार रोममध्ये कसा चाले याचें इतिहासकार वर्णन करितो की, रोम्युलस राजाने सबाइन व इतर आजूबाजूच्या शहरातील लोकाना रोममधील करमणुकीचे खेळ पाहाण्यास बोलाविले व

खेळ ऐन रंगात असता रोममधील लोकांनी या परगावाहून आलेल्या लोकां-
पैकी जेवढ्या उपवर मुली हाती लागल्या तेवढ्या पळविल्या यहुदी लोकांचा
इतिहास बायबलाच्या जुन्या करारात समाविष्ट आहे त्यात एका अध्यायात
पुढारी आपल्या अनुयायास सांगतो की, ' या द्राक्षाच्या मळ्यात दडून रहा व
शिलोच्या मुली नाचण्याकरिता बाहेर केव्हा पडतात हे पाहात बसा. त्या
बाहेर आल्या की प्रत्येकजण एक एक मुलगी बायको म्हणून घ्या. ' इंग्रज
लोकांत वधू पळवून नेण्याची चाल पूर्वी होती तिचा अवशेष अद्यापही
असा उरला आहे की वधूवर लग्नाकरिता चर्चकडे चालले की त्यांच्यामागे
कुणीतरी फाटकातुटका जोडा फेकावयाचा

राक्षसविवाह जेथे रूढ नव्हता तेथे आसुरविवाह रूढ होता यात
मुलगी जबरदस्तीने पळवावयाची नसून विकत घ्यावयाची चाल असे पंडूची
भार्या माद्री व दशरथाची कैकेयी ह्या आसुरपद्धतीने म्हणजे विकत घेत-
लेल्या भार्या होत्या. पंडूच्या वतीने भीष्माने सुवर्ण, हत्ती, घोडे, वस्त्रे, अलं-
कार, मणि, मोत्यें, वगैरे अर्पण केल्यावर शल्याने आपली बहीण माद्री ही
भीष्माच्या हवाली केली. कैकेयीच्या बापाला तर दशरथाने सर्व राज्य अर्पण
केले होते ग्रीक इतिहासकार लिहितात की, तक्षशीला नगरीत उपवर कन्या
बाजारात विकावयास आणीत व जो भारीत भारी किंमत देई त्यास त्या
विकण्यात येत. या ठिकाणीही कन्येच्या पसंतीचा प्रश्नच नसे विवाहाच्या
अष्टप्रकारापैकी गांधर्व विवाहाच्या प्रकारात मात्र वधूला मनपसंत वर पसंत
करण्याची मुभा असे व शकुंतलेप्रमाणे बहुत राजर्षिकन्यका गांधर्वविधीनें
पूर्वी विवाह करीत पण ही चाल कालांतराने बंद पडून कन्येला दान कर-
ण्याची ब्राह्मविवाहाची चाल रूढ झाली या चालीप्रमाणे बाप, भाऊ, किंवा
कोणी आप्त याने वधूस दान करावयाची असते अर्थात् तिच्या पसंतीचा
प्रश्न गांधर्वविधीप्रमाणे ब्राह्मपद्धतीत उत्पन्न होत नाही. बाप ज्या पुरुषाला
दान करील त्याच्या हातात तिने आपला हात अर्पण करावयाचा एखाद्या
धर्मभ्रष्ट रजपूत राजाप्रमाणे तिचा हात परधर्मीय राजाच्या हातात दिला
किंवा राजकीय मैत्री साधण्याकरिता पूर्वी शत्रू असलेल्या राजाच्या हातात
दिला तरी तिने तक्रार करता कामा नये. येथे एक विशेष लक्षवेधक उदा-
हरण रामदेवराव जाधव याचे. ज्ञानदेवाने ज्या रामदेवाचा गौरवपूर्वक

उल्लेख केला त्या रामदेवाने आपली एक कन्या आपणावर चालून आलेल्या अल्लाउद्दीन खिलजीस देऊन टाकली ! दोन राजामध्ये युद्ध सपून तह झाला म्हणजे एकमेकानी आपल्या मुली एकमेकास देऊन तह दृढ करावयाचा पूर्वी सप्रदायच असे हा तह विसरून नवरा व बाप याच्यात पुन्हा युद्ध उपस्थित झाले की दोन्ही कुटुबाकडे सारखाच ओढा असणाऱ्या वधूची मन स्थिति काय होत असेल याची कल्पनाच केलेली बरी ! पण असा प्रकार सर्रास रूढ होता हे इतिहास सागतो यज्ञसमारभात ऋत्विजाला सालकृत कन्यादान करण्याचीही रूढी असे तेथेही मुलीला ऋत्विज पसत आहे की नाही हा प्रश्न दिसत नाही ख्रिश्चन धर्मातही स्त्रीपुरुष एकमेकाची निवड करीत असले तरी धार्मिक विधीत कन्यादानच विहित आहे. मात्र त्याच्यात ते आता औपचारिकच उरले आहे. परतु प्रसगविशेषी बापाने विवाहास समति न दिल्यास वधूवराना गुप्तपणे पळून जाण्याचा प्रसग अजूनही येतो

## सहस्र सौभाग्यवतींचे पतिराज

विवाह झाल्यानतर स्त्री ही भर्त्याच्या पूर्ण अकित झाली असे समजण्यात येते. पतिगृही सपत्नीच्या समागमात काळ कठण्याची आपत्ती पूर्वीच्या काळी बहुश येई बहुपत्निकत्वाची चाल पूर्वी श्रीमतात तरी जारी होती ग्रीसमधील सालोमनला एक हजार व भारतातील कृष्णाला सोळा हजार स्त्रिया होत्या या वर्णनात अतिशयोक्ति असली तरी राजे लोकाच्या झनान्यात अनेक स्त्रिया असत व पुष्कळ वेळा त्यातील काही स्त्रियाना वर्षावर्षांत नवऱ्याचे दर्शन घडत नसावे हजारासारखे आकडे सोडले तरी तीन बायका करणाऱ्या दशरथापासून सहा लग्ने लावणाऱ्या शिवाजीपर्यंत धनाढ्याची बहुपत्नीकत्वाची चाल अखड दिसते. दोन बायका करणे हे तर सर्वसामान्य होते. हिंदुशास्त्रकार त्याचे समर्थन असे करीत की, 'यदेकस्मिन् यूपे द्वे रशने परिव्यसति तस्मात् एको द्वे जाये विन्दते' (तै स.) म्हणजे एका यूपाला दोन दोऱ्या बाधल्या जाऊ शकतात तस्मात् एका पुरुषाने दोन बायका करण्यास हरकत नाही. कुराणाने मुसलमानाना चार स्त्रिया करण्याची परवानगी उघड दिली आहे. मुसलमानी झनान्यातील स्त्रियाची सख्या तर प्रचड असे बगदादच्या खलिफाच्या झनान्यात ६३०० स्त्रिया

होत्या असे अबुल फैदने लिहिले असल्याचे गिबन सागतो. ऐने अकबरीचा कर्ता अबुल फाजल याने अकबराच्या झनानखान्यातील सख्या पाच हजारावर आहे असे लिहिलेले आहे. त्यावरून कृष्णाच्या सोळा हजार स्त्रियाचा आकडाही अशक्य वाटेनासा होतो

कुलीन घराण्यातच मुलगी द्यावयाची या कल्पनेचे बगाल्यात एके काळी इतके पीक माजले होते की कुलीन घराण्यातील पुरुषाला दहापधरा बायकाशी लग्न लावावे लागे. कुलीन कुटुब सधन नसले तर पतिमरणानतर दारिद्र्याचे हाल चुकविण्याकरिता केवळ काही स्त्रिया सती जात.

भर्त्याच्या घरी सवती नसल्या तरीही पत्नीची स्थिति स्वतत्र वृत्तीची नसते विवाह झाला म्हणजे स्त्री सर्वस्वी पतीची अकित मानण्यात येते. विवाहाच्या वेळी तिची समति विचारण्यात येत नाहीच, पण विवाहानतर पतीचे पटत नसल्यास किबहुना पति मारहाण करीत असला तरीही हिंदूतील पुष्कळ जातीच्या स्त्रियाना काडीमोड करून घेता येत नसे. विवाहानतर स्त्री ही पुरुषाची मालमत्ता होते, मग तिला त्याने कसेही वागविले, दासीबटकीची कामे करावयास लावले, तरीही 'पतिकुले तव दास्यमपि क्षमम्' असे म्हणून तिच्या बाधवानी ती वैतागून माहेरी आली असता पतिगृहीच लोटावयाची पूर्वीच्या काही शास्त्रकारानी काही विशिष्ट परिस्थितीत पहिल्या नवऱ्याला सोडून दुसरा नवरा करण्याची व पतिनिधनानतर पुर्नविवाह करण्याची मोकळीक ठेवलेली होती वात्सायन सागतो की,

सतु यदन्यजातीयः पतित क्लीब एव वा
विकर्मस्थ सगोत्रो वा दासो दीर्घामयोपि वा
ऊढापि देया सान्यस्मै प्रावरणभूषणा ।।

विवाहानतर पति अन्यजातीय, क्लीब, पतित, क्रियानष्ट, सगोत्र, दास किवा दीर्घरोगी असा आढळून आल्यास स्त्रीचा विवाहविधी झाला असला तरीहि ती अनूढा समजून दुसऱ्या वरास द्यावी. वशिष्ठ–स्मृतिकार तर स्पष्टच सागतो की—

कुलशीलविहीनस्य षण्ढादि पतितस्य च ।
अपस्मारिविधर्मस्य रोगिणा वेशधारिणान् ।
दत्तामपि हरेत्कन्या सगोत्रोढा तथैव च ।।

पति रोगी, विधर्मी, सगोत्री असला तर त्या स्त्रीला पतीच्या घरून हरण करून आणावी. पण पुढे स्त्रियाना या विपत्तीतून बाहेर पडण्याचीही वाट बद करण्यात आली

ब्रिटिश अमलाखालील भारतातहि विवाह ही गोष्ट वज्रलेप समजली जात असे. विवाह हा एक पवित्र अभेद्य सस्कार असून मत्राक्षता वधूवराच्या डोक्यावर पडल्या व वधूवराची गाठ मारली गेली की ती इतकी घट्ट बसते की वज्र फुटेल पण ही गाठ सुटणार नाहीं विवाहसस्काराच्या मिठीतून सुटावयाचा एकच मार्ग–तो म्हणजे मृत्यु ! पूर्वीच्या शास्त्रकाराच्या नियमाना हरताळ फासून इग्रज सरकारच्या अमदानीत कायद्याने अशी स्थिति उत्पन्न केली होती की पती वेड लागलेला, षढ, धर्मांतर केलेला अथवा पतित, सगोत्री किंवा भिन्न जातीचा आहे व विवाह कपटप्रयोगाने झालेला आहे असे जरी सिद्ध झाले तरी कायद्याच्या घरी तो विवाहसस्कार अभेद्य वज्रलेपच लेखला जाई व या सस्कारसकटातून सोडवून घेऊन अन्य पती वरण्याची परवानगी हिंदुकायदा स्त्रीला कधीहि देत नसे मनोरजन मासिकामध्ये वा वि. जोशी, वकील यानी या बाबतीत कोर्टाच्या निकालाची स्पष्ट उदाहरणेच दिली आहेत ' दाही चरणमित्र विरुद्ध राधाचरणमित्र ' या खटल्यावरून असे दिसून येते की वेडा माणूस इतर कोणताहि व्यवहार करण्यास अपात्र ठरला म्हणजे खरेदी, गहाण वगैरे लौकिक व्यवहाराला तो अयोग्य ठरतो पण धार्मिक सस्कार जो विवाह त्याला मात्र तो सर्वस्वी पात्र उरतो वेड्याने खोटा दस्तऐवज करून आप्तेष्टाना कायद्याच्या पाशात आणले तर तो वेडा ठरविला गेल्यास त्याची त्या पाशातून सुटका होऊ शकते पण वेड्याने विवाहसस्काराचा अभेद्य पाश स्त्रीच्या मानेभोवती टाकला की तो स्त्रीची मान तोडल्याविना काढता येत नाहीं. हाच प्रकार नवऱ्याच्या अपौरुषत्वाच्या बाबतीत आढळतो. अशा पुरुषाशी झालेला विवाहसस्कार रद्द समजण्यात यावा अशी पूर्वशास्त्रकारानी स्पष्ट परवानगी दिली होती पण अलिकडच्या धर्मशास्त्रकाराप्रमाणे असला विवाह हा रद्द होऊ शकत नाही असा निर्णय ' पुरुषोत्तम विरुद्ध बाई मोनी ' या खटल्यात देण्यात आला हाच प्रकार धर्मांतरात. विवाहसस्कारानतर पति आणि पत्नी ही इतकी एकजीव झालेली मानण्यात येतात की पतीला वाळीत टाकले किंवा त्याने धर्मांतर केलें तर पत्नीने ते स्थित्य-

तर बिनहरकत स्वीकारले पाहिजे. ती ते न स्वीकारील व धर्मांतराच्या मुद्यावर अन्य पती वरण्याची इच्छा करील तर ती कायदा चालू देत नाही. कारण, कायद्याच्या दृष्टीने विवाह कधीच नष्ट होत नाही. 'सुदरी विरुद्ध पिताबरी ' या खटल्यात धर्मांतराने विवाह रद्द होत नाही असाच कायद्याचा अभिप्राय पडला.

सगोत्र विवाहाचा प्रकार तर अन्यायाचा कळसच होय असा विवाह चुकून झाल्यास तो शास्त्राप्रमाणे निषिद्ध म्हणून सगोत्री स्त्रीची सतति अनोरस अतएव वारसास नालायक, पण विवाहमत्राक्षता त्या स्त्रीच्या डोक्यावर पडल्या म्हणून ती स्त्री विवाहसस्काराने कायमची बाधलेली ! विवाहशास्त्राप्रमाणे निषिद्ध तर तो रद्द करण्याची मोकळीक असणे हे अगदी स्वाभाविक दिसते. पण विवाहमत्राक्षतात अशी काही जादू कल्पिलेली असे की एकदा अक्षता पडल्या की नाथाच्या करणीने वळचणीचे पाणी आढ्याला जाईल किंवा शुक्राचार्यांच्या सजीवनीने मेलेला कच जिवत होईल पण विवाहसस्काराने एकत्र आलेली वधूवरे कधीही विलग होणार नाहीत !

## अर्धांगी भार्या

पाश्चात्य कायद्यातही अशी एक प्रथा उपस्थित झालेली होती की पतिपत्नी ही कायद्याच्या दृष्टीने एक व्यक्तीच मानली जावी पर्यायाने याचा इत्यर्थ इतकाच की पत्नीने आपले हिताहित ठरविण्याचा सर्व मक्ता पतीला देऊन टाकावा पहिली गोष्ट म्हणजे पति आणि पत्नी ही एकमेव असल्याने त्याना एकमेकाशी पैशाबाबत वगैरे काही करार करता येत नाही. अर्थात् नवऱ्याने बायकोस अमुक मालमत्ता माझ्यामागे तुला मिळेल असा लेखी दस्तऐवज करून ठेवला तरी पतिपत्नी ही कायद्याच्या दृष्टीने एकच व्यक्ति मानल्याने एकच व्यक्ति स्वत शीच करार करू शकत नाही या मुद्यावर तो दस्तऐवज कायद्याच्या घरी रद्द मानला जाई पण पतिपत्नी एकमेव होत याचा खरा अर्थ असा की कायद्याच्या दृष्टीने पती हा पुरुष असून पत्नी ही केवळ त्याची माया होय. उदाहरणार्थ, रेल्वेच्या अपघातात पत्नीला दुखापत झाली तर पत्नीला कपनीवर फिर्याद करिता येत नसे. कारण ती माया खरे ब्रह्म नव्हे–नुसता आभास ! फिर्याद करावयाची पुरुषाने आणि ती कोणत्या

मुद्यावर तर आपल्या मालमत्तेचे नुकसान झाले यावर उलट पतीला दुखापत झाली तरीही पत्नीला फिर्याद करता येत नसे कारण पती काही पत्नीची मालमत्ता नव्हे भाष्यकार ब्रूम स्पष्ट सागतो की, The inferior has no kind of property in the company and therefore the wife cannot recover damages for the beating of her husband—धनी आणि सेवक याच्या सबधात धन्याला इजा झाल्यास सेवकाचे नुकसान झाले असे मानण्याचे कारण नाही. याचमुळे नवऱ्याला दुखापत झाली असता बायकोला फिर्याद आणता येत नाही घटस्फोटाच्या प्रकारातहि स्त्री ही पुरुषाची मालमत्ता होय याचे प्रतिबिंब उठलेले दिसते कारण स्त्री ही दुराचारी असेल तर नवऱ्यास काडी मोडता तर येनेच पण स्त्रीला फूस लावणाऱ्याकडून नुकसानभरपाईबद्दल दडहि उकळता येतो

स्त्रीला शिक्षा करण्याचा अधिकार मान्य केला जाई पतीने पाठीवर दोरीने किंवा वेताच्या छडीने प्रहार केला तरी त्याला तसा अधिकार आहे असे समजण्यात येई मनू सागतो की,

> भार्या पुत्रश्च दासश्च प्रेष्यो भ्राता च सोदरः
> प्राप्तापराधास्ताडयास्युः रज्ज्वा वेणुदलेन वा ॥ ८।२९९

मनूच्या काळाइतके प्राचीन काळात जावयास नको अलीकडे म्हणजे १८७७ साली इग्लडमध्ये अशाच प्रकारचा एक खटला कोर्टात आला होता एका दारुविक्या दुकानदाराने आपली बायको दारू पिते म्हणून तिला एका भिंतीशी ३६ तासपर्यंत साखळीने बाधून ठेविली. बायकाने फिर्याद केली पण नवऱ्यास तसा हक्क आहे असे मानून न्यायाधिशानी नवऱ्याला काही शिक्षा न करिता सोडून दिले! असले प्रकार आधी कोर्टात क्वचितच येतात. नवऱ्याने भाजले, डाग दिले तरीहि कोर्टात न जाता निमूटपणे सोसणाऱ्या स्त्रियाचीच सख्या जास्त जेथे प्रत्यक्ष शारीरिक दुखापत झाली असेल तेथें कायद्याचे सरक्षण मिळण्यासारखे असते पण पती हाच देव या शिकवणीने व पतीने टाकल्यास अन्नाची मोताद या कल्पनानी पतीविरुद्ध दाद मागण्याची मनोवृत्तीही मारली गेलेली असते यामुळें जाच असह्य झाल्यास जीव दिलेल्याची उदाहरणे मात्र ऐकू येतात. श्वेतकेतूने जेव्हा विवाहसस्थेस स्थैर्य आणले तेव्हा—

व्युच्चरत्या: पति नार्या: अद्य प्रभृति पातकम्
भ्रूणहत्यासम घोर भविषत्यसुखावहम् ॥

पतीशी बेइमान होणाऱ्या स्त्रीला भ्रूणहत्येचे पातक लागेल असे बजावले. त्याबरोबरच पुरुषानाही—

भार्यान्तिथा व्युच्चरत. कौमारब्रह्मचारिणीम् ।
पतिव्रतामेतदेव भविता पातक भुवि ।।

पतिव्रता भार्येशी बेइमान होणाऱ्या भर्त्यासही तसेच पातक लागेल असे बजावले. पण हे दुसरे पातक पुराणातील दप्तरातच दडून राहिले ! कारण अन्य स्त्री पतीने घरी आणून ठेविली तरी पत्नीस कायदेशीर रीत्या लग्न रद्द करून घेता येत नसे

## अंध ऋषिवर्य

पतीमरणानतर तरी अन्य विवाह करण्याची पूर्वशास्त्रकारानी सवड ठेवली होती पण नतरच्या शास्त्रकारानी तोही मार्ग बद केला विवाह-सस्कार हा अभेद्य मानला तरी मरणोत्तर तरी तो रद्द समजला जावा. पण पत्नीच्या बाबतीत तसे समजले जाऊ नये, असे ठरले

नष्टे मृते प्रव्रजिते क्लीबेच पतिते पतौ
पञ्चस्सु आपत्सु नारीणा पतिरन्यो विधीयते ।।

अशी मोकळीक नारदस्मृतीने दिलेली आहे. पण ही मोकळीक दीर्घतमा ऋषीने हिरावून घेतली अशी महाभारतामध्ये कथा आहे. दीर्घतमा ऋषि नावाप्रमाणे खरोखरच अध होता त्याला कटाळून त्याची स्त्री त्याला सोडून जाऊ लागली तेव्हा त्या अधाने नियम घालून दिला की आजपासून स्त्रियाना यावज्जन्म एकच पती असावा. ( आदि अ. १०४ ) वस्तुत कात्यायन स्मृतींत सागितल्याप्रमाणे,

चक्षुश्श्रोत्रविहीनश्च तथापस्मारदूषित
व्रतचर्या भवेत् तेषा यावज्जीवमसशयम् ।।

अधं माणसानीं लग्नाचा विचार सोडून यावज्जीव ब्रह्मचर्यव्रताने रहावे या नियमास अनुसरून दीर्घतम्याने व्रतस्थ रहावयास पाहिजे होते. पण स्वत. तियम मोडणाऱ्या या ऋषीने बायको कटाळलेली पाहताच

तिच्यावर सतापून सरसकट सर्व स्त्रियाना यावज्जीव एकच पती असावा असा दडक घालून दिला यावरून त्या ऋषीचे दीर्घतमा हे नाव अर्थपूर्ण असावे असेच दिसते! शास्त्र ठरविण्याचा अधिकार पुरुषाचा नाहीतर दीर्घ-तम्याच्या बायकोने आधी अध स्थितीत लग्न केल्याबद्दल त्याची चागलीच झडती घेतली असती. पण नियम बाधून देण्याचा अधिकार पुरुषाचा, तेव्हा त्यानी आपणास साईस्कर असाच नियम करावा हे निसर्गास धरूनच होते.

काही वर्षांपूर्वी पुनर्विवाह कायद्याने सशास्त्र ठरविला त्यावेळी त्यात असे एक कलम मात्र घालण्यात आले की पुनर्विवाहित स्त्रीचा पहिल्या नवऱ्याच्या सपत्तीवर कोणत्याही प्रकारचा हक्क चालू नये, इतकेच नव्हे तर पहिल्या नवऱ्यापासून झालेली मलेही जवळ बाळगण्याचा तिला हक्क नसावा! थोडक्यात सागावयाचे म्हणजे पहिल्या कुटुबातून ती स्त्री मेली असेच मानण्यात यावे पति जिवत असेपर्यंत त्याने कसेही वागविले तरी प्रत्यक्ष प्राणघाताचा प्रसग खेरीज करून त्यास सोडता येत नाही आणि मेल्यावरही पति नसला तरी त्याच्या स्मृतीला कवटाळून जन्म काढण्याची बळजबरी

वैधव्यदशा प्राप्त होणे यासारखे दुसरे पातक नाही ही आजन्म शिक-वण भरल्या चुड्याने अहेवपणे मरण येणे हे महद्‌भाग्य. हें नच लाभले तर नवऱ्याच्या चितेवर आरोहण करून नवऱ्याच्या पाठोपाठ स्वर्गास जाण्याचा सतीचा मार्ग तरी पत्करावा उत्कृष्ट पतिव्रतेचे हेच लक्षण की नवऱ्यामागें तिने क्षणभरही जीवित ठेवू नये

महिपतीच्या भक्तिविजयात 'दास्यदृढीकरण' या प्रकरणामध्यें जयदेव कवि व त्याची स्त्री पद्मावती याची जी कथा दिली आहे ती कथा हिंदु स्त्रीने आदर्श समजावी म्हणून दिली आहे पद्मावती ही एक दिवस राणीपाशी बसली असता एका सेवकाने येऊन सागितले की राणीचा भाऊ मरण पावला व त्याची स्त्री सती जावयास निघाली आहे हे वर्तमान ऐकून सर्व स्त्रियाना सतीचे कौतुक वाटले एकटी पद्मावती मात्र स्तब्ध राहिली. राणीने विचारले, तुला सतीचे कौतुक वाटत नाही का ? तेव्हा तिने उत्तर दिले की, पतीच्या मरणाची वार्ता कानी येताच मरण आले तरच खरे पतिप्रेम ! राणीने तिची सत्वपरीक्षा करण्याचे ठरवून एक दिवस तिच्याशी बोलत बसली असतां

आपल्या सेवकाकडून खोटेंच सांगितले की जयदेव राजाबरोबर शिकारीस गेला असता वाघाकडून खाल्ला गेला ! आणि चमत्कार असा की हे वृत्त कानी पडताच पद्मावतीची आयुष्यज्योती निघून गेली ! !

वैधव्यदशेत दिवस कठावयाचे विधवेनें ठरविलेच तर तिला पतीच्या संपत्तीचा वारसा मिळू नये अशी व्यवस्था कायद्याने केलेली होती धनवान लक्ष्मीपुत्राची ती पत्नी असली तरी पतिमरणानंतर घरी वावरणाऱ्या लक्ष्मीस हटकण्याचा तिला अधिकार नसे निपुत्रिक असून दत्तक घेतल्यास सर्व माल-मत्ता दत्तकपुत्राला देऊन वंशरक्षणाच्या व पिंडदानाच्या कोरड्या धार्मिक समाधानावरच तिला आपली गुजराण करावी लागे. वैदिक कर्माधिकार व वारसाधिकार हे हिंदुधर्मशास्त्रात अन्योन्याश्रित समजले गेले आहेत 'दद्यात् पिंड हरेत् धन' हे ह्यासंबंधीचे महावाक्य होय एवंच, जन्मापासून मृत्यूपर्यंत गृहस्वामिनी म्हणून वाखाणलेल्या स्त्रीची ही अशी कुचंबणा असे

पत्नीने व्यभिचार केल्यास भार्यत्वापासून ती भ्रष्ट होई व तिचा कुळबीण म्हणून दान किंवा विक्रय करण्याचा तिच्या पतीस अधिकार प्राप्त होई. अशा प्रकारचे उल्लेख पेशवाई दप्तरात आढळतात. या कुणबिणींना वागवीत नोकरासारखेंच पण त्यांची दप्तरी नोंद गुरांच्या खात्यात 'लवडी' या नावाने केली जाई !

सतीच्या चालीत तर स्त्रीवरच्या जुलुमाचा कळस होय ह्या चाली-वर माधवाचार्यांनी स्पष्टपणे विरुद्ध शेरा मारला आहे तरी ही चाल पुरुष-वारसास सोयीची असल्याने तिचा अमल मुद्दाम केला जाई. सती जाणाऱ्या-पैकी एखादी असामान्य पतिव्रता वर्ज्य केल्यास फार थोड्या स्वखुषीने जात हे इंग्रज सरकारनेही पटवून दिले १८२३ साली पुण्यास पाचशे शास्त्री-पंडितांची एक सभा भरविण्यात आली व सतीने आपला विचार फिरल्यास 'प्रायश्चित्त' म्हणून एक गोप्रदान करावे एवढीच शिक्षा प्राचीन धर्म-शास्त्रकारांनी प्रतिपादली आहे, हे स्पष्ट करण्यात आले १८२९ साली राममोहन यांच्या खटपटीने सतीबंदीचा कायदा पास झाला. त्यावेळी अशा काही हकिकती बाहेर आल्या की बिचाऱ्या विधवेला उपाशी ठेवून भांग पाजीत व त्या भ्रमात तिने सती जाण्याविषयी पुसट इच्छा दर्शविली

तरी पडत्या फळाची आज्ञा मानण्यात येई. बंगालमध्यें विधवा ही वारस होत असल्याने त्या प्रांतात सतीची चाल विशेष जोरात होती.

## दासींचा नजराणा !

दास्यत्वाच्या आपत्तीत स्त्रियानाही पुरुषाप्रमाणेच कुचबावे लागे. शत्रूचा देश जिंकून घेतला म्हणजे तेथे सापडणाऱ्या सर्वच माणसाना सामान्यत गुलाम केले जाई पण कित्येक वेळा पुरुषांची कत्तल होई व स्त्रिया तेवढ्या दासी म्हणून पळवून नेल्या जात. यादवाच्या परस्परकलहामुळे सहार झाल्यावर अर्जुन यादवाच्या स्त्रियाना द्वारकेहून घेऊन निघाला असता पुष्कळ स्त्रिया अनार्यांच्या हाती पडल्याचे भागवतात वर्णन आहे तसेच हरिवशात कृष्णाला सोळा हजार स्त्रिया कशा मिळाल्या याची अशी हकीकत दिली आहे की, नरकासुराने सोळा हजार कन्या कैदेत ठेवल्या होत्या त्या सर्व नरकासुरवधानतर कृष्णाला मिळाल्या. गौडवहोचा कर्ता वाक्पति सागतो की, राजाने शत्रूस जिकले म्हणजे विजयी राजाने पराभूत राजाच्या स्त्रियाबरोबर जलक्रीडा करावी असा पूर्वी साप्रदाय असे या जलक्रीडेचा अर्थ लक्षात येणे कठीण नाही मत्स्यपुराणात तर युद्धात जिंकून आणलेल्या दैत्य स्त्रियाना इद्राने स्पष्टपणे वेश्याधर्माचाच उपदेश केला आहे इद्र म्हणतो, भक्तिमति सुदर स्त्रियानो, तुम्ही आता येथेच राजमदिरात किवा देवकुलात वेश्याधर्माने रहा कारण राजा, सूत आणि पति हे सारखेच होत पण धन घेऊन जो कोणी तुमच्याकडे येईल त्याची तुम्ही सेवा करा

लढाई जिंकली म्हणजे हजारो दासी मिळत. शिवाय या दासीच्या मुलीही दासीच मानण्यात येत यामुळे दासीची सख्या विशेषतः राजाच्या अत पुरात असख्य असे सैरध्री नावाच्या स्त्रिया राण्याची सेवा करणाऱ्या असत या स्त्रियाचे भुजिष्या असेही वर्णन केलेले आहे म्हणजे त्याच्यावर मालकाची एक प्रकारची जास्त सत्ता असे यासाठीच 'द्रौपदीने' गधर्व माझे पती आहेत असे सागितले होते दासीची मोठी सख्या ताब्यात असल्यामुळें रजपूत राजे युद्धात पराभवाचे चिन्ह दिसू लागताच आपल्या स्त्रियाचा जोहार करीत, त्याचे कारण हेच की, जिंकले गेल्यावर आपल्या स्त्रियाना शत्रूचे दास्यत्व येऊ नये परकीय मुसलमान राजेच रजपूत स्त्रियाना दासी म्हणून वागवीत असे नव्हे तर रजपूत

राजे एकमेकाशी लढत तेव्हाही शत्रूच्या स्त्रिया जिंकून त्याना दासी करण्याचा त्याचा परिपाठ असे व टॉड सागतो की, पुष्कळशा जयस्तभावर विजयाची पहिली निशाणी म्हणून उल्लेख आढळतो तो शत्रूच्या स्त्रिया पळवून आणल्याचा! ज्यू लोकामध्ये अशीच चाल होती जुन्या कराराच्या-ड्यूटरानमी नामक पुस्तकामध्ये असा स्पष्ट आदेश आहे की, 'शत्रूचा तू पराभव केलास आणि त्याच्या स्त्रियापैकी एकादी सुदर स्त्री तुझ्या नजरेत भरली तर तिला त्वा खुशाल आपल्या घरी आणावे नतर तिने नखे काढावी, क्षौर करावे, व महिनाभर आईबापाची आठवण काढून अश्रू ढाळावे! पण महिन्यानतर पत्नी म्हणून तिचा खुशाल स्वीकार कर.' (प्र २१) जुन्या कराराच्याच दुसऱ्या एका जज्जेस नावाच्या प्रकरणात एका विजयी वीराच्या मातेचे वर्णन आहे. सिसेराची माता खिडकीतून वाकून पहात म्हणाली की, 'माझ्या विजयी वीराचा रथ लवकर का इकडे येत नाही? लढाईंतील लुटीचे वाटप अद्याप सपले नाही का? प्रत्येक शिपायाला एकदोन स्त्रिया देऊन झाले नाही का?' लढाईंत अशा रीतीने हजारो स्त्रिया मिळत पूर्वीच्या काळी राजेलोकाच्या भोवती सुदर दासीचा नेहमी ताडा असे काही जिंकलेल्या असत, काही विकत घेतलेल्या असत, व काही दासीच्या मुली असत औरगजेबाची आवडती राणी उदेपुरी मूळ ख्रिस्ती गुलाम म्हणून विकत घेतलेली होती

दासीची प्रचड सख्या पदरी असल्याने इष्टमि ना नजराणे देताना इतर वस्तूबरोबर हा जिवत मेवाही पाठविण्यात येई! हा मेवा एका ठिकाणाहून दुसरीकडे जाताना सुकून जाऊ नये म्हणून सुदर दासीच्या चेहऱ्याला उन्हापासून रक्षण करणारे एक विशेष प्रकारचे औषधी रोगण रोमन उमराव लावीत रजपूत सरदाराच्या मुलीचे लग्न ठरले की तिच्या हुड्यात अलकाराबरोबर अनेक सुदर दासीचा समावेश होई दासी ही मालमत्तेप्रमाणेच समजली जात असल्याने इतर जिनसाप्रमाणे दासीचे दान करण्याचीही चाल होती व ती वैदिक कालापासून अलिकडच्या कालापर्यंत आढळून येते वैदिक वाङ्मयात त्र्यसदस्यूने सौभरीस पन्नास स्त्रिया दान केल्याचा उल्लेख आहे सत्तावन सालच्या बडाच्या वेळी उत्तर हिंदुस्थानात प्रवास करणारा गोडसे भटजी याने धार येथील दानसमारभाची हकीकत दिली आहे. त्यात तो लिहितो की, 'एकदर दाने अनेक झाली. ऐन्याच्या अबारीसह सालकार एक

हत्ती दिला शिवाय चार घोडे, तीन उट, दहा बैल, नऊ म्हशी व तेरा दासी दिल्या.'

मालमत्ता या नात्याने काही रानटी समाजात दासीना व विवाहित पत्नीनाही प्राणास मुकावे लागे मेसॉपोटेमियात काही जुन्या राजाची थडगी उकरली तेव्हा त्यात राजाच्या प्रेताशेजारी अनेक दासदासीची प्रेते आढळली आहेत या लोकाची समजूत अशी असे की, माणूस मेल्यावर तो ज्या लोकी जातो तेथे मृत्युलोकासारख्याच त्याच्या गरजा असतात व त्या पुरविण्याचा मार्ग म्हणजे त्याच्या थडग्यात त्याला हव्या असणाऱ्या सर्व वस्तु पुरविणे हा होय! याचा उल्लेख मागे दिलाच आहे रोमन लोक याच समजुतीने मृताच्या थडग्यात, दूध, मद्य, द्राक्षे, मध वगैरे ठेवीत असत तार्तर लोकामध्ये या इतर चैनीच्या वस्तूबरोबर सुदर दामदामीही पुरत या सुदर दासदासीना गुदमरेपर्यंत पारा पाजीत व या प्रकारामुळे त्याच्या चेहेऱ्यावरील टवटवी मृत्युनतरही बराच काळ टिके असे म्हणतात!! या जिवत मारलेल्या : '. ' घडे राजाच्या शवाशेजारी उभी ठेवीत! व त्याच्या हातात जिवत स्थितीतल्याप्रमाणे पखा, तपकोर डबी, गुडगुडी वगैरे साहित्य ठेवीत! पॅसिफिक समुद्रातील काही बेटात अशी चाल असे की राजाच्या मृत्यूनतर त्याच्या सर्व राण्याना गळे दाबून कठस्नान घालावयाचे. एकादी कबूल झाली नाही तर ती व्यभिचारिणी समजली जाई व तिच्या मुलाचा वारसाचा हक्क नाहीसा होई. हा सर्व मूर्ख समजुतीचा खेळ होय पण त्याचे प्रायश्चित्त मात्र दुबळ्या वर्गास भोगावे लागे

मुली विकण्याची चाल तर आजकालही सर्व देशात काही प्रमाणात आहे दुसऱ्या महायुद्धापूर्वीच्या राष्ट्रसघाने ( लीग ऑफ नेशन्सने ) या बाबतीत एक चौकशी कमिटी नेमली होती तिने अशा प्रकारचा मोठा व्यापार युरोपात व अमेरिकेत सध्याही चालतो अशाविषयी आकडेच दिले आहेत! विकलेल्या मुलीची स्थिति गुलामगिरीचीच असते. भडोच बदरात फार पूर्वीपासून देशोदेशीच्या मुलीची मोठ्या प्रमाणावर विक्री चाले. आणि काश्मीरातील मुली पळवून आणून विकण्याचे अद्यापही चालू आहे असे म्हणतात.

# देवदासी, मुरळी

शिवाय राजरोसपणे मुरळी, देवदासी, बसवी, भावीण, वगैरेच्या रूपाने धर्माच्या नावाखाली मुलीचा विक्रय चालतो तो निराळाच ! ज्ञान-कोशातील माहितीप्रमाणे १९०१ ते १९०५ पर्यंतच्या अवघ्या पाच वर्षांत बेळगाव, धारवाड, विजापूर या तीन जिल्ह्यात मिळून २६३२ मुली देवी-दासी म्ह ून देण्यात आल्या ! त्यातल्या पुष्कळशा विकल्या व काहीची दोनदोन हजारापर्यन्त किंमत आली हा सर्व विक्रीचा व्यवहार अनीतीच्या गर्तेत या मुलीना लोटण्यासाठीच चाललेला असतो. उघड विक्रीशिवाय चोरून मुली पळविण्याचा धदाहि वेश्यागृहाच्या मालकाचे साथीदार करीत असतात या पळविण्याच्या व फूस लावण्याच्या प्रकारासबधी, वेश्यागृहात कोंडले गेल्यानतरच्या अमानुष जीवितक्रमाविषयी व शहरात असणाऱ्या वेश्यावर्गाच्या प्रचड सख्येविषयी ज्ञानकोशकार लिहितात की, " गेल्या खाने-सुमारीच्या वेळी खुद्द मुबई शहरात उघडपणे वेश्येचा धदा करणाराची सख्या २९५५ होती पण हा आकडा याहीपेक्षा मोठा असावा कारण सर्वच वेश्या आपण हा धदा करतो असे उघडपणे कबूल करतील हे शक्य नाही. पोलिस कमिशनरच्या मते ही सख्या ५१६९ असावी " यापैकी सर्वच वेश्यानी खुशीने या धद्यात उडी टाकलेली नसते पुष्कळाना पकडून बळजबरीने या धद्यात लोटलेले असते अशाविषयी ज्ञानकोशकार लिहितात " वेश्यागाराचे हस्तक आगगाड्याची स्टेशने, रस्ते, बागा, देवळे, मुलीच्या शाळा वगैरे ठिकाणी नेहमी येरझारा घालीत असतात व एकादी स्त्री एकातात मिळाली किंवा नादिष्ट असली तर प्रसगी जुलूम करूनसुद्धा तिला लाबवितात कोणत्या तरी निमित्ताने भररस्त्यात या बेगुमान लोकानी स्त्रिया गाडीत घालून पळविल्याची व पुढें त्या आपल्या इच्छेप्रमाणे वागत नसल्यास त्याचा भयकर छळ केल्याची उदाहरणे कोर्टांत आली आहेत. वेश्यागारामध्यें नवीन स्त्री दाखल झाली की वेश्यागाराचा चालक तिला ज्या काही वस्तु पुरवितो त्याची दामदुप्पट किंमत आपल्या खात्यावर लिहून तिच्या नावे बरेच कर्ज चढवून ठेवतो. कारण तिला आपल्या कह्यात ठेवण्याचा हाच मुख्य मार्ग असतो वेश्यागारांतील स्त्रियाची स्थिति खरोखरीच गुलामापेक्षाही अगदी

खालच्या प्रतीची असते त्याना गिऱ्हाईकाकडून मिळालेले पैसे मालकाला द्यावे लागतात व त्या शरिराने कितीहि असमर्थ असल्या तरी किंवा व्याधि-ग्रस्त असल्या तरी मालक सांगेल तितक्या माणसाची पाशवी इच्छा त्याना तृप्त करावी लागते आणि तसे न केल्यास त्याच्या अंगावर डागण्या मिळाल्याचीहि उदाहरणे आहेत "

असो असली ही कहाणी लांबवावी तितकी थोडी अर्धांगी म्हणून जिचा अभिमानानें व लडिवाळपणे उल्लेख केला जातो त्या अर्धांगीची ही कहाणी होय. अर्धांग गेलेली व्यक्ति जशी सर्वस्वी पराधीन होते तशीच स्त्री ही होय असे उपरोधिकपणे सूचित करण्याकरिताच तर अर्धांगी शब्दाचा किताब तिला बहाल करण्यात आला नसेल ना ?

स्त्रियांवर लादलेली सर्वांत निर्घृण आपत्ती जी वेश्यावस्था तिचा अद्ययावत् असा शेवटी उल्लेख करून आता या प्रकरणी स्त्रियांचा निरोप घेऊ काही स्त्रिया मूलतः चंचल व स्वैराचारी वृत्तीच्या असतील, त्या वेश्याव्यवसायात रमतहि असतील तेव्हा त्यांच्याकडे पाठ फिरवून, ज्याना या व्यवसायात डांबले जात असेल त्यांच्याचकडे पाहू या ते मात्र भीषण चित्र आहे या घृणास्पद व्यवसायास जुलमाने जुंपून घातलेल्या स्त्रियांचा जीवनपट हा शिसारी आणणारा आहे. या 'अखंड' सौभाग्यवतींच्यापैकी काहीना दर दिवशी चार–पाच नव्हे, पाच–दहा नव्हे, तर तीस–चाळीस भाग्यवतांना आपला देह अर्पण करावा लागतो, असे म्हणतात. हा जुलूम त्यांच्यावर लादलेला असतो. गुलामाप्रमाणे त्याना राबविले जाते व कैद्याप्रमाणे कोंडून ठेवण्यात येते यापैकी एखादीने पळून जाण्याचा प्रयत्न केल्यास तिचा खूनही केला जातो * अशा प्रकारचा एक खून १९१७ मध्यें उघडकीस आला, व गुन्हा कोर्टापुढे शाबीत होऊन गुन्हेगाराना फाशीची शिक्षा देण्यात आली ! हे पाशवी राक्षस 'मिर्झा अल्लिखान व त्याची अर्धांगी' ही होत. मुंबईत डंकनरोडवर या दांपत्याने तीन कुंटणखाने चालविले होते. या कुंटणखान्यात कोंडून ठेवलेल्या एका स्त्रीने पळून जाण्याचा धाडसी प्रयोग

---

* वेश्याव्यवसायाची अधिकृत माहिती समाजसेवक पु. गो नाईक यांच्या 'वेश्या व वेश्याव्यवसाय' या पुस्तकात पहावी

केला. पण लवकरच पकडून आणून तिला लाथाबुक्क्यानी व वरवटयानी झोडपण्यात आले दुसऱ्या दिवशी पुन्हा ती पळून जाऊ लागली तेव्हा तिला एवढी मारहाण केली की तिचे प्रेतच शिल्लक उरले ! ते पुरण्याकरिता नेत असता मात्र वाटेवरील पोलिसाला सशय आला व त्या पोलिसाने मोठ्या घिटाईने त्या पठाणाला पकडल्यामुळे सर्व प्रकरण उघडकीस आले, खटला झाला व फाशीची शिक्षाही ठोठावण्यात आली !

## खुनशी कुंटणखाना

असे एखादें प्रकरण चुकूनमाकून चवाठ्यावर यावयाचे. पण बाकीची जी पडद्याआड डाबली जात असतील त्याचा थाग ना पत्ता ! या असल्या कुटण-खान्यातील स्त्रियाना दररोज तीस ते चाळीस नरपशूना सतुष्ट करावे लागते, असे न्यायालयातील साक्षीतच उघडकीस आले ! अशा हालअपेष्टा किती स्त्रियावर जुलमाने लादल्या जात असतील त्याचा पुरावा सापडणे कठीण असला पुरावा क्वचितच पुढे येतो त्यापैकी पुण्यातील एका कुटणखान्याची कोर्टापुढे आलेली हकीगत वरीलप्रमाणेच शिसारी आणणारी आहे या कुटणखान्याचे नाव ' मरगीचा अड्डा ' असे असून तो पुण्यातील शुक्रवार पेठेंतील दाणेआळीत वसविला होता याचाही तपास अचानकपणेच लागला त्याचे असे झाले की कोल्हापूरहून आपल्या भावाबरोबर पुण्यास आलेल्या एका तरुण विधवेला ती बाजारात गेली असता पुरणपोळी खावयास देते, म्हणून हूल दाखवून कुटणखान्यात नेण्यात येऊन कोडून ठेवण्यात आले खोलीला सुदैवाने रस्त्याच्या बाजूला एक खिडकी होती तिच्यातून ही हतभागिनी बाहेर पाहात असता पाचसहा दिवसानी तिला आपल्या भावाचा एक मित्र रस्त्यावरून जाताना दिसला व सुदैवाने त्याचे लक्ष वेधले जाऊन त्याने तावडतोब पोलिसास वर्दी दिली, व सगळें प्रकरण उघडकीस आले ! त्यात महत्त्वाची नमूद करण्यासारखी गोष्ट म्हणजे पोलिसानी कुटणखान्यास वेढा घातल्याचे कळताच आतील थोड्याथोडक्या नव्हे तर सुमारे पाऊणशें डाबून ठेवलेल्या भगिनी आपण होऊन पोलिसाच्या पुढे येऊन ' आमचे रक्षण करा ' असे करुणरवाने म्हणू लागल्या. इतक्यात मुख्य आरोपी फरारी झाले. तथापि त्यांपैकी शेख हुसेन गुलाम यास पकडण्यांत येऊन व त्याला सहाय्य

करण्याच्या आरोपावरून नरोत्तमदास पुरुषोत्तम, शेख महमद शेखदुघा, देवराज पिले अशा 'देवराजा'नाहि पकडण्यात येऊन शिक्षा ठोठावण्यात आल्या ! हा खटला जुना नसून अवघ्या दहा वर्षांपूर्वीचा म्हणजे १९४२ मधला !

असल्या कुटणखान्याच्या प्रकारावर धर्माचे शिक्कामोर्तब करण्यात येते, हे तर जितके आश्चर्यकारक तितकेच घृणास्पद आहे ! दानधर्म हा एक महत्त्वाचा धर्मप्रकार मानण्यात येतो त्या दानधर्मामध्ये पाहुण्याला व धर्म-गुरूला आपली पत्नी उपभोगण्यास देण्याचा रिवाज प्राचीन काली तर अनेक देशात रूढ होता बाबिलोनमध्ये मिलिटा नावाच्या देवीच्या दर्शनास असख्य तरुणी येत, व देवीला सतुष्ट करण्याकरिता आपले शरीर परकीय देव-भक्तास एकवार अर्पण करीत ! याची सख्या येवढी मोठी असे की काहीना देवदास आपला स्वीकार केव्हा करील म्हणून वेळ काढावी लागे. हा प्रकार पुढे रोमच्या कान्स्टाइन राजाने नष्ट केला आपल्या भारतातील वल्लभपथ व वाममार्गी शाक्तपथ याच्यातहि हे प्रकार गुप्तपणे चालत उघडपणे चाल-विला जाणारा कुटणखाना कायद्याने निषिद्ध व दण्डय करण्यात आला तो अगदी अलीकडे, म्हणजे सुमारे वीस वर्षापूर्वी, आणि १८ वर्षाखालील मुलीला वेश्याव्यवसायात शिरण्याची बदी करण्यात आली, ती त्याच्या आधी सात-आठ वर्षे तत्पूर्वी असले व्यवसाय राजरोम चालत व त्यावर धार्मिकतेचे शिक्कामोर्तबही करण्यात येई. मात्र धर्माचे व सरकारी मान्यतेचे पुढील मोकळे द्वार कायद्याने बद केले असले तरी मागच्या चोरट्या दाराने हे व्यवहार चालू नाहीत असे नाही. तुम्ही वाचले असेल की दिल्लीतील एका कुटणखान्यावर पोलिसाना छापा घातला तेव्हा ४४ मुली कोडून ठेवलेल्या व एक दोन तर पेटीत कोडलेल्या आढळल्या ! !

खडोबाच्या देवळातील 'मुरळ्या'ची तर महाराष्ट्रियाना मुद्दाम आठवण करून देण्याचीहि जरूरी नाही काही वर्षांपूर्वी या देवळात सुमारे २०० मुरळ्या असत ! आणि त्या सर्व खडोबाच्या साक्षीने आपला देहविक्रय उर-कीत मुले न होणाऱ्या व होऊन अल्पवयी जाणाऱ्या मुलाची आई खडोबाला नवस करी, की मला मूल झाल्यास तुला अर्पण करीन. अशी अर्पण केलेली मुले 'मुरळ्या' व 'वाघे' म्हणून ओळखली जात. देवाला अर्पण केल्याने

पापाचाही स्पर्श नाही. अशाच प्रकारचा दुसरा एक धार्मिक विधि रूढ असे, तो ' शेंस भरणे ' हा होय. वेश्या आपल्या मुलीचा विवाह-समारंभही करीत, तो या शेंसविधीने. तो कोणत्या प्रकारे ?—तर दुसऱ्या एका मुलीला पुरुषाचा पोषाख घालीत व या दोघांचा विवाहविधि करण्यात येई ' नवरा मुलगी ' डोकी पागोटें घालून हातीं खजीर सुरी घेई, व ' विहिणी ' रुसण्या फुगण्याचे नाटकही करण्यास कमी करीत नसत. हा विधि उरकल्यावर ती वेश्या-व्यवसायास धार्मिक दृष्ट्या लायक झाली असे मानण्यात येई ! हा झाला बालविवाह वयात आल्यावर त्याचा आणखी एक समारंभ उरकण्यात येई. त्याचे नाव ' हातलावणी ' त्या समारंभात जास्तीत जास्त द्रव्य देणाराला तिला अर्पण करण्यात येई म्हैसूरकडे मुली देवीला वाहण्याचा ' गज्ज पूजाविधि ' नावाचा असाच विधि असे गेल्या वीस वर्षांत तेथे असले सर्व विधी कायद्याने निषिद्ध व शिक्षार्ह ठरविले आहेत मात्र कायदा धुडकावणारेही असतातच त्यांपैकी एकाने गोव्याकडील शिरगाव येथे ' शेंस भरण्या ' चा समारंभ आरंभला होता, पण त्याला अटक करण्यात येऊन रोज दोन रुपयेप्रमाणे चार महिन्यांचा दंड ठोठावण्यात आला बलात्काराच्या संबंधात एका बोलपट कंपनीचाहि उल्लेख कोर्टात करण्यात आला होता त्या कंपनीशी संबंध असलेल्या तीन इसमांवर कंपनीत जादा काम करणाऱ्या एका तरुणीवर बलात्कार केल्याचा आरोप शाबीत होऊन हायकोर्टातील फुलबेंचने आरोपींवर सात पांच व दोन वर्षांच्या शिक्षा कायम केल्या व चित्रपटाच्या डायरेक्टरवर कठोर टीका करण्यास कसूर केली नाही गुप्त बलात्कारांपैकी असे काही थोडे उघडकीस येतात, बाकीचे गाडले जातात ! या प्रकाराला आळा घालण्याकरिता वेश्याव्यवसाय उघडपणे करण्याला काही प्रमाणात का होईना पण संधि द्यावी लागते मात्र तो दिवसेदिवस कमी होत जाईल अशा रीतीने सरकारने पावले टाकीत गेले पाहिजे

वेश्याव्यवसायाला संपुष्टात आणण्याचा एक व्यवहार्य मार्ग म्हणजे बाहेरगावाहून कामधंद्याकरिता येणाऱ्या पुरुषांना आपल्या बायकांना बरोबर घेऊन येऊन राहण्याची तरतूद पुरविता येणे हा होय. मुंबईंतील गिरण्यात काम करण्याकरिता जे हजारो मजूर खेड्यापाड्यातून येतात ते एकटे येत असल्यानें त्यांची नजर वेश्याकडे न वळली तरच आश्चर्य. म्हणून वेश्याव्यवसाय

आटोक्यात आणावयाचा असेल तर गिरण्यात काम करणाऱ्या सर्व मजुराची कुटुबासकट राहण्याची व्यवस्था होईल, अशा चाळी बाधण्याची गिरणी-मालकावर कायद्याने सक्ति केली पाहिजे ! पण या कल्पनेने मालकाच्या पोटात धस्स झाले तर नवल नाही कारण गिरणीच्या शेजारी हजारो मजूर कायमचे राहू लागल्यावर गिरणी आज ना उद्या त्याच्या आहारी गेल्याशिवाय राहणार नाही हे तो समजू शकतो आणि हे उमगूनहि त्याचा स्वीकार करणे म्हणजे समाजवादाला आमत्रण करण्यासारखेच होय त्याची हाय खाणारे असला कायदा करण्यास विरोध करतीलच पण या बाबतीत स्त्री-वर्गाने जागृत होऊन अपल्या पतिराजाचे मन वळवून घेण्याची शिकस्त केली पाहिजे सुशिक्षित स्त्रियाची सख्या वाढती आहे त्याच्यावर अशा सुधारणा घडवून आणण्याची जबाबदारी आहे कामकरी स्त्रियाच्या कनिष्ट राहणीकडे-ही लक्ष दिले पाहिजे त्याकरिता मागें मुबईसरकारने एका स्त्रीडॉक्टरिणीची नेमणूक केली होती. ती आपल्या अहवालात कामगाराच्या राहणीच्या खोलीचे वर्णन करते की, ' पधरा फूट लाब व बारा फूट रुद अशा एका खोलीत सहा कुटुबे रहात असलेली आढळली लहानथोर मिळून एकदर तीस जण ! आडोसा म्हणाल तर वर बाबू लावून त्याच्यावर कपडा टाकून करण्यात येई, तेवढाच काय तो ! ' असली राहणी ज्या दिवशी सपूर्ण उखडली जाईल तो सुवर्णदिन ठरेल तो सुवर्णदिन उगवेपर्यंत आपल्या प्राचीन कष्टकारी माता अहल्या, द्रौपदी, सीता, तारा, मदोदरी याची, ' पचकन्या स्मरेन्नित्य ' या सुभाषितात बजावल्याप्रमाणे आठवण तरी जागती ठेवू या.

---

## प्रकरण चवथें

# विपत्तींचें दृढीकरण

### राजेशाही शस्त्रास्त्रांचा कांटेरी लगाम !

माणसाने माणसावर, सत्ताधीशानी गुलामावर व पुरुषानी स्त्रियावर चालू ठेवलेल्या जुलुमाचे वर्णन गेल्या प्रकरणी केले ते वाचून माणसाला भोगाव्या लागणाऱ्या आपत्तीत मनुष्यकृत आपत्तीची सख्या केवढी मोठी आहे याची कल्पना आली असेल आता प्रश्न असा सुचेल की भूकप किंवा रोगराई यासारख्या आपत्ती माणूस अपरिहार्य म्हणून सोसतो, पण मनुष्यानेच चालविलेला हा जुलूम माणूस सोसतो कसा आणि काय म्हणून ? या प्रश्नाचा विचार करू लागले म्हणजे अनेक गमती दिसून येतात असहाय झाल्याविना माणूस जुलूम सहन करणार नाही, हे ह्या प्रश्नाचे एक उघड उत्तर आहेच, पण जुलुमाच्या प्रतिकाराची इच्छा ही कशी मारून टाकण्यात येते हा भाग जितका महत्त्वाचा तितकाच हृदयद्रावक आहे.

एका प्राण्याने स्वजातीच्याच दुसऱ्या प्राण्यावर जुलूम करावा ही क्रिया मनुष्येतर प्राणीसृष्टीत अनेक ठिकाणी दिसून येते चार कुत्रे एकत्र जमले की एकमेकावर भुकले नाहीत असे क्वचितच घडावयाचे बैलाच्या प्राणघातक टकरी कोणी पाहिल्या नाहीत ? आणि पक्ष्याच्यासबधी 'दाणे टाकून कोबडो झुजविणे' ही भाषेत रूढ झालेली म्हण तर या कलहाची साक्ष देण्यास सदैव सिद्ध आहे पण एका अल्पसख्याक वर्गाने सघटित व पद्धतशीर रीतीने दुसऱ्या बहुसख्याक वर्गावर अव्याहत जुलूम चालवावा ही गोष्ट मानवी समाजातच आढळून येते

अल्पसख्याक वर्गाला हें सामर्थ्य कसे प्राप्त होते हा प्रश्न मोठा मनोरजक होय. मानवेतर प्राणीसृष्टी आणि मानवसृष्टी यात असा कोणता महत्त्वाचा फरक आहे की ज्यामुळें इतर सृष्टीत अल्पसख्याकाना अशक्य असणारे, हें बहुसंख्याकाना दडपून टाकण्याचे सामर्थ्य माणसाला प्राप्त

होते !—मागील प्रकरणात ग्रीसमधील नागरिकाची सख्या अवघी एकवीस हजार तर गुलामाची सख्या चार लाख होती हे सागितलेच आहे मग हे एकवीस हजार किवा त्याच्या जोडीला परदेशीय दहा हजार मिळविले तरी एकतीस हजार आपल्या सख्येच्या दसपट सख्येस दडपू कसे शकले ?

## आयुधधारी मानव

प्रश्न जितका महत्त्वाचा तितकेच त्याचे उत्तर सुलभ. मानवी सृष्टी आणि मानवेतर सृष्टी यात एक अत्यत महत्त्वाचा फरक आहे त्यायोगेच अल्पसख्याकाना बहुसख्याकावर कुरघोडो करता येते तो फरक म्हणजे माणसास आयुधे निर्माण करता येतात हा होय ! प्रश्नाचे हे उत्तर इतके स्पष्ट, ठळक व सुलभ आहे की, सकृन्दर्शनी त्याचे महत्त्वच वाटणार नाही. पण थोड्या विचाराअती ही आयुधशक्ति म्हणजे मनुष्याच्या सर्व सस्कृतीची आदिशक्ति होय हे लक्षात येईल. मला वाटते, आपल्या पूर्वजाना या गोष्टीचे महत्त्व कळले असावे एरवी ईश्वरी अवताराच्या हाती प्रमुख आयुधे का देण्यात आली ? नरसिहापर्यंतचे मत्स्यकूर्मादि मानवेतर अवतार सोडले तर पुढील अवतार जे परशुराम, राम, कृष्ण त्या प्रत्येकाचे विशिष्ट ‘ आयुधधर ’ असे वर्णन आहे त्यात अर्थ नसावा काय ? क्षत्रियाचा सहार करणाऱ्या परशु-रामाच्या नावातच त्याच्या आयुधाचे—परशूचे—नाव कायमचे गोवले गेले आहे. रामाचे वर्णन ‘ चापबाणधरो युवा ’ असे असून कृष्णाचे सुदर्शनचक्र प्रसिद्ध आहे विष्णूच्या ध्यानात चारी हातात शख, चक्र, गदा, पद्म ही असावया-चीच इद्राच्या वज्राचे स्मरण प्रतिवर्षी मेघाच्या गडगडाटात प्रत्ययास येत असते नागर सरसावून धावून जाणाऱ्या बळिरामाचे वर्णन क्वचित् विनोदी असले तरी हलधराचा ‘ हल ’ हे एक अत्यत महत्त्वाचे आयुध होय, हे कोण नाकबूल करील ? पुण्याहवाचनाचे वेळी देवतेला आवाहन करताना ‘ सायुध सशक्तिकम् आव्हाययामि ’ असे तिला पाचारण करण्यात येते तात्पर्य, अवतारी पुरुषाच्या प्रमुख आयुधाचे नित्य स्मरण राखण्यात, त्या आयुधांनीं घडवून आणलेल्या क्रातीचेही स्मरण टिकविण्याचा हेतु तर नसेल ना ? तें कसेही असो. आयुधनिर्मातृशक्ति ही इतर प्राणीसृष्टीहून व्यवच्छेदक अशी मानवी शक्ति असून या शक्तीच्या सामर्थ्यावर एकेपक्षीं कांहीं समाज-

घटकाना पुरेसे स्वास्थ्य देऊन माणसाने शास्त्र, कला, वाङमयादि सस्कृतीचा टोलेजग प्रासाद निर्माण केला, आणि दुसरेपक्षी याच शक्तीच्या सामर्थ्यें-करून या प्रासादाच्या तळघरात कोंदट, कुजट हवेत स्वजातीच्याच असख्य प्राण्याना कोंडून टाकले !

'मनुष्य हा आयुधधारी प्राणी होय' ही मानवाची सुप्रतिष्ठित व्याख्या फार अर्थगर्भ होय इतर प्राण्याच्याही वाटयास थोडीबहुत बुद्धि आलेली आहे घरटी किंवा वारुळे बाधण्यात, भक्ष्यावर लपून छापा घाल-ण्यात मानवेतर प्राण्याची बुद्धि दिसून येते परतु अगदी प्रथमावस्थेतील मानवाने उपयोगात आणलेली साधीसुधी दगडी आयुधे, ही अत्यत चतुर अशा मानवेतर प्राण्यानेहि वापरलेली दिसत नाहीत त्याची हत्यारे म्हणजे निसर्गसिद्ध तीक्ष्ण नखे असलेले हात, व दणकट अणकुचिदार दाताचे सुळे असलेला जबडा एवढीच होत माणसाला आपली निसर्गसिद्ध आयुधें जी हात व जबडा, त्याच्यावरूनच इतर हत्याराची कल्पना सुचली त्याचा हातोडा किंवा घण म्हणजे हाताच्या वळलेल्या मुठीचे प्रतिबिब, त्याचा सामता म्हणजे तीक्ष्ण नखाच्या बोटाचा प्रतिनिधी, त्याच्या करवतीचे दाते हे तोंडातील दाताचे भाईबद, आणि त्याची पकड म्हणजे जबडयाचे दुसरे रूप. तसेच बोटाच्या आकडीवरून हूक, तळहाताच्या मधील खोलगटीवरून भाडे, हाताच्या निरनिराळया आकृतीवरून कुदळ, फावडे, वल्हे, नागर ही सुचली असावीत असे अनुमान बाधण्यास हरकत नाही पण ह्यापैकी जरी एखाद्या आयुधाची कल्पना मानवेतर प्राण्यास सुचली, तरी ती प्रत्यक्ष व्यवहारात उतरावयाची कशी ? कारण, चतुष्पाद जनावराना हात मोकळे नसल्यामुळे हत्यारे वापरण्याचे मुख्य साधनच नव्हते अर्थात् पक्ष्याना चोचीत धरता येणाऱ्या हत्याराचा उपयोग करता आला नसता असे नव्हे माणसाप्रमाणे बसून हाताने केळी, शेगा वगैरे सोलून खाणाऱ्या माकडाने झाडाच्या फादीच्या काठीचा किंवा नारळाच्या करवटीचाही उपयोग केलेला दिसत नाही हे आश्चर्य नव्हे का ? उपजत ज्ञानापलीकडे ज्ञान सपादन करण्याची त्याना शक्ति नसते असेही नाही. एकेकाळी मोटार पाहिली की जू तोडून पळून जाणारे बैल आता मोटार अगदी चाटून जवळून गेली तरी जागचे हालत नाहीत व पिंजऱ्यात येणारे उंदीर काही कालानतर पिंजऱ्याना दुरूनच राम-

राम करू लागतात पण या ज्ञानाचा उपयोग आयुधे बनविण्यात झालेला नाही त्यामुळे असे झाले की मानवेतर प्राणी हा हजारो वर्षे एकाच अवस्थेत राहात आलेला आहे

## आयुधांचा विकास

मानवाच्या आयुध–निर्माण–शक्तीमुळें प्रत्येक पिढीला मानवी आयुष्याचे स्वरूप बदलत चालले आहे मानवी सस्कृतीचा एकदर इतिहासच त्याच्या आयुधविकासाच्या अनुरोधाने लिहिता येईल असे म्हणणे अवास्तव नव्हे मानवाच्या अतिप्राचीन इतिहासातील प्रथम खडाना तर अश्मायुध युग, लोहायुध युग वगैरे नावे देणेही असमर्पक ठरणार नाही आता अल्पसख्याकाना बहुसख्याक लोकावर जुलमी हुकमत चालविता येण्याच्या बाबतीत या आयुधानी जी कामगिरी बजाविली, त्याकडे लक्ष देऊ.

माणसाना गुलाम बनविण्याचे साधन म्हणजे शस्त्रास्त्रें होत, हे नवीन देश काबीज केल्यावर प्रथम त्या देशातील लोकाची हत्यारे हिसकावून घेण्यात जेत्याकडून जी तत्परता दाखविण्यात येते त्यावरून स्पष्टच आहे. अलीकडे भरत असलेल्या 'शस्त्रसन्यास' परिषदातून ओठाने शातिपाठ चालू असता पोटात प्रत्येक राष्ट्र आपली शस्त्रास्त्रें अधिक तीक्ष्ण व प्रभावी कशी ठरतील या विवचनेत कसे चूर असते हे आज तरी जगजाहीर आहे! इग्लडमधील पहिल्या महायुद्धानतरच्या 'आरमार–नियत्रण' परिषदेचे इग्लिश ग्रथकार वेल्स याने असे वर्णन केले आहे की, 'चार चोरानी सभा भरवावी व हातातील नवी पिस्तुले परजीत असताच ठराव करावा की जुन्या दारू ठासायच्या बदुका वापरणे हे रानटी होय! अशासारखीच ही परिषद नाही का?' जगाच्या जीवनकलहात सहारक हत्यारानाच अग्रपूजेचा मान मिळत असतो व म्हणून जयिष्णु राष्ट्र नवीन सहारक युक्त्या शोधून काढण्यात व त्या गुप्त राखण्यात अत्यत दक्ष असते, व प्रचड सैन्ये खडी ठेवण्यात पाण्यासारखा पैसा ओतीत असते अणुशक्तीच्या गोप्यस्फोटनाबद्दल इग्लड, अमेरिकेने काही श्रेष्ठ सशोधकाना कशा जबर शिक्षा ठोठावल्या हे आपण सध्या वाचीत आहोतच ना? शास्त्रीय ज्ञानाच्या इतर शाखाची कितीही लोभनीय वाढ होवो, पण ज्या राष्ट्राने सहारक शस्त्रास्त्रे ही जीवन-

कलहाची गुरुकिल्ली होय हे सूत्र ओळखून वाङमय, कला, तत्त्वज्ञान वगैरे सस्कृतीच्या इतर अगाबरोबर ती अगें कायम ठेवण्यास लागणारे शस्त्रास्त्राचे ज्ञान सपादन केले नाही, त्या राष्ट्राची सस्कृति मातीमोलाने विकली जात आली आहे ! विद्वान् असून अव्यवहारज्ञ हा जसा जगात बावळा ठरतो तशीच नुसत्या बौद्धिक सस्कृतीचे गोडवे गाणाऱ्या राष्ट्राची स्थिति होत असते !

दोन सस्कृतीची टक्कर झाली असता प्रथम तरी जिची शस्त्रास्त्रे अधिक घातक, तीच विजयी होत असते आणि विजयाच्या पहिल्या धुदीत जेते राष्ट्र जित राष्ट्राची वाङमय, कलादि वैभवचिन्हे नष्ट करण्याचा प्रयत्न करीत असते हिंदुस्थानातील शिल्पाच्या काही उत्कृष्ट मूर्ति मदाध व बेमुर्वतखोर परकीयानी फोडलेल्या ज्यानी पाहिल्या असतील त्याना या प्रकारातील कटुसत्य झोबले असेलच अलेक्झाड्रियाचा प्रचड ग्रथसग्रह जाळल्याची ऐतिहासिक दंतकथा प्रचलित आहे असे म्हणतात की, या ग्रथसग्रहालयातील हजारो ग्रथ चार हजार स्नानगृहास सरपण म्हणून वाटून देण्यात आले आणि स्नानगृहाच्या भट्ट्यात हे ग्रथ सुलतानी लहरीला खूष करण्यासाठी सतत सहा महिने आपणास जाळून घेत होते ! वाङमयशास्त्रकलादीचे मनोरे उठविण्यात हजारो वर्षे खितपावे, आणि क्षणार्धात एकाद्या उन्मत्त पण बलवान रागडयाने ते आपल्या डोळयासमोर उध्वस्त केलेले पहावेत यापरती शोचनीय स्थिति कोणती ? या शोचनीय परिस्थितीचे मर्म जीवनकलहात प्रथम आवश्यक असणारी जी शस्त्रकला तिच्या हेळसाडीत असते हे मर्म न ओळखून हतबल राष्ट्रे भाबावून या परिस्थितीचे खापर दैव, सट्टी वगैरेवर फोडू पाहतात, हे तर अत्यत शोचनीय होय

दोन सस्कृतीचा झगडा सुरू झाला की प्रथम तरी शस्त्रास्त्रसपन्न सस्कृतीचाच जय न होणे हे वळचणीचे पाणी आढयास लागण्याइतकेच सुतराम् अशक्य मराठे आणि युरोपियन याची गाठ पडली तेव्हा युरोपियन हे मराठयापेक्षा हत्यारे, शिस्त, जूट वगैरे युद्धविषयक कलेत इतके पुढारलेले होते की मराठयाचे राज्य इग्रजाच्या हाती पडले नसते तर दुसऱ्या कोणा युरोपियन राष्ट्राच्या हाती पडणे अपरिहार्यच होते ! तात्पर्य, उत्तमोत्तम प्राणघातक आयुधें ही इतरांना अकित करण्याचा बीजमंत्र होय. सायुध माणूस हा निरायुध माणसापेक्षा शतपटीने बलवान होऊ शकतो. यामुळेच

एका राष्ट्राला दुसऱ्यास जिंकता येते, तसेच अल्पसंख्याकांना प्रचंड बहु-संख्याकांना आपल्या काबूत राखता येते पशुपक्ष्यांची हत्यारे फक्त निसर्ग-निर्मित त्यात एक सजातीय दुसऱ्यापेक्षा बलवान असला तरी बळाला सीमा असते शस्त्राने मिळणारे बळ हे मात्र जणू अमर्याद होय.

पण जुलुमाची साधने जी ही शस्त्रास्त्रें, ती एका अल्पसंख्याक वर्गा-च्याच हाती कशी गेली व त्याच्याच हाती कायम कशी राहिली ? मानवी समाजाच्या इतिहासाच्या प्रथमावस्थेत ही स्थिति कशी उत्पन्न झाली असावी याची नुसती कल्पनाच करावयाची आहे

अगदी प्राथमिक अवस्थेत भक्ष्याकरिता मनुष्यात जनावराप्रमाणे मारामाऱ्या होत असाव्या पुढे एका टोळीने दुसऱ्या टोळीवर हल्ला करून शत्रू-टोळीतील कैद्यानाच भाजून खाण्यास सुरुवात झाली असावी व भक्ष्य न मिळाल्यास आपआपसात लढे होत असावेत या अवस्थेत सर्वच लढवय्ये असत शिकार करून पोट भरण्याच्या मृगया अवस्थेत जोपर्यंत माणूस होता तोपर्यंत या छोटया छोटया समाजातील सर्व घटक सारख्याच दर्जाचे असावेत मृगया वृत्तीत आपसात युद्धेही नव्हती व गुलामही नव्हते वेदपूर्व-कालातील अतिप्राचीन समाज या अवस्थेत होता मृगयावस्थेतून संस्कृतीची पुढची पायरी जी कृषिसंवर्धन, त्या पायरीवर गेल्यानंतर मात्र श्रमविभागास सुरुवात झाली असावी आणि ज्या ह्या श्रमविभागाने त्याच्या सुखसाधनात भर पडली त्यानेच त्याच्या दु खापत्तीची रोपटी रोवली गेली ! जगात विष आणि अमृत एकत्रच असते असे म्हणतात त्याचे हे एक उत्कृष्ट उदाहरण होय ! कुटुंब ही संस्थाही कृषीच्या अवस्थेतच उत्पन्न झाली असावी. शेतीला सुरुवात झाल्यावर रानटी जनावरापासून शेताचे रक्षण करणे, पाळीव जनावराची निगा राखणे, शेतीची मशागत करणे वगैरे कामें निरनिराळ्या लोकाकडे स्वाभाविक-पणे वाटलीं गेली असावीत या वाटपात क्षात्रवृत्तीचे काम बलवान व धिप्पाड अशा जवानाकडे आले क्षात्रवृत्तीचा निराळा वर्ग निर्माण झाल्यावर बाकीचा समाज सामर्थ्यांत दुर्बल झाला अर्थात् क्षात्रवृत्तीच्या लोकाना श्रेष्ठ पदवी प्राप्त झाली व ती कायम टिकविण्याची महत्त्वाकांक्षा त्याच्या मनात रुजू लागली. क्षात्रेतर समाज अर्थात् संख्येने फार मोठा, तेव्हा क्षात्रवर्ग सामर्थ्यवान असला तरी त्याला दुसऱ्या बहुसंख्याक लोकावर कायमची कुरघोडी करणे अशक्य

होते. पण ही अशक्य गोष्ट ज्या साधनानी शक्य झाली ते साधन म्हणजे आयुध होय ! आयुधें ही सहजोत्पन्न सापडत नाहीत, ती तयार करावी लागतात, त्यास फुरसत लागते शेती कसण्यास निर्वेधत्व यावे म्हणून सरक्षक असा क्षात्रवृत्तीचा निराळा वर्ग राखून त्याचे श्रेष्ठत्वही समाजाने मान्य केले ! पण तेच श्रेष्ठत्व शेवटी त्याच्यावर उलटले !

शस्त्रास्त्रे व युद्धकला याची विशेष प्रगति होईपर्यन्त शासक वर्ग व शासित वर्ग यामधील राहणीचे अतर फार थोडे असले पाहिजे व जुलूम करण्याची शक्तीहि मर्यादित असली पाहिजे पण शस्त्रास्त्राची व युद्धकलेची जसजशी वाढ होत गेली तसतसे सत्ताधीश आणि कष्टाधीश यामधील अतर व कष्टाधीशाला नागविण्याची शक्ति भडकत गेली. फार प्राचीन कालची शस्त्रें अगदीच साधी म्हणजे घासून अणकुचीदार केलेला धोडा किंवा फांदी साफसूफ केलेला सोडगा, या स्वरूपाची होती अर्थात् ही कोणालाही तयार करता येण्यासारखी होती पण पुढे जसजसा विशिष्ट ज्ञानसाधनसपत्तीने साध्य होणाऱ्या शस्त्रास्त्राचा शोध लागला, तसतसा निःशस्त्र वर्ग अधिकाधिक हतबल व परवश होत चालला इतका की शस्त्रधाऱ्यापुढे लोटागण घालन त्याचा लाचार दास बनू लागला तिरकामठ्यापलिकडे हत्यार माहीत नसणाऱ्या निग्रोवर जेव्हा शस्त्रधारी गोऱ्यानी बदुका डागल्या तेव्हा प्रचड आवाज करून निमिषार्धांत प्राण हरण करणाऱ्या बदुकीची इतकी जबरदस्त धास्ती त्याना बसली की, टोपीवाल्या गोऱ्याची छाया दिसताच वाघापुढील गायीप्रमाणे ते अजूनही हतबुद्ध होऊन जातात असे गाधीजीनी आपल्या दक्षिण आफ्रिकेच्या पुस्तकात लिहिले आहे

## गर्दछाटे गाडदी

हत्यारें चालविण्यास तरी सैनिक पाहिजेतच ना ? मग त्या सैनिकानी आपल्याच भाईबदावर गोळ्या झाडण्यास का सिद्ध व्हावे ? जुलमी राजाना ही भीति असेच, म्हणून प्रिटोरिअन गार्ड्स् किंवा गाडदी अशासारखे परकीय सैनिक ठेवण्याची कल्पना निघाली हे लोक लढाईचा पेशाच स्वीकारलेले व माणुसकीला रामराम ठोकलेले असे असत त्याचा राज्यातील लुटीत भाग असे. असल्या उरफाट्या काळजाच्या व प्राणघातक शस्त्रास्त्रानी सज्ज

असलेल्या हजारो सैनिकाना बाकीच्या शात, दुबळया, काबाडकष्ट करणाऱ्या लाखो लोकावर जुलूम गाजविता यावा, यात नवल कसले? शेतकऱ्यानें शेतात वर्षभर राबावे, पिवळी धमक पिके दिसू लागली म्हणजे श्रमाचें सार्थक मानावे, व खळयावरील धान्य पोराबाळाकरिता घरी नेणार तोच सैनिकाची टोळधाड अभावित उभी रहावी व उभ्या वर्षाची कमाई क्षणात मातीत लोटलेली उघडया डोळयानी पहावी व वर जिवानिशी सुटल्यास परमेश्वरी खैर समजावी! असले प्रसग पूर्वीच्या काळी दुर्मिळ नव्हते खेडो-खेडी पागलेले शेतकरी आपल्या विळयाकोयत्यानी सघटित सशस्त्र सैनिका-पुढें काय टिकाव धरणार? गिरण्यातील मजूर दगा करू लागले तर गोळया झाडून किंवा विमानातून बाँब टाकून त्याची पागापाग करण्यास किती अवधी? या नि:सहाय स्थितीतूनही गुलामगिरीत खितपतणाराना आपले डोके सामुदायिक शक्तीच्या योगे वर काढता येणे कसे शक्य आहे ह्याचे विवेचन यथावकाश येईलच

ज्या शास्त्रविज्ञानाने मानवी जीवन सुखमय करण्यास हरतऱ्हेची मदत केली त्याच शास्त्रविज्ञानाचा फायदा चतुर शासकवर्गाने इतराना लुबाडण्याची शस्त्रास्त्रें बनविण्यासाठी घ्यावा यापरीस दुर्दैव ते कोणते? दगडाची आयुधे करण्याची क्लृप्ति निघाली तेव्हा काहीनी त्याचा धान्य कुटण्याची उखळे बनविण्यासाठी उपयोग केला, तर क्षात्रवर्गाने तिच्या सहाय्याने अणकुचिदार सुरे बनविले लोखडाचा शोध लागला तेव्हा एकाने त्याचा नागर बनविला, तर दुसऱ्याने त्यातून भाला निर्माण केला औषधी वनस्पतीचे गुणधर्म कळले तेव्हाही एकाने त्याच्या सहाय्याने रोगपरिहार केला तर दुसऱ्याने त्यातील विष, विषारी झगे वा विषकन्या शत्रूस नजराणे देण्यात योजले. मत्रतत्र साध्य झाले तर एकाने सर्पविष उतरविले, दुसऱ्याने शत्रूस मूठ मारली साराश, ज्या ज्या विद्येने मानवी-जीवनात सुखसोयीची भर पडली त्या त्या विद्येच्या दुसऱ्या अगाने दास्याची मगरमिठी आवळत चालली व सर्व सुखसोयी शासकवर्गाच्या हातीच पडल्या विष आणि अमृत एकत्रच वास करीत असतात ते असे या जोडीपैकी विष नष्ट करून अमृत तेवढें उरवावयाचे, किंवा सरळ भाषेंत म्हणावयाचे म्हणजे शास्त्रकलादिका-च्या योगाने सुखसमृद्धीचा फायदा तर घ्यावयाचा पण त्या सुखसोयी मूठभर

लोकाच्या हातीच राहण्याचे जेणेकरून टळेल व त्या सर्वांना मुक्तद्वार होईल अशी समाजाची रचना करावयाची, ह्राच सामाजिक पुनर्घटनेचा विषय होय. असो तूर्त दास्यदृढीकरणाच्या साधनाचा विचार करू.

## मनोमुंडन

दास्यदृढीकरणात आयुधाची कामगिरी साक्षात् स्पष्टच आहे पण याशिवाय इतर अप्रत्यक्ष साधनाचीही दास्याच्या दोऱ्या आवळण्यात भर पडली आहे. ती साधने अप्रत्यक्ष असली तरी शरिरात अदृश्यपणे राहून शरीर पोखरणाऱ्या रोगजतूइतकीच परिणामी मन दुर्बल करणारी आहेत ही साधने मनोवृत्तिमारक होत सत्ताधीश हे अलौकिक उच्च कोटीतील पुण्यात्मे होत पृथ्वीपति ह्रा तर साक्षात् विष्णूचा अवतार (ना विष्णु पृथिवीपतिः), इतराना भोगाव्या लागणाऱ्या आपत्ति ह्या नैसर्गिक, स्वाभाविक होत, इतकेंच नव्हे तर समाजव्यवस्थेंतील तो एक अपरिहार्य भाग होय अशी आपत्ति भोगणाऱ्या लोकाची मनोवृत्ति तयार होत जाऊन स्वतच्या पायातील शृखला तोडण्याची इच्छाच नष्ट करणे हे ह्या प्रकारच्या साधनातील बीज होय सरकार किंवा शासनसस्था व त्यानी केलेले कायदे याचे अस्तित्व व प्रवृत्ति ही स्वभावत च न्यायप्रवण होत त्यातून काही अन्याय शिल्लक उरत असल्यास तें मनुष्यनिर्मित सस्थेंतील अपरिहार्य व्यग होय त्याच्याबद्दल असतोष प्रदर्शित करणे म्हणजे सामाजिक सुव्यवस्थेकरिता झटणाऱ्या सस्थेशीं द्रोह करण्यासारखेंच हा द्रोह परमेश्वराच्या दरबारी रुजू अशक्य. असली विचारसरणी उत्पन्न होणे किंवा निर्माण करणे ही दास्यदृढीकरणातील महत्त्वाची क्रिया होय

कायद्याने प्रस्थापित झालेल्या सरकारविषयी अमर्याद पूज्यबुद्धि उत्पन्न करणे ह्याचे महत्त्व प्रत्येक शासनसस्थेने—मग ती राजसत्ताक असो वा प्रतिनिधिसत्ताक असो—ओळखलेले असतें पूर्वीच्या काळी रक्षणाची जबाबदारी स्वतःवर घेऊन प्रजेस आपापल्या धद्याची जोपासना करण्यास निर्वेध राखणारा राजा भेटला तर प्रजा त्याबद्दल उपकार मानी. उपटसुभाच्या व भटक्या क्षात्रवृत्तीच्या टोळधाचे भूत नेहमीच डोळ्यापुढें नाचत असल्याने तें गाडणारा कोणीहि पचाक्षरी भेटल्यास, तो मागेल ती खडणी द्यावयास लोक

सिद्ध असत राज्यशकट हाकणे हे एका विशिष्ट वर्गाचेच काम, अशी समजूत होती प्रजेच्या प्रतिनिधींनी समाजनियमन करणे, ह्या कल्पनेची भरारी छोट्या गणराज्यापलीकडे गेलेली नव्हती थोडेसे स्वास्थ्य मिळे ते राज्यसंस्थेच्या छाये-खालीच मिळे यामुळें अराजकाविषयी येवढी धास्ती जनतेच्या मनात बसली होती की शासनसंस्था निर्माण करणारा परकीय असला तरी त्याविषयी जनता कृतज्ञ असे शुक्रनीति सांगते की, इंद्राणी ही इंद्राशिवाय राहू शकत नाही, तद्वत् जनता ही राजाशिवाय राहू शकत नाही राजसत्तेभोवती परमेश्वरी सत्तेचे अभेद्य कवच असल्याने मंत्रतंत्रादीचे तोडगे त्यावर लागू होत नाहीत, वगैरे समजुती राजसत्तेच्या अलौकिक प्रभावाच्याच निदर्शक होत.

दोन राष्ट्रामध्यें युद्ध सुरू झाले असता, ज्या राष्ट्रात राष्ट्राला सुसंघटित करणारी राजसत्ता नसे ते राष्ट्र पराभव पावे, याचा अनुभव आर्य लोकाना देवासुर–युद्धातच येऊन चुकला याविषयी ऐतरेय ब्राह्मणकाराने अशी आख्यायिका दिली आहे की, 'देवासुरा वा एषु लोकेषु समयन्तत तान्स्तेऽसुरा अजयन् । देवा अब्रुवन्नराजतया वै नोजयन्ति राजानं करवामहा इति ।' देवासुराच्या युद्धात असुरानी देवाचा पराभव केला तेव्हा देवानी विचार केला की, आपणास राजा नसल्यामुळे आपला पराभव होतो, तर आपण राजा करू या असे म्हणून त्यानी सोमाला राजा केला. अशा रीतीने राजसत्ता लोकानी आपल्या हातानी निर्माण केली व त्याबरोबर आपल्या पायातील शृंखलाही तयार केल्या.

यहुद्याच्या इतिहासातही असाच प्रसंग आहे यहुदी लोकानी त्याचा तत्त्वज्ञ जो सॅम्युअल त्याच्यापाशी असा हट्ट धरला की, 'आम्हाला राजा पाहिजे इतर सर्व राष्ट्राना राजा आहे मग आम्हालाच का नको?' सॅम्युअलने त्यांना बजावले की, 'पहा बरे, तुम्ही राजा केलात की तुमचे मुलगे राजाचे शिपाई व हेलकरी बनतील, तुमच्या मुली राजाच्या भटारखान्यातील स्वयंपाकिणी होतील, तुमची जमीन तुमची न राहता राजाच्या मालकीची होईल, राजा कर म्हणून धान्य व गुरेढोरे तुमच्यापासून बळकावील व शेवटी तुम्ही सर्व राजाचे सेवक बनाल' पण इतर राष्ट्रातील राजशाहीचे ऐश्वर्य पाहून यहुद्याचे डोळे इतके दिपून गेले होते, कीं त्यांनीं

म्हटले, 'आमची भांडणे तोडण्यास आणि आमची युद्धें लढण्यास आम्हाला राजा हा पाहिजेच!'

महाभारतातही अराजकाच्या भयानक स्थितीचे वर्णन केले आहे शांति-पर्वाच्या ६७ व्या अध्यायात 'नहि राज्यात् पापतरमस्ति किंचिदराजकात्।' असे ठासून सांगून पुढे ६८ व्या अध्यायात वर्णिले आहे की, चंद्रसूर्य नसले तर जग जसे अंधकारात बुडून जाईल त्याप्रमाणे राजा नसल्यास लोक नाश पावतील राजा नसेल तर स्त्री, पुत्र, द्रव्य ही सर्व नाहीशी होतील व सर्वत्र शून्य होईल. द्रव्यसंपन्न लोकांना प्रत्यही वध आणि बंधन भोगावे लागेल विवाहाचे अस्तित्व नाहीसे होईल कृषिवाणिज्य लोप पावेल. सर्व लोक भीतीने व्याकुळ होऊन पलायन करू लागतील वगैरे पुढें असेही सांगितलें आहे की, बाहेरचा बलवत्तर राजा राज्यार्थी येईल तर अराजक राष्ट्राने त्याचाही जयजयकार करावा अथचेत् अधिवर्तेत राज्यार्थी बलवत्तरः। प्रत्युद्गम्य अभिपूज्य स्यात् एतदत्र सुमंत्रितम् ॥७॥ कारण 'नहि पापात्परतर अस्ति किञ्चित् अराजकात्' अराजकापेक्षा दुसरी भयंकर स्थिति नाही. राजा नसेल तर मासे माशाला गिळतात त्याप्रमाणे लोक एकमेकांना खातील, लुटतील

राजाचेन्नभवेल्लोके पृथिव्यां दण्डधारक
जले मत्स्यानिवाभक्ष्यन् दुर्बलान्बलवत्तरा ॥ १६ ॥

रामायणातही हीच मात्स्यन्यायाची भीति प्रकट झालेली आहे 'बभूवाराजकं तीक्ष्णं मात्स्यन्याय कदर्थितम्' (अयोध्या ६७।२२) आणि कौटिल्यानेंही राजशाहीची उत्पत्ति अशीच वर्णिली आहे 'मात्स्यन्यायाभिभूता प्रजाः वैवस्वतं मनुं राजानं चक्रिरे' महाभारत सांगते की, मनूला राजा हो म्हणून विनंति करताना प्रजा म्हणाली की, 'तुला आम्ही पशूंचा एक पंचाश हिस्सा व सुवर्णाचाहि पंचाश भाग व धान्याचा दशमांश अर्पण करू पशूनामथ पंचाश धरण्यस्य तथैरच धान्यस्य दशम भाग दास्याम कोशवर्धनम्। कन्याच्या विवाहसमयी तुला एक कन्या देऊ. शस्त्र, अस्त्र व वाहनें यांनी युक्त असे आमचे लोक तुझ्या रक्षणास ठेवू, तरी तू सुखाने राज्य कर' असे आश्वासन देऊन राजाकडून धर्माने राज्य चालविण्याविषयी शपथही घेत (शांति अ. ६७.)

पण राजाला त्या शपथेचें व एकदशांश हिस्सा तेवढाच कर घेण्याचे

लवकरच विस्मरण पडे. यहुद्याच्या सॅम्युअलने भाकित केल्याप्रमाणे राजे लोक सर्व राज्यच आपली खासगी मिरास होय असे मानीत फ्रान्सचा चौदावा लुई म्हणे, 'राष्ट्र–राष्ट्र कसले आले आहे, मीच राष्ट्र!' ऐतरेय ब्राह्मणांत राजा हा 'विशामत्ता' म्हणजे सर्वभक्षक असे वर्णिले आहे पुराणप्रसिद्ध वेन राजाकडे यज्ञयागाबद्दल विनति करण्याकरिता ऋषि गेले असता तो राजा उद्गारला, 'यज्ञाचा वटवट करणारे तुम्ही सर्व मूर्ख आहात प्रत्यक्ष येथल्या येथें बऱ्यावाईट कर्मांची फळे देणारा माझ्यासारखा चालताबोलता देव सोडून तुम्ही परलोकचा देव कोठला घेऊन बसलात?' एवच, प्र म हौसेनें गादीवर बसविलेल्या राजाने लौकरच सर्व राज्यच बळकाविले!

## राजसत्तेचें वैभव

पुढे त्याचा दरारा वाढला व तो कायम टिकावा म्हणून राजसत्ते-विषयी अमर्याद पूज्यभाव उत्पन्न होईल अशा कल्पना व राजवैभवानें डोळे दिपतील अशी ऐश्वर्यस्मारके निर्माण करण्यात आली इजिप्तच्या पिरॅमिड-विषयी हिरोडोटस् सागतो की, पिरॅमिडचे बाधकाम चालले असता लोकाना पिळून काढण्याची कमाल झाली होती अरिस्टॉट्ल्नेही असाच अभिप्राय दिला आहे तो म्हणतो की, पिरॅमिडसारखी प्रचड कामे ही लोकाची प्रति-काराची शक्ति झिजून काढण्याची साधने होत राजेलोकाच्या 'क्षत्रिय-कुलावतस,' 'इदरमंहिदर', 'परमभट्टारक' 'महाराज–राजातिराज देवपुत्र' वगैरे घोसदार बिरुदावली ही लोकाना दिपविण्याची साधने होत. खलीफाच्या वैभवाचे वर्णन मागे आलेच आहे, त्यात सिंहासनापुढे सर्वांनी साष्टाग नमस्कार घालावयाचा व उठून उभे राहीपर्यंत असा चमत्कार होई की यत्राच्या कळीने निमिषार्धांत सिंहासन पूर्वीपेक्षा एकदम उच केले जाई, याचा उल्लेख आलाच आहे

पण ह्या बाह्य देखाव्यापेक्षाही राजा हा सामान्य जनतेपेक्षा जन्म-तःच श्रेष्ठ आहे ही कल्पना पसरविणे हे स्वातत्र्यकल्पना जिरवून टाकण्याचें अधिक प्रभावी अस्त्र होय. प्रजासत्ताक राज्यघटनेचे आकर्षक चित्र रंग-विणाऱ्या प्लेटोनेही आपल्या आदर्शभूत राज्यात राजसंरक्षक म्हणून जो वर्ग नादेल त्या वर्गाविषयीं जनतेत अवास्तव आदर उत्पन्न होईल अशा कथा

प्रसृत कराव्यात असे सागण्यास कमी केलेले नाही ! उदाहरणार्थ, "लोकाना असे सागावे की, सर्व माणसे पृथ्वीच्या पोटात उत्पन्न झाली, ती उत्पन्न होत असताना काहीच्या शरिरात परमेश्वराने सोने मिसळले, काहीच्यात रुपे मिसळले, काहीच्यात ताबे, तर काहीच्यात लोखड मिसळले तेव्हा ज्याच्या शरिरात सुवर्ण मिसळले आहे त्यानी सत्ता चालवावी रौप्यशरीरकानी त्याना सहाय्य करावे आणि ताम्र व लोहकायिकानो त्याची सेवा करावी ' (पु ३)

पौर्वात्य व पाश्चिमात्य राज्यशास्त्रकारानी तर प्लेटोच्याही वर ताण करून राजा हा प्रत्यक्ष ईश्वरी अशच होय असेही प्रतिपादण्यास कमी केले नाही राजा हा ईश्वरी अश असल्याने मत्रतत्रादि अभिचारप्रयोग त्याच्यावर चालत नाहीत, अशी समजूत असे याचा उल्लेख मार्गे केलाच आहे. राजा ही प्रत्यक्ष देवता होय ही कल्पना महाभारताच्या शातिपर्वात स्पष्टपणे माडली आहे तेथें म्हटले आहे की,

नहि जात्ववमन्तव्य मनुष्य इति भूमिपः ।
महती देवताह्येषा नररूपेण तिष्ठति ॥

'राजा हाहि आपल्यासारखाच दोन हात, दोन पायाचा माणूस होय असे मानून राजाचा कधीहि अवमान करू नये, कारण राजा ही मनुष्यरूप धारण केलेली महान् देवता आहे जो त्याचे मनानेहि वाईट चिंतील तो निःसशय नरकात जाईल '

यस्तस्य पुरुष पाप मनसाप्यनुचिन्तयेत् ।
असशयमिह क्लिष्ट प्रेत्यापि नरक व्रजेत् ॥

स्मृतिग्रंथातसुद्धा ही कल्पना स्पष्ट स्वरुपात माडली आहे मनु लिहितो की,

अराजके हि लोकेऽस्मिन् सर्वतो विद्रुते भयात् ।
रक्षार्थमस्य सर्वस्य राजानमसृजत् प्रभुः ॥

अराजकाची अनवस्था पाहून परमेश्वरानें साक्षात् राजाला निर्माण केला. ग्रीक लोकहि सीझर व शिकदर याची परपरा परमेश्वरापर्यंत नेऊन भिडवीत व्यवहारनिपुण चाणक्य हा मात्र राजाला देव मानीत नाही; त्यानें प्रतिपादिलें आहे की, 'भोळ्या जनतेला फसविण्याकरितां राजाने आपल्या हेरांकरवी निग्रहानुग्रह करणारे राजे हे साक्षात् इद्र व यमच होत व त्याच

अपमान केला असता दैवी दडही भोगावा लागतो असे मत प्रसृत करून क्षुद्र लोकाना झुलवावे !' (अ १३)

अर्थात् परमेश्वराने दयार्द्रबुद्धीने पाठविलेल्या प्रतिनिधीचे कृतज्ञतापूर्वक स्वागत करणे प्राप्तच आले तो प्रतिनिधीही कसा, तर मनू सागतो—

यस्माद्देवां सुरेन्द्राणा मात्राभ्यो निर्मितो नृपः।
तस्मादभिभवत्येष सर्वभूनानि तेजसा ॥

सर्व देवाच्या अशापासून निर्माण झालेला राजा आपल्या तेजाने सर्व भूतावर स्वामित्व गाजविण्यास समर्थच असतो. अशा ईश्वरी अशाकरवी जुलूम सोसावा लागला तर तो आपल्याच कृतकर्माचे प्रायश्चित्त असा परमेश्वरी कोपच होय असे म्हणून 'भोगेनैव सक्षय' या न्यायाने तो भोगून त्याची निष्कृति झाल्याचे समाधान मानणे क्रमप्राप्तच झाले 'पावसाने झोडपले व राजाने गाजले, तर फिर्याद कोणाकडे करावयाची' ही म्हण लोकाच्या अत करणात पूर्ण रुजलेली

मात्र हेही नमूद केले पाहिजे की, प्रजेच्या रक्षणाकरिताच राजाची योजना असल्याने—

स्नेह दया च सौख्य च यदि वा जानकीमपि।
आराधनाय लोकस्य मुञ्चतो नास्ति मे व्यथा ॥

असे उद्गार काढणाऱ्या आदर्श रामचद्राप्रमाणे प्रजारजनामुळे आपली राजा ही पदवी सार्थ करावी असेही स्मृतिकारानी सागितले आहे. इतकेच काय, पण एकीकडे राजा हा परमेश्वरी अश होय असे प्रतिपादन केले असता दुसरीकडे राजाने प्रजेची गाजणूक केल्यास,

प्रजापीडनसन्तापात् समुद्भतो हुताशन
राज्ञः कुल श्रिय प्राणा चादग्धा न निवर्तते।

असा स्पष्ट इशारा दिलेला आहे. पण प्रजेने हा वन्हि कसा चेतवावा हें त्यानीं सांगितलेले नाही किंवा पूर्वी वेन राजाला ऋषीनी पदच्युत केले ह्या गोष्टीवरही नुसत्या ओझरत्या उल्लेखापलिकडे कधी भर दिलेला नाहीं. यामुळें राजाची कर्तव्यें धर्मग्रथ व काव्य ह्यात राहून, प्रजेच्या कर्तव्याची जाणीव तेवढी जागती राहिली. 'महती देवताह्येषा' म्हणून राजाच्या

व्यक्तीला जसे दैवी स्वरूप देण्यात आले, त्याचप्रमाणे राजाची लोकाना शिक्षा करण्याची जी सत्ता त्या सत्तेलाही दैवी स्वरूप देण्यात आले सातव्या अध्यायात मनु लिहितो की—

तस्यार्थे सर्वभूताना गोप्तार धर्ममात्मजम् ।
ब्रह्मतेजोमय दण्डमसृजत् पूर्वमीश्वरः ।। १४ ।।

राजा उत्पन्न केल्यानतर साक्षात् परमेश्वराने सर्व प्रजेच्या रक्षणार्थ ब्रह्मतेजोमय असा 'दण्ड' उत्पन्न केला या दडाच्या भयानेच सर्व लोक आपआपली कामे करतात देव, गधर्व व राक्षस वगरेही या दण्डाच्या भयानेच आपापली नियतकर्मे करीत आहेत. श्यामवर्ण व लोहिताक्ष असा हा दण्ड विलसत आहे तोवर प्रजा कर्तव्यच्युत होत नाही. महाभारतात या दण्डाला यापेक्षा अधिक मर्त रूप देऊन त्याचे असे वर्णन केले आहे की—

नीलोत्पलदलश्यामः चतुर्दंष्ट्रश्चतुर्भुज ।
अष्टपानैकनयनः शङ्कुकर्णोर्ध्वरोमवान् ।
जटी द्विजिव्हस्ताम्राक्षो मृगराजतनुच्छद ।।

—शा १२१।१५

हा दण्ड नीलोत्पलाप्रमाणे श्यामवर्ण आहे. त्याला चार दाढा, चार हात, आठ पाय, असख्य डोळे, शकूसारखे कान, उभे केस आहेत त्याच्या जटा वळलेल्या आहेत, त्याला दोन जिभा आहेत, त्याचे डोळे तावडे आहेत व तो सिहाचे कातडें पाघरलेला आहे टीकाकारानी याचा अर्थ, चार दाढा म्हणजे चार प्रकारच्या शिक्षा, चार हात म्हणजे द्रव्य घेण्याचे चार प्रकार, तावडे डोळे हे रागाचे चिन्ह वगैरे प्रकारानी लावला आहे हे चित्र असे, की जे पाहून जनतेच्या मनात दरारा उत्पन्न व्हावा या दण्डाविषयी भीष्म पुढें सागतात की हा दण्ड ब्रह्मदेवाने क्षत्रियासच दिला आहे, इतरास दिलेला नाही.

## कायद्याची सत्ता

जेथे राजसत्तेचे स्वरूप प्रजासत्तेंत विरून गेले तेथे राजाच्या व्यक्तीऐवजीं प्रजामडळास व त्यानी निर्माण केलेल्या कायदेकानूविषयी व सामान्यतः ज्याला सनदशीरपणा म्हणतात त्याविषयी अवास्तव आदराच्या प्रतिपादनास चालना मिळाली व पूर्वीच्या परमेश्वरी मत्राऐवजीं नव्या मनूस अधिक सयुक्तिक

भासणारा ' सनदशीरपणा हा निसर्गाचा कायदा होय ' हा मंत्र जपण्यास सुरुवात झाली पण सत्ता एकाच्या हातून दहाच्या हातात गेली तरी काबाड-कष्टाचा शिक्का कपाळी कायमचा बसलेल्या असंख्य जनतेच्या आयुष्यक्रमात फरक थोडाच होणार ? हा फरक घडवून आणण्याकरिता त्यांनी बंड केले तर ते बेकायदेशीर, सनदशीरपणाचा तो उपमर्द, निसर्गाच्या सर्वंकष नियमाचे ते उल्लंघन, अशा मनोवृत्तीची सजावट निर्माण करण्याची खटपट सुरू झाली कायदा, शांतता व सुव्यवस्था ही त्रयी अभेद्य होय व कायद्याचा भंग हा समाजव्यवस्थेचा घोर अक्षम्य अपराध होय, हे कायद्याच्या अन्यायचक्रामध्ये भरडून जात असलेल्या जनतेच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न चालू झाला

शासनसंस्था व कायदेकानू याविषयी अवास्तव आदर उत्पन्न करण्याबरोबरच त्या आदरात किंतु उत्पन्न करण्यास लावणारे व स्वतंत्र विचाराची चटक लावणारे मुख्य साधन जे शिक्षण, तेहि जित लोकांस व निकृष्ट वर्गास मिळू नये अशी व्यवस्था करण्यात येई वेद तर शूद्रांना शिकवू नयेतच पण इतर लौकिक विद्याही शिकवू नयेत असा दंडक होता ' न शूद्राय मतिं दद्यात् ' असे स्मृतिवचन असून ' मति ' म्हणजे दण्डनीति, शास्त्र वगैरे विषय शूद्राला शिकवू नयेत असा दण्डक भाष्यकारांनी स्पष्ट केला आहे इंग्लंड-मध्ये सहाव्या हेन्रीच्या कारकीर्दीत ईटनची प्रसिद्ध शाळा स्थापन करण्यात आली. त्यावेळी असा स्पष्ट नियम केला की या शाळेंत शेतकरी मजुरांची मुले घेतली जाऊ नयेत ! ज्यू लोकांविषयी युरोपियनांना फार तिटकारा त्यांना डोके वर करण्यास फुरसत मिळू नये ही इच्छा, त्यामुळे हंगेरियात शाळेमध्यें ज्यू लोकांच्या थोड्याच मुलांना शाळेत घ्यावे असे नियम होते ज्यू हे स्वतंत्र तरी होते. तेव्हा परतंत्र असे जे गुलाम, त्यांना शिक्षण मिळू न देण्याविषयी किती कटाक्ष असेल याची कल्पना करावी त्याचे प्रत्यक्ष उदाहरण अमेरिकेतील कॅलिफोर्निया संस्थानातील १७४० च्या ज्या कायद्यात स्पष्ट रूपात पहावयास सापडते, त्या कायद्यान्वयें नीग्रोला लिहिण्यावाचण्यास शिकवण्याचा जर कोणी घोर अपराध केला तर त्याला शंभर पौंडाचा दंड भरण्याची शिक्षा ठोठावली जाई ! नंतरच्या शंभर वर्षांत तर ही रानटी वृत्ति अधिकच सबळली व १८३४ च्या कायद्याने ज्ञानदानाच्या अघोरी गुन्ह्यास

दंडाच्या जोडीला सहा महिने तुरुगवासाची शिक्षाहि ठोठावण्यात आली !
ज्ञान हे स्वतंत्र विचाराचे प्रवर्तक होय, याची जाणीव सत्ताधीशांना उत्तम असते, म्हणून दलितवर्गात विचारास चालनाच मिळणार नाही याविषयी ते नेहमी बरदारी घेत असतात.

दलितवर्गातील महत्त्वाकांक्षा मारून टाकण्यास वरील हत्यारापेक्षा आणखी एक हत्यारहि फार यशस्वी ठरलेले आहे. ते हत्यार दिसण्यात कमलाप्रमाणे कोमल असले तरी मनाच्या वज्रगांठी फोडण्याचे त्यांत सामर्थ्य अचाट आहे हे हत्यार म्हणजे धर्मभावना होय. याचे सहाय्य कसे मिळतें हें थोडें विस्ताराने पुढील प्रकरणी पाहू या.

---

## प्रकरण पांचवें

# विपत्तींची निरगांठ : धर्माची रेशमी काढणी !

जुलुमाचा प्रतिकार करणारीं व पौरुषवृत्ति बधिर करण्याची काही साधने मागील प्रकरणी पाहिली. प्रस्तुत आणखी एका साधनाचा स्वतंत्र विचार कर्तव्य आहे हे साधन म्हणजे धर्म हे होय. पौरुष वृत्तीची खच्ची करण्यात काही धार्मिक कल्पनाचे सहाय्य झाले आहे हे अप्रिय सत्य होय कोणत्याही ध र्मातील मध्यवर्ति कल्पना ही जुलूम व पारतंत्र्य याना विरोधकच आहे हे खोटे नव्हे 'परोपकार पुण्याय पापाय परपीडनम्' ही सर्व धर्मांची मध्य-वर्ति कल्पना होय या कल्पनेला मूर्त स्वरूप म्हणून विश्वजित यज्ञ, सुवर्ण-तुला, अन्नसत्रे, धर्मशाळा, पाणपोया, देवालये, अनेकविध दाने याचा पुर-स्कार करून निकृष्ट वर्गाची दुःखें हलकी करण्याचाच धर्माने प्रयत्न केला आहे तसेच प्रत्येक माणूस परमेश्वराचा अंश आहे अशी घोषणा करून पारमार्थिक दृष्टया सर्वांचा दर्जा समान होय असेही प्रतिपादिले आहे

पण पारमार्थिक दृष्टया धर्मग्रथाची कामगिरी स्वातंत्र्यपोषक असली व ऐहिकदृष्टया दानधर्माच्या उपदेशाने ऐहिक आपत्ति दूर करण्याचे श्रेयही धर्मास मिळत असले तरी धार्मिक ग्रथातील काही कल्पना ह्या जुलुमाच्या प्रतिकाराला व स्वतंत्र आणि उत्साही वृत्तीला मारक झाल्या आहेत हें डोळया-आड करता येत नाही. पुढील एकदोन प्रमुख प्रकारच पहा मानवजातीच्या आद्य जनकाने पातक केल्यामुळे सर्व मानवजात ही पापाचा बोजा पाठीवर घेऊनच जन्मास येते ही कल्पना, व प्रतिकाराची वृत्ति मारणारी 'एका गालावर मारले असता दुसरा पुढे करा' ही ख्रिश्चन धर्मातील शिकवण ही वरील प्रकारचीच उदाहरणे नव्हेत काय? हिंदुधर्मातील ज्या कल्पनाची जुलुमाचा प्रतिकार करण्याचा उत्साह मारण्यास किंवा जुलुमाची जाणीव बधिर करून टाकण्यास मदत होते, त्या कल्पना म्हणजे युगऱ्हास, पूर्वजन्माचे पाप, संसार–निःसारत्व व दैववाद ह्या होत. पैकी संसारमिथ्यात्वाच्या कल्पनेचा शतकानुशतके इतका अहर्निश महागजर आपणात चालत आलेला

आहे की हिंदू मूल आईचे स्तनपान करू लागताच ते ससारमिथ्यात्वाचे श्रवण करू लागते असे म्हटले असता अतिशयोक्ति होणार नाही !

ही शिकवण राष्ट्राला घातुक आहे याची जाणीव होऊ लागल्यापासून या दोषाचा घडा कोणाच्या माथी फोडावा याविषयी निरनिराळी मते माडण्यात आली आहेत. या विषयाकडे लक्ष वेधणारापैकी काहीनी ससार-मिथ्यात्वाचा उपदेश करण्याबद्दल सतमडळीची झडती घेतली दुसऱ्या काहीचे म्हणणे असे की ह्या कल्पनेचे मूळ शोधण्यास बुद्ध व जैन ग्रथकाराकडे वळले पाहिजे. या ग्रथकारानी जीवित हे दुःखमय होय या विचाराची अगदी कड नेऊन पोचविली यामुळें या घातुक विचाराची मुख्य जबाबदारी बुद्धावर येते कारण बुद्धपूर्व वैदिक वाङमय हे जगत् आनदपूर्ण आहे या सिद्धाताचे प्रतिपादन करणारे आहे

## संन्यासी शंकराचार्य

बौद्धमताचा पाडाव करून सनातनधर्माला पुन्हा उज्ज्वल रूप देताना शकराचार्यांनी यज्ञयागाला योग्य महत्त्व दिले नाही व सन्यासधर्माचाच पुरस्कार केला व त्यामुळें वैदिक उत्साह–धर्माची परपरा बुडाली, म्हणून एकाने शकराचार्यांचा खरपूस समाचार घेतला, तर दुसऱ्याने आपला पक्ष माडला की, दोषाची जबाबदारी लादावयाचीच झाली तर ती यज्ञाला गौणत्व देणाऱ्या शकराचार्यांबरोबर, यज्ञाचा उत्साहाने पुरस्कार करणाऱ्या मीमास-कावरही लादली जावी कारण शकराचार्यांच्या सन्यासोपदेशानें प्रपचाविषयी विरक्ति उत्पन्न केली तर [illegible] ‘ प्रत्येक कर्माचे ‘ अपूर्व ’ नावाचें अदृश्य व अतर्क्य असे फल असते ’ ह्या उपदेशाने विचारस्वातत्र्याची खच्ची झाली ! किंबहुना वैदिक वाङमयाचा एक भाग अशी जी उपनिषदें, तींही ‘ आनदीआनद गडे । इकडे तिकडे चोहीकडे ’ असा उपदेश सर्वत्र करीत नसून काही ठिकाणी ती ससाराच्या नि सारतेचेच चित्र रगविताना आढळ-तात. तैत्तिरीयोपनिषद् जगात भरलेल्या आनदाचे वर्णन करते की, ‘ आनन्दा-द्धेय खल्विमानि भूतानि जायन्ते । आनन्देन जातानि जीवन्ति । आनन्द प्रत्य-भिसविशन्ति । (तृ व ) सृष्टीतील चराचर पदार्थ हे आनदापासूनच जन्मास येतात, आनंदचैतन्यानेंच जगतात, व शेवटीं आनदातच लीन होतात. तर

मैत्रायणी–उपनिषद वर्णन करते की, ' अस्थिचर्मस्नायुमज्जामांसशुक्रशोणित-श्लेष्माश्रुदूषिते विण्मूत्रवातपित्तकफसङ्घाते दुर्गन्धे नि सारेऽस्मिन् शरीरे कि कामोपभोगे–' विण्मूत्राने लडबडलेल्या शरिराने कामोपभोग घेण्यात कोणता फायदा ? वैदिक आर्य एकेकाळी अनार्यांना जिंकीत, आयुष्यातील सुखे भोगीत ' पश्येम शरद· शतम् । जीवेम शरद शतम् ' असे उत्साही उद्गार काढीत सुखाने नांदत होते पण तो काळ ओसरल्यावर जगत् दु खमय आहे, ससार असार आहे, ऐहिक सुखाच्या मगरमिठीतून जितक्या लवकर सुटता येईल तितके चागले, वगैरे विचाराचा प्रवाह जो एकदा सुरू झाला ता थेट आजतागायत ज्या महाभारतग्रथात ' कर्मयोगो विशिष्यते ' असा उपदेश करणारी गीता अतर्भूत आहे त्या महाभारत ग्रथातही ' सुखात्बहुतर दुःख जीविते नास्ति सशय ' जगात सुखापेक्षा दुःखच जास्त आहे हे नि सशय, असा उपदेश आहे (शा २०५)

सस्यशामला व मलयजशीतला अशा या आपल्या सुवर्णभूमीत राहात असता ससार दुःखमय होय ह्या नामर्दकारक विचारसरणीची पकड लोकाच्या मनावर कशी बसली ह्याचे भारताचार्य वैद्य यानाही आश्चर्य वाटते ते लिहितात की, ' हा एक खरोखर चमत्कारच आहे कीं चार्वाकाशिवाय सर्व निरनिराळ्या मताचे भारतीय आर्यतत्त्वज्ञानी जगात दु ख भरलेले आहे असे एकमताने मानतात सर्वांच्या मतावर हेच एकसारखें आरूढ झालेले आहे की, या जगातील वैभव क्षणभगुर आहे. मोक्षधर्माच्या शातिपर्वांतील भागात पहिल्या अध्यायात जगताच्या नश्वरत्वाचे पूर्ण विवेचन केलेले असून वाचकाच्या मनात जगताविषयी विराग उत्पन्न करण्याचा चागला प्रयत्न केला आहे किंबहुना ज्यास मोक्ष साधावयाची इच्छा आहे त्यास प्रथमवैराग्यच पाहिजे, असे आपल्या सर्व तत्वज्ञाचे मत आहे. ' (पृ. १६) ते पुढें लिहितात की, ' भारतीय आर्यांच्या बहुतेक तत्त्वज्ञानाचा ससारत्यागाकडे साधारणपणे कटाक्ष आहे या गोष्टीचे एकप्रकारे आश्चर्य वाटते कारण ज्या देशात ते राहात होते त्यात भौतिक सुखसाधने सर्व प्रकारची भरलेली होती, अर्थात् जगताचा कटाळा येण्यास भारतवर्षांत कोणतीच परिस्थिति अनुकूल नव्हती कदाचित् असे असू शकेल, की भारतीय आर्यांचा स्वभाव मूळपासूनच वैराग्ययुक्त असावा आणि एकदर देशांतील राज्यव्यवस्था

ही हळूहळू या त्याच्या मनाच्या प्रवृत्तीस बळकटी आणण्यास साधनीभूत झाली असावी. ज्या समाजात निरनिराळ्या व्यक्ति समाजाच्या कल्याणाविषयी, सर्वांचा सबध न राहिल्याने विचार करीत नाहीत, त्या समाजात समष्टि-रूपाने जिवतपणाचा अहभाव उत्पन्न होत नाही प्रत्येक व्यक्ति आपआपल्या सुखदुःखाच्या विचारानेच ग्रासली जाते एकदर समष्टिरूपाच्या समाजाची सुखदुःखे त्याच्या मनासमोर उभी राहात नाहीत किंवा त्याची काळजी तो वाहात नाही. राज्यरूपी समाज दीर्घायुषी असल्याने राज्यविषयक कल्पनानी प्रत्येक मनुष्याच्या मनात जागृति असल्यामुळें त्याच्या क्षणिक सुखदु खाचा विसर त्यास पडतो आणि ससार हा केवळ सुखमय आहे अशी भावना त्याच्या मनात राहात नाही हिंदुस्थानातील राज्यें हळूहळू भारतकालात एकतन्त्री राजसत्ताक झाली. अर्थात् क्षत्रियाशिवाय इतर वर्गांचा म्हणजे ब्राह्मण, वैश्य, शूद्र याचा राजकीय कारणाशी सबध बहुतेक नाहीसा होऊन राजकीय व्यवहाराविषयी त्यास काळजी राहिली नाही राष्ट्रीय जीविताची अह-भावना त्याच्या ठायी नष्ट झाली व जो तो आपल्या सुखदु खानी व्याप्त होऊन एकदरीत ससार दु खमय आहे अशी कल्पना सामान्य लोकात प्रसृत झाली असावी. या गोष्टीचे कोणतेही कारण असो, भारतीय प्राचीन आर्य-तत्त्वज्ञानाचा कल ससार दु खमय आहे असेच मानण्याकडे आहे यात सशय नाही अर्थात् ससारचक्रातून सुटून जाण्याचा सरळ व एकच उपाय म्हटला म्हणजे ससारत्याग होय असे त्याचे मत होणे साहजिकच आहे.' ( महाभारत उपसहार पृ ४८७ )

## सर्वं दुःखम् !

बुद्धधर्माची सर्व शिकवणच मुळी 'सर्वं दु:ख' या तत्त्वावर उभारलेली होती पण या दुःखवादाच्या छायेंतून षड्दर्शनेही सुटली नाहीत. त्रिविध-तापानें पोळलेला प्राणीच मोक्षास अधिकारी होय, अशी एकदर माडणी असल्याने ससाराविषयी विरक्ति उत्पन्न होईल असेच ससाराचे वर्णन कर-ण्याचा अध्यात्म ग्रथाचा प्रचारच पडून गेला. ससारात असता प्रत्येकावर सामाजिक जबाबदारी आहे ह्याचीही आठवण बुजली व ससारांतून जितकें लवकर निसटतां येईल तितके बरे, या विचारानें ससाराकडे भाडोत्री परके-

पणाने पाहण्याची वृत्ति बळावली ऋग्वेदकालीन आर्य म्हणत असत की मोघमन्त विन्दते अप्रचेता सत्य ब्रवीमि वध इत् स तस्य । नार्यमाण पुष्यति नो सखाय केवलाघो भवति केवलादी ।। ' देवाना अर्पण न करिता व मित्राना न देता जो नुसते स्वत च अन्न खातो तो पापी होय ' तसेच समाजाच्या सुस्थितीचा विचार करण्याची जबाबदारी ज्याच्यावर होती त्या स्मृतिकारानीही आश्रमव्यवस्थेचा उपदेश केला व मनुस्मृतीप्रमाणे स्पष्ट बजावले की,

अनधीत्य द्विजो वेदाननुत्पाद्य तथा प्रजाम् ।
अनिष्टा चैव यज्ञैश्च मोक्षमिच्छन्व्रजत्यध ।। ६।३७

वेदाध्ययन, प्रजोत्पादन, यज्ञयाग वगैरे जे धर्म द्विजाना लावून दिलेले आहेत त्याची सागता झाल्याविना जो मोक्षाची इच्छा धरील तो मोक्षाऐवजी अधोगतीस जाईल ! तसेच माणूस जन्मास येतो तो तीन ऋणे घेऊन येतो ती फेडल्याशिवाय मोक्षाचा विचार करणारा अध पातास जातो, असे स्पष्ट बजावण्यास कमी केलेले नाही पण अध्यात्मिक ग्रथकारानी समाजशास्त्रकाराची ही शिकवणूक धाब्यावर बसवून जाबालोपनिषदाच्या मुखाने ' यदेवरह. विरजेत् तदेव प्रव्रजेत् ' ज्या दिवशी वैराग्य उत्पन्न होईल त्या दिवशीच ससाराचा त्याग करून सन्यास घ्यावा अशी स्पष्ट अनुज्ञा दिली इतकेच नव्हे तर ससाराविषयी जुगुप्सा उत्पन्न व्हावी अशा प्रकारे ससार हा तापदायक होय अशी शिकवणूक सुरू झाली सर्व दर्शनग्रथानी ' ससार हा दुःखमय होय, त्यातून सुटणे हा मोक्ष व त्याचा मार्गदर्शक आपले दर्शन किंवा शास्त्र ' अशी मूळ भूमिकाच घेतलेली आहे साख्यकारिकाकार लिहितो की, ' दु खत्रयाभिघातज्जिज्ञासा—' दु खत्रयाने होरपळलेल्याला मोक्षाची जिज्ञासा उत्पन्न होते. अशा रीतीनेच त्याने ग्रथाची सुरुवात केली आहे न्यायदर्शनकार लिहितो की, ' यथा मधुविषसपृक्तान्न अनादेय इत्येव सुख दु खानुषक्तमनादेयम् । ' ' गोड लागणाऱ्या विषाने कालविलेले अन्न जसे त्याज्य होय तसे दु.खाशी चिकटलेले सुख हे त्याज्य होय ' योगदर्शनकार लिहितात की, ' परिणामताप सस्कारदु खै दुःखमेव सर्वं विवेकिनः । ' ' ससारातील सर्व सुखाचा अत दु खात होत असल्याने विवेकी माणसाना सर्व दुःखमयच दिसते ' ब्रह्मसूत्रावरील भाष्यकाराकडे पाहिले तरी हीच वृत्ति आढळते. शकराचार्य ' येहि सस्पर्शजा भोगाः दुःखयोनय एव ते ' या गीताश्लोकावर

भाष्य करताना लिहितात की, 'नहि ससारे सुखस्य गधमात्रमप्यस्ति'। ससारात सुखाचा गधही कसा तो सापडणार नाही !

## संतांचा टाहो !

प्राकृत सतकवीनीहि हीच परपरा पुढे अढळ चालविली सतमडळीतील 'आधी प्रपच करावा नेटका', 'यत्न तो देव जाणावा' व 'शक्तियुक्ति जये ठायी। तेथे श्रीमत नादती' अशा प्रकारची समाजधर्माची व पौरुषाची आठवण शिवाजीकाली जागविणाऱ्या रामदासानीहि दासबोधाच्या पूर्वार्धात ससाराविषयी उद्वेग उत्पन्न होईल अशा रीतीने, परपरेस अनुसरून, ससाराचे हिडीस चित्र रेखाटण्यास कमी केले नाही. आणि तेहि अगदी सविस्तर ! दासबोधाच्या तिसऱ्या दशकात 'जन्म दुःखाचा अकुर। जन्म शोकाचा सागर। जन्म भयाचा डोगर। चळेना ऐसा ॥' अशी सुरुवात करून शरिराचे मूळच मुळी अमगळ, कारण-'अत्यत दोष ज्या विटाळा। त्या विटाळाचाचि पुतळा। तेथे निर्मळतेचा सोहळा। केवि घडे ॥ वरिवरि दिसे वैभवाचे। अतरी पोतडे नरकाचे। जैसे झाकणे चर्मकुडाचे। उघडताचि नये ॥' असे जन्मक्रियेचे व शरिराचे वर्णन केले आहे बाहेर शरीर कितीहि मोहक दिसले तरी, आत 'जत किडे आणि आतडी। नाना दुर्गधाची पोतडी। अमूप लवथवती कातडी। कटाळवाणी ॥' याची जाणीव मानवाने अहर्निश जागविली पाहिजे परलोकचा नरक टाळावयाचा असल्यास ह्या शरीरातर्गत नरकाचे नित्यस्मरण राखले पाहिजे 'एत्र मळमूत्र आणि वमन। हेचि देहाचे जीवन। येणेची देह वाढे जाण। यदर्थी सशय नाही ॥' याप्रमाणे देहदुर्गधीचे व गर्भवासाचे वर्णन त्रेपन्न ओव्यात फैलाविले आहे ! दुसऱ्या समासातही 'ससार हाचि दुःखमूळ। लागती दु खाचे इगळ' अशी सुरुवात करून दुसऱ्या, तिसऱ्या, चवथ्या व पाचव्या अशा समासात बालपण, तारुण्य, वृद्धपण अशा तिन्ही अवस्थामध्ये जन्मापासून मरेपर्यंत जीवाला अहर्निश दु खाचे कसे चटके बसत असतात याचे सविस्तर विवरण करण्यास सुमारे अडीचशे ओव्या खर्ची घातल्या आहेत. त्यातील सर्व वर्णन पुढील थाटाचे आहे ' बालपण कसे तापदायक, तर 'बालपणी त्वचा कोवळी। दु.ख होताचि तळमळी। वाचा नाही तये काळी। दुःख सागावया॥' आणि बाळपणात आजार शंभर 'निघाल्या देवी आणि

गोवर । उठले कपाळ लागला ज्वर । पोटशूळ निरंतर । वायगोळा ।।' शिवाय भुतेखेते 'लागली भुते झडपणी । जळीच्या मेसको मायराणी । मुंज्या झोटिंग करणी । म्हसोबाची ।। ' पुढे लग्न होऊन संसार थाटल्यावर–' तये भार्येचेनि कैवारे । मायबापासि नीच उत्तरे । बोलोनिया तिरस्कारे । वेगळा निघे ।। स्त्रीकारणे लोभी जाहला । स्त्रीकारणे धर्म सांडला । स्त्रीकारणे अंतरला । तीर्थयात्रा स्वधर्म ।। ' पण पुढे ही भार्या मरून गेली, हा पुन्हा ऊर बडवू लागला–' स्त्री घेवोनि आडवी । ऊर बडवी पोट बडवी । लाज सांडोनि गौरवी । लोकादेखता ।। ' पुढे–' परस्त्री देखोनि दृष्टी । अभिलाष उपजे पोटी । अकर्तव्यं हिपुटी । पुन होय ।। ऐसे पाप उदंड केले । शुभाशुभ नाही उरले । तेणे दोषे दुःख भरले । अकस्मात अंगी ।। व्याधी भरली सर्वांगी । प्राण जाहला क्षयरोगी । केले दोष आपले भोगी । शीघ्रकाळे ।। ' पण, ' मरत मरत वाचला । यास पुन्हा जन्म झाला । ' नंतर ' येरे स्त्री आणली । पुन्हा घरवात मांडली ' प्रथम पुत्र होईना, म्हणून खिन्न झाला अनेक नवससायास केले पुढे लेकरांनी घर भरल्यावर, ' दिवसेंदिवस खर्च वाढला । यावा होता तो खुंटोनि गेला । कन्या उपवर झाल्या त्याला । उजवावया द्रव्य नाही ।। ' अर्थात् मग कर्ज काढणे प्राप्त झाले ' काही केला तोडा मोडा । विकिला घरचा रेडापाडा । काही पैका रोकडा । कळांतरे काढिला ।। ' पण व्याज वाढू लागले तशी उपासमार होऊ लागली ' आता आम्ही काय खावे । किती उपवासी मरावे । ऐसीयाचे संगतीस दैवे । का पा घातले आम्हासी ।।' पुढे देशांतराला जाऊन थोडा पैसा आडका आणून आनंद करतो ' तो ऐसा आनंद मानला । दुःख सर्व विसरला । तंव तो गलबला झाला । परचक्र आले ।। अकस्मात् धाडी आली । कांता बंदी करूनि नेली । वस्त भावहि गेली । प्राणियाची ।। ' पुढे वृद्धापकाळ आला त्याचे वर्णन कोठवर करावे ? ' वळे जिव्हेची बोबडी । कफे कंठ घडघडी । दुर्गंधि सुटली तोंडी । नाकी श्लेष्मा वाहे । ' अशा रीतीने [illegible] मरेपर्यंत दुःख भोगल्यावर पुन्हा मेल्यावर यमयातना आहेतच असे हे समर्थांनी रंगविलेले संसारचित्र आहे ! यानंतर पुन्हा त्रिविधतापाचे वर्णन आहे ते निराळेच या वर्णनातल्याप्रमाणे सामान्यत. संसार जर इतका हिडीस व ओंगळ असेल तर त्यातून जितक्या लवकर पार पडता येईल तितके बरे, असे वाटणे स्वाभाविकच नाही का ?

ज्ञानेश्वरानी एके ठिकाणी वर्णन केले आहे की, मृत्युलोकीची कथा जो ऐकेल त्याला धगधगीत निखाऱ्यावर निजणाऱ्याप्रमाणे दु ख होईल नवव्या अध्यायात ते लिहितात की, ‘ म्हणोनि मृत्युलोकी सुखाची कहाणी । ’ ऐकिजेल कवणाचिये श्रवणी । कैचि सुखनिद्रा आथुरणी । इगळाच्या ॥’ तुकाराम बोवाचे- ‘ सुख पहाता जवापाडे । दुःख पर्वतायेवढे । ’ व ‘ वीतभर पोटासाठी । करितोसि आटाआटी ’ वगैरे अभग प्रसिद्धच आहेत. वैदिक वाङमयाच्या बौद्धजैनप्रधान उत्तरकालात ही जी जीवनाकडे पाहाण्याची वृत्ति रूढ झाली, ती अगदी तुकोबा रामदासापर्यंत रामदासानी ‘ यत्न तो देव जाणावा ’ ह्या प्रकारची जी नवी कलाटणी दिली ती अधिक अनुभवानतर उत्तरकालीच दिली. निवृत्तिपर वृत्ति अगी बाणली म्हणजे ससारातील आपत्तीचा प्रतिकार करण्याची कल्पना नष्ट न झाली तरच नवल किंबहुना प्रतिकार तर राहोच, पण, ‘ तैसा ससारे दु खावला । त्रिविध तापे पोळला । तोचि एक अधिकारी जाहला । परमार्थासि ॥ ’ या कल्पनेप्रमाणे ससारातील आपत्तीबद्दल परमेश्वराचे उपकार मानण्याची उलटी प्रथा सुरू झाली परमेश्वराचे स्मरण आपत्कालीच होत असल्याने, मला आपत्तीचाच वर दे असे म्हणणाऱ्या कुतीचे ‘ आपदा सन्तु न शश्वत् ’ हे वचन प्रसिद्ध आहे तुकारामबोवानीही आपत्तीचा असाच गौरव केला आहे. ते म्हणतात ‘ बरे झाले देवा निघाले दिवाळे, बरी या दुष्काळे पीडा केली । अनुतापे तुझे राहिले चितन, झाला हा वमन सवसार । बरे झाले देवा बाईल कर्कशा, बरी हे दुर्दशा जनामध्ये । बरे झाले जगी पावलो अपमान, बरे गेले धन गुरेढोरे । बरे झाले नाही धरिली लोकलाज, बरा आलो तुज शरण देवा ॥ ’ वाचक हो ! तुकोबादि सतश्रेष्ठानी मौलानी सत्तेचा धुमाकूळ थयथयाट करीत असताही स्वधर्म व स्वभाषा याचे तेज सतत कायम राखले व गोब्राह्मणप्रतिपालक छत्रपतीच्या राज्याभिषेकाची भूमिका तयार करून ठेवली, हे मी विसरलो नाही हे करीत असताही प्रवृत्तीपेक्षा निवृत्तीवर व जनताजनार्दनापेक्षा स्वर्गीय जनार्दनावर त्यानी भर दिला तो त्या कालच्या पूर्व परपरेस धरूनच होता मात्र आता बदलत्या कालानुरूप व विज्ञान-वृद्धीला अनुसरून इहलोकही आनदमय करण्यास झटले पाहिजे.

## आजच्या विचारवंतांचा जळफळाट

ही आदर्श आनदमय परिस्थिति अद्याप दूर क्षितिजावरच असून ससारदु खवादाची परपरा आजतागायत अखड चालू आहे आजचे विद्यमान साधुसत हे पूर्वीच्या परपरेतच रुळलेले पण आजच्या नव्या युगातील धर्ममताचा चिकित्सक इतिहास लिहिण्याचा बाणा बाळगणाऱ्या परपरावाद्याचीही स्थिति ससार हा आनदमय होय असे म्हटल्याने नाकास मिरच्या झोबल्यासारखी कशी होते, हे तुम्हास पहावयाचे असेल तर नवयुगधर्मकाराच्या शब्दात आढळेल ब्राह्मधर्मी लोक ससार हा आनदमय होय असे मानतात त्याचे खडन करताना नवयुगधर्मकार स क्रु फडके लिहितात की, "ब्राह्माच्या लेखात वर्णन केलेल्या प्रेमानदाचा एक शताशही अनुभव ज्यास खरोखर प्रपचात येत असेल ते त्रिवार धन्य होत ज्या ससारास यादवाच्या रामराज्यात श्रीज्ञानेश्वरानी 'इगळाची शेज' म्हटले तीच या इग्रजाच्या विसाव्या शतकात पुष्पशय्या झाली काय ? 'ह्या ससारासारखे दु ख आणिक नाही' असे स्पष्टपणे म्हणणाऱ्या राजगुरु समर्थापेक्षाही आम्ही अधिक समर्थ झालो, नव्हे ? 'प्रपच साधुनि परमार्थाचा जेणे लाहो केला, तो नर भला भला ॥' अशा उक्तीतील सताचा खरा आशय तेच जाणोत पण ह्याच सतानी स्वत ससाराची आस्था काडीचीही दाखविली नाही, इतकेच नव्हे तर ससारात सुख मानणाऱ्यास मूर्खातला शिरोमणी म्हणण्यासही कमी केले नाही, ही गोष्ट विसरता येत नाही असा जगात एकही धर्म नाही की ज्याने विषयसुखाचा त्याग सागितला नाही. ससार सुखमय नाही, सुख वाटत असेल तर तो सुखाचा भास आहे हा अनुभव काही आजच्या हिंदुस्थानचा नाही तो सिद्धात दिक्कालातीत आहे" (पृ. ६४८) या उताऱ्यावरून दुःखवादाच्या परपरेची अखड साखळी दिसून येते याचा परिणाम दु खाचा, अन्यायाचा, जुलुमाचा प्रतिकार करण्यापेक्षा मोक्षाचे साधन म्हणून आपत्तीचा आनदाने स्वीकार करण्यात कसा होतो याचे निदर्शक म्हणून तुकारामबोवाचा अभग वर दिलाच आहे

या प्रकाराचे अतिरिक्त स्वरूप आपत्ति आल्या असता आनदाने स्वीकार करूनच न थाबता मुद्दाम आपत्ती ओढवून आणणाऱ्या पथात पाहावयास

सापडते देहदडन जितके अधिक होईल तितका मोक्षाचा मार्ग सुलभ होईल, ही या पथीयाची समजूत काहीनी अशी कल्पना माडली आहे की, जीव हा शरीराच्या पिजऱ्यात कोडलेला आहे. त्याला त्यातून सोडवावयाचा असल्यास शरीरास अनेक प्रकारे पीडा दिली पाहिजे, तप्त शिळेवर उभे राहिले पाहिजे व चिमटचाने डोक्याचे केस उपटले पाहिजेत ! तसेच आजीवक नावाच्या पथाचे भिक्षु शरीर धुळीने माखीत, नग्न स्थितीत हिडत फिरत व ' जठरानल शमवाया गोमय ताजें ' भक्षण करीत हठयोग्याचा झाडास उलटे टागून खालून मिरच्याची धुरी देण्याचा प्रयोग, किवा पचाग्निसाधनाचा प्रयोग हाहि याच प्रवृत्तीचा मासला होय ही परपरा बुद्धपूर्व काळापासून रामदासाच्या वेळेपर्यंत अभग दिसते रामदासानी त्याच्या वेळी आढळात येणाऱ्या असल्या विक्षिप्त प्रकाराचे ' जनस्वभावगोसावी ' यात मोठे ठसकेदार वर्णन केले आहे त्याची पुढील दोन तीन ओव्यावरून कल्पना येईल. ' एक म्हणती गुरू आमचा। करी अगिकार विष्ठेचा। तयासारिखा दुजा कैचा। भूमडळी ॥ १७ ॥ एक म्हणति एकचि तो । अखड ओक वपितो । बरे वाईट पाहे तो । गोसावी कैचा ॥ १८ ॥ अगीकार करी सौख्याचा । तो गोसावी कशाचा। पहा गोसावी आमचा । गुहाळीत लोळे ॥ १९ ॥ वोक नरक वाणि मूत । निःशक घटघटा घेत । लोकामध्ये मोठा महत । तया म्हणावे ॥२०॥' असो अशा रीतीने आपत्ती ही मोक्षाची सुवर्णसधि, किवा आपत्तीच्या पैंजारा म्हणजे मोक्षसोपानाच्या पायऱ्या, असे तत्त्वज्ञान जनतेच्या हृदयात खोलवर रुजविले गेलेले आहे !

## सृष्टिकर्त्याचें मांगल्य

धर्मग्रथातील या मनोवृत्तीला पोषक अशी दुसरी एक कल्पना म्हणजे ईश्वर करतो ते सर्व आपल्या बऱ्याकरिताच करतो– स्थूल दृष्टीला क्वचित् अन्याय दिसला तरी त्यात सर्वत्र ईश्वरी सूत्रच असते, ही होय एका इग्रज कवीने हा आशय एका कल्पित कथेने माडला आहे ती अशी की, रानावनात राहणाऱ्या एका सन्यासी बोवाना जगाची रहाटी पाहण्याची इच्छा होऊन ते एकदा आपली पर्णकुटी सोडून शहराच्या रस्त्याला लागले. वाटेंत त्याना एक वाटाड्या भेटला, व ते दोघे बरोबरच गप्पागोष्टी करीत चालले एव-

ढ्यात मुसळधार पाऊस सुरू झाला. म्हणून रस्त्यालगतच असलेल्या एका भव्य प्रासादात ते शिरले मालकाने मोठ्या प्रेमाने त्याचे स्वागत करून त्याना बडी मेजवानी दिळी पण निरोप घेताना बुवाजीच्या वाटाड्याने पाणी पिण्याचा चादीचा पेलाच खिशात घातला ! बोवा चपापले, पण बोलले नाहीत पुढे दुसऱ्या मुक्कामी त्याचे स्वागत करणारा यजमान अगदी कजूष भेटला तेथे त्याना कण्याभाकरीवरच गुजराण करावी लागली. पण तेथून निघून जाण्यापूर्वी या वाटाड्याने पूर्वीचा चादीचा पेला तेथे ठेवून दिला ! बुवाजी बुचकळ्यात पडले, पण बोलले नाहीत तिसऱ्या मुक्कामी त्याचे स्वागत चागले झाले, पण तेथें तर त्याचा मोबदला म्हणून तेथून जाण्यापूर्वी मालकाच्या तान्ह्या अर्भकाची मानच वाटाड्याने मुरगळली ! आता मात्र बुवाजीचा सताप अनावर झाला. पण ते क्रुद्ध नजरेने वाटाड्याकडे पाहू लागले तो, तो तेजःपुज देवदूताच्या रूपाने विलसू लागला ! देवदूत म्हणाला, ' झाला प्रकार पाहून अन्याय, अन्याय म्हणून तुम्ही मनात चरफडला असाल अदूरदृष्टी लोक असेच ईश्वरी न्यायाच्या नावाने खडे फोडतात पण तुम्ही पाहिलेल्या सर्व प्रकारात ईश्वरी घटनाच आहे उधळ्या माणसाच्या घरून मी पेला चोरला व कृपणाच्या घरी ठेवला, यात त्या दोघानाहि धडा घालून देण्याचाच माझा उद्देश होता. तिसऱ्या ठिकाणी मी लहान्या अर्भकाची मुडी मुरगळलेली पाहून तुम्हाला सताप आला पण त्यातले इगित असे होते की, ह्या अर्भकाचा बाप एके काळी फार देवधर्मी होता, पण हे मूल झाल्यापासून त्याचे लक्ष देवधर्मावरून पार उडाले होते, मूल मेल्याने त्याचे लक्ष आता पुन्हा देवधर्माकडे वळेल !" या गोष्टीने कवीला मनावर बिबवावयाचे आहे ते हे की प्रत्येक आपत्ती ही बाह्यत अपायकारक व अन्यायप्रेरित दिसली तरी ईश्वराच्या न्यायी जगांत प्रत्येक गोष्ट ही परिणामी सुफलदायी व रमणीयच असते !

## वैषम्यसमर्थक रवींद्रनाथ

आपल्या भारतातील अर्वाचीन जगप्रसिद्ध कविवर्य रवीद्रनाथ टागोर यानी आपल्या ' साधना ' नावाच्या ग्रथात दु खवादाचा जो विचार केला आहे त्यातही त्याचे मुख्य सूत्र वरीलपेक्षा फारसे निराळे नाही. जगातील

दुःखे, आपत्ती, अन्याय, कुरूपता वगैरेनी जग हे अपूर्ण व मर्यादित दिसले तरी साकल्याने पाहिले असता ते तसे नाही. कविवर्यांनी हे तत्त्व विशद करण्याकरिता अनेक रमणीय उपमा ओतल्या आहेत 'नदीला दोन्ही बाजूनी काठ असतात व त्यामुळे तिच्या पात्राच्या उच्छृखलपणाला मर्यादा बसते हे खरे, पण उच्छृखलपणाला पायबद घातल्यानेच नदीच्या प्रवाहाची प्रगति होत असते. जगाचेही तसेच आहे. जगात दु खे का आहेत हे विचारणे म्हणजे जग उत्पन्न का झाले असे विचारण्यासारखेच होय सृष्टी म्हटली म्हणजे ती अपूर्ण असावयाची व अपूर्णातूनच ती पूर्णाकडे मार्ग आक्रमण करीत असावयाची जगात दु ख, अन्याय, आपत्ती भरलेल्या आहेत यात आश्चर्य मानण्यासारखे काहीच नाही आश्चर्य हे, की ह्या दु खपूर्ण जगातहि शिस्त, प्रेम, आनद वगैरे सुदर वस्तु नादताना आढळून याव्यात. जगात जे अपूर्ण म्हणून दिसते ते पूर्णतेचेच एक स्वरूप होय. What appears as imperfect is the manifestation of the perefct मोठा मासा लहान माशाला गिळतो हे पाहिले, म्हणजे आपणाला असे वाटते की सृष्टीत सर्वत्र कलहाचेच साम्राज्य नादत आहे, पण या कलहप्रिय सृष्टीतच अपत्यप्रेम, स्वार्थत्याग वगैरे वावरत असतात ना? प्रत्येक घडीला कोणीतरी प्राणी परलोकची वाट धरीत आहे, म्हणून येवढ्याच गोष्टीचा विचार करू लागलो तर सर्व जग ही एक भयाण स्मशानभूमीच दिसू लागेल, व माणसाचा सर्व उत्साहच गळून पडेल पण माणूस हा मृत्यूचा विचार न करता आपण जणो अजरामर आहोत अशा भावननेच विद्या आणि अर्थ याचा सचय करीत असतो. आणि हीच त्याची जगाविषयीची खरी भावना होय मूल प्रथम चालू लागले म्हणजे इतक्या वेळा पडत असते, आपटत असते की ते पाहून त्याच्या असहाय आपत्तीबद्दल कळवळाच येईल. पण मूल धडपडत असता पुन पुन्हा उठून धावण्याचा जो एक विलक्षण उत्साह त्याच्या नसानसातून उसळत असतो त्याकडेच अधिक लक्ष पुरविले पाहिजे. कारण, त्याच्या प्रथम–प्रयत्नातील स्खलन हें खरे नसून अतिम विजय हाच खरा होय खरी स्थिति अशी आहे की जग हे दु खपूर्ण आहे यावर माणसाचा खरा विश्वासच नसतो सतारीच्या तुटलेल्या तारा जुळवीत असता जो त्याला वैताग येतो त्यावरून तो सतारीचे मोल बाधतो, की तारा एकदा

जुळल्या म्हणजे त्यातून निघणाऱ्या सुरेल नादब्रह्मावरून ? तात्पर्य, जगातील दुःख हे जगातील भरून उरलेल्या आनंददीपाखाली अपरिहार्य रीतीने असणारी सावली होय. छाया ही खरी नव्हे व तिच्या दर्शनाने उद्वेग उत्पन्न होण्याचेहि कारण नाही.' अशा प्रकारची ही कविरायाची विचारसरणी आहे व तिचे मूळ सूत्र हे, की जगात दुःख दिसते ते वस्तुत दुःख नसून शुभ्र सुखाच्या पाठीशी असणारी ती कृष्णछाया होय या दु खाच्या कृष्णछायेमळें जगातील अविनाशी सुख उलटे खुलूनच दिसावयास हवे !

## वैषम्याचें तात्त्विक समर्थन !

प्रत्येक तत्त्वज्ञानाला जगातील दु खाचा अथवा वैषम्य-नैर्घृण्याचा विचार करावाच लागतो, आणि त्याचे काहीतरी निश्चित उत्तर देणे जरूर आहे असे प्रत्येक तत्त्वज्ञान मानते जगात दु ख दिसते ते सुखाचेच एक अग होय हे वर दिलेले तत्व हे त्याचे एक उत्तर होय पण सुखाची कृष्णपार्श्वभूमि म्हणून तरी सर्वज्ञ ईश्वराच्या सृष्टीत दु ख का असावे ? सृष्टि ही सर्वज्ञ, सर्वशक्तिमान, परमकारुणिक अशा परमेश्वरानेच निर्माण केली तर तीत रोग, दुष्काळ, गुलामगिरी याना थारा कसा मिळाला व परमकारुणिक परमेश्वराने याना नगा नाच घालू कसा दिला ? इच्छास्वातत्र्य मानवास दिले असल्याने त्याने हृया आपत्ती ओढवून घेऊ नयेत असे म्हणून एका शकेची समजूत काढावी तो वाईट कृत्याचा मोह पडण्याची स्थिति तरी का उत्पन्न केली वगैरे शका भडावून सोडण्यास तयारच त्याचे समाधान करण्याकरिता निरनिराळ्या उपपत्त्या सुचविण्यात आल्या आहेत नव प्लेटोभक्तानी सुचविले की सृष्टि ही परमेश्वरी आज्ञा पूर्णपणे मानीत नाही म्हणून जगात वैगुण्ये उत्पन्न होतात पारशी, ज्यू, ख्रिश्चन धर्मांनी कारुणिक परमेश्वराच्या जोडीला क्रूरकर्मा अहरिमन किंवा सैतान मानिला आहे व तो परमेश्वरी घटना नेहमी हाणून पाडीत असतो व त्यामुळे जगात अन्याय, दु ख वगैरे उत्पन्न होतात असे प्रतिपादिले आहे आपल्याकडील साख्यानी सत्त्व, रज, तम असे प्रकृतीचे तीन गुण मानिले असून त्यापासून वैषम्य निर्माण होते अशी कल्पना केली आहे पण या सर्व कल्पनानी परमेश्वराच्या सर्वशक्तिमत्वाला बाध येत असल्याने मायावाद्यानी सर्व शकाचा थोडक्यात निरास करण्याची

अशी कल्पना लढविली की सर्व जगतच मुळी आभासात्मक होय ! त्यातील सुखेही आभासात्मक व दु खेही आभासात्मक ! हा आभास, ही माया झाडून टाका की हे जग, त्यातील सुखे दु खे ही सर्वच धुक्याप्रमाणे वितळून जातील व मग दुःख, अन्याय, जुलूम म्हणून ओरडण्याचे कामच राहणार नाही ! पण हा आभास तरी का उत्पन्न झाला, मूळ स्वरूपाची विस्मृति का पडली, व स्वप्न सुरू कसे झाले याचे मायावादी झाला तरी काय उत्तर देणार ?

जगात वैषम्य–नैर्घृण्य प्रत्ययास तर येते पण ईश्वरी जगात ते नादणे ईश्वराच्या सर्वशक्तिमत्वास बाधक होते, ह्या खोड्यातून सुटण्याकरिता तत्त्वज्ञान्यानी निरनिराळ्या उपपत्ती निर्माण केल्या. अनावर्षण, भूकप, ज्वालामुखी, कुरूपता, रोग, जरा, अपमृत्यु, वगैरे आपत्तीशी जगात अहर्निश टक्कर देणे प्राप्त आहे व त्याकी काहीचे निर्मूलन करण्याचे मानवास अद्याप तरी साध्य झालेले नाही व काहीचे कधीच साध्य होण्यासारखेही नसेल म्हणून मनाच्या समाधानाचे मार्ग शोधीत बसण्याचा प्रयत्न या दृष्टीने तत्त्वज्ञान्याच्या निरनिराळ्या उपपत्तीना महत्त्व आहे, पण दुसऱ्या दृष्टीने विचार केला असता मनाला भुरळ घालण्याच्या या युक्त्याच नव्हेत काय ? त्याने कायमचे समाधान कधीतरी होईल काय ? वरुणाला बळी देण्यास काढलेल्या शुन - शेपाला, डोबाच्या घरी गुलाम म्हणून राबणाऱ्या तारामतीला, किंवा दु:शासनाने विटबना करून वस्त्रहरणाचा प्रसग ओढविलेल्या द्रौपदीला हे सर्व जुलूम आभासात्मक आहेत असे सागणे किंवा जुलुमाच्या पार्श्वभूमीवर त्याचे धीरोदात्त वर्तन जास्तच खुलून दिसते आहे असे खिजवणे कितपत रुचेल ? निदान द्रौपदीसारख्या पतिव्रतेला ते रुचणारे नसल्याने तिने, भीष्मद्रोणादिकाचा "धिक् अस्तु नष्ट· खलु भारताना धर्म तथा क्षत्रविदाच वृतम्" या शब्दाने धिक्कार केला असे भारतकार सागतात (म. भा सभापव अ ६७ )

त्यापेक्षा उघड असे प्रतिपादणे काय वाईट की जगात वैषम्य-नैर्घृण्य, दुःख, अन्याय, आपत्ती आहेत त्या आम्हाला दिसताहेत, जाणवताहेत कुरूपता, रोगराई, भूकप, वगैरे आपत्ती देवाने का निर्माण केल्या हे आम्हास कळत नाही पण या सर्वांचा प्रतिकार करीत राहण्यासाठी देवाने बुद्धि दिली आहे तिचा निरलस उत्साही मनाने उपयोग करून या आपत्तीची

तीव्रता जितकी कमी करता येईल तितकी करण्याचा कसून प्रयत्न करू या भौतिकशास्त्राच्या अभ्यासाने रोगराई, दुष्काळ वगैरेचा परिहार करू या, आणि कृत्रिम उच्चनीचपणा व गुलामगिरी यासारखी मानवानेच आपल्या हाताने उठविलेली भुते सघटित प्रतिकाराच्या मत्राने गाडून टाकू या ह्या प्राजल विचारसरणीचा राजमार्ग सोडून तत्त्वज्ञान्यानी कल्पिलेल्या उपपत्ती-च्या जगलात शिरले म्हणजे अन्यायप्रतिकाराची वृत्ति भाबावून जाते मग त्या वृत्तीला दैवी आपत्तीबरोबर मानवी आपत्ती ह्याही विश्वरचनेचा एक अवश्य भाग होय असे वाटू लागते व प्रतिकारवृत्तीचे मानवी मनातील बीजच खुडले जाते !

या सर्व तत्त्वज्ञानाचा परिणाम जगाकडे उदासीन, निरुत्साही दृष्टीने पाहण्यात होतो सर्व जगच जर पारमार्थिक दृष्टया मिथ्या व आभासात्मक तर या आभासात्मक जगातील अन्याय, आपत्तीही आभासात्मकच मग त्या दूर करण्याविषयी प्रयत्न तो काय करावयाचा ? खोटया बागुलबुवाला भिऊन मल रडू लागले तर तो बागुलबोवा खोटा आहे हे दाखविणे येवढाच त्यावर उपाय !

## दैववादाची झांपड

आभासात्मक जगातील अन्याय, आपत्ती परमार्थतः आभासात्मक असल्या तरी आभास कायम असेपर्यंत तरी त्याचा जुलूम जाचणारच मग आभासात्मक स्थितीत तरी त्याचा प्रतिकार का करू नये अशी शका साह-जिकच उद्भवेल त्या शकेलाहि गप्प बसविणारे जे एक तत्व तत्त्वज्ञानाने पुरस्कारिले आहे तेहि वैराग्यवाद व जगन्मिथ्यावाद याच्या इतकेच अन्याय-परिमार्जनाची वृत्ति हतबल करणारे आहे ते तत्त्व म्हणजे दैववाद अथवा कर्मवाद होय या जन्मीचे सर्व दु:ख हे पूर्वजन्मीच्या आपल्याच कृत्याचे फळ व 'भोगेनैव सक्षय' या न्यायाने त्याविषयी कुरकुर न करिता ते निमूट-पणे भोगूनच सपविले पाहिजे हे कर्मवादाचे मुख्य सूत्र होय. प्रस्तुत जन्म हा पूर्व-सचिताचा परिपाक असल्याने प्राणी जन्मास येताच त्याची जीवयात्रा व त्यातील सुखदु खप्रसग हे ठरूनच जातात सस्कृत सुभाषितकार सागतो की 'यद्दिने पतितो बिन्दु मातृगर्भे सुनिश्चितम् । तद्दिने लिखित सर्व हानिमृत्युसुखो-

त्तरम् ।।' ज्या दिवशी जीवाची मातृगर्भांत स्थापना होते त्याच दिवशी त्याच्या जीवयात्रेतील हानि, मृत्यु, सुख वगैरे त्याच्या ललाटी लिहिले जाते ! बुद्धि- बल व शरीरबल प्राप्त होणे न होणे पूर्वकर्माधीन, श्रीमंत आईबापांच्या पोटी जन्म लाभणे पूर्वकर्माधीन. स्वतंत्र देशाच्या मोकळ्या वातावरणात नांदावयास लाभणे किंवा परतंत्र देशाच्या कोंदट हवेत कुजत पडणे दैवाधीन. उच्च कुलात व जातीत जन्मास येणे वा अस्पृश्य कुलात जन्म काढणे दैवाधीन. येथून तेथून सर्वच आयुष्यपट जन्मांतरकृत पापपुण्याच्या दोऱ्यांनी विणलेला ! इहजन्मीच्या आपत्ती या पूर्वसंचिताचे फळ, त्या टाळण्यात अर्थ नाही. भोगूनच त्याचा संक्षय केला पाहिजे या जन्मी पुण्य केले तर पुढील जन्मीच्या आपत्ती टाळता येतील आणि सर्वच आपत्ती एकाच सदरात गणलेल्या. मग त्या उपजत बुद्धीत कमतरता असण्यासारख्या असोत किंवा हलक्या जातीत जन्मास येण्यासारख्या असोत !

जातीतील उच्चनीच भाव ही तर केवळ अहंकारी मेंदूतून निघालेली मानीव कल्पना होय पण तीहि पूर्वसंचिताचाच परिणाम ठरून गेली आयुष्यातील सर्व आपत्ती, मग त्या मनुष्याने निर्माण केलेल्या असोत किंवा मानवी परिहाराच्या आवाक्याच्या बाहेर असोत, सर्वच आपत्ती ह्या पूर्वा- र्जित पापाच्या शिक्षेच्या स्वरूपाच्या समजल्या म्हणजे मग काही आपत्ती मानवी असल्या तरी त्याच्या परिहाराचा विचार करण्याचे कारणच उरत नाही. कारण शिक्षा भोगून जितके लवकर सुटता येईल तितके सुटणे एवढेच उरते प्रत्येक आपत्ति ही अदृष्ट पूर्वार्जित पापाची शिक्षा असे मानले तर विद्यमान आपत्तीत आणखी भर पडत चालली म्हणून तरी काय बिनसले ? हीच विचारसरणी विधवेला बजाविते की, ' बाई, पुन्हा लग्न करण्याचा वेडगळ विचार मनात देखील आणू नको तुझा नवरा का मरावा याचा तू विचार केलास का ? तुझा नवरा मेला याचे कारण पतिसहवासाचे येवढेंच सुख तुझ्या नशिबी लिहिलेले होते ! उरलेले आयुष्य तू व्रतचर्येने घालवावे अशीच ईश्वरी इच्छा आहे नाही तर तुझा नवरा मरता का ? तेव्हा ईश्वरी इच्छेचा निषेध करू नको '

हीच विचारसरणी शूद्र व अंत्यज यांचेकडे वळून म्हणते, 'द्विजाची सेवा करण्यात तुम्ही खंत कशाकरिता मानता ? सेवाधर्म हा परमेश्वरानेच

तुमच्या जातीला लावून दिला आहे स्वत भगवान् कृष्ण सांगतात की, ‘परिचर्यात्मक कर्म शूद्रस्यहि स्वभावजम्’ ऋषिवर्य मनूही असेच बजावितो ना? ‘एकमेव तु शूद्रस्य प्रभु कर्म समादिशत्। एतेषामेव वर्णानां शुश्रूषामनसूयया॥’ तुम्हाला शूद्रयोनीतच परमेश्वराने का जन्मास घातले तर तुमच्या हातून द्विजाची शुश्रूषा व्हावी म्हणून. यात तुमच्या इच्छेचा प्रश्न नाही. पूर्वसंचिताप्रमाणे तुम्हाला योग्य तो वर्ण प्राप्त झाला आहे. तेव्हा त्या वर्णाला उपदिष्ट असे कर्म करा म्हणजे पुढील जन्मी तुम्हास उच्चतर वर्ण प्राप्त होईल’ वगैरे! अशा रीतीने जातिभेदादि मानवी आपत्ती ह्या दैवी घटनेचा एक भाग असून कोणत्या जातीत जन्म यावयाचा हे स्वत च्या पूर्वसंचितावरून ठरत असल्याने, मानवकृत मानवी उच्चनीचपणाचा प्रतिकार करण्याचे मनोबीजच अशा रीतीने दग्ध केले जाते

## राष्ट्राचें दैव

या दैववादाचे भूत नुसत्या व्यक्तीच्या मानगुटीसच बसून समाधान न पावता, ते सबंध समाजाला किंवा राष्ट्रालाहि झपाटू शकते, असेही मानण्यात येते राजा प्रजेला त्रास देऊ लागला तरी प्रजेचेच दुर्दैव अतिवृष्टि–अनावृष्टीसारख्या आपत्तीची बोळवण प्रजेचे दुर्दैव म्हणून केली, तर काहीतरी शोभेल. पण उन्मत्त सत्ताधारी प्रजेला छळू लागला तरीहि ‘प्रजेचेच पूर्वसंचित,’ अशी विचारसरणी सुरू होते अशी दुर्बल विचारसरणी प्रत्यक्ष अवलंबिली जात असे, याचे संस्कृत भाषेतील अव्वल दर्जाचा इतिहासकार कल्हण याने स्पष्ट पुरावे दिले आहेत संस्कृतमध्ये ज्या ग्रंथाला अव्वल दर्जाचा इतिहासग्रंथ म्हणता येईल असा एकच ग्रंथ उपलब्ध आहे. तो कल्हणकृत ‘राजतरंगिणी’ नामक काश्मीरचा इतिहास हा होय काश्मीरातील राजाची दानत चांगली नव्हती प्रजेवर जुलूम करण्याचीही त्यांना चटक लागलेली होती व सामान्यत हल्लीच्या संस्थानिकांत दिसून येणाऱ्या बहुतेक दुर्गुणांनी त्यांच्या वैभवात घर केले होते. इतिहासकार कल्हणाने इतिहासकाराच्या भूमिकेला साजेसे राजाच्या दुर्वर्तनाचे निःपक्षपातीपणे वर्णन केले आहे, व

निर्भीडपणे टीकाही केली आहे * पण या अन्यायाचे परिमार्जन कसे करता येईल याची कल्पना करताना कल्हण दैववादावरच आला आहे. एके ठिकाणी तो स्पष्ट म्हणतो की, ' राजाच्या हाती खरोखर कळसूत्री . . . . . . सत्ता असते प्रजेच्या शुभाशुभ नशिबाप्रमाणेच तिला सुष्ट किंवा दुष्ट राजा मिळत असतो वृक्षाना अबुवाहक अभ्राकडून अमृतजल किंवा अशनिपात प्राप्त होतो तो त्याच्या पूर्वसुकृतदुष्कृतानुरूपच ' परकीय क्रूर राजा मिहिर गुल याच्यासबधी कल्हण लिहितो की, ' या अनन्वित जुलूम करणाऱ्या राजाचा प्रजेने खूनच पाडावयास हवा होता ! पण तसे घडले नाही याचे कारण उग्र देवता त्याचे रक्षण करीत असाव्यात हेच धरले पाहिजे. एव क्षुद्रोऽपि यद्राजा सभूय न हतो जनैः। तत्कर्मकारयद्भि तद्दैवतैरेव रक्षित ॥ (१-३२४) ही कल्हणाची विचारसरणी होय ही विचारसरणी ज्या प्रजेच्या मनात रुजली ती प्रजा राजाने कितीहि जुलूम केला तरी ' आले देवाजीच्या मना । तेथे कोणाचे चालेना ' असे म्हणून हात बाधून, मान पुढे करून, अन्यायाचे तडाखे निमूटपणे सोशीत उभी राहिली तर नवल कसले ?

## पारतंत्र्याची फिकीर कशाला !

ह्या दैववादाच्या विचारसरणीची झापड डोळ्यावर अद्यापही कायम आहे गीतारहस्याचे परीक्षण करणारे गोविंदसुत यानी हिंदुस्थानच्या पारतत्र्याला उद्देशून काही वर्षांपूर्वी लिहिले होते की, ' प्रतिकूल दैव आले की सर्व गोष्टी प्रतिकूल होतात अशा प्रसगी सर्व देशावर सारखा खराटा फिरविणारी यात्रिककला पाश्चिमात्याच्या हाती का न यावी ! ' गोविंदसुताच्या मते यात्रिककला पाश्चात्याच्या हाती गेली, हे केवळ त्याचे दैव ! स्वातत्र्यप्राप्तीची इच्छा खोटचा धार्मिक कल्पनानी कशी ठेचली जात असे हेही याच ग्रथकाराच्या उद्‌गारावरून लक्षात येईल स्वातत्र्य नष्ट झाले, याविषयी

* याचे अधिक वर्णन माझ्या ' सस्कृति-सगमा ' च्या ' आसुरी भारत ' या सहाव्या व ' विचारदौर्बल्याचे शेवाळे ' या चौदाव्या (दुसरी आवृत्ति) प्रकरणात पहा

तो लिहितो की, ' आपली सपत्ती, ऐश्वर्य, स्वराज्य सर्वस्वी गेले जाऊ द्या! कुछ फिकीर नही ! ही सर्व जड सपत्ति आहे. ' अभय सत्त्वसशुद्धि ' वगैरे गीतेत सागितलेली सव्वीस लक्षणानी युक्त दैवी सपत्ति आपल्या राष्ट्रात होती, तिची परपरा गेली याबद्दल मात्र राहून राहून हळहळ वाटते आजकाल स्वराज्य, सपत्ति, ऐश्वर्य याबद्दल लोकाची अहोरात्र धडपड चालली आहे पण दैवी सपति आणण्याचा कोणीही प्रयत्न करीत नाही ही राष्ट्राला शरमेची गोष्ट आहे जड ऐश्वर्य, सपत्ति, स्वराज्य यानी प्राप्त होणारे ते रजनात्मक सुख खरे नव्हे आत्मोन्नति व्हावी म्हणून लोक जिवावरही उदार होत आहेत ही आनदाची गोष्ट होय पण आत्मोन्नति कशात आहे याचा कोणीच शोध करीत नाही सपत्ति, ऐश्वर्य, स्वराज्यप्राप्ति इत्यादि बाह्य ऐश्वर्याच्या अभावात अवनतीचे मूळ नाही त्यामुळे तत्प्राप्त्यर्थ अहोरात्र जी धडपड चालली आहे ती व्यर्थ आहे. '

पुढेहि हेच गृहस्थ लिहितात की, ' स्वराज्याचा उपभोग घेण्याचा चग बाधून चळवळ करण्यासाठी पुढे सरसावलेल्या पुढाऱ्यानो, तुम्ही आपणास सनातनधर्मी म्हणविता अर्थात् पुनर्जन्माचे तत्त्व आपल्याला नि सशय मान्य असलेच पाहिजे अध्यात्मिक धारणेने आत्मरूप ओळखून मुक्त होण्यासाठी जगन्नियत्याने तुम्हाला नरदेह दिला असता, ते कर्तव्य अजिबात विसरून गेला व जगाला स्वराज्याचा व स्वातत्र्याचा उपभोग मिळवून देण्याचा तुमचा प्रयत्न आहे पण कोणालाहि स्वराज्याचा अगर स्वातत्र्याचा उपभोग द्यावा अगर न द्यावा हे तुमच्या हाती नसून जगन्नियत्याच्या हाती आहे जगन्नियत्याच्या पदार्थसग्रहालयात जन्म–मृत्यु, सुख–दु ख, –स्वातत्र्य-पारतत्र्य, इत्यादि यच्चयावत् जिन्नस भरपूर भरले आहेत आणि पूर्वकर्मानुसार लोकाना त्याचा उपभोग मिळत आहे स्वराज्य, स्वातत्र्य हे जिन्नस आज इग्रज लोक भोगीत आहेत देवाच्या पदार्थसग्रहालयातून हा जिन्नस उपभोगाला मागून घ्यावयाचा असेल तर कर्मसिद्धीला दैव अनुकूल पाहिजे " वगैरे यावर भाष्य काय करावयाचे ?

अशा रीतीने शासक सत्ताधारी वर्गाला आपल्या सत्तेची पकड घट्ट करण्याला काही धर्मकल्पनाकडून अचानक मदत होत असते, आणि धूर्त सत्ताधारी त्याचा उपयोग करून घेतात्आहे. सुभाषितकार म्हणतो की, ' धार्मिकाला

आपला धर्मच तेवढा सत्य वाटतो, तत्त्वज्ञान्याला सर्वच फोल वाटतात, आणि सत्ताधीश मुत्सद्याला सर्वच धर्म उपयुक्त वाटतात।' अर्थात् मूठभर लोकाच्या जुलमी सत्तेपुढे विराटस्वरूपी जनता शतकानुशतके मान वाकवीत असलेली आढळून यावी हा जो इतिहासातील अद्भुत चमत्कार त्याची मीमासा शस्त्रसवर्धन, अज्ञानपोषण व जुलुमाची जाणीव मारून टाकणारी विचारसरणी या तीन प्रकारात दिसून येते पैकी तिसरा प्रकार अधिक विस्ताराने पुढील प्रकरणी पाहू या

## प्रकरण सहावें

# समाजघटना सनातन कीं परिवर्तनशील ?

विद्यमान समाजरचनेतील अन्याय टाळून सामाजिक पुनर्घटना करू पाहणाऱ्या वृत्तीला मारक होणाऱ्या दैववाद, संसारमिथ्यावाद, दैवी राजसत्तावाद, वगैरे काही कल्पनांचे स्वरूपाविष्करण गेल्या प्रकरणी झाले. प्रस्तुत आणखी दोन प्रबल कल्पनांचा विचार कर्तव्य आहे. त्या कल्पना म्हणजे 'आजची समाजरचना ही अचल कूटस्थ सनातन आहे, आणि फरक झालाच तर तो साक्षात् ईश्वरी प्रेरणेने होत असतो,' या होत

विद्यमान सनातन समाजरचना बदलून नवी कल्पनेने सुचलेली साम्यनिष्ठ समाजरचना करू पाहणे या कल्पनेचेच प्रथमदर्शनी धाष्टर्य वाटेल नवी सृष्टि रचू पाहणारा विश्वामित्र एके काळी होऊन गेला पण ती गोष्ट अर्धीमुर्धी साध्य होण्यासही त्याला हजारो वर्षें उग्र तपश्चर्या करावी लागली म्हणे ! आणि इतक्या प्रयासाने साध्य झालेली सृष्टीही लवकरच विधात्याच्या जुन्या सृष्टीत विरून गेली इतकेच नव्हे तर, एका त्रिशंकूला स्वर्गीय सुख मिळवून देण्याकरिता स्वर्गापर्यंत पोचेल इतका तपश्चर्येचा सोपान रचला तरी शेवटच्या पायरावर पोचनाच भोवळ येऊन बिचारा कोलमडला, तो एका दक्षिण दिशेकडच्या ताऱ्याच्या रूपाने अद्याप उरफाटाच लटकत आहे ! ही महातपस्वी विश्वामित्राची गोष्ट ! मग आजच्या कलियुगातील हीनतेज दुर्बल मानवाने समाजाच्या अनाद्यनंत सनातन ईश्वरघटित समाजरचनेत फेरफार करू पाहणे ही कल्पनाच किती उद्दाम मनोवृत्तीची! .. प्रवेशद्वारावरच असलेल्या या धाष्टर्याच्या शंकेची शिळा फोडून का त्याशिवाय उद्याच्या सामाजिक पुनर्घटनेच्या संस्कृतीच्या विचारसरणीचा पुढील मार्ग साफ होणार नाही. आणि ही शंका सनातनधर्माभिमानी व भौतिकशास्त्राभिमानी या दोन्ही गटातील काही उपपक्षात दिसून येत असल्यानें या शंकेचीं निरनिराळीं स्वरूपें नीट न्याहाळली पाहिजेत.

या शंकेचे अगदी प्राथमिक स्वरूप म्हणजे 'सृष्टीच्या व समाजाच्या

घटनेत फेरफार वा परिवर्तनच सभवत नाही ' हे होय ' सर्व सनातन ' हे ह्या शकेचे महावाक्य चराचर सृष्टीतील प्रत्येक वस्तुमात्रास ' आब्रह्मस्तब-पर्यन्तम् ' म्हणजे जगदुत्पादक ब्रह्मापासून यःकश्चित् गवताच्या काडीपर्यंत प्रत्येकाला नियम घालून दिलेले असून स्व–स्व प्रकृतीप्रमाणे विश्वातील प्रत्येक सजीव निर्जीव वस्तु विश्वकर्म्याने आखून दिलेल्या ठराविक मर्यादित वर्तुळात अनतकाल फिरत आहे त्याच्या गतिस्थितीचे सर्व नियम जगदुत्पत्तिकालीच ठरून गेले असून ' धातायथापूर्वमकल्पयत् ' म्हणजे विधात्याने नवीन सर्गाच्या वेळी सर्व सृष्टीची आखणी एकदाच करून टाकली आहे या पूर्वसकल्पित योजनेप्रमाणेच सूर्य प्रकाशतो, वारा वाहतो, पाऊस पडतो पृथ्वी अद्रि-अर्णवानी उच्च नीच होते, पक्षी घरटी बाधतात व किडे खातात. व्याघ्रादि हिंस्र पशू अरण्यात राहतात व अजादीना भक्षण करतात, मनुष्य-समाजातील सामर्थ्यवान वर्ग दुर्बलाच्या प्राणघातक परिश्रमाने स्वत करिता स्वर्गीय प्रासाद उठवितो. याच पूर्वसकल्पानुरूप लतावृक्षाचे फाद्या, पाने, फुले, असे भेद पडतात व मनुष्यसमाजात पुष्पशय्येवर लोळणारे लोभाळू व उन्हातान्हात स्वतच्या शरिराचा कोळसा करून लोभाळूची पुष्पशय्या कोमेजू न देणारे कष्टाळू असे वर्ग उत्पन्न होतात ! साराश, धातुपाषाणादि जडसृष्टी, वृक्षलतादि अर्धचैतन्यसृष्टि, पशुपक्षादि चैतन्यसृष्टि, व चैतन्या-हकारी बुद्धिप्रधान मानवसृष्टि या सर्वांची घटना सर्गोत्पत्तीच्या प्रारभीच विधात्याने मुक्रर केलेली आहे व ती नित्य व सनातन असल्याने त्यात अणुमात्र फरक पडेल ही कल्पना म्हणजे निव्वळ फाजील शहाणपणाचे कुतर्क-जाल होय!

या सनातनवादी मताच्या दृष्टीने जशी बाह्य जडसृष्टीची पर्वत, पहाड, समुद्र, सरिता, द्वीपे, द्वीपकल्पे, वगैरेनी घटित अशी सनातन माडणी विधात्याने कायमची करून ठेवली, किंवा लतावृक्षाचे व पशुपक्ष्याचे प्रत्येक जातीचे एक एक जोडपे उत्पन्न करून त्याच्या जातीचे कायमच नियमन करून टाकले, तद्वत् मानवी समाजातील वर्णजातीचा व समाजस्थैर्यार्थ आव-श्यक असणाऱ्या विवाह, कुटुब, राष्ट्र वगैरे सस्था, स्पर्शास्पर्श, दडचादडच, नैतिक अनैतिक, धार्मिक अधार्मिक वगैरे कल्पना, कामक्रोधादि षड्विकार ही सर्व ' सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा ' या न्यायाने विधात्याने सर्गोत्पत्तीबरो-

बरच उत्पन्न केली आहेत, आणि हजारो वर्षांत त्यात लेशमात्र फरक पडलेला नाही पूर्वशास्त्रकाराचा श्रद्धापूर्वक अभिमान बाळगणाऱ्या सनातन्याची वरील प्रकारची निष्ठावत समजूत असते

## धर्मशास्त्राचा उलटा कौल

आता प्रथम हे सागितले पाहिजे की ज्या शास्त्रकाराच्या भरवशावर विसबून सनातनवादी वरील विचारसरणीला पवित्र व धर्म्य मानतात त्या •• • त्याच्या ग्रथाच्या अध्ययनरूपाने त्यानी कौल लावला, तर त्याना वाटते तितक्या विश्वासाने तो कौल प्रत्येक बाबतीत त्याच्यासारखा पडणार नाही. इतकेच नव्हे, तर समाजाच्या घटनेत, चालीरीतींत, विचार कल्पनेत फरक पडत असतो, असाच कौल पडलेला त्याना दिसून येईल हा फरक सूक्ष्म असल्याने पायाखालून सरणाऱ्या वाळूप्रमाणे, मद गतीने वाहणाऱ्या प्रवाहाप्रमाणे, किंवा पळाविपळानी बदलणाऱ्या कालाप्रमाणे ध्यानी येत नसला तरी स्थलकालाचा दीर्घखड अवलोकिला असता तो मनी मुरल्यावाचून राहतही नाही, अशीच पूर्वाचार्यांची साक्ष पडेल समाजमीमासक व समाजनियामक काय म्हणतात ते पहा नैतिक कल्पनापैकी समाजधारणेस व माणुसकीस उचित अशा विवाहपावित्र्य व अहिसा या दोनच कल्पनाची ऐतिहासिक कालातील स्थित्यतरे अवलोकिली, तरी स्वयभू निसर्गसिद्ध वाटणाऱ्या या कल्पनाचे सनातनत्व वस्तुस्थितीत उमटलेले नाही, हे ध्यानी येईल समाजस्वास्थ्यास स्त्रीपातिव्रत्य अवश्य गणले गेले आहे, व व्यभिचार हे घोर पातक म्हणून सर्व धर्मांनी कठरवाने प्रतिपादिले आहे पण आज स्वत सिद्ध नैतिक गुणानी युक्त दिसणाऱ्या व म्हणूनच सनातनी भासणाऱ्या या कल्पनेविरुद्ध अशी जमजूत एके काळी सर्वत्र व काही जातीत आजही प्रसृत आहे, याचा पुरावा इतिहासाच्या दप्तरी नमूद आहे. फार प्राचीन काळी आज दैवी वाटणारी ‘ विवाह ’ ही सस्थाच मुळी अस्तित्वात नव्हती व समाजाच्या विकसितावस्थेत ती कोणीतरी धर्माचार्याने सुरू केली, अशी कथा सर्व प्राचीन राष्ट्राच्या वाङ्मयातून आढळते ग्रीक लोक हा मान सेक्रॉप्स (Cecrops) याला, इजिप्शियन मेनेस (Menes) याला, व चिनी फोही (Fohı) याला देतात आपल्या प्राचीन वाङ्मयातही अशीच एक कथा

आढळते. महाभारतांतर्गत आदिपर्वांतील १२२ व्या अध्यायात विवाहसंस्था कशी स्थापन झाली याविषयी पंडु कुंतीस सांगतो की, पूर्वी एके काळीं स्त्रिया अनियंत्रित होत्या व त्या स्वेच्छेप्रमाणे स्वतंत्रतेने विहार करीत त्या कौमार्यावस्थेपासूनच नीतीचे अतिक्रमण करीत, तरी पण त्यांना त्या काळीं अधर्म घडत नसे. कारण पूर्वी तोच धर्म होता हा धर्म सप्रमाण असून त्यास मोठमोठ्या ऋषींचीही संमति आहे अजूनही उत्तर कुरुक्षेत्रांत स्त्रियांस सुखप्रद असा हा 'सनातनधर्म' चालू आहे.

उत्तरेषु च रंभोरु पुरुष्वद्यापि पूज्यते
स्त्रीणामनुग्रहकरः सहि धर्म सनातनः ॥

यातील सनातन या शब्दाकडे वाचकाचे लक्ष सहजच जाईल. असा हा सनातन धर्म मोडून श्वेतकेतूने नवीन धर्म का प्रस्थापित केला याचे कारण पंडु असे सांगतो की, उद्दालक नावाच्या एका महर्षीला श्वेतकेतू नावाचा एक पुत्र होता एकदा असे घडले की श्वेतकेतू व त्याचा बाप यांच्यासमक्ष एका ब्राह्मणानें त्याच्या आईचा हात धरला व तिला म्हणाला, 'चल, आपण जाऊ या.' आपल्या आईला बलात्काराने नेत असल्याचे पाहून श्वेतकेतू अत्यंत कोपायमान झाला. पण त्याचा बापच त्याला म्हणाला, 'मुला तू रागावू नकोस, कारण हा सनातन धर्म आहे.

मा तात कोपं कार्षी स्त्वं एष धर्मः सनातनः
अनावृता हि सर्वेषां वर्णानामङ्गना भुवि ॥

अशा गाई स्वतंत्र आहेत तशाच स्त्रिया आपापल्या वर्णाच्या पुरुषांशीं विहार करण्यास स्वतंत्र आहेत ' परंतु बापाची ही विचारसरणी श्वेतकेतूस पसंत पडली नाही. त्याने असा दंडक घालून दिला की पतीशी बेइमानपणे वागणारी स्त्री पातकी म्हणून समजली जाईल.

चकार चैव मर्यादामिमां स्त्रीपुंसयोर्भुवि
व्युचरन्त्याः पतिं नार्या अद्यप्रभृति पातकम् ॥

विवाहाची ही शिस्त श्वेतकेतूनें ठरवून दिल्यानंतरही बराच काल-पर्यंत ती शिथिल असली पाहिजे कारण जुन्या प्रथांतून बापाची खात्री नसल्यामुळें आईची नावें लावणारे ऋषी आढळून येतात. उपनिषदांमधील

सत्यकाम जाबालाची गोष्ट तर सुप्रसिद्ध आहे. अध्ययनाकरिता तो गुरूकडे गेला असताना गुरूने त्याला बापाचे नाव विचारले तेव्हा बटूने स्वच्छ उत्तर दिले कीं, 'माझ्या आईला मी विचारले, पण ती म्हणते की मी पुष्कळ तरुणाच्या सगतीत राहात असल्याने तू कोणाच्या पोटचा हे मलाच माहीत नाही '

## पातिव्रत्याच्या प्राचीन तऱ्हा

प्राचीन काली बहिण–भावडामध्येही लग्ने होत, असे ऋग्वेदातील यमयमी सवाद–सूक्तावरून दिसते हा काल अर्थात् फार प्राचीन असला पाहिजे कारण यमीने यमास भर्ता होण्याविषयी प्रार्थना केली असता यम म्हणतो की, 'हे सुभगे, तू आता माझ्याशिवाय दुसरा कोणीतरी पति शोधून काढ कारण भावाबहिणीची लग्ने होण्याची ती युगें आता गेली'

आ घा ता गच्छान्युत्तरा युगानि ।
यत्र जामय कृणवन्नजामि ।।
उपबर्बृहि वृषभाय बाहुम् ।
अन्यमिच्छस्व सुभगे पतिमत् ।।

विवाहानतर स्त्री निपुत्रिक विधवा झाल्यास तिच्या पोटी दिराकडून पुत्रोत्पत्ति करविण्याची नियोग नावाची पद्धतीही एके काळीं शिष्टसमत होती याविषयी वशिष्ठ, गौतम व मनु इत्यादि ग्रथकाराची साक्ष आहे गौतम अठराव्या अध्यायात म्हणतो, 'वाक्चक्षु: कर्मसयता अपति: अपत्यनिप्सु: देवरात् गुरुप्रसूता न ऋनु अतीयात् । पिण्डगोत्रे ऋषिसबधिभ्यो योनिमातात्रे वा । ना देवरात् इत्येके । नापि द्वितीयम् । —कोणी म्हणत, दिरापासून पुत्र इच्छू नये. आणि कोणी म्हणत, दोहोहून अधिक इच्छू नये.' या शेवटल्या वाक्यावरून नियोगविधीला मर्यादा घालण्याची सुरुवात त्यावेळींच झालेली होती. मात्र नियोगविधि शिष्टसमत होता. या प्रकारचा नियोगविधि ग्रीकाच्या सॉलोमन राजाच्या कायद्यात व ज्यू लोकाच्या जुन्या करारातही नमूद आहे. जुन्या कराराच्या भाषेत तर दिरावर ही एक प्रकारची नैतिक जबाबदारी असे, असे दिसून येते

इतर देशातील राजघराण्यात ही अशा प्रकारची चाल होती असे

इतिहासकार वर्णन करतात जुना करार अनुवादाच्या २५ व्या अध्यायात सागतो, ‘ भाऊ एकत्र राहात असता त्यापैकी एक निपुत्रिक वारला तर त्याची बायको बाहेरच्या परक्या पुरुषाची होऊ नये, तर तिच्या दिरानेच तिजपाशी जावे व तिला बायको करून तिजजवळ दिराचे कार्य करावे, आणि असे करावे की तिला जो पहिला पुत्र होईल त्याला त्या मेलेल्या भावाचेच नाव ठेवावे अशाकरिता की, त्याचे नाव इस्त्राएलातून पुसले न जावे आणि तो पुरुष भावजयेशी दिराचे कार्य करण्यास न इच्छील तर त्याच्या भावजयेने वेशीतल्या वृद्धाकडे जाऊन म्हणावे की, ‘ माझा दीर आपल्या भावाचे नाव इस्त्राएलातून उठवावयास पाहतो, म्हणजे तो मजशी दिराचे कार्य करीत नाही. ’ मग नगरच्या वृद्धानी त्याला बोलावून समजवावे व तरीही जर तो उभा राहून म्हणाला, मी हिला करून घ्यावयास इच्छित नाही, तर त्याच्या भावजयेने वृद्धाच्या देखत जाऊन त्याचा जोडा त्याच्या पायातून काढून त्याच्या तोडावर थुकून उत्तर द्यावे ‘ जो माणूस आपल्या भावाचे घर बाधीत नाही त्याशी याजप्रमाणे वागावे ! ! ’

आपल्या वाङमयात विचित्रवीर्याच्या स्त्रीच्या पोटी व्यासापासून झालेल्या धृतराष्ट्र, पडु व विदुर या ऐतिहासिक व्यक्तीचे उदाहरण सर्वश्रुतच आहे बलात्काराने किवा फसगमतीने परपुरुषापासून गरोदर राहिलेली स्त्री ही गर्भविमोचनानतर पूर्वीप्रमाणे शुद्ध समजण्यास काही स्मृतिकारानी उघडपणे समति दिली आहे, हे ‘ विनिसृते तत शल्ये विमल काचन यथा ’ हे वचन अक्षरश जसेच्या तसे एकाच नव्हे तर अनेक स्मृतीतून आले आहे, यावरून स्पष्ट होते विवाहानतर कौमार्यभगाचा विधीही पतीकडून न करविता, धर्मगुरूकडून किंवा राजाकडून करविण्याची चाल पूर्वी जर्मन लोकांत होती व पुढे पुढे राजाच्या किंवा जमीनदाराच्या या हक्काबद्दल मोबदला पैसे देण्याची चाल अमलात आली, असे गिबन म्हणतो. आफ्रिकेतील बुशमेन्मध्ये तर, कौमार्यभग अनेक पुरुषानी हल्ला करून करावयाचा अशी चाल असल्याचे वेस्टरमार्क लिहितो हिरोडोटसने अनेक राष्ट्रातील चालीरीतीचे वर्णन केले आहे, त्यात तो लिहितो की ॲकिअन राष्ट्रात कौमार्य भग राजाकडून केला जाई, तर गिडॅनी राष्ट्रात विवाहपूर्व व्यभिचार सार्वत्रिक असून पायांत फिती घालून किती जणांशी व्यवहार झाला हे दर्शवीत! नॅसॅमोनी

लोकात नवरी लग्नसमारभास आलेल्या सर्व पाहुण्याशी व्यवहार करी व त्याबद्दल तिला सर्वांकडून बिदागी मिळत असे।

अनेक भावाच्या समाईक मालकीची एकच पत्नी पूर्वी असू शके याचे द्रौपदी हे सुप्रसिद्ध उदाहरण आहे —अति प्राचीन काली जी गणराज्ये असत त्यात सर्वच स्त्रिया समाईक असत हल्लीचा 'गणिका' (म्हणजे वेश्या) हा शब्द गणातील सर्वांना समान असणारी स्त्री या अर्थी गणराज्यात वापरला जात असला पाहिजे असे राजवाडे मत आहे आणि त्याच्या पुष्टीकरणार्थ वाजसनेय सहितेच्या तेविसाव्या अध्यायातील पुढील मत्र त्यानी उद्धृत केला आहे—

गणाना त्वा गणपर्ति हवामहे
गणाना त्वा प्रियपर्ति हवामहे
आहृ अजानि गर्भधम्
आत्व अजासि गर्भधम्

यात गणाचा जो मुख्य त्याला सर्व गणिका प्रियपति म्हणून सबोधीत असून त्याची प्रेमयाचना करीत आहेत

ही चाल प्राचीन काळी सर्वत्र होती इग्लडमध्ये सर्व भावाची अथवा बापलेकाचीही समाईक स्त्री असे असे सीझरने स्पष्ट म्हटले आहे तोच प्रकार आपल्याकडेहि एका भावाचे एका स्त्रीबरोबर लग्न झाले म्हणजे त्या स्त्रीवर दुसऱ्या भावाचा पतित्वाचा हक्क आपोआपच उत्पन्न होई, याविषयी मत्स्यपुराणात उशजमुनीची एक गोष्ट आढळते. ह्या उशज ऋषीला बृहस्पति नावाचा एक धाकटा भाऊ होता तो एक दिवस कामवासनेने प्रेरित होऊन उशजमुनीची गर्भवती पत्नी ममता हिच्याजवळ जाऊन विषयोपभोगाची याचना करू लागला. ममतेने आपल्या कनिष्ठ दिराचा निषेध केला नाही तिने सबब पुढें केली तो एवढीच, मी तुझ्या जेष्ठ बधूपासून गर्भिणी झाले आहे. तेव्हा सध्या तू सबूर कर हा काळ गेल्यावर तुझ्या इच्छेस येईल तसे कर।

'अस्मिन्नेव गते काले यथा वा मन्यसे प्रभो।'

पण हा उपदेश बृहस्पतीस पटला नाही व त्याने आपला हट्ट तडीस नेलाच! तरीही ममतेला झालेला पुत्र जो भारद्वाज याला अधर्मसततीचा डाग

त्या काळी कोणीही लावला नाही. तसेच जटिला नामक गौतमीचे सात ऋषि पती होते, व कडूनामक मुनीच्या कन्येने प्रचेन नावाच्या दहा भावाबरोबर समागम केला होता अशा कथा पुराणातरी असल्याची हकिकत भागवतात दिली आहे

स्वतःची स्त्री अर्पण करून अतिथिसतर्पण करण्याच्या चालीचाहि मत्स्यपुराणात उल्लेख आहे दीर्घतमा नावाचा एक ऋषि एकदा नदीतून वाहात जात असता बलिराजाने त्याला सोडवून आणले व अतःपुरात नेऊन आणि खाद्यपेये देऊन सतुष्ट केले पुढे दीर्घतम्याने 'वर माग' असे म्हणताच बलीने विचित्र वर मागितला की, आपण माझ्या स्त्रीच्या ठिकाणी सतति निर्माण करावी! बलीची स्त्री सुदेष्णा हिला वृद्ध व अध असलेल्या दीर्घतम्याकडे जाणे न रुचून तिने आपल्या दासीस आपल्याऐवजी पाठविली पण ह्या अनादराबद्दल बलोने तिची निर्भर्त्सना केली व तिला अलकारानीं सुशोभित करून दीर्घतम्याकडे जावयास भाग पाडले!!

पातिव्रत्याची कल्पना ही पूर्वीं हल्लीइतकी कडक नव्हती हे स्मृतिग्रथातून कानीन, पौनर्भव वगैरे पुत्राच्या उल्लेखावरूनही लक्षात येइल स्मृतीत बारा प्रकारचे पुत्र वर्णिले असून लग्नापूर्वी झालेला कानीन व विधवेने किंवा परित्यक्तेने स्वेच्छेने उत्पन्न केलेला पौनर्भव यानाही औरसानतर वारसा हक्क सांगितलेला आहे.

औरसक्षेत्रजौ पुत्रौ पितृरिक्थस्य भागिनौ
दशापरे तु क्रमशो गोत्ररिक्थाश भागिनः ॥ मनु ९।१६५

वरीलपेक्षाही अधिक स्पष्ट वचन म्हणजे अत्रिसहितेतील होय. तेथें सांगितले आहे की,

न स्त्री दुष्यति जारेण ब्राह्मणोऽवेद कर्मणा
नापो मूत्रपुरीषाभ्या नाग्निदहनकर्मणा ॥ १९२

मूत्रपुरीष्याने जलाशय किंवा दहनकर्माने अग्नि याना जसा दोष प्राप्त होत नाहीं तद्वत् जारकर्माने स्त्रीलाही दोष येत नाहीं याचे कारणही अत्रि सांगतो की,

पूर्वं स्त्रियः सुरैर्भुक्ता सोमगधर्ववन्हिभिः।
भुञ्जते मानवा. पश्चात् अता दुष्यन्ति कर्हिचित् ॥ १९४॥

स्त्रिया ह्या सोम, गधर्व, अग्नि वगैरेकडून आधीच भुक्त असतात. त्यामुळें जारकर्माने त्या कधीही दोषित होऊ शकत नाहीत. 'असवर्ण माणसाशी जारकर्म झाले तर गर्भ पोटात असेपर्यंत मात्र दोष येतो नतर पुन्हा ती शुद्ध होते' असे अत्रि लिहितो.

असवर्णैस्तु यो गर्भ स्त्रीणा योनौ निषिच्यते ।
अशुद्धा सा भवेन्नारी यावद्गर्भं न मुञ्चति ।। १९५ ।।

अत्रिसहितेंतील हेच श्लोक अत्रिस्मृति व देवलस्मृति यांतही आलेले आहेत. बृहद्यम नावाचा स्मृतिकारही आपले निश्चित मत म्हणून सागतो की,

व्यभिचाराद्तौ शुद्धि स्त्रीणा चैव न सशय ।
गर्भे जाते परित्याग. नान्यथा ममभाषितम् ।। ४।३६

गर्भसभव झाला नसल्यास मासिक ऋतूने व्यभिचाराची शुद्धि होते असे निःसशय समजावे वेदव्यासाचेही हेच मत आहे ते लिहितात की,

व्यभिचारेण दुष्टा ता पत्नीमादर्शनादृनो
हृतत्रिवर्गकरणा धिक्कृता च वसेन् पति
पुनस्तामार्तवस्नाता पूर्ववद्व्यवहारयेत् ।।

व्यभिचार झाला असता स्त्री आर्तवस्नात होईपर्यंत तिजशी व्यवहार करू नये. नतर पूर्ववत् व्यवहार करण्यास हरकत नाहीं गर्भसभव असताही गर्भमोचनानतर आर्तवस्नात झाल्यानतर कोणताही दोष उरत नाहीं व स्त्री विमल काचनाप्रमाणे शुद्ध होते.

विमुक्तस्तु ततः शल्ये रजसापि प्रदृश्यते
तदा सा शुद्धते नारी विमल काञ्चन यथा ।।

'कांचनाप्रमाणे विमल' ही उपमा व हे वचन अनेक स्मृतीत आलेलें आहे, यावरून पातिव्रत्याची कल्पना पूर्वी कडक नव्हती हें स्पष्ट दिसते. वरुणप्रघास नावाच्या यज्ञात तर यजमान आपल्या पत्नीस उघडपणे विचारी कीं 'आजवर तुझे किती जार होते ग !' वाचकहो ! तुम्हीं विचाराल कीं हे कडू कारलें का घोळीत बसला आहात? तर उत्तर येवढेंच कीं, कटु सत्य चाखण्याची रुचीही आपण तयार केली पाहिजे. आणि तसें पाहिलें तर यांत

कट ते काय ? समाजाला नवीन वळणे देण्याचे अनेक प्रयोग पूर्वी झाले येवढे त्यातले सत्य !

समाजघटनेचे मुख्य घटक कुटुबव्यवस्था व वर्णजातिव्यवस्था हे होत कुटुबव्यवस्थेची उभारणी ज्या विवाहसस्थेवर अधिष्ठित असते त्या विवाह-सस्थेत व पातिव्रत्यकल्पनेत कालानुसार कसे फरक होत गेले आहेत हे पाहिले आता दुसरा घटक जो वर्णजातिव्यवस्था तोही स्थाणु व अचल नसून कालाच्या प्रवाहाबरोबर बदलत आलेला आहे, अशीच इतिहासाची साक्ष आहे बेटीबदपणा किवा स्वैरविवाह-निषेध हे जातीचे किवा वर्णाचे मुख्य लक्षण ठरून गेले आहे गेली काही शतके हा निषेध अगदी कडकडीत सोवळे पाळताना दिसतो, पण याचे पूर्वचरित्र चाळून पाहू गेले, म्हणजे पूर्वी तो इतका कडक असलेला आढळत नाही

## भिन्नवर्णीय विवाह

पूर्वीच्या काळी ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य याच्यातील उपजातीमधील विवाहाचा तर प्रश्न नव्हताच, पण वरच्या वर्णाला खालच्या सर्व वर्गातील भार्या स्वीकारता येत असे अनुशासनपर्वात ( अ ४४ ) सागितले आहे की,

तिस्रो भार्या ब्राह्मणस्य द्वे भार्ये क्षत्रियस्य तु
वैश्य स्वजात्या विन्देत तास्वपत्य सम भवेत् ॥

म्हणजे ब्राह्मणास तीन वर्णांच्या, क्षत्रियास दोन वर्णांच्या व वैश्याला एक वर्णाची म्हणजे स्वत च्याच वर्णाची भार्या करण्याची मोकळीक असून त्याची सततीही पित्याच्या वर्णाची समजली जात असे. ४७ व्या अध्यायात तर,

'तृषु वर्णेषु जातो हि ब्राह्मणात् ब्राह्मणो भवेत्'

म्हणजे ब्राह्मणाला ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यापैकी कोणत्याहि वर्णाच्या स्त्रियेच्या पोटी झालेला पुत्र ब्राह्मणच होतो असे स्पष्ट शब्दात सागितले आहे. पुढें पाणिनीच्या काळात ही स्थिति पालटून अन्यतर वर्णाच्या स्त्रियेच्या पोटीं झालेल्या सततीस मातृसावर्ण्य प्राप्त झाले, आणि मनुस्मृतीच्या काळी तर सकर जातीचे स्वतत्र नामकरणच करण्यात आले

सकरज जातीना अशा रीतीने उत्तरोत्तर कमीपणा दिला जात होता, तरी अन्य वर्णाच्या स्त्रीशी लग्न करण्याची शास्त्रोक्त परवानगी होती; व

अशा लग्नापासून झालेल्या संततीचा बापाच्या मालमत्तेवर कायदेशीर हक्क मानला जात असे अशा कारचे मिश्रविवाह बाणभट्टाच्या वेळेपर्यंत म्हणजे ८ व्या शतकापर्यंत तरी चालू असल्याचे दिसते कारण, खुद्द बाणभट्टाने आपल्यास 'पारशव' (म्हणजे ब्राह्मणाला शूद्र स्त्रियेच्या पोटी झालेले) बधू होते असे सांगितले आहे पुराणांतरी तर अशा प्रकारची उदाहरणे पुष्कळच आढळतात शंतनूने कोळ्याची मुलगी मत्स्यगंधा हिचे पाणिग्रहण केले होते अर्जुनाने नागलोकाची म्हणजे जुन्या रानटी लोकांची उलूपी पळवून आणली होती, व भीमदादांनी तर हिडिंबेच्याच गळ्यात माळ घातली होती. तसेच लोमपाद राजाची कन्या शांता ही ऋष्यशृंगाला दिली होती तृणबिंदु राजाची कन्या पुलस्त्य ऋषीला दिलेली होती व अगस्त्यऋषि, च्यवनऋषि, कौत्सऋषि, वगैरेंच्या भार्या क्षत्रिय कन्या होत्या असे उल्लेख आढळतात. मोठमोठ्या यज्ञसमाप्तीच्या वेळी ऋत्विजास अर्पण करण्यात येणाऱ्या मौल्यवान देणग्या म्हणून राजांनी आपल्या कन्यांचे लग्न ऋत्विजाशी लावून देण्याचाही प्रघात होता

वेदाध्ययनाचा व यज्ञ करण्याचा अधिकारही पूर्वी नुसत्या त्रैवर्णिकांना म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य एवढ्यानाच नसून शूद्र व शूद्रापलीकडीलही निषादासारखे रानटी लोक यानाही होता निषादाचा पुढारी कवष ऐलूष याने या बाबतीत मोठी चळवळ करून हा अधिकार मान्य करून घेतला. वेदाध्ययनाचाही अधिकार शूद्रांना असावा असे प्रतिपादन करणारा बादरी नावाचा आचार्य पूर्वी होऊन गेला त्याचे म्हणणे असे की, 'यजेत' अशा प्रकारची जी वेदाज्ञा ती अमुक एक वर्गाला उद्देशून नसल्यामुळे ज्याला ज्याला म्हणजे शूद्र वगैरेनाही यज्ञ करण्याची इच्छा असेल त्यांना ती लागू समजावी संहिता व ब्राह्मणकाळीही रथकारांना अग्न्याधानाचा अधिकार होता पण हे रथकार म्हणजे शूद्र स्त्रीच्या पोटी उच्चवर्णीयापासून झालेली संतति होय असे मत पुढच्या स्मृतिकारांनी मांडले आहे।

प्रतिलोम विवाहावर उत्तरकाली जो विशेष कडक निषेध घालण्यात आला होता तोही पूर्वकाली मानला जात नसावा. नाहीतर ब्राह्मण शुक्राचार्यांची मुलगी देवयानी हिचा क्षत्रिय ययातीशी विवाह झाला नसता. तसेच

ज्याच्या जातीचा पत्ता लागला नाही अशा एकाद्या मुलास एकाद्याने आपले कृतक पुत्र म्हणून मानले तर,

यो वर्णं पोषयेत् त च तद्वर्णस्तस्य जायते ।
आत्मवृत्तस्य कुर्वीत सस्कार स्वामिवत्तथा ।।

म्हणजे अशा मुलाला पालनकर्त्याच्या वर्णाचाच समजले जावे व त्याचे उपनयनादि सस्कारही पालनकर्त्याच्या वर्णात रूढ असलेल्या पद्धतीने करावेत, असे अनुशासन पर्वाच्या ४९ व्या पर्वात सागितले आहे अर्थात् सस्काराचा अधिकार हा त्या काळी बराचसा स्वामित्वावर अवलबून असे

वर्णातर करण्याची प्रक्रियाही त्या काळी बरीच लवचिक होती याविषयी, तपोबलाने ब्राह्मण झालेल्या विश्वामित्राचे उदाहरण प्रसिद्धच आहे. पण विश्वामित्राचे हे एकटेच उदाहरण नसून वीतहव्य, गार्ग्य, दुरितक्षय, पुष्करासाण प्रियमेध वगरेची इतिहासाला माहिती आहे या वर्णातराच्या कथाना उपोद्बलक असे वर्णातराचे काही नियमही सापडतात भागवत सप्तम स्कध, अध्याय ३१ यात शम, दम, सतोष, शाति वगैरे ब्राह्मणाची, शौर्य, वीर्य, क्षमा, त्याग वगैरे क्षत्रियाची, उद्योगनिपुणता व देव, गुरु, परमेश्वर याची भक्ति वगैरे वैश्याची, व निष्कपट सेवा, मत्ररहित यज्ञ, गोवि रक्षण वगैरे शूद्राची लक्षणे सागून एका वर्णाची लक्षणे दुसऱ्या वर्णाच्या व्यक्तीत आढळल्यास त्या लक्षणानुरूप त्या व्यक्तीचा वर्ण मानण्यात यावा असे स्पष्ट सांगितले आहे.

यस्य यल्लक्षण प्रोक्त पुसो वर्णाभिव्यजकम्
यदन्यत्रापि दृश्येत तत्तेनैव विनिर्दिशेत् ।।

त्याचप्रमाणें एका वर्णातून दुसऱ्या वर्णात जाण्याचे म्हणजे वर्णातराचेहि नियम आढळतात उदाहरणार्थ, गौतम स्मृतीतील चौथ्या अध्यायात असा नियम सागितला आहे कीं, 'वर्णातरगमन उत्कर्षाभ्या सप्तमेन पञ्चमेन च आचार्याः ।'

याज्ञवल्क्य स्मृतींतहि जात्युत्कर्षो युगे ज्ञेय. पञ्चमे सप्तमेऽपि वा । म्हणजे 'पाचव्या किंवा सातव्या पिढीत कनिष्ठ जातीचे कनिष्ठत्व नाहीसें होते.' दुसरा एक शास्त्रकार बौद्धायन याने असें मत दिलें आहे की, ब्राह्मण पुरुषापासून शूद्र स्त्रीला झालेली सतति जी निषाद त्या निषाद कुळांत

निषाद पति व निषाद पत्नि याप्रमाणे पाच पिढ्यापर्यंत विवाह होत गेले तर पाचव्या पिढीतल्या सततीमध्ये शूद्रत्वाचे दोष निघून जातात. त्या पिढीतील पुरुषास उपनयनाचा अधिकार प्राप्त होतो, व सहाव्या पिढीत तर पुरोहिताच्या सहाय्याने यज्ञविधी करण्याचाहि पात्रता येते !

अशा रीतीने हिंदु समाजरचनेचो प्राणभूत मानली गेलेली जातिव्यवस्था व वर्णव्यवस्था ही सनातन अचल नसून परिस्थितिपरत्वे सकोच, विकास पावत व स्थित्यतरित होत आलेली जर आहे, तर मग आता त्या व्यवस्थेला बदलत्या कालानुरूप नवे वळण लावण्यास समाजाने कचरावे कशासाठी ? सामाजिक चालीरीतीत फरक पडत आहेत तेही थोडे नव्हेत समाजाच्या आचारविचारात पडलेल्या फरकाचा 'कलीवर्ज प्रकरण' हा एक सकलित चित्रपटच होय पराशर स्मृतीच्या माधवीय व्याख्येत दिलेल्या या चित्रपटाकडे अवलोकन केले असता सामाजिक आचारविचारात झालेल्या अनेक फरकाचे सकलित चित्र पहावयास सापडते व्याख्याकार लिहितो, 'कलियुगाच्या प्रारभी लोकरक्षणाची काळजी वाहणाऱ्या महात्म्यानी पूर्वी चालत आलेल्या अनेक गोष्टी निषिद्ध म्हणून ठरविल्या त्या चाली पुढील होत विधवेच्या पोटी नियोगपद्धतीने पुत्र उत्पन्न करण्याची चाल पूर्वी शिष्टसमत होती, पण कला–युगात ती निषिद्ध मानली जावी. अक्षतयोनी बालिकेच्या विवाहास पूर्वशास्त्रकाराची समति होती, पण कलियुगात असा विवाह त्याज्य समजावा. ब्राह्मण आततायीपणानें वागू लागले तर धर्मयुद्धानें त्याना मारण्याची पूर्वी मुभा होती, पण कलियुगात ही मुभा देण्यात येऊ नये. द्विजाना समुद्रप्रयाण करण्यास पूर्वी हरकत नसे, पण आता त्यानी समुद्रप्रयाण करू नये छलाने किंवा बलाने धर्मभ्रष्ट झालेल्यास पूर्वी प्रायश्चित्तविधीने त्याच पूर्ववर्णांत समाविष्ट करता येत असे, पण आता तो प्रायश्चित्ताने शुद्ध होतो असे मानले जाऊ नये अनेकानी मिळून मोठें यज्ञसत्र करणें, गोसव नावाच्या यज्ञात गोवध करणे, सौत्रामणी यज्ञात दारू पिणें, अग्नि–होत्र हवणी पात्र चाटणे व चाटलेले उपयोगास आणणें, अतिथि आणि पितर याच्याकरिता पशु मारणे, दत्तक आणि औरस याच्याशिवाय क्षेत्रज, कानीन, सहोढ वगैरे इतर पुत्राचा स्वीकार करणे, सवर्णेतरानी स्त्री भ्रष्ट केली असताही शुद्ध करून पुन. तिचा स्वीकार करणे, सुतक्याचा स्पर्शास्पर्श

न पाळणे, सहा वेळ उपवास घडल्यास कनिष्ठ जातीच्या हातचे अन्न वरिष्ठ जातीस घेण्यास हरकत नसणे, प्रजा वाचत नसल्यास अरणीपरीग्रह करणे, ब्राह्मणादिकाकडील अन्न शूद्राने शिजविणे व शूद्र नोकरचाकराच्या घरी ब्राह्मणादिकानी अन्न सेवन करणे, गायीचे पाणी पिणे झाल्यानतर राहील ते पाणी शुद्ध मानून त्याने आचमनादिक करणे, सन्याशाने सर्व वर्णांच्या घरी भिक्षा मागणे, वगैरे गोष्टी पूर्वी रूढ होत्या तरी आता त्या कलियुगात प्रशस्त मानल्या जाऊ नयेत । तसेच गुरु मागेल तीच दक्षिणा देण्याचा, गुरुप्रमाणेच गुरुपत्नीलाही वदन करण्याचा, तसेच अतिदूरच्या तीर्थयात्रा करण्याचा पूर्वी प्रघात होता, तोही कलियुगात सोडून द्यावा पूर्वी विद्वानानी फिरता फिरता जेथे सध्याकाळ होईल तेथेच वास करावा, ब्राह्मणानी दुसऱ्या दिवसाकरिता शिल्लक काही न ठेवता सर्व खर्चून टाकावे व नेहमी प्रवास करीत असावे असे नियम होते, तेही कलियुगाला लागू नाहीत असे समजावे पूर्वी वृद्ध पुरुषानी वानप्रस्थाश्रम व सन्यास घेण्याची तसेच महाप्रस्थानगमन म्हणजे मरण येईपर्यंत सारखें उत्तरदिशेकडे चालत जाण्याची व अग्नीमध्ये उडी मारून मरण स्वीकारण्याची चाल होती, पण या चालीही कलियुगात अनुसरल्या जाऊ नयेत '

महाप्रस्थान, अग्निप्रवेश वगैरे चाली हिंदुस्थानात प्राचीन काळी होत्या, हे पाडवाच्या महाप्रस्थानावरून दिसून येते शय्येवर मरणे हे दुर्दैव होय, अशी भारतकाली समजूत होती. भारतकार सागतो की,

> अधर्मं सुमहानेष यच्छय्यामरण गृहे ।
> अरण्ये वा विमुच्येत सङ्ग्रामे वा तनु नरः ।।

ग्रीक ग्रथकाराचीही याबाबत साक्ष सापडते स्ट्रेबोने शिकदराबरोबर ग्रीसमध्यें गेलेल्या एका योग्याच्या मरणप्रसगाचे वर्णन लिहून ठेवले आहे हा योगी वयाच्या ७३ व्या वर्षी आजारी पडला असता राजाच्या विनतीचा अव्हेर करून त्याने एक चिता तयार करविली, तिच्यावर एक सुवर्णाचा पलग ठेविला व त्याच्यावर पाघरूण घेऊन स्वस्थ पडून चितेस अग्नी लावून दिला. हिरोडोटसही लिहितो की, हिंदुस्थानातील योगी अरण्यात राहतात जेव्हा त्याच्यापैकी एकादा रोगाने ग्रस्त होतो, तेव्हा तो अरण्यात एकात निर्जनस्थली जाऊन पडतो. मग तो मेला आहे किंवा जिवत आहे याविषयी

कोणीच चौकशी करीत नाहीत यावरून देहत्याग करण्याचे अनेक प्रकार पूर्वी प्रत्यक्ष अमलात होते असे दिसते पण कलियुगात ह्या चाली वरच्या इतर चालीप्रमाणेच निषिद्ध मानण्यात आल्या, कारण व्याख्याकार सागतो कीं, 'समयश्चापि साधूना प्रमाण वेदवद्भवेत्' साधू लोकानी ठरविलेली व्यवस्था वेदाप्रमाणेच प्रमाणभूत होय

येणेप्रमाणे शास्त्रकारानी कालस्थितिपरत्वे सनातन भासणाऱ्या जातिसस्था, विवाहसस्था, नियोगादि चालीरीनी या सर्वात फेरफार केलेले आहेत. मात्र ते व्यवहारज्ञ लोकनायक असल्याने पूर्वीचा धर्म बदलला असे उघड न म्हणता आपणाकडे कमीपणा घेऊन नव्या चाली ह्या आपद्धर्म म्हणून प्रथम मान्य करीत उदाहरणार्थ, आपस्तब लिहितो की, 'दृष्टो धर्म-व्यतिक्रम साहस च पूवषा। तेषा तेजोविशेषेण प्रत्यवायो न विद्यते। तदन्वीक्ष्य प्रयुञ्जानो सीदत्यवर ।' 'आज रूढ नसलेले नियोगासारखे अनेक आचार पूर्वी रूढ होते व त्यामुळे धर्मात फरक झाला असे दिसते हे खरे, पण त्याचे कारण असे की, पूर्वीचे लोक तेजस्वी असल्यामुळे त्याना अनेक गोष्टी मानवत त्याच गोष्टी आजचे हीनतेज असे आपण आचरणात आणू लागलो तर आपला ऱ्हास होईल' युगायुगात धर्म बदलत जातो याचे कारण मनूनेही 'युगऱ्हास' असेच दिले आहे

अन्ये कृतयुगे धर्मा त्रेताया द्वापरे परे।
अन्ये कलियुगे नृणा युगऱ्हासानुरूपत ॥

पण ही मुत्सद्देगिरीची भाषा सोडली म्हणजे तत्कालोन लोकनायकाना धर्म अथवा समाजघटनेचे नियम हे बदलण्याचा अधिकार आहे असेच हे शास्त्रकार मानीत आपस्तबाने धर्माची व्याख्या दिली आहे ती 'यस्त्वार्या प्रशसन्ति स धर्म यद्गर्हन्ते सोऽधर्म' अशी अत्यत व्यापक दिली आहे आणि नारदाने तर 'व्यवहारो बलीयान् धर्मस्तेन वधीयते' म्हणजे व्यवहार अथवा समाजहित हे मुख्य असून त्याच्या अनुरोधाने धर्मवचने लावली पाहिजेत, असे आपले मत दिले आहे. अर्थात् आजच्या समाजघटनेला निराळे वळण लावून तिची पुनर्घटना करण्यास 'विद्यमान समाजघटना ही सनातन आहे' ही कल्पना आड येण्याचे कारण नाही. हे सूत्र अधिक कातत बसण्याचे कारण नाही! हे इतका वेळ कातत बसलो याचे कारणही येवढेच की

उद्याच्या सस्कृतीला जें नवीन वळण लावावयाचे ते लावताना सनातन परपरेवर आ ात केला जातो आहे अशी नुसती समजूत समाजाची होऊ नये हेच होय अनेक प्रयोग आजवर आपण केले आहेत. तशाच प्रकारचा साम्यवादी सस्कृतीकरण हा उद्याचा प्रयोग होय हें नीट समजावून घेतले तर निष्कारण बिचकून जाण्याचे कारण उरणार नाही येवढेच मला विशद करावयाचे आहे तरी आता समाजघटनेचे हे सूत्र सोडून राजकीय सूत्राकडे वळू या व तेथेंही ते राजशाहीतून लोकशाहीकडे कसे वळत चाललें त्याकडे दृष्टी टाकू या

## प्रकरण सातवें

# नृपशाहींतून लोकशाहीकडे

काही धार्मिक कल्पनानी आपल्या बुद्धीवर पाडलेली झापड आपण मागील प्रकरणी पाहिली आता तिच्यातून सुटका करून समाज पुढे पाऊल कसे टाकतो इकडे लक्ष देऊ या.

धर्माच्या व नीतिनियमाच्या नैराश्यमय कल्पनानी इच्छा व महत्त्वाकाक्षा थिजत असली तरी आपत्तीचा नागर सतत फिरत असल्याने प्रतिकाराचा अकुर पुन:पुन्हा डोके वर काढावयाचाच यामुळें सामुदायिक सामाजिक जीवनक्रम सुरू झाल्यापासूनच त्यात उत्पन्न होणाऱ्या दोषाचे परिमार्जन करण्याची खटपटही सुरू झाली. समाजजीवनाची धार्मिक, राजकीय, सामाजिक, आर्थिक अशी अनेक क्षेत्रें आहेत. या सर्वांत सत्ताधीशाच्या अरेरावीचे तण माजू लागते, व ते उपटून काढण्याचा अव्याहत प्रयत्न करावा लागतो प्राचीन काळी समाजधारणेचे नियामक तत्त्व ' धर्म ' हे समजले जाई त्या काळी धार्मिक जीवनातही श्रेष्ठता कनिष्ठता उत्पन्न झाली होती व तिचा शेष ' शूद्रास वेदाध्ययनाचा अधिकार नाही ' या समजुतीत उरलेला दिसून येतो. यज्ञ करण्याचा अधिकार शूद्राना आहे की नाहीं या विषयावर वैदिककाळी मोठें रण माजले असावे. पण त्या काळी कवषऐलूष या निषादानें सत्याग्रह करून शेवटी आपला यज्ञाधिकाराचा हक्क प्रस्थापित केला. वसिष्ठ विश्वामित्राचे भाडण हा ह्याच प्रकारच्या झटपटीचा इतिहास होय. शूद्राप्रमाणेच स्त्रियानाही मोक्ष मिळणार नाही असे मत एके काळी प्रचलित होते. पण गीतेच्या काळात 'स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परागतिम्' एवढें मान्य करण्यापुरती प्रगति झाली. महाराष्ट्रातील साधुसतानीही परमेश्वराच्या दरबारी सर्व सारखेच होत, व ' दया करी पुत्र पौत्री, तेचि दासा आणि दासी । तोचि साधु ओळखावा देव तेथेंचि जाणावा ॥ ' अशी खऱ्या साधुत्वाची ग्वाही फिरविली, पढरपूरच्या विठोबाचे मंदीर चारी वर्णांना मुक्तद्वार केले आणि वेदाताच्या भूमिकेवरून तर गोरा कुभार व

चोखा महार या अंत्यजानाही श्रेष्ठ स्थान देण्यात आले युरोपमध्यें ॲरिस्टॉट्ल्च्या वेळी दास लोकाना देवाची पूजा करण्याचा अधिकार नसे ईश्वरी सिंहासनापुढें सर्व मानव सारखे होत ही कल्पना ख्रिस्तानंतर उदय पावली पण ती कल्पनाही पूर्ण स्थिर झाली नाही, कारण त्यात पुढे अशी अढी पडली की, ख्रिश्चन धर्मांतील लोक तेवढे समान, पण ख्रिश्चनेतराना तर मोक्षही मिळणार नाही. 'यमेव एष वृणुते तेन लभ्य ' अशा प्रकारचे ईश्वराचे लाडकेपणाचे तत्त्व आपल्या उपनिषदातूनही क्वचित् दृष्टीस पडते मुसलमानी व ख्रिश्चन धर्मांत त्याने किती रक्तपात केला याचे वर्णन मागें आलेच आहे

सामाजिक जीवनातील जर कोणत्या क्षेत्रातील वैषम्य काढून टाकणे सुकर असेल तर ते धर्मक्षेत्रातील कारण येथील वैषम्य हे निव्वळ मानीव कल्पनानी उत्पन्न केलेले स्वर्गांत सर्वांनाच अमृतपान करावयास सापडले तर वस्तुत. कोणाच्याच पोटात दुखावयाचे कारण नाही. आपण सर्व एकाच बापाची लेकरे आहोत अशी तात्त्विक धार्मिक दृष्टचा कबुली दिल्याने त्या लेकरापैकी एखादें आपल्या सपत्तीवर वारसाहक्क सागावयास येत नाही, व स्वर्गांत आपल्या दासाला अप्सरेचे आलिंगन मिळाले तरी इहलोकीं कोरडे ओढणाऱ्या वेत्रलतेच्या आलिंगनाचा अनुभव त्याचा सुटणार नाही, ही खात्री असते पण मनुष्य उच्चनीचतेच्या खोटचा कल्पनाच्या इतका आहारी गेलेला असतो की, तात्त्विकदृष्टचा समतेची कल्पनाही त्याला पचविण्यास कशी जड जाते व पूर्वजन्मीच्या सत्कृत्य-दुष्कृत्यावरून वैषम्याचे समर्थनहि कसे करण्यात येते हे आपण पाहिले

कालांतरानें हे धार्मिक दृष्टचा समानतेचे तत्त्व मान्य केले गेले, पण रोजच्या व्यावहारिक जीवनात उतरण्यास मात्र ते खळखळ करू लागले. धर्माची दृष्टि परलोक आणि पुनर्जन्म यांवर खिळलेली असल्यामुळें ऐहिक जगांतील पायाखाली जळणाऱ्या अन्यायापत्तीची त्याला फिकीर नसते इतकेच नव्हे तर 'आपद सन्तु न शश्वत् ' या कुतीच्या वचनाप्रमाणे ऐहिक आपत्ति या पारलौकिक सुखाची साधने समजून त्याकडे धर्म आपुलकीच्या ममताळूपणाने पाहण्यासही कमी करीत नाही.

पण कुतीने आपत्तीचा कितीही गौरव केला तरी तिचे पुत्र हे द्यूतात

हरविलेले राज्य परत मिळविण्याकरिता सर्व सामोपचार निष्फळ झाल्यावर का होईना पण युद्धास सज्ज झाले,आणि ज्या कृष्णापुढे कुंतीने आपदेचे वरदान मागितले, तो कृष्ण तिच्या पुत्राना रणागणावर सहाय्य करता झाला.पारलौकिक सुखाच्या कल्पनेने क्षणभर समाधानाची ढेंकर देता आली तरी ऐहिक मध्या-न्हीची भ्रात टळणार नाही. ती टळण्याकरिता विश्वामित्रासारख्या महर्षीला स्वर्गांतील अमृताचे स्मरण सोडून, चडालाच्या घरच्या कुत्र्याच्या मासाचा शोध करावा लागला. तात्पर्य, दुपारची भ्रात टळली नाही तोवर स्वर्गसुखाचा काल्पनिक आनदहि फुकट होय.

## ऐहिक स्वास्थ्य

दैवी अवतारानेच समाजसुस्थिति प्राप्त होईल अशी समजूत बाळगणारे विचारवत राजकीय स्वातत्र्याच्या चळवळीची थट्टा करून म्हणतात, 'आत्मोन्नतीचा वृक्ष जोरावण्यास राजकीय स्वातत्र्याच्या जीवनाची आवश्यकता आहेच असे नाही ख्रिस्तप्रेषक पॉल हा गुलामच होता ना ? ' पण परवशतेच्या नरकाच्या यातना ज्याने स्वत सोसल्या होत्या व जो कार्लाईलच्या काळी इग्लडमध्येच राहात होता अशा मॅझिनीचे उत्तर असे असे की, ' शिक्षणाची बदी केली व रोज चौदापधरा तास राबावे लागले, तर धर्म, परलोक, आत्मोन्नती या पदार्थांच्या अस्तित्वाची जाणीव तरी अशा माणसास होईल काय ? ' दिवसभर कष्ट करून कातळावर अग टाकून गाढ पहुडणाऱ्या हेलकऱ्याला कसल्याहि प्रकारचा विचार करण्यास वाव सापडेल तेव्हा ना ? तात्पर्य, धार्मिक समतेच्या मानीव समाधानावर कायमचे झुलत राहणे मानवी मनःप्रवृत्तीच्या विरुद्ध होय. म्हणून ऐहिक आपत्ति कमी होतील अशा रीतीने समाजघटनेची सुधारणा करण्याकडे विचारी पुढाऱ्याचे लक्ष वेधणे अपरिहार्य असते.

ऐहिक बाबतीतील मानीव कृत्रिम कल्पनामुळें उत्पन्न होणारी आपत्ति म्हणजे सामाजिक उच्चनीचतेच्या व अस्पृश्यतेच्या कल्पना होत. या आपत्ति नष्ट करण्याची खटपट करणारासच आपल्याकडे 'सुधारक,' या नावानें ओळखलें जाते. पुरुषाप्रमाणे स्त्रियानाही पुर्नविवाहाची मोकळीक असावी, ठराविक वयोमर्यादेच्या आत पतीला पतित्वाचा हक्क गाजविता; येऊं नये,

सार्वजनिक रस्ते, विहिरी, तळी, इमारती, ह्या अस्पृश्यानाही खुल्या असाव्यात, सर्वांना शिक्षण फुकट मिळावे, जातीजातीतील उच्चनीचत्वाच्या कल्पना नष्ट व्हाव्या, या प्रकारानी सामाजिक आपत्ति दूर करण्याचा उपक्रम सुरू असतो. केवळ या प्रकारच्या अन्यायानी मानवी जीवनात किती निरर्थक आपत्ति उभ्या केल्या आहेत हे त्या आपत्ति अजूनही काही प्रमाणात सोसणाऱ्या आपल्या समाजाला सागावयास नकोच

## राजसत्तेचें रूपांतर

पण हे अन्याय चालू ठेवण्याची सत्ता राजसत्तेत केंद्रीभूत झालेली असते. समाजाची जुलुमी व अन्यायनिष्ठ रचना बदलावयाची म्हणजे त्या रचनेतील वैषम्य व नैर्घृण्य चालू ठेवणारी जी शासनपद्धति किंवा राजसस्था तिच्या स्वरूपातच इष्ट तो फरक घडवून आणणे हे मुख्य काम होय. कारण समाजाची घटना कोणत्याही रीतीने बसविली तरी ती कायम राखणे किंवा विसकटून मोडून टाकणे हे सर्वस्वी सत्तेच्या हाती असते किंबहुना समाजरचनेतील अन्याय हे सर्व सत्ता आपल्या हाती राखण्याच्या सत्ताधीशाच्या धोरणातूनच जन्मास येत असतात उदाहरणार्थ, जुन्या काळची 'गुलामगिरी' ही सस्था राजेलोकाच्या अमर्याद सत्तातृष्णेमुळेच अस्तित्वात आली. दिग्विजय करून देश जिकला म्हणजे तेथील हरतऱ्हेची लूट लुबाडून न्यावी व तेथील लष्करातील शिपायाना व झनान्यातील स्त्रियाना दासदासी या नात्याने आमरणान्त दास्यकर्मांत राबवावे अशी चाल असे. कालातराने दास्य-याच्या उपपत्तीचे मूळ विसरले गेले, तरी सत्ताधीशाला अरेरावी व मानवनिर्मित मानीव श्रेष्ठता वशपरपरेने चालविता यावी म्हणून अनेक चालीरूढीची व कल्पनासमजुतीची जाळी उच्चनीचतेभोवती गुडाळली गेली

शासितवर्गाच्या उच्चनीचतेच्या कल्पनेचा फायदा घेऊन शासकवर्गाचे आश्रित असे इतर वर्गही उच्चनीचतेच्या कल्पना आपापल्या सोईप्रमाणे फैलावतात पण या कल्पनाच्या पायाखाली सत्तेची बैठक असते, तोपर्यंतच त्या दिमाखाने मिरवू शकतात हे शासनच डळमळले किंवा सत्ताधीशाची लहर फिरली की या कल्पनाही सत्ताधीशाच्या डोळ्याकडे नजर ठेवून आपले

रूप त्याच्या इच्छेनुरूप पालटू शकतात जगातील व्यवहार नुसत्या कल्पना-वर अवलबून नसतो, तर सत्तेवर अवलबून असतो अर्थात् समाजाची कोणती घटना अस्तित्वात असावी, हे ज्याच्या हाती सत्ता असते त्या सत्ताधीशाच्या हितसबधावरून ठरत असते. आणि हे हितसबध असे असतात की सत्ता, वैभव, श्रेष्ठत्व, ही आपल्या विशिष्ट वर्गांत केंद्रित व्हावी, व शाश्वत टिकावीं, म्हणून इतर वर्गांच्या हाती ती चुकूनसुद्धा जाणार नाहीत अशाविषयी निरंतर खबरदारी घेतली जाते यामुळे समाजातील अन्याय दूर करून समतेच्या तत्वावर समाजाची रचना करू पाहणारास अन्याय व वैषम्य चालू ठेवण्याची सत्ता ज्या शासनसस्थेंत अधिष्ठित झालेली असते त्या शासनसस्थेचे स्वरूप बदलण्याकडे लक्ष पोहोचवावे लागते

## शासनसंस्था

ही शासनसस्था, राज्ये लहान व आटोपशीर असत तोपर्यंत साहजिकपणेच मर्यादित स्वरूपाची असे अशा लहानशा राज्यात बहुतेक सर्वच प्रजाजनाना राज्यकारभारात थोडयाबहुत प्रमाणात तरी लक्ष घालता येते म्हणजे ती प्रजासत्ताक असतात. या लहान राज्यानी आसपासच्या शेजारच्या लहान राज्यावर स्वारी करून, त्याना जिकून, आपल्या राज्यात त्याना आणून कायमचे गुलाम केले, आणि सर्व कष्टदायक व घाणेरडया कामाचा बोजा त्याच्यावर लादला व आपल्या प्रजाजनाना सुखसोयीच्या आयुष्याची चटक लावली, म्हणजे सामाजिक अन्याय व वैषम्य याचा समाजघटनेत प्रवेश होतो. सर्व प्रकारची काबाडकष्टाची कामे करण्यास गुलामवर्ग मिळाल्यामुळें प्रजाजनास प्रथम मोठे गोड वाटते पण समाजशरीरी शिरलेल्या गुलामगिरीच्या काटयाचा कालातराने नायटा होऊन समाजशरीराच्या इतर अवयवावरहि तो पसरतो गुलामा ी सख्या जसजशी वाढत जाईल, तसतशी त्या राजाला संख्येच्या जोरावर इतर राज्ये काबीज करता येतात. आणि अशा रीतीने चिमुकल्या राज्याचे हातपाय वाढता वाढता त्याचे साम्राज्यात रूपातर होते.

साम्राज्यशाहीत अमर्याद पैका शासनसस्थेच्या हाती खेळू लागतो व या पैशाच्या जोरावर भाडोत्री सैन्यें उभारता येऊ लागतात हया भाडोत्री सैन्याचें पाऊल शासनसंस्थेंत शिरले, की प्रजाजनांच्या स्वातत्र्याचे पाऊल

बाहेर पडते ! असे सैन्य हाताखाली बाळगणारा शूर सेनापति हा प्रथमतः काही दिवस राजा म्हणून प्रजेकडून औपचारिकरीत्या निवडला गेला तरी लौकरच तो कायमचेच राजसिंहासन बळकावून बसतो, व प्रजेने कुरकुर केल्यास भाडोत्री सैन्याच्या जोरावर त्याना दडपून टाकू शकतो, अशी रोमच्या इतिहासाची साक्ष आहे. ही अवस्था प्राप्त झाल्यानतर हातून गेलेले स्वातत्र्य प्रजेस फिरून मिळते ते राजसत्तेशी अहर्निश झगडल्यावरच ते मिळविण्याची जाणीव युरोपमध्ये तीन चार शतकापूर्वीच उत्पन्न झाली आणि अविरत प्रयत्नानतर युरोपातील बहुतेक राष्ट्रानी आजमितीस शासनसस्थेचे पूर्वीचे स्वरूप इतक्या प्रमाणात बदलले आहे की एकमेव अनियत्रित व्यक्तिप्रधान, लहरी, राजसत्तेला सिंहासनावरून खाली ओढून त्याजागी प्रजासत्ताक शासनसस्थेची स्थापना करण्यात आली आहे. शासनसस्थे ी ही तिसरी अवस्था होय. ‘ छोटी प्रजासत्ताक राज्ये ’ ही पहिली अवस्था, ‘ मोठी राजसत्ताक साम्राज्ये ’ ही दुसरी अवस्था, व ‘ लोकप्रतिनिधिसत्ताक राज्ये ’ ही तिसरी अवस्था

हिंदुस्थानात स्वराज्य होते त्या काळीही शासनसस्था ही या तिसऱ्या पायरीपर्यंत येऊन पोहोचलेली नव्हती हिंदुस्थान-च्या प्राचीन इतिहासात प्रजासत्ताक राज्यपद्धतीचे उल्लेख आढळतात पण ती सर्व प्रजासत्ताक राज्ये शासनसस्थेच्या पहिल्या अवस्थेतील छोटया प्रमाणाची होत अलेक्झाडरच्या वेळचे इतिहासकार व बौद्ध ग्रथकार याच्या ग्रथावरून पाहता निरनिराळया भागात औदुबरगण, यौधेयगण, मालवगण, शिबिगण, सत्रग्निकगण, वज्जीगण, लिच्छवीगण, शाक्यगण वगैरे अनेक गणराज्ये नादत असल्याचे आढळून येते शाक्यगणातील लोकसख्या १० लक्ष असून त्यानी निवडलेल्या एका महासभेकडून राज्य चालविले जाई. लिच्छवी गणराज्यात लोकप्रतिनिधीची सख्या ७७०७ असे परतु काम चालविण्यासाठी त्यातील ९ प्रतिनिधीचे एक मडळ असे या मडळातील सभासदाची नेमणूक करताना वैशालीच्या नदीतील उदकाचे सिंचन त्याच्या मस्तकावर करण्यात येई *

ग्रीसमधील लहानलहान प्रजासत्ताक सस्थाने कालातराने जशी प्रबल

*अधिक माहितीकरिता लेखकाचे ‘ सस्कृतिसगम ’ प्रकरण आठवें पहा.

राजसत्तेच्या भक्ष्यस्थानी पडली, तशीच हिंदुस्थानातील ही छोटी प्रजासत्ताक राज्येही कालांतराने प्रबळ राजसत्तेच्या उदरी गडप झाली असली सघराज्ये कशी जिंकावीत याचे कौटिल्याने विवेचन केले आहे युरोपात सीझर, शार्लमेन, फ्रेड्रिक, नेपोलियन वगैरे प्रबळ व प्रभावशाली चक्रवर्ति होऊन गेले तसे हिंदुस्थानातही चंद्रगुप्त, अशोक, विक्रमादित्य, समुद्रगुप्त, हर्षवर्धन वगैरे प्रबळ व प्रतापशाली चक्रवर्ती झाले पण युरोपात प्रबळ राजसत्तेच्या मगरमिठीतून प्रजेचे स्वातंत्र्य परत हिसकून घेण्याचा जसा प्रयोग झाला तसा हिंदुस्थानात पूर्वी झाला नाही गेल्या चार वर्षांत मात्र भारताने सर्व लहानमोठ्या राजसत्ताक संस्थानाधिपतींना कायमचा निरोप दिला, ही अभिमानास्पद घटना होय.

तात्त्विक दृष्ट्या राजाच्या सत्तेवर प्रजेचे काही प्रमाणात नियंत्रण प्राचीन काली मान्य केले जाई उदाहरणार्थ, न्यायदानाचा हक्क हा केवळ राजाकडे नसून कमीत कमी दहा प्रतिष्ठित लोक ज्या सभेत आहेत अशा परिषदेकडे असे अमात्याची निवड करताना चार ब्राह्मण, आठ क्षत्रिय, एकवीस वैश्य, तीन शूद्र व एक सूतपौराणिक अशा संख्येने निवड करावी व त्यापैकी आठाचा सल्ला घ्यावा असे भीष्म युधिष्ठिरास सांगतो (शांति–अ. ८५)

अनुशासन पर्वात तर स्पष्ट प्रतिपादिले आहे की, प्रजेचे रक्षण करतो असे तोंडी बडबडून प्रत्यक्ष न करणाऱ्या राजाला पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणे ठार मारावा ! अहं वो रक्षित इत्युक्त्वा यो न रक्षति भूमिप । स संहत्या निहंतव्य श्वेव सोन्माद आतुर. । (अ ६१) शुक्रनीतिकारहि बजावतो की, ‘धर्मपर असेल तोच राजा देवांश म्हणून मानून, अन्याला राक्षस मानावे’ योहि धर्मपरो राजा देवांशः अन्यश्च रक्षसाम् । (१–७०) केवळ ऐहिक व व्यावहारिक दृष्ट्या विचार करणाऱ्या कौटिल्यानेही लिहिले आहे की, ज्याप्रमाणे एकच चाक चालू शकत नाही, त्याप्रमाणे राजकार्यही एकट्या राजाच्या हातून होत नाही. यास्तव राजाने सचिवांची नेमणूक करावी व त्यांचे मत ऐकत जावे सहायसाध्य राजत्व चक्रमेक न वर्तते । कुर्वीत सचिवान् तस्मात् तेषां च शृणुयात् मतम् । (अ ७) तसेच राजाने कुलशीलवान सदाचारी असा पुरोहित नेमावा व शिष्य जसा गुरूच्या वचनात, पुत्र जसा पित्याच्या वचनात, किंवा नोकर जसा धन्याच्या वचनात राहतो, तसे

राजाने पुरोहिताच्या वचनात वागावे. (अ. ९) राज्याभिषेकाच्या वेळी "जर मी तुमचा द्रोह करीन तर माझी इष्टापूर्ती निष्फळ होईल." अशा प्रकारची शपथही राजाकडून घेवविली जात असे, असे ऐतरेय ब्राह्मण-कार स्पष्ट बजावतो (८-४) नवा बालराजा गादीवर बसविताना प्रजा-जनाची समति घेण्यात येत असे, असेही ह्यूएनत्सगाने हर्षवर्धनाच्या राज्या-रोहणाची जी हकीकत दिलेली आहे त्यावरून दिसते पण हर्षाच्या काळापर्यंत म्हणजे इ स ७ व्या शतकापर्यंत पूर्वीच्या प्रजासत्ताक शासनपद्धतीची आठ-वण बुजालेली होती मोठ्या साम्राज्याची अवस्था प्राप्त झाल्यानतर प्रजा-सत्ताक पद्धतीचे विस्मरण पडले व राजसत्ता ही अढळ व अपरिहार्य होय ही समजूत दृढमूल झाली काश्मीरच्या इतिहासातही अनेक कारणामुळें सिंहासन रिकामें पडण्याचे प्रसग आले होते, पण अशा प्रत्येक वेळी शासनपद्धतीचे राजशाहीतून लोकशाहीत रूपातर न होता, मत्रिमडळ राजाचा लाबचा दूरचा एकादा नातेवाईक मुद्दाम शोधून काढून गादीवर बसवीत असे, असे राजतरगिणीत आढळते.

राजाच्या जुलुमी वर्तनाने सतापून जाऊन त्याचा शिरच्छेद केल्याचे एक उदाहरण भारतीय इतिहासाला अवगत आहे. ते म्हणजे पौराणिक कालातील राजा वेन याचे होय पण त्यावेळीही राजशाहीचे लोकशाहीत रूपातर करण्याची कल्पना नव्हती किंबहुना राजाला मारण्याचा पद्धतशीर बेत केलेला नसावा असे दिसते भागवताच्या चौथ्या स्कधाच्या १४ व्या अध्यायात वेन राजाची कथा दिलेली आहे त्यावरून असे दिसते की, ब्राह्मण व ऋषि याचे एक शिष्टमंडळ राजाची कानउघाडणी करण्याकरिता गेले असता राजा त्याना टाकून बोलला त्यावर ब्राह्मण व ऋषि सतापून गेले व त्यानीं एकच गडबड करून राजाला मारून टाकले आणि ते घरोघर निघून गेले. पुढें गादीवर कोणाला बसवावयाचा याचा त्यानी विचारच केलेला नव्हता त्यामुळें बेबदशाही माजली ! व तिचा फायदा घेऊन मूळच्या रहि-वाशापैकी निषाद जातीचा बाहुक नावाचा एक पुरुष आपण होऊनच गादीवर बसला. या जुन्या इतिहासावरून पाहता राजशाहीचे लोकशाहीत रूपातर करण्याचा प्रयोग हिंदुस्थानात झाला नाही असेच म्हणावे लागते

## प्रजासत्तेचे प्रयोग

युरोयपिन राष्ट्रांनी मात्र राजाच्या अमर्याद, अनियंत्रित सत्तेवर नियंत्रण घालण्याचे कसून प्रयत्न केले व अंती राजाची सत्ता नामशेष करून टाकण्याचे यशही संपादिले. ही गोष्ट काही शतकांच्या अहर्निश झगड्यानंतर प्राप्त झाली. प्रातिनिधिक शासनसंस्था ही राजशाहीच्या मुळावरच घाव घालणारी असल्याने राजसत्तेने आपले सर्व बळ एकवटून तिला कसून विरोध केला. राजा व प्रजा यांच्या या झटापटीत इंग्लंडचा चार्लस्, फ्रान्सचा लुई व रशियाचा निकोलस यांना प्राण अर्पण करावे लागले. प्रजेलाही आपल्या रक्ताच्या नद्या वाहवाव्या लागल्या. पण अंती सार्वत्रिक मतदानाचा विजय होऊन राजशाहीचे 'प्रातिनिधिक लोकशाहीत' रूपांतर झाले.

काही शतकांच्या झगड्यानंतर मिळालेल्या या विजयाच्या अंव्वल अमदानीत मोठमोठ्यांचेही डोळे दिपून गेले व क्षणभर सत्ययुग सुरू झाल्याचा त्यांना भास झाला! आणि असे का न वाटावे? जी सत्ता राजाच्या एका व्यक्तीत केंद्रित झाली होती ती आता देशातील यच्चयावत् व्यक्तींत खेळू लागली. प्रासादशिखरावर आरामाने पहुडणाऱ्या लक्षाधीशापासून खाणींतील कोंदट अंधारात फिकुटलेल्या कामकऱ्यापर्यंत सर्वांना सारखाच मताधिकार मिळाला! म्हणजे यःकश्चित् प्राकृत माणसाच्याही अंगी राजतेज झळकू लागले! तर मग अन्यायाच्या भुताला थारा तरी कोठें मिळणार? भुताखेताची बाधा किंवा अभिचाराचे मंत्रतंत्र यांचा प्रभाव राजसत्तेवर चालत नाही अशी समजूत आहे. त्याच न्यायाने प्रत्येक व्यक्तींत जर राजअंश चमकू लागला तर अन्यायाच्या भुताला झपाटण्यास झाड तरी कोठे मिळणार? प्रत्येक कायदा प्रतिनिधीसंस्थेने पास करावयाचा, व प्रत्येक प्रतिनिधि लोकांनी मनपसंत निवडून घ्यावयाचा! मग लोकांना जुलूमकारक कायदे पास होतीलच कशाला? ज्या सत्तेच्या जोरावर सत्ताधीशाला जुलूम गाजविता येतो ती सत्ता जर सामान्य जनतेत वाटली गेली आणि सत्ताधीन व कष्टाधीश हा भेदच मुळात नष्ट झाला तर मग सर्वत्र अद्वैत झाल्याने कोणी कोणावर जुलूम करावयाचा? "यत्र तु सर्वं आत्मैवाभूत् तत्र केन

क पश्येत् केन क विजानीयात्" या औपनिषदिक स्थितीचा साक्षात्कार होणार व सार्वत्रिक मतदानाच्या मन्त्राने जुलुमाचे भूत कायमची गति घेणार, असेच सर्वांस वाटले!

पण हा टप्पा शेवटचा नव्हे हे यन्त्रशक्तीच्या गिरण्यावर कोटयाधीश होणाराना समाजाच्या ध्यानी आणलेच मतदानाचा परीस प्रत्येकाने मोठ्या आशेने आपल्या उराशी जतन करून ठेवला, पण प्रत्यक्ष व्यवहारात लोहाचें सोने करण्याचे यश फारच थोडयाच्या हाती आलें कृष्ण भगवानाच्या हातून दहा हजाराची समाराधना करविण्याकरिता द्रौपदीला प्रथम स्थालीतील भाजीचे पान अर्पण करावे लागले तद्वत् मतदानाच्या परिसाने सोने करण्याकरिता त्या परिसालाच ोन्यानें प्रथम मढविला पाहिजे हे सामान्य जनतेच्या लक्षात येऊ लागले म्हणजे शेवटी पैशाकडे पैसा जाणार हे उघड झाले मताधिकार हा सत्ताकर्षक लोहचुबक आहे, पण तो स्वयभू लोहचुबक नसून धनविद्युत्प्रवाह त्यात सोडावा तेव्हाच त्याला लोहचुबकत्व प्राप्त होतें! अर्थात् राजतेज राजातून निघून मताधिकाररूपाने आपल्या अगावर विलसू लागलेले पाहण्याचे भाग्य सामान्याला लाधले, पण हळू हळू ती नुसती बाह्य झळाळी आहे असे त्याला आढळून आले सरळ शब्दात सागावयाचे म्हणजे कायद्याने ·!·! ·[ प्रतिनिधिसभेत निवडून येण्याचा हक्क प्राप्त झालेला असला तरी निवडणूक ही भयकर खर्चाची बाब असल्याने लक्ष्मीपुत्रच निवडून येऊ शकतात, मत देतानाही लाचलुचपत व मिधेपणा यामुळें वाटेल त्यास मते दिली जातात, हें समाजाला उमगू लागले.

प्रथम हें सागितले पाहिजे कीं, पूर्वीच्या एकतन्त्री राजसत्ताक पद्धतीपेक्षा आधुनिक प्रातिनिधिक प्रजासत्ताक पद्धति पुष्कळ सुधारलेली होय हे नि सशय. पहिली गोष्ट म्हणजे राजा मरून त्याचा पुत्र गादीवर येण्याच्या प्रत्येक वेळी यादवी व कत्तल ही हजर असावयाचीच दुर्बल राजाला सबल सेनानीनें ठार करणे हा प्रकार होताच राजाला ठार मारून सिंहासनावर बसणाऱ्या पुष्यमित्र सेनापतीचे उदाहरण आपला इतिहास कविकुलगुरूच्या तोडून आपणास सागत आहे. सिंहासनाची पालट ही एक ठराविक क्रमानें येणारी आपत्ति होती गादीवर चढू पाहाणाऱ्या युवराजाला प्रतिस्पर्धी भाईबदाच्या डोक्यावर पाय देऊनच चढावे लागे. छत्रपती शिवाजीराजाचा

पुत्र संभाजी यालाही हा झगडा खेळावा लागला. संभाजीला बाजूला टाकून राजारामाला गादीवर बसविण्याचा प्रकारही झाला तेव्हा तापट स्वभावाच्या संभाजीने याचा सूड म्हणून घरे लुटण्यास, प्रौढास हत्तीच्या पायीं लोटण्यास, सोयराबाईस भिंतीत चिणून टाकण्यास कमी केले नाही. राज्यवैभवाची आतुरता जन्मदाता पिता व माता याच्या मानेवर सुरी ठेवण्यासही कमी करीत नसे. बापाला बंदिवासात टाकून, भावांना यमसदनास पाठवून, रक्तलांच्छित सिंहासनावर चढणाऱ्या औरंगजेबाची कडवी कहाणी कोणास माहीत नाही? क्रौर्याचा केवळ कंद व जुलुम्याचा राजा जो रोमन नीरो याने तर आपल्या जन्मदात्रीला मारेकरी लावून मारविले, असे इतिहास सांगतो रोममध्ये बादशहा निवडला जाण्याचा फार्स असे. अशा प्रत्येक वेळी ही निवड रक्तात न्हाली नाही असे क्वचितच नवीन बादशहा होऊं इच्छिणाराने जुन्याला ठार करावे व मग सेनेटकडून बादशहा म्हणून निवडून घ्यावे किंवा बेताल व अरेराव प्रिटोरिअन गार्ड्स् यांनी बादशहाचा खून करावा व राज्याचा लिलाव पुकारून बादशाही विकावी जुलियन सेव्हरस्, मॅक्झिमिन गॉडिमन् वगैरे रोमन बादशहा गादीवर चढताच चारदोन वर्षांत खुनाला बळी पडले होते आणि अशा वेळी नुसत्या राजाचाच खून होऊन रुधिरप्रियता थांबत नसे. राजाच्या जोडीला त्याच्या पक्षाच्या हजारो लोकांची कत्तल होई. नारायणराव पेशव्याच्या खुनाचे स्मरण आपल्या इतिहासाला अगदी ताजें आहे

प्रजासत्ताक राज्यात हे नित्यनैमित्तिक संकट नष्ट झाले आहे. फ्रान्स, अमेरिका येथील अध्यक्षाच्या निवडणुका दर पांच वर्षांनी होत असतात, लाखो मतदार त्यात भाग घेत असतात, पण सर्व कारभार बिनबोभाट आणि नव्या अध्यक्षाचे अभिनंदन करण्यास प्रथम कोण पुढे येतो, तर जुना अध्यक्षच! राजसत्ताक संस्थेप्रमाणे प्रजासत्ताक संस्थांतही पक्षोपपक्ष असतात पण एकाचा अधिकारन्यास आणि दुसऱ्याचे अधिकारग्रहण हें शासनसंस्थेने एका पक्षाचा झगा काढून दुसऱ्याचा चढविण्याइतके सोपे झाले आहे तसेच राजाच्या वैयक्तिक लहरीमुळें होणाऱ्या छळाची प्रजासत्ताक राज्यात कल्पनाही उरत नाही प्रजासत्ताक राज्यांतील सत्ताधीश परकीय जित लोकांना कसे वागवितात ह्याकडे दुर्लक्ष केले, तर स्वकीयांतील एका पक्षानें दुसऱ्याचा छळ केल्याचे आढळणें कठीण अर्थात् प्रातिनिधिक प्रजासत्ताक शासनपद्धति एक-

तत्री राजसत्तेहून अनेक पटीने सरस होय याचे अलीकडचे अत्यत आकर्षक उदाहरण इग्लडच्या चर्चिल या पत धानाचे होय दुसरे जागतिक महायुद्ध मोठ्या शिताफीने आणि धैर्याने जिंकणाऱ्या या वरिष्ठ नेत्यास लोकानी 'तुझे काम आता सपले ! तर आता सत्ता सोड पाहू' असे सागताच तोही हसनमुखाने सत्ता दुसऱ्याच्या हाती अर्पण करतो, हा देखावा अत्यत आकर्षक होय गेल्या साली कोरियातील लढाईवरील वरिष्ठ सेनापति मॅक् आर्थर यास अमेरिकन राष्ट्राधिपति ट्रुमन याने एका लेखणीच्या फटकाऱ्याने व विद्युत्सदेशाने बडतर्फ केले हे तर अगदी ताज्यातले ताजे उदाहरण आहे !

पण आजची इग्लड, फ्रान्स, अमेरिका वगैरे राष्ट्रातील प्रजासत्ताक पद्धति ही खऱ्या प्रजासत्ताक पद्धतीच्या वाटेवरची फक्त एक पायरी होय. कारण सत्ता किंवा राजश्री राजवाड्यातून बाहेर पडली हे खरे, पण तिचे ओझरते दर्शन होते न होते तोच ती लक्ष्मीपुत्राच्या महालात शिरली आणि खेडोपाड्यातून आणि खोपटाखोपटातून तिचे नखही दृष्टीस पडेनासे झाले. सार्वत्रिक मतदानाचा अधिकार म्हणजे तात्त्विकदृष्ट्या सत्तेचें सार्वत्रिक वाटप राज्ययत्राचे कर्णधारत्व कोणास प्राप्त व्हावे, कायदेकानू कोणी करावे, राज्यातील सपत्ति कशावर खर्च व्हावी, हे ठरविताना मत देण्याचा अधिकार तात्त्विकदृष्ट्या सर्वांना प्राप्त झालेला पण व्यवहारात या मतदानाचा उपयोग काय ?

## धनाढ्यशाही

राजाच्या व्यक्तीत व केवळ लष्करीपेशात गुरफटलेली सत्ता क्रमाक्रमानें प्रथम लष्करी सरदारात व नतर धनाढ्य व्यापारी वर्गात मिसळ लागली, तसतशा अनेक शतकानुशतके चालत आलेल्या सामाजिक आपत्तीं-पैकी काही आपत्ती ढिल्या झाल्या हे मान्यच आहे गुलामविक्रयाची चाल रोमन काळानतर बद झाली होती, ती फिरून पधराव्या शतकानतर पुन्हा जोरात सुरू झाली तरी ती अखेर हतप्रभ झालीच. कोलबसाने अमेरिकेचा शोध लावल्यापासून तेथे वसाहत करण्याचा व आफ्रिकन् निग्रो गुलामान-राबविण्याचा तडाखा सुरू होता तो अमेरिकेतील दक्षिण व उत्तर सस्थानें यामधील युद्धानें बद पडला, व युरोपातील सुधारलेल्या सर्व देशातून लोकशा-

ही राज्यसस्थानी गुलामविक्री ही बेकायदेशीरच ठरविली. स्त्रियाची वारसाहक्काच्या बाबतीत होत असलेली कुचबणा इग्लडमधील १८८२ मधील विवाहित स्त्रीच्या वारसाच्या कायद्याने व १९२५ मधील अज्ञान-पालक कायद्यान्वये दूर करण्यात आली. तसेच ज्यू वगैरे परधर्मीय व रोमन कॅथॉलिक वगैरे राजेतर धर्मीय लोकावर जी नियन्त्रणे होती ती दूर करण्यात आली बहुपत्नीकत्वाच्या चालीमुळे उत्पन्न होणारी स्त्रियाची कुचवणा चार बायका करण्यास धार्मिक परवानगी असणाऱ्या तुर्कस्थानात-ही नष्ट झाली आहे. साराश, व्यक्तीला धार्मिक व सामाजिक स्वातत्र्य पूर्वीपेक्षा अधिक मिळाले आहे

पण या सर्व स्वातत्र्याचा शेवट ज्या एका आर्थिक स्वातत्र्यात व्हावयास पाहिजे, ती पायरी गाठल्याशिवाय बाकीचे स्वातत्र्य हे तकलुपी होय ! भुकेने मरणाऱ्या कगालास सध्या रस्त्यातून उचलून गुलाम म्हणून विकीत नाहीत, तर त्याला 'भुकेने मरण्याचे' पूर्ण स्वातत्र्य बहाल करून तेथेच सोडून देतात ! गुलाम असताना, भूतदयेने नव्हे, तर गुलाम मेल्याने आर्थिक नुकसान होऊ नये म्हणून तरी, गुलामाच्या पोटास घालणे धन्यास जरूर वाटे पण गुलामगिरीतून मुक्त झालेल्या स्वतत्र कगालाची पोटापाण्याची व्यवस्था करण्याची कोणाही स्वतत्र व्यक्तीवर सक्ती असणे शक्य नाही. पाचसहा वर्षांपूर्वीच्या दुष्काळात बगालमधील लाखो लोक मृत्युमुखी पडले ते धनाढ्यानी धान्य काळ्या बाजारात दडपले म्हणूनच ! रोगराईमुळें खेड्यापाड्यातील असख्य माणसे तडफडून मरत असता दवाखान्यातून औषधानी भरलेल्या पेट्याची झाकणे बदच राहतात, पण दुष्काळात मरणाऱ्या मोरगरीबाचे जीव वाचविण्याकरिता सरकारी धान्याची कोठारे खुलीं करणाऱ्या सत दामाजीला मात्र राजाज्ञेने गिरफदार करण्यात येते तात्पर्य, तात्त्विक स्वातत्र्याचे नाणे जगातील व्यवहारात उपयोगी पडत नाही. जगातील व्यवहार एकाच वस्तूस ओळखतो. ती वस्तु म्हणजे पैसा माणूस सुदर असेल, गुणी असेल, पण निर्धन असेल तर व्यर्थ, त्याच्या-जवळ काचन असेल तर मात्र 'स एव वक्ता स च दर्शनीयः।' कारण सर्वे गुणा काञ्चनमाश्रयन्ते'.

'ज्याच्या हाती मत्ता त्याच्याच हाती सत्ता, आणि ज्याची सत्ता त्याचीच

विद्वत्ता' असा व्यवहारन्याय आहे मतदानाचा अधिकार प्राप्त झाला तरी निर्धन गुणी माणूस निवडणुकीत यशस्वी होऊ शकत नाही निवडणुकीस स्वयवराचा व प्रीतिविवाहाचा हक्क दिला आहे खरा, पण ती झाली तरी निर्धनास थोडीच वरणार ? प्राचीन काळी निपुत्रिक राजा मेला असता हत्तिणीच्या सोडेंत माळ देऊन ती माळ ज्याच्या कठी पडेल त्याला सिंहासनावर बसवावयाचे असा सकेत असे पण हत्तिणीच्या पुढें राजघराण्यातील किंवा सत्ताधीश प्रधान घराण्यातील पुत्रानाच बसविण्यात येई. मग हत्तीच्या माळेस निर्धनाचा स्पर्श कसा होणार ? ग्रीसमध्ये युद्धें सुरू असता किंवा काही भानगडीचे प्रश्न उपस्थित झाले असता तेथील देवळातील सुप्रसिद्ध डेल्फी नावाच्या अगात येणाऱ्या पुजारिणीला प्रश्न टाकीत पण ह्या पुजारिणीचाही निकाल लोहचुबक शलाका उत्तरेकडे फिरावी तद्वत् सत्ताधीशाकडेच फिरे. आधुनिक कालातहि कोर्टांत फिर्याद सुरू असता पैशाच्या साहाय्यावाचून खटला जिंकणे हे कसे अशक्य असते, याची जाणीव सर्वांनाच आहे- आणि कायदाच बदलून घ्यावा म्हटले तरी, कायदा करणार कोण तर कायदेमडळातील प्रतिनिधी, आणि हे प्रतिनिधी म्हणजे धनाधीश ! तेव्हा ते आपल्या स्वार्थास धक्का लागेल असा कायदा करतील कशाला ? आणि असा कायदा मुर्वतीने पास झालाच तर अमलबजावणीचा अमलदार धनाला वश असल्याने सुवर्ण किल्लीने कायद्याचे कपाट फोडून बाहेर जाण्यास मार्ग राहतोच.

आधी कायद्याचे स्वरूप इतके भानगडीचे झाले आहे की, सामान्य माणसास कायदा समजणारच नाही कायद्याच्या अज्ञानामुळें गुन्हा झाला तरी शिक्षा झाल्याविना सुटका नाही. कायद्याची अमलबजावणी करणाऱ्या पोलिसखात्यानेच गुन्ह्यास सामील असावे हा तर सर्वांच्या परिचयाचा एक अजब प्रकार होय ज्याला म्हणून पैसा खावयास सापडला त्याने तो न खाणे, म्हणजे चुना आणि हळद एकत्र झाली असता तांबडा रग तयार न होण्याइतकेच दुर्घट. अर्थशास्त्राचा कर्ता चाणक्य याने याबाबत जें लिहिले आहे की 'यथा हि अनास्वादयितु न शक्यम् । जिव्हास्थलस्थ मधु वा विष वा ॥ अर्थस्तथा ह्यर्थचरेण राज्ञः। स्वल्पोप्यनास्वादयितु न शक्य.॥ तें काव्यमय पण सर्वस्वी खरें आहे, हें कोणास पटणार नाही ? जिव्हेवर पडलेला मधुबिंदु

चाटण्याची ही प्रवृत्ति अमुक एका वर्गांत आहे असे नव्हे. ती मनुष्यस्वभावातच रुजलेली आहे तेव्हा ह्या मूळ रोगावर उपाययोजना केल्याविना नुसत्या तात्त्विक स्वातंत्र्याने खरे सुखसमाधान नांदू लागणार नाही.

आपल्याकडेही प्राचीन काळी कायदे करण्याचा अथवा धर्मशास्त्र रचण्याचा अधिकार ब्राह्मणाचा होता, व त्यानी निर्लोभ वृत्तीने रहावे, तीन दिवसापेक्षा अधिक टिकणाऱ्या धान्याचा संग्रह करू नये, वगैरे ध्येय प्रतिपादलेले होते कुसूलधान्यको वा स्यात् कुम्भीधान्यकमेव वा। त्र्यहैहिको वापि भवेदश्वस्तानिक एव वा ।। (मनु ४।७) पण प्रत्यक्ष व्यवहारात असा वर्ग निर्माण झाला काय? उच्छवृत्ति तर राहोच पण यज्ञ करणाऱ्या पुरोहिताना हजारो गायी दक्षिणा देण्यात येत असत याची चटकदार अशी अनेक उदाहरणे ऐतरेय ब्राह्मणकाराने दिली आहेत. उदाहरणार्थ, 'अग' राजाविषयी तो लिहितो की, या राजाने देशोदेशीहून लुटून आणलेल्या मुलीपैकी दहा हजार सुंदर मुली पुरोहिताला दिल्या!—देशादेशात् समोहलाना सर्वासा आढ्यदुहितॄणा दश आददात् सहस्राणि ।। (अष्टमपंचिका चतुर्थ अध्याय) मोठ्या यज्ञात जेथे अनेक पुरोहिताचे काम पडे, तेथे कोणत्या ऋत्विजाने दक्षिणेचा कोणता भाग घ्यावा ह्याविषयी नियमही धर्मशास्त्रात निविष्ट करण्यात आले

निष्काचनत्वाचे बीरुद धारण करणारा वर्ग म्हणजे परिव्राजकाचा अथवा सन्याशाचा पण तोही लौकिक व्यवहाराविषयी उदासीन नसतो. परिव्राजाचार्य जे शकराचार्य, त्याच्या मठातून 'अर्थमनर्थं भावय नित्यम्' असा तात्त्विक उपदेश चालू असतानाच दिवसा मशाल लावून पाद्यपूजा उकळीत पालखीतून मिरविण्यास सुरुवात झाली आणि पाद्यपूजेचा स्थलाधिकार ठरवून घेण्याकरिता जगाला कायदेकानू ठरवून देण्याचे अधिकारी जे शकराचार्य, तेच व्यावहारिक कोर्टात जाण्यास तयार झाले! रामदास कौपीनधारी व तुकाराम लगोटी बेभान! पण त्याच्या शिष्यानी मात्र गुरूच्या पुण्याईवर देणग्या घेण्यास मागें पाहिले नाही क्षेत्रस्थ पड्याची नि:स्वार्थ वृत्ति तर गयेस हत्तीवरून येऊन पितराचा उद्धार करणाऱ्या गयावळावरूनच ताडावी. तात्पर्य, पैसा मिळत असता तो लाथाडून निःस्वार्थ बुद्धीने समाजसंघटनेचे काय करणारा वर्ग फक्त संतसाधूचा. ते ध्येय असले

तरी तात्त्विक होय चाणक्याने म्हटल्याप्रमाणे जिव्हेवर पडलेल्या थेंबाचा आस्वाद न घेणे ही गोष्ट सामान्य माणसाला अशक्य !

पण सर्व अनर्थाचे मूळ जे आर्थिक वैषम्य त्याकडे लोकशाहीतील सुधारकाची दृष्टि गेलेली नव्हती. म्हणून त्यानी अन्यायपरिमार्जनाचे अन्य उपाय सुचविले तात्त्विकदृष्ट्या सर्व तऱ्हेचे व्यक्तिस्वातंत्र्य या काळाइतकें पूर्वी कधी लाभले नव्हते पण आर्थिक वैषम्यही या काळाइतके तीव्र पूर्वी कधी नव्हते. तेव्हा राजकीय, धार्मिक, सामाजिक वगैरे सुधारणा अमलात येऊनही बहुजन समाजाच्या आपत्ति दूर झाल्या नाहीत या विषयाचा विचार करणाऱ्या मिल्‌सारख्या स्वातंत्र्यवादी विचारवंतानी 'अधिकाचे अधिक सुख' हीच नीतिमत्तेची कसोटी व हेच सर्व सुधारणेचे साध्य, असे तात्त्विकदृष्ट्या ठरविले पण हे साध्य करण्याचे उपाय योजताना आर्थिक वैषम्य हें बहुजनसुखाच्या मार्गात आडवे येत आहे, व आर्थिक सुबत्ता व वाटपाचे नियंत्रण स्थापन झाल्याशिवाय बहुजनसुखाच्या मृगजलाचे खऱ्या जलाशयात रूपांतर होणार नाही, ह्याचा त्यानी पुरस्कार केलेला दिसत नाही.

आर्थिक स्वातंत्र्याऐवजी 'वाटपाचे नियंत्रण' हे शब्द वर साभिप्राय योजले आहेत कारण आर्थिक स्वातंत्र्य प्राप्त होऊन चुकले आहे. (ते देखील जाचू लागते तेव्हा पुनश्च हिरावण्याचा प्रयत्न होत असतो, हें दक्षिण आफ्रिकेतील कायद्यावरून दिसून येते ) म्हणजे पूर्वी जशी गुलामाना मालमत्ता मिळविण्याची कायद्याने मनाई होती तशी सध्या गरिबातल्या गरिबालाही नाही. पण या तात्त्विक सवलतीही प्रत्यक्ष व्यवहारात विरून जातात. कारण नवीन धन जोडण्यास जुन्या धनाची आवश्यकता असते. पैशाकडे पैसा जातो. तेव्हा निर्धनाला धन मिळविण्याची जेथे सवड नाही, तेथें मालमत्ता करण्याचे स्वातंत्र्य म्हणजे गरिबाला हत्ती बाळगण्याचे स्वातंत्र्य बहाल करण्याचाच प्रकार होय आधुनिक काळात तर धनाशिवाय धन मिळविणे हे अधिकाधिक अशक्य होत चालले आहे. धनाचा मुख्य मार्ग व्यापारधंदा; आणि भांडवल हा तर त्याचा प्राण पूर्वीच्या काळी जेव्हा थोड्या भांडवलाने धंदा उभारणे शक्य होते, तेव्हा काटकसर करून पैसा साठवून भांडवल उभारणे हे कष्टाळू आणि हिशेबी माणसाला शक्य होतें. पण हल्लीच्या काळी उद्योगधंद्याचे स्वरूप एवढें अजस्र झाले आहे कीं, त्याला

लागणारे भांडवल निर्धनाला लाभणे दुर्लभ होय, यामुळें 'आर्थिक स्वातंत्र्य' ह्या शब्दाला व्यावहारिकदृष्टया अर्थच उरत नाही तेव्हा आर्थिक स्वातंत्र्याचे 'आर्थिक नियंत्रणा'त रूपांतर झाल्याविना व हे नियंत्रण कडक व कठोर वृत्तीने अमलात आणल्याविना बहुजनसुखवाद हा क[illegible]नासृष्टीतून व्यवहारसृष्टीत उतरणार नाही पण बहुजनसुखवादी मिल् याला आर्थिक वैषम्य नष्ट करता येईल याची खात्री नव्हती तेव्हा आर्थिकसामर्थ्यामुळें प्राप्त होणाऱ्या सत्तेचा दुरुपयोग टाळण्याच्या उपायाचे त्याने विवेचन केले आहे

## प्लेटो व कोंट

ह्यावरील एक उपाय प्लेटोने [illegible] सुचविला होता सत्तेच्या दुरुपयोगाचे मुख्य साधन म्हणजे कायदा होय कायदा करण्याचा अधिकार हा ज्या वर्गाच्या हाती असतो तो वर्ग कायद्याची घटना आपल्या स्वार्थास पोषक होईल अशीच करणार हे स्वाभाविक. एखादी व्यक्ति निःस्वार्थ असू शकेल पण सामान्य समाजाचे व्यवहारसूत्र स्वार्थाच्या धाग्यानेच विणलेले असते. तेव्हा ज्याच्या हाती सत्ता असेल तो त्या सत्तेचा आपल्या स्वार्थाचे हित सांभाळतां येईल असाच कायदा करण्याकडे उपयोग करणार म्हणून प्लेटोने अशी युक्ति सुचविली की, मानवी दुःखाचे परिमार्जन होण्यास उपाय एकच व तो म्हणजे राजसत्ता ही निर्लोभ तत्त्वज्ञाच्या हाती देणे हा होय पण हे कसे साध्य करावयाचे याविषयी मात्र प्लेटो काही सांगत नाही ते कल्पनाचित्र आहे, असेच तो सॉक्रेटिसाच्या तोंडून वदवितो ग्लॅकॉन सॉक्रेटिसाला विचारतो की, तुमची नव्या शहराची कल्पना नुसती आदर्शाचीच समजावयाची ना? तेव्हा सॉक्रेटिस मोकळेपणे कबूल करतो की आपण कल्पिलेले आदर्श शहर फक्त स्वर्गातच सापडेल! ('रिपब्लिक', खंड ९) युरोपातील समाजशास्त्राचा निर्माता कोंट यानेहि कायदेकानू हे निःस्वार्थी वर्गाच्या हाती द्यावे, असे प्रतिपादले आहे 'मानवी अन्तःकरणात चिररूढ झालेला स्वार्थीपणा आत्मनिरीक्षणाने मारून टाकणे सर्वांनाच साध्य नसते. कारण, सर्वांची मानसिक

नैतिक उन्नति सारखीच नसते तेव्हा ज्या थोड्या लोकाची अशी उन्नति झालेली आहे, व सत्यशोधनाच्या स्थडिलावर स्वार्थाचा होम करण्याची ज्याची तयारी आहे, ते लोक भावी मानवी समाजरूपी धर्माचे पुरोहित होत त्याच्या नैतिक वर्तनाच्या जोरावर समाजातील सर्वांचे योगक्षेम चालतील. जगताचे सर्व व्यवहार सोडून दिल्यामुळे सासारिक सुखातच केवळ निमग्न झालेल्या लोकापेक्षा त्याचा अधिकार उच्च असतो अर्थात् हा पुरोहित वर्ग सत्य, शुद्ध, पवित्र आचरणाचा आदर्श म्हणून समाजाच्या आद्यस्थानी स्वतत्र मानला पाहिजे.' तात्पर्य, प्लेटोप्रमाणेच एक नि स्वार्थी असा वर्ग समाजनियमन करण्यासाठी निर्माण करावा असे कोटने सुचविले आहे पण ह्या वर्गाला नि स्वार्थी कसे करावयाचे या मुख्य अडचणीस त्याच्याजवळ उत्तर नाही म्हणून प्लेटोप्रमाणेच एक रम्य पण अव्यवहार्य कल्पना एवढेच त्याच्या उपायाचे स्वरूप ठरते असा नि स्वार्थ कायदेपडित मिळेल तर समाजातील अन्यायास वाव मिळणार नाही. आणि त्याच्या न्यायाबद्दल कुरकुरण्यास जागा राहणार नाही पण चालू समाजघटनेत अशा एकाद्या नि स्वार्थी वर्गाच्या हाती कायदेयत्र जाणे हे कायद्याच्या स्वरूपाकडे व समाज शासनयत्राच्या खऱ्या स्वरूपाकडे मुद्दाम डोळेझाक केल्याशिवाय शक्य नाही. कायदा हे सत्ताधीशाच्या हातातील अमोघ शस्त्र ते तो निमूटपणे सोडील हे मनुष्यस्वभावात आमूलाग्र फरक पडल्याशिवाय अत्यत अशक्य शिवाय मनु, प्लेटो व मिल यानी योजल्याप्रमाणे निःस्वार्थी वर्ग सापडणेच अशक्य तो शोधून कसा काढावयाचा ? कोणी काढावयाचा ? नि.स्वार्थीपणाची द्योतक लक्षणे कोणती ? नि स्वार्थीपणा आज दिसत असला तरी कालातरान त्यात स्वार्थ रुजणार नाही म्हणून कशावरून ? असे अनेक भानगडीचे प्रश्न उपस्थित होतात आणि त्याना समाधानकारक उत्तर नसल्याने निव्वळ कल्पनेपलीकडे या मताचा अधिक उपयोग होऊ शकला नाही

## रूसो व गांधी

या घोटाळ्याने गाजून भौतिक सुधारणेच्या अनुषगाने वर्धमान होत चाललेल्या धनतृष्णेने वैतागून काहीना असे वाटते, की आजच्या सामाजिक आपत्तीपैकी बऱ्याचशा आपत्ति ह्या ज्याला भौतिक सुधारणा म्हणून

म्हणतात, तिची अवलाद होय. ह्याच्यापासून सुटका करून घेणे असल्यास सुधारणेच्या ज्या मार्गाने आज अनेक शतके आपण पावले टाकीत आलो त्याच मार्गाने उलट दौड करून, सुधारणापूर्व जगातील आयुष्यक्रमात जाऊन थडकलो तरच निभाव लागणार आहे या मताचा आद्य पुरस्कर्ता रूसो होय. रूसोचा बराच काळ निरनिराळ्या खेड्यापाड्यात भटकण्यात गेला. आणि प्रवासात खेडेगावातील लोकाच्या साध्या राहणीचा त्याच्या मनावर इतका परिणाम झाला की, सर्व दु खाचे मूळ भौतिक सुधारणेत आहे अशी त्यानें दु खाची मीमासा माडली. त्याच्या मते, इतिहासाच्या आद्य काली सर्व मानव स्वतत्र होते नतर त्यानी सर्वांनी सर्वांच्या सुखाकरिता झटावे असा 'करार' करून समाज निर्माण केला आणि या समाजाने व कराराने शेवटी आपल्या स्वत च्या पायात बेड्या ठोकल्या अर्थात् बधनातून मुक्त होण्याचा मार्ग म्हणजे विद्यमान घटना मोडून टाकून पूर्वीच्या नैसर्गिक स्थितीत जाणे होय रूसोनतरहि बराच काळ या 'निसर्गस्थिती' च्या मताच्या मोहिनीने पुष्कळ विचारवताना भारलेले दिसते कार्लाईल, रस्किन, टॉलस्टॉय, महात्मा गाधी हे सर्व भौतिक सुधारणेवर, शहरातील जीवनावर, दातओठ खाऊन निसर्गाच्या मोकळ्या अगणात बागडणाऱ्या खेडुताच्या आयुष्याची स्तुतिस्तोत्रे गाऊ लागले होते शेतावर जाऊन पेरणी कापणी करणाऱ्या शेतकऱ्यात सामील होणे हा आत्मोन्नतीचा मार्ग होय असे रस्किन यास वाटे सौंदर्यभोक्त्या रस्किनला आगगाडीच्या धुरामुळे सताप होत असे, व डोगरात पोखरलेले बोगदे हे सृष्टिसुदरीच्या जखमा भासत शहरी आयुष्यापेक्षा खेड्यातील लोकात राहणी साधी, विचार साधे, कल्पना साध्या इतकेच म्हणून न थाबता, त्याची मनोवृत्ति अधिक शुद्ध असते अशी त्यानी आपली समजूत करून घेतली. आपल्याकडील महात्मा गाधीचे मत वरील मताच्या धर्तीचेच आहे. त्याना वाटतें की, आपल्या गरजा शक्य तितक्या कमी करणे, वासना मारणे, स्वतःचे अन्न स्वतः तयार करणे, आणि स्वत.चे वस्त्र स्वत. विणणे, अशा प्रकारचा साधासुधा आयुष्यक्रम बनविणे हाच लोभ, मोह, स्वार्थ नष्ट करण्याचा व तज्जन्य आपत्ति टाळण्याचा मार्ग होय.

निःस्वार्थीपणाचा उपदेश व्यक्तीच्या बाबतीत सफल होऊ शकतो हे अनेक माधमताच्या चरित्रावरून सिद्ध आहे पण बहुजनसमाजाला हा उपदेश व्यर्थ होय स्वार्थ हा मानवी हाडामासात इतका खोल रुजला आहे की तो उपदेशाने नुसता हलणारदेखील नाही त्याला मारण्याचा उपाय म्हणजे 'अतृणे पतितो वन्हि' या न्यायाने स्वार्थाला पोषक असलेली आजची खाजगी मालकीची कल्पना बदलणे हाच होय

## अर्थशास्त्रज्ञ माल्थस

पण खाजगी मालकी, वारसा, मालमत्ता वगैरे कल्पना इतक्या बद्धमूल झाल्या आहेत की, त्या जणु निसर्गसिद्ध अथवा सनातन वाटू लागल्या आहेत. यामुळे सर्व स्वार्थाचे मूळ जो अनाभिलाष त्याच्याकडे नजर न जाता अन्य उपाय दिसू लागतात माल्थस नावाच्या एका गणिती अर्थशास्त्रज्ञ भटजीने तर दारिद्र्यप्रभृति सामाजिक आपत्तीची अशी मीमासा केली आहे की, प्रजोत्पत्तीची बेसुमार वाढ हाच दारिद्र्याचा खरा पाया होय दरिद्री वर्गाने प्रजोत्पत्ती बेसुमार वाढवून दारिद्र्य सपादन केले असले, तर त्याच्या पापाचे धनी तेच स्वत होत अमर्याद लोकसख्येच्या वाढत्या भुकेला शमविण्याइतके अन्नच सृष्टिमातेला तयार करता येणार नाही मग दारिद्र्य आणि उपासमार झाली तर नवल काय ? अन्नोत्पत्तीची वाढ असली तरी तिची वाढ गणितश्रेणीने होत असून मनुष्यसख्येची वाढ भूमितिश्रेणीने होत आहे, तेव्हा ह्या मडुकप्लुती व अश्वगति ह्याची बरोबरी व्हावी कशी ? तेव्हा उपाय हा, की प्रजोत्पत्तीची वाढ कमी करण्याच्या उपायाला समाजसुधारकानी लागले पाहिजे माल्थसने हे मत साठ वर्षांपूर्वी प्रतिपादले होते. यानतरच्या वस्तुस्थितीनेच माल्थसचें मत हें बादात खोटें आहे असी सा दिल्याने आजचे अर्थशास्त्रज्ञ आणि समाजशास्त्रज्ञ माल्थसच्या मताचा, एक चमत्कारिक मत म्हणून विषयाला वैचित्र्य आणण्यापुरताच उपयोग करीत असतात.

अर्थात्, सपत्तीची मालकी समाईक करण्याच्या मार्गाने जाणें, हाच एक उपाय फलद्रूप [illegible] दिसतो.

## बुरख्यांतील धनाढ्यशाही

आतां धनाढ्यशाहीचा निरोप घेण्यापूर्वी या धनाढ्यशाहीनें लोकशाहीच्या पुढची पायरी म्हणून ओळखली जाणारी शासनपद्धति जी साम्यवादी व समाजवादी शासनपद्धति तिचा नाटकी बुरखा घेऊन समाजाला कांहीं काल कसें लुटलें हें पाहून पुढें जाऊं. गुलामगिरी दहाव्या अकराव्या शतकांत अन्तर्धान पावली. कारण ख्रिस्ती धर्माच्या रक्षणार्थ झगडणारी सेना हवी म्हणून अनेक गुलामी शेतकऱ्यांना मोकळें करण्यांत आलें व त्यांतच गुलामगिरी जमीनदोस्त झाली. पण दोनतीन शतकें गुदमरून गेलेल्या गुलामगिरीशीं अमेरिकेचा शोध लागतांच धनाढ्यांनीं हस्तांदोलन करण्यास मागेंपुढें पाहिलें नाहीं. तेथील अफाट प्रदेशांतील अमाप रानेंवनें, संपन्न खाणी यांची लूट हस्तगत करण्याकरितां लागणारें मनुष्यबळ त्यांनीं आफ्रिकेंतील निग्रोंना जुलमानें उचलून आणून कसें तयार केलें हें आपण मागें पाहिलेंच (पृ. २८), तसाच प्रकार थोड्या वर्षांपूर्वी या शतकांतहि आपल्या डोळ्यांपुढें घडलाच ना ? हा प्रकार जर्मनींतील फॅसिझम हा होय. पहिल्या महायुद्धाच्या धडाक्यांत विल्यम् कायसर राजा हॉलंडमध्यें पळून गेल्यावर राजेशाही नष्ट झाली. युद्धांतील अफाट नुकसानानें देश दारिद्र्यजर्जर झाला. अशा स्थितींत या काबाडकष्टी राष्ट्रांतील जनतेचे डोळे रशियांतील साम्यवादी प्रयोगाकडे लागून राहिले तर नवल कसलें ? उलट त्याच देखाव्यानें धनपतींची छाती धडधडूं लागली होती. अशा स्थितींत अफाट जनतेला अन्नवस्त्र पुरवावयाचें पण धनाढ्यांच्या पिशवीला हात तर लावावयाचा नाहीं असा पेंचप्रसंग जर्मनीपुढें होता. या पेंचांतून राष्ट्राची सुटका करण्यास हिटलरशहा दंड थोपटून पुढें आले. त्यांनीं प्रथम घोषणा केली कीं, विजयी राष्ट्रांचें कर्ज आजवर फेडलें तेवढें पुष्कळ झालें. आतां दारिद्र्याला तोंड द्यावयाचें असेल तर उरलीसुरली सर्व संपत्ति ही अखिल जनतेची आहे असा आपण पुकारा करूं या.

या उत्साही घोषणेनें कष्टाळूंना थोडेंसें हायसें वाटलें व धनाढ्यांनीं धमकी घेतली; पण लवकरच धनाढ्यांची धमकी धुराप्रमाणें वितळून गेली

व कष्टाळूचे कष्ट अधिक कडक झाले. राजा पळून गेल्यावर पुढील दहा पधरा वर्षे जर्मन वृद्ध सेनानी हिंडेनबर्ग हा राष्ट्राचा प्रमुख होता. १९३४ मध्ये तो परलोकवासी झाल्यावर परकीय कर्ज धिटाईने फेटाळून लावणाऱ्या हिटलरने सर्व सत्ता आपल्या हाती घेतली. महायुद्धात पिळून निघालेली जर्मन जनता हिटलरकडे धाडसी वीरनेता म्हणून मोठ्या आशेने पाहू लागल्यास नवल कसले ? त्या जनतेच्या जोरावरच हिटलरने १९३८ मध्ये ऑस्ट्रिया घशाखाली घातला तेवढ्याने क्षुधा अधिक पेटल्याने पुढील वर्षी झेकोस्लोव्हाकिया उघडपणे गिळून टाकण्यास इतर राष्ट्राची फिकीर केली नाही पुढे पोलडकडेहि त्याची नजर वळल्यावर मात्र इतर राष्ट्रे थोडे डोळे चोळून पाहू लागली हिटलरचा समाजवाद हा बुरखा होता हे इग्लड, फरान्ससारख्या साम्राज्यवादी राष्ट्रानी ओळखले होते व साम्यवादी रशिया व साम्राज्यवादी आपण याच्यामध्ये दोन्ही बाजूनी धक्के खाणाऱ्या मध्यस्थासारखा जर्मनीचा उपयोग करावा असे त्याचे धोरण होते पण हिटलर काय कमी मुत्सद्दी ? त्याने पोलडचा काही भाग रशियाला देऊ करून त्याच्याशी हातमिळवणी करून इग्लड, फरान्सला नेस्तनाबूद करण्याचा चग बाधला त्यातूनच द्वितीय महायुद्धाचा वणवा कसा पेटला व त्याने जर्मनीला कसे धुळीला मिळविले हा इतिहास अगदीच ताजा आहे ह्या इतिहासाचा उल्लेख मुख्यत करावयाचा आहे तो हिटलरच्या समाजवादी बुरख्याखाली दडणाऱ्या हुकूमशाहीकरिता जनतेची खुषामत करण्याकरिता त्याने ज्यू लोकाची हकालपट्टी केली व आपल्या स्वतत्र जर्मन आर्य राष्ट्राचे स्वस्तिक चिन्हाकित निशाण फडकावले ! धुळीत मिळालेल्या राष्ट्राला कणखर पुढारी पाहिजेच असतो. असा एखादा राष्ट्रपिता झळकून पुढें आल्यास ते त्याच्याकडे आशाळभूतपणाने पाहू लागतात व तोहि आपणास राष्ट्रपिता म्हणूनच न थाबता देवराट्हि म्हणू लागतो. हिटलरने हेच केले. सत्ता हाती येताच असख्य भुकाळू जनतेची भूक काबाडकष्टाला सक्तीने जुपून का होईना पण भागविली. पण त्याच काबाडकष्टाच्या तरफेने शस्त्रनिर्मात्या लक्षाधीशाना कोट्याधीशाच्या उचीवर नेण्यास मागे पाहिले नाही

आणि हे सर्व आपण राष्ट्रहिताकरिता करीत आहो हे पटवून देण्या-

करिता ईश्वरी प्रेरणेने आपण हे सर्व करतो आहो हे सागण्यास त्याने कसूर केली नाही हाती सत्ता आल्यावर पुढल्याच वर्षी १९३५ मध्ये त्याने जनतेला विचारले की, " पधरा वर्षांपूर्वी ज्या आपल्या हाती काडीची सत्ता नव्हती तेच आपण आज दड थोपटून उभे आहोत याचा अथ ईश्वरी आशीर्वादाचे कृपाछत्र आज आपल्यावर फिरत आहे हेच नव्हे का ?" जर्मनीमधल्या सनातनी कॅथॉलिक धार्मिकानाहि हे धोरण कठोर वाटले तेव्हा जर्मन कॅथॉलिक पथ म्हणून एक नवा पथ स्थापण्यात आला त्याने हिटलर हा ईश्वरी अवतार होय किंवा ख्रिश्चन धर्माच्या भाषेत देव व मानव यामधील मध्यस्त होय, असा उघड पुकारा करण्यास कमी केले नाही ख्रिस्ताचा नवा खरा अवतार असेल तर हिटलर हाच बायबलमध्ये वर्णिलेला येशू हा ज्यू लोकाचा ईश्वर होय खऱ्या ख्रिस्त्याचा धर्म हा एका गालात मारली असता दुसरा गाल पुढे करण्यास सागणारा नसून एका गालात मारली असता, मारणाराचा गळा काप असा आदेश देणारा शूराचा धर्म हा खरा ख्रिस्ती धर्म होय. आणि हे धोरण नुसते कागदात न राहता त्याच्या विरुद्ध पुकारा करणाऱ्याचे कागद जाळून टाकण्यात येत Feucht Wanger या एका नामांकित लेखकाने हिटलरच्या आत्मचरित्राचा शब्दन् शब्द खोटा, असा पुकारा करताच त्या ग्रथकाराचे सर्व ग्रथ जाळण्यात आले !

## हिटलरशाहीची जोखड

हिटलर हा अवतार ठरल्यावर तो म्हणेल ते वेदवाक्य. परकीयाचे कर्ज फेडण्याचे नाकारण्याबरोबरच त्याने पहिल्या महायुद्धात सामान्य जनतेकडून जे युद्धकर्जरोखे घेतले होते ते सर्व सत्तारूढ होताच सरकारजमा करून टाकण्यास मागे पाहिले नाही. सर्व लोकाना कामास जुपले, भाकरीचा तुकडा दिला, पण या कामकऱ्याचा ,सघटित होऊन सप पुकारून मागण्या करण्याचा हक्क सर्वस्वी हिरावून घेतला. व कम्युनिस्ट पथ आणि लोकशाही समाजवादी पथ व ट्रेड युनियन कामगार सघ या सर्व सस्था बेकायदेशीर ठरवून नष्ट केल्या. कॅथॉलिक पु ऱ्यानी जमिनदाराच्या जमिनी गरीबाना वाटन द्याव्या असा प्रचार करतांच मुस्कटदाबी कायद्याने त्याचेहि तोड

आवळण्यात आले नतर शभर टक्के जमिनीपैकी ४० टक्के जमीन अखिल जनतेच्या शेकडा अर्धा या सख्येने वावरणाऱ्या मूठभर धनिकाच्या मुठीत ओतली गेली, व बाकी ६० टक्के जमीन शेकडा साडेनव्याण्णव गरिबाना वाटण्यात आली ! नवे लष्कर व शस्त्रास्त्रे यावर अमाप पैसा ओतण्यात आला लोकाना पुढारी सांगू लागले, 'अरे, भूक भूक काय करता ? अडी व लोणी मिळत नाही म्हणून चरफडता ? हा मूर्खांनो ! अडी व लोणी द्या फेकून आणि हातात बदुका घ्या म्हणजे आपण जगाला लुबाडून घेऊ '

जगाला पिळून काढणाऱ्या नाझीला शाततेचा उपदेश करणाराचा काटा बोचल्याशिवाय थोडाच रहाणार ? म्हणून शाततेचा पुरस्कार करून जगप्रसिद्ध नोबेल पारितोषिक मिळविणाऱ्या ओझिकी Ossietzky याला कैदेत डाबण्यात आले आजचा जगप्रसिद्ध विज्ञानश्रेष्ठ आइन्स्टाइन हा ज्यू असल्याने त्याला जर्मनी बाहेर पिटाळून लावण्यात आले हे सुशिक्षिताना सागावयासहि नको. हा शास्त्रज्ञ अणुबॉब वापरणे मानवतेला काळिमा आणणारेच नव्हे तर मानवता आमूलाग्र नष्ट करणारे आहे असा इषारा देऊ लागताच अमेरिकेनेहि त्याचे तोड बद केल्याचे दिसत आहे !

जर्मनीप्रमाणे ईश्वरी कृपाप्रसादाचा पुरस्कार अमेरिकेनेहि करण्यास मागे पाहिले नाही, एवढें जाता जाता ऐकून ठेवा चालू शतकाच्या सुरवातीला अमेरिकेने आशियातील फिलिपाइन्स ही बेटे गिळकृत केली त्या प्रसगी त्यावेळचे अमेरिकेचे राष्ट्रपति मॅकिनल याचेकडे एक शिष्टमडळ पाठवून धर्मोपदेशकानी आपल्या अमेरिकन सरकारचे अभिनदन केले त्याप्रसगी भाषण करताना राष्ट्रपतिसाहेब बहादूर उद्गारले की, 'फिलिपाइन्स खालसा करण्याचा बेत आपण केला तो साक्षात् ईश्वराने तशी आज्ञा केल्यावरूनच धार्मिक कल्पनेच्या मानेवर राजकारणाचे जोखड कसे लादले जाते याचे हे एक नमुनेदार उदाहरण होय. अशी अनेक देता येतील आपल्या देशातील गोऱ्या धर्मोपदेशकाचे एक उदाहरण दिले म्हणजे पुरे १८५७ साली आपल्या लोकानी इग्रजाविरुद्ध बड पुकारले तेव्हा 'अहिसा परमोधर्म' म्हणणाऱ्या हिदुस्थानातील अमेरिकन व जर्मन मिशनऱ्यानी काय केले तर दहा हजार ख्रिस्ती सैनिक इग्रज सरकारास देऊ केले.

---

(लेखकाच्या 'वादळी वारे'मधील मिशनऱ्याचे आक्रमण हा लेख पहा.)

## बेगडी समाजवाद

असो चालू मुद्दा जर्मनीने समाजवादाच्या बुरख्याखाली बहुजन समाजाला कसे पिळून काढले हे पाहण्याचा आहे. वर सांगितलेच की, असंख्य भुकेकंगालांना त्याने कामास जुंपून, पोटापुरते अन्न देऊन राबवून घेतले १९३३ मध्ये बेकाराची संख्या ६० लाख होती. ती त्याच वर्षी ३७ लाखापर्यंत उतरविण्यात आली व हा प्रयोग पुढे चालू ठेवून चार वर्षांनी म्हणजे १९३७ मध्ये बेकाराची संख्या साठ लाखाहून अवघी पाच लाखावर आणून सोडली व बेकारी जवळजवळ गाडून टाकली मात्र बेकारी गाडून टाकत असता वेठीने कामास लावण्याच्या सत्तेचाहि अतिरेक करण्यास कमी केलेले नाही रशियामध्येहि हाच प्रयोग झाला त्याचे दर्शन पुढे घेऊ तात्पर्य, समाजवादाने आकर्षक चित्र • • •, •।, माडून, त्याला पोटभर भाकर देण्यात आली, पण या वीतभर पोटासाठी कामकऱ्याला अटीतटीच्या अनेक बंधनांनी करकचून आवळण्यास कमी केले नाही समाजवादी चळवळ जर्मनीत पहिल्या महायुद्धाच्या [illegible] धुमसत होतीच तिने पहिल्या जागतिक युद्धात नृपशाहीचा पराभव होताच पेट घेण्यास सुरवात केली मजुरांना लागणाऱ्या वस्तूंची खरेदी करण्यास मजूर संघाने सुरवात केली व कामाच्या बाबतीत आठवड्यातून ४८ तास काम व अखंड ३६ तास सुट्टी, असे ठराव पास करून घेण्यात कसूर केली नाही. शिवाय प्रत्येक कारखान्यात कामगार न्यायालये व कायदेमंडळे उभारण्यात आली १९२६ मध्ये देशाच्या अनेक जिल्ह्यात जिल्हावार लेबरकोर्टें (कामगार न्यायालये) नेमण्यात आली अशा रीतीने जनतासत्तेचे पाऊल पुढे पडत चालले होते ते आणखी पुढे पाडू याचे आमिष दाखवून हिटलरने सत्ता बळकावली व पायाखालचे आमन स्थिर होताच त्याच पायांनी मजूरसंघटनांना लाथा मारण्यास प्रारंभ केला !

१९३३ च्या जानेवारीत हिटलर हा राष्ट्रपति झाला व मे महिन्यात त्याच्या नाझी सरकारने मजूर संघाच्या सर्व नेत्यांना तुरुंगात गाडले. संघाची मालमत्ता तर जप्त केलीच पण सन १९१८ साली पास झालेले

मजुराच्या हिताचे १८ कायदे नाझी सरकारने एका कायद्याच्या फटकाऱ्याने फेटाळून फेकून देण्यास मागे पाहिले नाही त्याचबरोबर बेकारी नष्ट केली हे आपण पाहिलेच पण ती करीत असता कामाची सक्तीहि राष्ट्रावर लादण्यात आली [illegible] स्त्रियाना सक्तीने वेठीस जुपण्यात आले व शेतावर काम करणाऱ्या मजुराना दुसरे कोणतेहि काम न करता शेतावरच राबले पाहिजे अशी सक्तीहि ठोठावण्यास कमी केले नाही. १९३९ मध्यें हिटलरचा हस्तक गोअरिंग याने एक चतुर्वार्षिक योजना आखली व जरूर वाटल्यास सरकारने खाजगी कारखान्यातील मजूरहि आपल्या कामास जुपावे असा वटहुकूम काढला त्याचबरोबर मजुराला काढून टाकण्याची कारखानदाराची व मालकाच्या समतीशिवाय काम सोडण्याची मजुराची स्वतत्रता सपुष्टात आणली गेली अशा रीतीने प्रत्येकाच्या पोटापाण्याची तरतूद केली आणि त्याचबरोबर पोट आवळून पडेल ते काम करण्याची सक्तीहि अमलात आणली.

या सक्तीबरोबरच कामकऱ्याना करमणुकीची साधने पुरविण्याचे धोरणहि आखण्यास पुढारी विसरले नाहीत हे नमूद केले पाहिजे हे धोरण अमलात आणण्यासाठी लेबर फरट—कामगार सघ—नावाची सस्था सरकारने स्थापन केली व तिच्या तर्फे अनेक करमणुकी जलसे आखण्यात आले व मजुराना स्वस्त दराची आगगाडीची तिकिटे देण्यात आली एकीकडे लाखो लोकाना वेठीस जुपले व थोडा विरगुळा म्हणून त्याना करमणुकीची साधनेहि बहाल केली अशा रीतीने वरवर पाहता समाजसत्तेच्या मार्गाने जात असता लोकशाहीला लाजवील अशी हुकूमशाही बळकट करण्यात आली या हुकूमशाहीचा पाया जोमदार करण्यास काही तत्त्वज्ञानी महताानी कसा हातभार लावला हे आपण पुढे पाहू उद्याच्या सस्कृतीला, आजवर मानव कोणत्या वाटेने चालत आला आहे व त्या वाटेवरील अनेक खाचखळग्याना व झाडाझुडपाना त्याला कसे तोड द्यावे लागले हे मागे वळून पाहूनच पुढील पावले टाकावयाची आहेत. तरी पुढील प्रकरणी थोडें मागे वळून पाहू या.

## प्रकरण आठवें

# उत्क्रांति व वर्धमान वैषम्य

हजारो वर्षाच्या उत्क्रातीनतर सामाजिक वैषम्य घटत न जाता वर्धमान होत आहे हे पाहून एक मन असे विचारू लागते की छोटया राज्याकडून विशाल नागराज्या.े जग वळले हीच मुळात आपली चूक तर नसेल ? प्रसिद्ध फरेन्च तत्त्वज्ञ रूसो याला याच शकेने झपाटले तेव्हा तो मान. ेग जीग तोडून बजावू लागला की ईश्वराने मानवाला जन्म दिला तो त्याने स्वतत्र वृत्तीने जीवनयात्रा करावी म्हणून पण प्राणीसृष्टीतील या शहाण्यातील अतिशहाण्याने आवाक्याबाहेरील सम्राटशाहीचा खोडा निर्माण करून आपल्या पायात आपल्याच हाताने बेड्या ठोकून घेतल्या. त्या आता तोडून टाकावयाच्या असल्यास त्यास एकच उपाय आहे, व तो म्हणजे त्याने पुनश्च छोटया नगरराज्याच्या अवस्थेत राहाण्यास सुरुवात करावी हा होय।

रूसोचा हा निराशेचा उपाय कोणासहि वैतागाचा उद्गारच वाटेल विद्यमान समाजघटनेत कितीहि दोष उत्पन्न झाले असले तरी माणसाची आजची सर्व ज्ञानविज्ञानमय सस्कृति ही सामाजिक अवस्थेचेच अपत्य होय त्यात छोटया राज्यातून मोठयात परिणत होणे हे क्रमप्राप्त आहे माणूस एक एकटा न भटकता समाज करून राहू लागतो तेव्हाच श्रमविभाग अस्तित्वात येतो या श्रमविभागात अन्नसपादन, अपत्यसगोपन व समाजसरक्षण या बाबी काहीनी उचलल्या म्हणजेच जीवित सुखमय करणाऱ्या शास्त्र व कला याची जोपासना करण्यास इतराना फुरसत सापडते. या फुरसतीचा उपयोग करून माणसाने आपल्या बुद्धिवैभवाच्या जोरावर सस्कृतोचा जो प्रासाद निर्माण केला आहे त्याचा भव्यपणा एवढा मोठा आहे की तो सामाजिक जुलुमाने अधु झालेल्या दृष्टीसहि पटल्याविना राहणार नाही. आणि तो पटल्यावर या इमल्यास आग लावून त्याची राख अगास फासून पुनश्च अरण्यातील झाडाच्या ढोलीत राहावयास जाण्यास कोण तयार होईल ? समाजाला

इमल्यापेक्षा शरिराची उपमा दिल्याने आपला मुद्दा अधिक स्पष्ट होईल देवाने सुदर शरीर दिले, पण माणसाचे वाकडे पाऊल पडून त्यात रोग शिरले. या स्थितीत वैद्याचे कर्तव्य काय ? रोग्याच्या गैरवर्तनाने चिडून रोग्यास विषाचा पेला द्यावयाचा की रोगशामक रसायन द्यावयाचे ? शरिराच्या एका अगात रोग शिरला तर तेवढा कापण्यास माणूस तयार होईल पण समूळ शरिराचा नाश करण्यास कोणीहि उद्युक्त होणार नाही एखादा इमला रोगजतूनी दूषित झाला तर सबध इमला जाळून टाका असे एकवार आपण म्हणू कारण त्याच्या जागी दुसरा उठविण्याची धमक आपणात आहे तसे शरिराचे नाही. शरीर गेले की कायमचेच सस्कृतिविकासाची गोष्ट ही अशीच आहे आजची मानवी सस्कृति ही कोटचवधि पिढचाच्या परिश्रमाने घडत आलेली आहे ती चुटकीसरशी कोण्या शहान्शहालाहि निर्माण करता येणारी नव्हे अर्थात् या सस्कृतीची गोड फळे सर्वांच्या वाटचास येत नसली तर वैतागून प्राचीन गावगाडचाच्या वा छोटचा राष्ट्राच्या आयुष्यक्रमाकडे तोड फिरविणे हा मार्ग नसून ही गोड फळे जेणेकरून सर्वांच्या ओटचात पडतील अशी उद्याच्या सस्कृतीची पुनर्घटना करणे हाच तो मार्ग होय.

## विकासांतील अपरिहार्य विघ्नपरंपरा

पण समाजरचनेत दोष उत्पन्न झालेच कसे ? ते नीट उमगले म्हणजेच ते काढून टाकून निराळी समाजरचना करता येईल प्रथम हे समजून घेतले पाहिजे की, जुलूम, अन्याय, विषमता वगैरे जे आज रूढ झालेले दोष आढळतात ते दोष उत्पन्न होणे काही प्रमाणात अपरिहार्यच होते ज्या समाजरचनेमुळें मानवीसस्कृतीचा भव्य प्रासाद उभारला गेला, त्या रचनेमुळेच त्या प्रासादाच्या पायात काही दीन वर्ग चिणले गेले समाजरचना मुळात पायावर उभी राहिली ती श्रमविभागाच्या तत्त्वावर समाज म्हटला की, श्रमविभाग हा आलाच. तो यथार्थपणे गुणकर्मविभागश. असता तर अन्याय उत्पन्न झाले नसते. माणूस कदमुळें खणून किंवा शिकार मारून खाण्याच्या वन्य अवस्थेत होता तोवर तो स्वत चे अन्न स्वत च सपादी, आणि स्वत चे

रक्षणहि स्वत च करी. अपत्यसगोपनहि स्तनपान असेतोवर माता करील तेवढेच या अवस्थेत राजाहि तोच व प्रजाहि तोच भूक लागली म्हणजे शिकार करावी आणि ती खाऊन फस्त झाली म्हणजे पुन भूक लागेपर्यंत वाटेल तसे विहरावे अन्न जतन करून ठेवण्याची सग्रही वृत्ति या अवस्थेत उदित होण्यासारखीच नसते.

मेढ्या, गाई वगैरे जनावरे पाळून गोपालवृत्ति सुरू झाल्यावर सग्रहाची वृत्ति उदित झाली असावी पण कुरणे एकाच ठिकाणी मुबलक नसल्याने वृत्ति भटकीच राहिली असावी शेती करण्याचा शोध लागेपर्यंत शतकानुशतके ही वृत्ति अशीच कायम असावी

शेतीचा शोध हा समाजरचनेच्या दृष्टीने एक अत्यत क्रातिकारक शोध होय या शोधामुळे समाजरचनेचा जो पाया घातला गेला तोच शे-दीडशे वर्षांखालील औद्योगिक क्रातीपर्यत कायम होता शेतकी करावयास माणूस लागला म्हणजे त्याला माणूसबळाची किंमत कळू लागते दिवसभर शेतात राबून घरी आल्यावर आयती भाकरी ताटात वाढणारी स्त्रीहि आपल्या मालकी हक्काची असावी अशी इच्छा साहजिकच उदित होते शेतात राबण्यास व गुरे वळण्यास घरचीच विश्वासाची माणसे असल्यास उत्तम म्हणून मुलेबाळे होतील तितकी हवीच असतात. मुले म्हणजे विश्वासाचे हुकमी कामकरी या दृष्टीने महत्त्वाची बाब असल्याने कानीन, सहोढ, गूढज, क्षेत्रज वगैरे सर्व प्रकारचे पुत्र त्याला चालतात अशा प्रकारे एकदरीने कुटुबसस्था दृढमूल होने, आणि श्रमविभागाला प्रारभ होतो कुटुबामध्ये घरातील स्वयपाकपाणी, शेणगोठा, ही स्त्रियाकडे आणि कष्टाची, नागरकीची कामे पुरुषाकडे असे कामाचे वाटप ठरून जाते. शिकारी अवस्थेतल्या प्रमाणे आता भटकावे लागत नसल्याने शेजारी शेजारी जमिनी नागरून माणूस जमाती करून राहू लागतो

शेतकीत गुतले असता वन्य जनावरापासून किंवा लुटारू शत्रूपासून सरक्षण करण्याचा प्रश्न उत्पन्न होतो तेव्हा इतराना निर्वेधपणे शेती करता यावी म्हणून सरक्षणाचे काम काही बलिष्ट व्यक्तीच्याकडे सोपविण्यात येते ह्या बलिष्टातील बलिष्टतम असेल तो पुढे त्या जमातीचा नाईक

किंवा राजा होतो शेतावर कामें नसतील तेव्हा इतराना हाताखाली घेऊन हा नाईक आपल्यापेक्षा दुर्बल अशा दुसऱ्या जमातीवर हल्ला क न, त्याचे धान्य लुटून आणतो व झटापटीत पकडता येतील तितकी पुरुष, स्त्रिया, मुले पळवून आणतो शेतकी अवस्थेच्या पूर्वीहि जमानी जमातीचे तटे होत पण या तटचात जिंकलेल्या लोकाना कायमचे राबवून घेता येत नसे म्हणून वन्य नरमासभक्षक अवस्थेत तो जिंकलेल्या माणसाना फाडून शिकार केलेल्या जनावराप्रमाणे त्याचे मास खाई पण शेतकीचा शोध लागल्यावर गुरेढोरे आणि मनुष्ये ही दोन्हीहि इसापाच्या गोष्टीतील सोन्याची अडी घालणारी कोंबडी बनली त्याना एकदम मारून एकदाच खाण्यापेक्षा त्याना कामास जुपून त्याच्या कमाईवर उभा जन्म पोटभर खावयास मिळेल ही कल्पना त्याला सुचली या कल्पनेतून गुलामगिरीचा उदय झाला लुटीत सापडलेली माणसे फाडून खाण्याऐवजी त्याना गुलाम करून काबाडकष्टाची सर्व कामे तो त्याच्याकडून करून घेऊ लागला

ज्या नाइकाच्या हाताखाली मारामारी करून हे गुलाम जिंकता आले त्याचा दर्जा वाढला पुष्कळसे गुलाम खुद्द त्याच्या तैनातीला देण्यात आले आणि बाकीचे जमानीतील सर्व कुटुबाना वाटून देण्यात आले. सर्वांचेच काम हलके झाले सर्वांचीच चगळ झाली या स्थितीचे सुष्ट दुष्ट असे दोन अगदी भिन्न परिणाम झाले एक म्हणजे कष्टाची हरएक कामे करणारा एक खास स्वतत्र वर्ग निर्माण झाल्याने इतराना जी फुरसत मिळाली त्या फुरसदीतून पुढें कला, शास्त्र, वाङमय, धर्मतत्त्वज्ञान वगैरे मानवाची बौद्धिक कामगिरी विकास पावली. आणि दुसरा म्हणजे शास्त्र, कला, धर्म वगैरेच्या जोपासनेमुळे जी सुखसाधने निर्माण झाली ती सर्व कायमची आपल्याच हाती असावी या वासनेमुळे राजा प्रजा, मालक मजूर, श्रेष्ठ जाती, नीच जाती अशा प्रकारची वैषम्यनिष्ठ समाजरचना अस्तित्वात आली विष आणि अमृत, किंवा प्रकाश आणि छाया एकत्रच निर्माण होतात, तसे मूळ सक्तीने काम करणाऱ्या गुलाम-सस्थेंतूनच आजच्या मानवी सस्कृतीतील सुष्ट दुष्ट असे दोन्ही भाग निर्माण झाले आहेत

आतां उद्याच्या सस्कृतींत समाजाची पुनर्घटना करताना आजच्या

वैषम्यनिष्ठ समाजरचनेचे हे दुहेरी स्वरूप नीट समजावून घेतले पाहिजे. म्हणजे त्या घटनेपासून निष्पन्न झालेले फायदे सभाळून दोष तेवढे टाळता येतील म्हणूनच रूसोप्रमाणे जुन्या सस्कृतीवर रुसून गुलामगिरीची सस्कृतिविकासातील कामगिरी डोळ्याआड करता कामा नये. कष्टाची कामे करण्याचा शिक्का जन्मानेच ज्याच्या डोक्यावर मारला असा गुलाम, दास, शूद्र, अस्पृश्य, मजूर वगैरे नावानी ओळखला जाणारा हुकुमी वर्ग यापुढे टिकविण्याची जरूर नाही आणि व्यक्तीच्या विकासास व कर्तबगारीस वाव न देता केवळ जन्मानेच त्या व्यक्तीच्या कपाळी कष्टाचे अथवा घाणेरडे काम जन्मभर मारले जाणे हा तर माणुसकीचा उपमर्द होय अशी विचारसरणी आज आपण प्रतिपादन करीत असलो तरी आजवरच्या मानवी सस्कृतीच्या विकासात या गुलामगिरी सस्थेने जी कामगिरी बजावली आहे ती प्राजलपणे मान्य केली पाहिजे जीवनाला आवश्यक असणाऱ्या अन्नवस्त्रादि वस्तूची पैदास मोठे कष्ट सोसून आणि अल्प वेतन घेऊन निर्माण करणारा मोठा वर्ग समाजात नसता तर छोटया सत्ताधीश वर्गाला हरतऱ्हेच्या ज्ञानशाखाची जोपासना करण्यास फुरसदच उरली नसती !

या छोटया वर्गांत पुन्हा दोन पोटवर्ग निर्माण झाले एकाने शासनसस्था निर्माण करून सत्ता काबीज केली, आणि दुसऱ्याने सत्तेचा लोभ सोडून ज्ञानार्जनास स्वत स वाहून घेतले प्राचीन काली अरण्यात वसाहत करून राहणाऱ्या ब्राह्मणाना किंवा मठात राहणाऱ्या श्रमणाम गावेच्या गावे इनाम लावून दिलेली असत. पोटाकरता कष्ट करण्याची त्याना आवश्यकता नसे त्यामुळे ज्ञानार्जनास त्याना निर्वेधपणे वेळ देता येई मठ व अरण्य सोडून दरबारात राहणारे कलावत आणि शिल्पजीवि याच्यावरहि कष्टाच्या कामाचा बोजा नसे त्यामुळे त्यानाहि आपल्या कलाची अव्यभिचारी भक्तीने सेवा करण्यास सापडे याच प्रक्रियेने कुटुबात घरगुती सर्व कामे स्त्रियांवर सोपविल्या कारणाने पुरुषाना बाहेरील पराक्रमाला अधिक अवसर मिळू लागला. अशाप्रकारे श्रमविभाग अस्तित्वात येणे हे सस्कृतिविकासाच्या दृष्टीने अत्यत अवश्य होते उद्याच्या सस्कृतीतहि श्रमविभागाचे हे अत्यंत उपयुक्त ठरलेले तत्त्व अबाधितच राखावयाचे पण या तत्त्वात जो दोष

उत्पन्न झाला तो टाळण्याचा प्रयत्न करावयाचा आहे

ता दोष म्हणजे श्रमविभाग हा माणसातील नैसर्गिक कर्तबगारीवर न सोपविता त्या श्रमविभागाला जन्मसिद्ध उच्चनीचत्वाच्या कल्पनेने कायम जखडून टाकणे हा होय

## वर्णवैषम्याचें दृढीकरण

काबाडकष्ट करण्यास गुलाम मिळाऱ्यामुळे हरतऱ्हेचे सुखवर्धक हुन्नर निर्माण करण्यास फुरसद मिळाली पण त्याचबरोबर ही फुरसद कायमची आपणासच नव्हे तर वशपरपरेनेहि मिळावी अशी वासना उद्भूत झाली· म्हणजे जे मिळविले ते सग्रहित करण्याची, ते कायम टिकविण्याची अथवा त्यावर अनिर्बंध मालकी उत्पन्न करण्याची इच्छा बळावली या इच्छेला व्यवस्थित रूप देण्याम्तव समाजरचनेतील दोन महत्त्वाची तत्त्वे जी खाजगी मिळकतीवरील अनिर्बंध स्वामित्व व ते परपरेने रक्षण करणारी वारसा-पध्दति ही समाजरचनेची आदिसूत्रे म्हणून स्वीकारण्यात आली

या मूत्रानीहि समाजाच्या विकासात महत्त्वाची कामगिरी केलेली आहे जी कमाई आपण करतो ती आपल्या हाती राहील, याविषयी खात्री नसेल तर कमाई करण्याची प्रेरक शक्ति दुर्बल होईल वर्षानुवर्ष ज्यात श्रम खर्ची घालावे लागतात त्या शेतीचे उदाहरण पाहा पडीत जमिनीची मशागत करणे, ताली बाधणे, विहिरी खणणे, खारटाणात बधारे बाधणे, दहा पधरा वर्षांनी फळे धरतील अशी बागाईत करणे व वर्षानुवर्षे त्याची निगा राखणे, या क्रियेस माणूस प्रवृत्त होतो तो या क्रियेचे फळ निश्चितपणे आपल्या पदरात पडेल अशी खात्री असते म्हणूनच अशी खात्री असणे हा समाजधारणेचा अथवा सुव्यवस्थेचा महत्त्वाचा घटक होय पण हे खाजगी मालकीचे तत्त्व मान्य केले गेल्यावर ते मर्यादित स्वरूपात न राहता त्याची सत्ताधीशाच्या सोयी लहरीप्रमाणे अमर्याद व अप्रशस्त वाढ झाली. मालकी ही फक्त स्वकष्टार्जित कमाईच्या जड वस्तूपुरतीच न राहता तिच्या क्षेत्रात गुलामाचाहि समावेश करण्यात आला इतकेच नव्हे तर गुलामावर सत्ता गाजविण्यास चटावलेल्या मालकाने स्वत च्या कुटुबातहि बायका आणि पोरे ही आपली खाजगी

मालमत्ता होत अशा भावनेने वागावे हे सहजच घडे जनावराचा क्रयविक्रय होतो तसा गुलामाचाहि होई आणि स्त्री-पुत्रादिकावरहि स्वामित्वाचा हक्क असल्याने त्याचासुद्धा क्रयविक्रय चाले. म्हणजे झाले काय की माणसाच्या कर्तबगारीस प्रेरक अशी जी स्वामित्वबुद्धि ती मान्य करण्याने समाजाला सघटित व शिस्तवार स्वरूप येण्यास मदत झाली खरी, पण या स्वामित्वाच्या हक्काला मर्यादा घालून देता न आल्याने, ज्याच्या हाती सत्ता येई तो आपली जिदगी कायमची कायदेशीर रीतीने ठेवू लागला पण ज्याच्या हाती जिदगी नव्हती ते स्वत च दुसऱ्याची जिदगी बनल्यामुळे त्याना स्वत ला जिदगी करण्याची वाटच बद झाली.

खाजगी मालकीचे हे तत्त्व एवढ्यावरच थाबले नाही. ज्याच्या हाती राजसत्ता आली त्यानी आपले राज्य ही खाजगी कमाई ठरविली म्हणजे राज्यपदाशी सलग्न असलेल्या सुखसाधनावरच तेवढा कायमचा वशपरपरा मालकी हक्क सागितला असे नव्हे तर राज्यपदाशी सलग्न असलेली जी प्रजेवर हुकमत चालविणारी सत्ता, प्रजेच्या सुखदु खाशी लहरीप्रमाणे खेळखडोबा करण्याची सत्ता, तीवरहि ते हक्क सागू लागले

याच क्रमाने एका राष्ट्राने दुसऱ्या राष्ट्रास जिकले म्हणजे जित राष्ट्र ही जेत्याची कमाई होते, व त्यावर जेते राष्ट्र कायमचा हक्क सागू पाहते म्हणजे ज्याची कमाई त्याची, ती दुसऱ्याने लबाडू नये हे जे खाजगी मालकीचे तत्त्व त्या तत्त्वातील कमाईचा अर्थच पार फिरला. कोणाची कमाई दुसऱ्या कोणी ुबाडू नये असा मत्र जपत असताच यशस्वी रीतीने लुबाडली तर तीहि कमाईच मानावी असाहि त्या मत्रातून अर्थ निघू लागला ! व विश्वजित यज्ञ करणारा नृपति हा आदर्श ठरला. ज्याच्या त्याच्या कमाईवर ज्याचा त्याचा [illegible] मानावा असे तत्त्व प्रतिपादन करण्यात दुर्बलाचे बलिष्ठापासून रक्षण व्हावे हा समाजधारणापोषक असा स्तुत्य उद्देशच आहे, पण या तत्त्वाची बलिष्ठानी कधीच कदर केली नाही. उलट लोकाची कमाई अचानक लुबाडणे हीच आपली स्वतत्र कमाई असे सक्रिय दर्शवून त्या तत्त्वाची थट्टाच केली. जेथे प्रत्यक्ष लुबाडले जात नाही तेथेंहि

नवीन कमाईची सर्व साधने बलिष्ठ वर्ग बळकावून बसतो व मग कनिष्ठाना कमाईला संधीच मिळत नाही

समाजाचे नियमन करण्यासाठी कायदे करावयाचे ते बलिष्ठानीच त्या कायद्यान्वये समाजातील दलित वर्गाला जसे ते धनसंचय करू देत नसत, तसे कुटुंबातील स्त्रियानाहि स्वतःचे धन संपादू देत नसत म्हणजे ज्याची कमाई त्याच्या पूर्ण मालकीची अशी घोषणा एकीकडे चालू असताच दुसरीकडे दुर्बलाना कमाई करूच द्यावयाची नाही हा प्रकार अजब होय अर्थात् खाजगी मालकी तत्त्वाचे अंतिम स्वरूप पाहिले म्हणजे दुर्बलानी कमाई करूच नये आणि बलिष्ठानी लोकाना लुबाडले तरी तीहि कमाईच समजावी असाच याचा अर्थ होऊ लागला मर्यादित स्वरूपात मालकी तत्त्वाचा कर्तबगारीला प्रेरक म्हणून उत्कृष्ट उपयोग होतो हे वर सांगितलेच जेथे खाजगी कमाईला क्षेत्र विस्तृत असते व व्यक्तिव्यक्तीचा हितविरोध येत नाही तेथे सन्मान्य व्यवहाराचे तत्त्व म्हणून खाजगी मालकीचे तत्त्व हे उपयुक्त ठरलेले आहे पण जेथे हितविरोध आला तेथे दुर्बलाचे बलिष्ठापासून रक्षण करण्याच्या कामी हे तत्त्व निर्वीर्य ठरले आहे कारण असे आहे की ज्याच्या मनगटात जोर आहे तो कोणत्याच तत्त्वाना धूप घालीत नाही सुखसाधने सर्व बलिष्ठानी आपली कमाई म्हणून आपल्याच हाती राखावी एवढाच त्याचा अर्थ व्यवहारात उतरला. अमेरिकेला प्रचंड भू-प्रदेश मिळाला व इंग्लंड फ्रान्स वगैरे युरोपियन राष्ट्राना आफ्रिका, आशिया, ऑस्ट्रेलिया या खंडातील प्रचंड कुरण लुबाडण्यास मिळाले यामुळे तेथील कामगाराना अधिक वेतन देणे धनवंताना शक्य झाले म्हणूनच समाजवादाचे तत्त्व तेथे फोफावण्याचे मंद झाले पण इतर राष्ट्राना लुबाडण्याचे सामर्थ्य हटत जाईल त्या प्रमाणात युरोप अमेरिका याना आपले डोळे चोळून जगाकडे पाहावे लागेल. परवाच स्वयंनिर्णयाच्या हक्काविरुद्ध इंग्लंड, फ्रान्स व अमेरिका यानी कौल टाकलाच ना? तो इतर राष्ट्रानी झुगारून लावला हे बदलत्या कालमानाचे लक्षण

अर्थात् खाजगी मालकीचे तत्त्व उपयुक्ततेच्या मर्यादित स्वरूपात कसे कोंडून ठेवता येईल याचा विचार केला पाहिजे. मालकी तत्त्वामुळे समाजामध्ये

जी सग्राहक वृत्ति उत्पन्न होते ती समाजोपकारक असते या सग्राहक वृत्तीमुळे अगी जोम असेतो कष्ट करून म्हातारपणाकरिता माणूस तरतूद करतो आणि वारसाच्या हक्कामुळे पुढील पिढीसाठीहि कमाई करून ठेवतो. या सग्राहकवृत्तीमुळे त्याला दुष्काळात काळ कठता येतो आणि कमाईच्या वेळी सग्रह करून ठेवल्यावर सग्रहामुळे मिळालेल्या फुरसदीच्या वेळी हौसेचे उद्योग हाकता येतात. मात्र या सग्राहक वृत्तीचाहि मूळ उद्देश आपत्कालीन तरतूद एवढाच आहे म्हणजे सग्रह हे साध्य नसून साधन आहे पण हे तत्त्व विसरले जाऊन नुसतो सग्रह करण्याची हावच माणसास ग्रासून बसते आणि मग इतराना नाडवून आपल्या नैसर्गिक व प्रामाणिक गरजा भागल्या असताहि केवळ सग्रह म्हणून सपत्ति मत्ताधीशाच्या कोठारात कोंडली जाते

कमाई थोडी असते तोवर सग्राहक वृत्तीला विशेष महत्त्व असते. गरिबीत कजुषपणा हा दोष नसून गुणच ठरतो, पण गरिबी फिटल्यावरहि चालू राहिलेली कजुष वृत्ति ही कजुषाला उपकारक होत नाहीच पण पैशाकडे पैसा जातो या न्यायाने इतराना मात्र बाधक होत जाते. असाच प्रकार सध्या झाला आहे

सस्कृतीच्या सध्याच्या अवस्थेत यत्रशक्तीमुळे सर्व समाजाचे दारिद्र्य फिटेल इतकी कमाईची शक्ति वाढली आहे तेव्हा आता पूर्वीच्या कजुष-वृत्तीची आवश्यकता उरलेली नाही उन्हाळ्यात नदीने पात्र आटले व हेळ खणून पाणी नरोटीने उपसून घेण्याची पाळी आली म्हणजे जितके सापडेल तितके पाणी साठवून ठेवणे आणि आपल्या हेळावर दुसऱ्यास भरू न देणे हे दक्षतेचे लक्षण ठरेल. पण वर्षाकाळी नदी दुथडी भरून वाहू लागली असता पूर्वी जेथें मी हेळ खणला होता तो आता पुराखाली बुडून गेला असला तरी त्या ठिकाणी तू पाणी भरू नकोस असे कोणी कोणास म्हणू लागेल तर ती दक्षता न ठरता दुष्टता ठरेल! माणसाच्या अन्नवस्त्रादि आवश्यक वस्तूचा पूर येण्यासारखी निपज करण्याची गुरुकिल्ली यत्रशक्तीमुळे माणसास साध्य झाली आहे, तेव्हा आता त्याला पूर्वीची कजुष वृत्ति सोडून द्यावयास लावणे हेच उचित नाही का ?

कजुष वृत्ति आणि मालकी वृत्ति याची मनावरील पकड कमी करा-वयाची तर या वृत्तीमुळें आपत्कालच्या तरतुदीचा प्रश्न जो सुटतो, तो दुसऱ्या रीतीने अधिक चागला सुटतो हे दाखविले पाहिजे ती रीत म्हणजे किरकोळ धदे सोडले तरी ज्यामध्ये अवाढव्य कमाई आहे असे सर्व उद्योगधदे शासन-सस्थेने आपल्या हाती घेतले पाहिजेत हीच होय यामुळें उद्याच्या सस्कृ-तीच्या स्वरूपात शासनसस्थेच्या स्वरूपाचा व कार्यक्षेत्राचाहि विचार अवश्य ठरतो. कोणतीहि नमाज[illegible] यशस्वी व्हावयास तिला राजसत्तेचे पाठबळ लागते आजची राजसत्ता ही धनाढ्याच्याच हाती अस-ल्याने आपल्या खऱ्या किंवा मानीवहि हिताविरुद्ध जी समाजसुधारणा जाईल ती अमलात आणण्यास राजसत्तेचे पाठबळ मिळणार नाही. तेव्हा सास्कृतिक पुनर्घटना करताना जी कोणती नवी घटना अमलात येईल ती टिकविण्याची जबाबदारी व सत्ता ज्या शासनसस्थेच्या हाती राहील तिचें स्वरूप खरेखुरे प्रातिनिधिक कसे होईल याचाहि विचार टाळता येत नाही.

शासनसस्था खरी प्रातिनिधिक झाली म्हणजे आज खाजगी बाबी म्हणून समजल्या जाणाऱ्या काही बाबी तिने आपल्या शिरावर घेणे ओघानेच येते. मुख्यत बेकारास काम देणे, दुबळ्यास फुकट पोसणे, आणि काम करण्याचे वय नसलेल्या मुलाना अन्नवस्त्र व शिक्षण याची मोफत तरतूद करणे ही कामें शासनसंस्थेने अगावर घेतली तरच ‘स पिता पितर तासाम् केवल जन्महेतव:’ ही कालिदासोक्ति यथार्थ ठरेल. आज या गोष्टी व्यक्तीच्या खाजगीपैकी समजल्या जात असल्याने बेकाराला काम मिळेल अशी खात्री वाटत नाही, आणि गरिबाला आपल्या मुलाला शिक्षण देता येईल हा विश्वास उत्पन्न होत नाही यामुळे मिळेल त्यावेळी खूप खाणाऱ्या भिक्षुकाच्या [illegible] मालकी वृत्ति अधाशी बनते पण काम मिळ-ण्याची व शिक्षणाची हमी सरकारने घेतली म्हणजे मालकी वृत्तीचे मना-वरील पाश ढिले झाल्याविना राहणार नाहीत. अखड वाहणाऱ्या नदीकाठी पाण्याकरिता झुज लागेल कशाला ?

कुटुंबसस्थेची सुधारणा करणे हेंहि शिक्षण व अन्नवस्त्र या दोन्हींचा जिम्मा सरकारने घेतला म्हणजे सुलभ होते कुटुबसंस्था अस्तित्वात येण्यास

व बद्धमूल होण्यास दोन कारणे प्रभावी ठरली आहेत. पैकी एक कारण माणसातील नैसर्गिक सहवासप्रियता व त्यातल्या त्यात स्त्रीपुरुषातील परस्पर आकर्षण हे होय दुसरे व यापेक्षाहि अधिक प्रभावी कारण अन्नवस्त्राची व शिक्षणाची जबाबदारी पत्करणारी व श्रमविभागाची व्यवस्था करणारी आर्थिक संघटना हे होय. कुटुंबसंस्थेत पोरांनी गुरे वळावी, बायांनी शेणगोठा करावा, व बाप्यांनी औत धरावा अशी श्रमविभागाची ज्याच्या त्याच्या मगदुरास झेपेल अशी पद्धतशीर मांडणी असते आणि बापाने मुलाच्या लहानपणी त्याचे संगोपन करावे, व म्हातारपणी मुलांनी त्याचा भार वाहावा, व कोणी आजारी पडल्यास किंवा पंगू निघाल्यास त्याला पोसण्याची सर्वांनी जबाबदारी घ्यावी अशी व्यवस्था असते.

कुटुंबसंस्थेस ज्या कारणांनी बळकटी उत्पन्न झाली त्या कारणात बेकारीच्या वेळी व अडचणीच्या काळी कुटुंबातल्या समाईक कमाईचा चतकोर नितकोर तरी आपणास खास मिळेल हा विश्वास हे बलवत्तर कारण होय. केवळ या विश्वासाखातर कुटुंबातर्गत सर्व जुलूम अपमान सोसण्यासहि माणूस तयार होतो कुटुंबातील कर्ता पुरुष असा विश्वास सर्वांत उत्पन्न करतो म्हणूनच त्याच्या हाती सर्व सत्ता केंद्रित होते केंद्रित झालेल्या सत्तेचा दुरुपयोग व्हावयाचा तसा येथेहि होतो म्हणजे कर्ता पुरुष हा कुटुंबातील बायका व मुले यांच्यावर अमर्याद सत्ता गाजवू शकतो स्त्रियांचा वारसाहक्क तो नष्ट करून टाकतो आणि एके काळी आपल्या हयातीत मुलांचाहि धनाचा हक्क तो मानीत नसे पण अडचणीच्या वेळी याच्याच पुढे आपणास तोंड वेंगाडावे लागणार याची जाणीव असल्यामुळे माणूस सर्व अरेरावी चालू देतो. कुटुंबात राहिल्याने अडचणीच्या वेळी मदत मिळण्याची जी हमी घेतलेली असते तशी बाहेर सरकार जोवर घेत नाहीं तोवर कुटुंबातील कर्त्या पुरुषाची अनियंत्रित सत्ता मान्य करण्याशिवाय गत्यंतरच नसते. स्त्रियांच्या बाबतीत तर प्रसूतीची आपत्ति ही वरचेवर येणारी आपत्ती असल्याने त्यासमयी काम न करता बसून खाण्यास द्यावयाची हमी कोणी घेतली तर ती अवश्य असते म्हणून तिला नवरा कसाहि असला तरी त्याच्याशी नांदण्यातच हितकारक वाटू लागते

पण कुटुम्बाने स्वीकारलेल्या सर्व आर्थिक जबाबदाऱ्या जर सरकारने उद्या स्वीकारल्या, म्हणजे मुलेमुली वयात येईपर्यंत त्यांच्या शिक्षणाची व अन्नवस्त्राची सोय केली, वृद्धाना व पगूना मोफत पोसण्याची जबाबदारी स्वीकारली, व स्त्रियाना प्रसूतिकाली व सर्वांना आजारीपणात अन्नवस्त्र व दवापाणी मोफत मिळण्याची तरतूद केली, तर कुटुम्बसस्था ज्या दोन तत्त्वावर अधिष्ठित आहे, त्यापैकी आर्थिक तत्त्व कमजोर होईल व दुसरे सहवासप्रियतेचे व प्रेमाचे तत्त्व बळावेल मग कुटुबात राहाणे हे दुर्बलतेमुळे सक्तीचे व अगतिकत्वाचे न राहाता खुषीचे होईल कुटुम्बात राहिल्याने जीवनात काव्य उत्पन्न होण्यासारखे असेल तरच व तोवरच माणूस कुटुबात राहील कुटुबसस्थेची अशी सुधारणा करता आली म्हणजे स्त्रीपुरुषातील मानीव उच्चनीचत्व लयास जाईल

तेव्हा आतापर्यंतच्या विवेचनावरून आपण पाहिले की, मानवी सस्कृती-च्या आजच्या विकासास कुटुबसस्था, गुलामसस्था, जातिसस्था व या सर्वांच्या अन्तर्यामी वसणारी खाजगी मालकीची व्यवस्था ह्या सर्व आप-आपल्या परी पूर्वकाली उपयुक्त ठरल्या असल्या तरी या सस्थांच्यामुळेच सस्कृतीचा जो विकास झाला व त्या विकासाच्या पोटी सुखसाधनाची जी गडगज पैदास झाली तिचा फायदा मात्र सर्वांस मिळू शकला नाही वरि-ष्ठानी त्यातील लोण्याचा भाग उचलला व कनिष्ठाना ताकाच्या फुलकवणी-वर झुलविले ! वरील सस्थानी समाजात शिस्त व व्यवस्था उत्पन्न केली हे निर्विवाद समाजरचना म्हटली की त्यात श्रमविभाग आणि शिस्त पाळली गेली तरच सुव्यवस्था निर्माण होणार.

## शिस्त व स्वातंत्र्य

पण शिस्त आणि सुव्यवस्था ही दोन निरनिराळ्या प्रकारची असू शकते शिस्तीचा आत्मा स्वार्थनियन्त्रण होय समाजात वागावयाचे म्हणजे प्रत्येकाने आपल्या स्वार्थावर काही बधन हे अवश्य घातलेच पाहिजे तसे ते सर्वांनी घातले म्हणजे त्यात सर्वांचाच एकदरीत फायदा होऊन सुव्यवस्था निर्माण होते आता दुसऱ्याहि एका तऱ्हेने शिस्त लावण्यांत येते व त्यातूनहि

व्यवस्था निर्माण होते. ही शिस्त म्हणजे काहींनी, म्हणजे बलिष्ठांनी दुसऱ्या काहींवर म्हणजे दुर्बलांवर सक्तीने बंधन घालून उत्पन्न केलेली व्यवस्था होय ह्या बंधनाची अमलबजावणी कडक रीतीने केली म्हणजे व्यवस्था निर्माण होते यात शंका नाही पण या संस्थेला सुव्यवस्था असे कोण म्हणेल ? तुरुंगातदेखील व्यवस्था आणि शिस्त निर्माण केली जाते किंवा एका राष्ट्राने दुसऱ्यास जिंकले म्हणजे जेते हे तरवारीच्या जोरावर जितामध्ये शिस्त व व्यवस्था उत्पन्न करतातच इसापाच्या गोष्टीतील माकडाने लोण्याच्या गोळ्याकरिता भांडणाऱ्या मांजरांचा तटा निकालात काढून व्यवस्था निर्माण नाहीं का केली ? त्याने ऐनजिनसी लोण्याचा गोळा स्वतःच खाऊन टाकला आणि अशा रीतीने भांडणाचे मूळ नाहीसे केले. सध्याच्या रूढ समाजरचनेत व्यवस्था व शिस्त आहे ती मूलतः या प्रकारचीच आहे

शिस्त म्हटली म्हणजे कोणाच्या तरी आज्ञेत कोणीतरी हे वागलेच पाहिजे आता ज्याच्या आज्ञेत वागावयाचे तो गुणांनी वरिष्ठ व स्वभावाने निःस्वार्थ असा असला तर त्याच्या आज्ञेत वागावयास सक्तीची गरजच नाही. तसे वागण्यात आपलेच हित आहे हे कनिष्ठाला कळते इतकेच नव्हे तर अशाच्या हुकुमाची तामिली करावयास सापडणे हे भाग्यच होय असेहि तो मानतो लोकप्रिय पुढाऱ्यांना रथात घालून, रथाचे घोडे सोडून तो रथ आपल्या हातांनी ओढण्यात भूषण मानणाऱ्या हजारो देशभक्तांचा मेळा तुम्ही पाहिला नाही काय ? तो पाहिला असेल तर गुणांचा मोठेपणा मानण्याकरिता सक्तीची जरूरी नाही हे लक्षात येईलच पण सध्याच्या रूढ समाजव्यवस्थेत बलिष्ठपणा हाच प्रमुख गुण ठरला आहे तो स्वयंस्फूर्तीने मान्य केला जाणार नाही हे माहीत असल्याने तो मान्य करण्याची सक्ती केली जात असे आणि त्याच्याविरुद्ध प्रतिक्रिया ज्या साधनांच्या योगाने होण्यासारखी असते, ती सर्व साधने हिरावून घेतलीं जात असत कुटुंबात स्त्रीला स्वतंत्र मालमत्ताच देण्यात येत नसे जातिसंस्थेमध्ये हलक्या ठरविलेल्या जातींनी हलके धंदेच केले पाहिजेत अशी सक्ती केली जात असे वरिष्ठ जाति आपले धंदे दुसऱ्यास शिकवीत नसे व दुसऱ्याचा

आपल्या धद्यात प्रवेश होणार नाही याविषयी खबरदारी घेण्यात येत असे. आजहि अणुशक्तीचे गुपित फोडणारास तुरुगात डाबून टाकले जातेच ना ? राष्ट्रसस्थेत जेते राष्ट्र पहिले काम करते ते म्हणजे जिताना नि शस्त्र करणे हे होय. शातता व सुव्यवस्था निर्माण करण्याचा हा मार्ग स्वीकारणे म्हणजे 'बळी तो कान पिळी' हेच समाजरचनेचे आद्य सूत्र होय असे मान्य करणे होय. आणि आजच्या रूढ समाजव्यवस्थेच्या तळाशी नीट निरखून पाहू लागलात तर हेच तत्त्व तुम्हाला प्रभावी असलेले आढळून येईल

समाजनियमनाच्या या पद्धतीचे वर्णन आपल्या शास्त्रकारानी मात्स्य-न्याय या शब्दानी केले आहे समुद्राच्या अफाट विस्तारात पसरलेले साम्राज्य म्हणजे त्यातील मात्स्याचे होय या साम्राज्याचा कारभार कसा चाललेला असतो तर अगदी लहान माशाला मध्यम माशाने खावे, मध्यमाला मोठ्याने गट्ट करावे, आणि या मोठ्यालाहि त्याहून बड्याने गिळकृत करावे, असा हा या सागरसाम्राज्यातील मात्स्यन्याय होय.

इतका धादात अन्याय व अव्यवस्था यातून अर्थातच मानवी समाजाने बरेच पुढे पाऊल टाकले आहे. मनुष्याने कुटुम्ब, जाति, राष्ट्रे, साम्राज्ये वगैरे गट उत्पन्न केले व नीतीच्या, सदाचाराच्या, पापपुण्याच्या कल्पना रूढ केल्या तसतशी त्याने मात्स्यन्यायाच्या मगरमिठीचे पुष्कळ विळखे दूर केलेले आहेत पण अजूनहि उरलेले विळखे किती पीळदार आहेत याची साक्ष कोट्यधीशाच्या शेजारीच भुकेने पोट भकास झालेला दरिद्री व बलिष्ठ राष्ट्राच्या टाचेखाली रगडली जाणारी निर्बल राष्ट्रे सदैव देत आहेत. अर्थात् समाजात शिस्त आणि व्यवस्था लावण्यात आली असली तरी त्या शिस्तीचे लगाम मुख्यतः एकमेकाला भक्षण करण्याचा मात्स्यन्याय सोडून कमलाला न लुबाडता त्यातील अल्पाश मधूचा आस्वाद घेण्याच्या मधु-मक्षिकान्यायाचा स्वीकार करणे हे उद्याच्या सस्कृतीचे मूलभूत तत्त्व मानावयास मानवाने आपले मन तयार केले पाहिजे

ते तयार करण्यासाठी त्याच्या एकदोन शकाकुशकाकडे पुढील प्रकरणी वळू या

## प्रकरण नववें

# मात्स्यन्यायांतून मधुमक्षिकान्यायाकडे

संपत्तीच्या समाईक मालकीकडे साशंक मुद्रेने पाहाणाऱ्या शंका अनेक आहेत. पैकी एकीला वाटते की जगांत निर्धनांची संख्या एवढी प्रचंड व त्या मानाने सधनांची संख्या एवढी क्षुद्र आहे की लक्ष्मीपुत्रांची सर्व संपत्ती आक्काबाईच्या संततीस बहाल केली तरी परिणाम एवढाच होईल की भिकाऱ्याच्या हातची नरोटी सुटणार नाहीच, फक्त त्याच्याबरोबर लक्ष्मीपुत्राच्या हातीहि ती विराजू लागेल! माधुकऱ्याची उलटी अबारी कायम राहीलच, पण सुलट्या हत्तीच्या अंबारीवाल्यांना मात्र त्या वैभवाची कल्पना काव्यांतच वाचावी लागेल. दुष्काळांत झाडपाला पोटांत ढकलणारांना दूधभात खावयास मिळणार नाहीच, पण दूधभात कां खात नाही म्हणून विचारणाऱ्या विलासी राजपुत्रांना मात्र पक्वान्नाऐवजी कदान्न सेवावे लागेल!

ही शंका विचारते की जगांत कुबेर असे आहेत किती? आणि त्यांची सर्व संपत्ति राष्ट्रीय मालकीची केली तरी प्रत्येकाच्या उत्पन्नाला असे काय बाळसे येणार आहे? हिमालय पर्वत मोठा उंच दिसतो खरा पण सर्व भरतखंडावर तो पसरला तर भरतखंडाची उंची अशी काय वाढणार? कृष्णाकडे एक सुदाम भेटावयास गेला म्हणून त्याला तो सुवर्ण सुदामपुरी देऊ शकला. पण सांदीपनी कुलपतीच्या आश्रमांतील त्याचे हजारो सवंगडी जर त्याला सुदामाप्रमाणे भेटावयास गेले असते तर त्या सर्वांना सुवर्णपुऱ्या कृष्ण झाला तरी कोठून पुरविता? यामुळे समाईक मालकीच्या आहारी गेल्याने श्रीमंतांची औटकोटी जाऊन दरिद्र्याची अठराविश्वे मात्र कायम राहील हेच आपण साधणार ना?

या शंकेची समजूत काढली पाहिजे. पहिली गोष्ट अशी की धनवानांच्या जामदारखान्यांत अडकून पडलेली सर्व संपत्ती—आणि अशी गोठून ठेवलेली संपत्ती आपल्या धनिकांनी कबूल केल्याप्रमाणे साठ सत्तर कोटी

आहे! मग खरी संख्या किती असेल ती लक्ष्मीपती विष्णूच जाणे! –ही सर्व संपत्ति जर गरिबांचे दैन्य हरण करण्यास उपलब्ध झाली तर आजचे उपासमारीचे दैन्य कमी करणे अशक्य नाही. दुष्काळात धर्मादाय फंड नेहमीच गोळा केला जातो, व त्या फंडानेहि आपत्तीचे थोडेसे निवारण होतेच ना? मग आपखुषीने दिलेल्या या देणगीच्या कितीतरी पट संपत्ति जी पुंजीपतीच्या तिजोरीत लोळत असते, तिचा भरपूर विनियोग झाल्यास दुष्काळात एक तरी प्राणी मृत्यूच्या हवाली करण्याचे पातक समाजाने आपणावर का ओढवून घ्यावे? आपल्या भारतातील खेडोपाडी राहाणाऱ्यांच्या उत्पन्नाचा आकडा जमविणे कठीणच. दोन वर्षांपूर्वीच्या पुण्यास भरलेल्या शास्त्रविज्ञान परिषदेच्या अध्यक्षांनी स्पष्ट टीका केली की वरचे अधिकारी खालच्या अधिकाऱ्याकडून आकडे घेतात आणि शेवटी गावचा पाटील जे आकडे वर पाठवील तच अधिकृत धरले जातात. म्हणून प्रत्यक्ष खेड्यात राहाणारे एक विद्वान निवृत्त सरकारी अधिकारी ना. गो. चाफेकर यांनी आपल्या 'आमचा गाव' या ग्रंथात दिलेल्या माहितीकडे ओझरती नजर टाकू या. ही माहिती दुसऱ्या जागतिक युद्धापूर्वीची आहे तरी एकंदरीने खेडुतांच्या राहणीची कल्पना येण्यास अनुपयोगी नाही. चाफेकरांनी आपल्या 'बदलापूर' खेड्यातील सर्व जमातींचे उत्पन्न, खर्च, कर्ज, व्याज, वगैरेची तपशीलवार माहिती एकत्र केलेली आहे. त्यापैकी ज्यांनी बदलापूर गाव वसविला त्या आगरी जातीच्या जमातीची रहाणी पाहिली तर एकंदर हलाखीची कल्पना येईल. गावात एकंदर ४० आगरी कुटुंबे आहेत व त्यांची लोकसंख्या २१४ आहे. ४० पैकी फक्त १० ना स्वतःच्या मालकीची जमीन आहे. कोणत्याहि आगऱ्याची सावकारी नाही किंवा पेढीत ठेवी नाहीत. शेतकी हा मुख्य धंदा व गाडीभाडें मजुरी हे उपधंदे. हे सर्व जमेस धरून या ४० कुटुंबाचे वार्षिक उत्पन्न सर्वांचे मिळून स्थूल मानाने ७ हजार रुपये आहे. नवराबायकोचे व मुलांचे कपडेलत्ते व अन्नखर्च ही सर्व लक्षात घेता या ४० कुटुंबांना रोजचा खर्च भागण्यास वर्षाकाठी ७३१९ रुपये तरी पाहिजेत. म्हणजे ७ हजारात भागण्यासारखे नाही हे स्पष्ट. यात लग्न, मुंज, सणवार, पाहुणचार,

आजार वगैरे समाविष्ट केलेली नाहीनच शिवाय कर्जावर जबर व्याज द्यावे लागते ते निराळेच हे सर्व लक्षात घेता माणशी वार्षिक उत्पन्न ६७ रुपये पडते पण गरीबीने राहण्यासहि दर माणशी वार्षिक सुमारे १०० रु खर्च झाल्याविना उपाय नाही. सरकारी तुरुगातील कैद्यामागे वर्षास रु. १२० खर्च केला जातो तर खेडुताला ६० ते ७० रुपयातच आपला जबाना उरकावा लागतो!

## भांडवलदारी लूट

आता भाडवलदाराची सपत्ति पाहा. ती पाहात असता विशेष लक्ष वेधण्यासारखी गोष्ट म्हणजे भाडवलदारानी जी अफाट सपत्ति हस्तगत केली ती कोणत्या काळात तर युद्धकालात! लाखो लोकाचे युद्धाने बळी घेतले, पण त्या बलिदानाचे सापत्तिक उदक कोणाच्या हातावर पडले तर धनिष्ठाच्या! पहिल्या महायुद्धाचा चटका बसेपर्यत भारतातील गिरण्याच्या वाढीला इग्रज भाडवलदाराचा विरोध होता. पण युद्धात जो सैनिक, माल, पैसा सर्व अफाट पाहिजे त्याकरिता भारताच्या भाडवलदाराना पाहिजे ती कमाईची सवलत देणे अवश्य ठरले १९१७ मध्ये भारतातील गिरण्याचे भाडवल ७ कोटी ६५ लक्ष होते ते पुढील चार वर्षात १७ कोटी ८३ लक्षावर येऊन पोचले. आणि नफ्यानेहि शिखर गाठले. बगालमधील ज्यूट कारखानदारानी १९१३ ते १९१९ या कालात १०० रु वर ६८५ रु नफा वाटला! ही कमान आणखी वर चढेल व आपल्या आवाक्याच्या बाहेर जाईल अशी परकीय सरकारला भीति वाटून आर्थिक चौकशी नेमण्याची दुसऱ्या महायुद्धात सरकारने सूचना माडली पण युद्धसहाय परिषदेचे अध्यक्ष मिर्झा इस्माइल यानी ही सूचना फेटाळून लावली. पहिल्या महायुद्धानतरच्या काही वर्षात गिरण्यातील मजुरीचे दरहि वाढत वाढत शेकडा ८० टक्के इतके वाढले तरीहि दुसऱ्या महायुद्धात भाडवलदारानी नफा किती घशात घातला हे पाहाल तर तुम्ही स्तभित व्हाल! या नफ्यातील मोठा वाटा सरकारच्या खिशात जाऊन पडत असल्याने दुसऱ्या महायुद्धाच्या काळात सरकारने भाडवलवाल्याना,

सवलती देऊन रयतेला लुबाडण्यास मदत केली! दुसरे महायद्ध सुरू झाले १९३९ साली, पण कापड नियत्रण केव्हा बसविले तर फार हाकाहाक झाली तेव्हा १९४३ मध्ये! म्हणजे चार वर्षांनी! तोपर्यंत व्यापाऱ्यानी अफाट पैसा खाल्ला आणि परकीय सरकारने तो डोळे मिटून चालू दिला, कारण त्यातला भरगच्च वाटा सरकारच्या पोटीहि जात होता! या चार वर्षांत सरकारला लागणारे कापड ठराविक भावात मिळे मात्र जनतेला लागणाऱ्या कापडात किमतीची पाचपट म्हणजे शेकडा ५०० वाढ झाली. पण धनिकाना त्याचे काय ? या कालात बगालमधील दुष्काळाने गरिबाचे लाखो बळी घेतले आणि त्याच काळात भाडवलवाले लाखोपतीचे क्रोडो-पति झाले! सरकारमान्य आकडेच तुम्हाला सागतील की १९३८ साली सुमारे पन्नास पाऊणशे गिरण्याचा मिळून नफा २ कोटी ४८ लक्ष होता तो १९४२ साली ११ कोटी १२ लाख म्हणजे पाचपटीहून अधिक वर चढला! आणि मग नियत्रणाची भाषा सुरू झाली जिवावर बेतलेले युद्ध निकराने लढणारे जे इग्लड त्या देशातील राहणीचा खर्च शेकडा ३० नी चढला तर आपल्या देशात त्याने शेकडा १३८ वर मात केली!

किमती भरमसाट कशा वाढल्या याची कल्पना स्पष्ट करण्याकरिता श्री द. वा केळकर यानी 'मौजे'च्या १९४७ च्या अकात जे आकडे दिले आहेत तेच पाहा. १९३४ मधील पदार्थांची किमत १०० धरली तर १९३९ सालात महायुद्ध सुरू झाले तेव्हापासून १९४७ पर्यंत ज्या किमती वाढल्या त्याचा आढावा घेतला तर आढळून येते की दूध ८३ ते ३८२, तूप १०३ ते ३९७ पर्यंत या वाढीने चढले. सुपारी १२० पासून ५२० वर गेली! गोडेतेलाने १०८ ते ६०० इतकी उडी मारली, खोबरेल ९७ पासून ७३८ पर्यंत चढले आणि हरबऱ्याने १२१ पासून ८४२ इतका उच्चाक गाठला!! ह्या किमत-वाढीने भरमसाट पैसा धनपतीच्या खजिन्यात सुखात लोळत पडला आणि गरिबाचे हाल कुत्रा खाईना १९४३ साली बगालमध्ये भयकर दुष्काळ पडला त्यात इस्पितळात स्वीकारण्यात आलेल्या निराधार रोग्याची सख्या ४९१८ वर गेली व त्यापैकी १२२४ नी मृत्यूला कवटाळले कलकत्ता विद्या-पीठाच्या अँथ्रोपॉलॉजी खात्याने ५०४ कुटबाची तपासणी केली तेव्हां

त्यापैकी शें. ५२ अस्पृश्य व शेकडा ५५ अविवाहित असे रुग्णालयात गेलेले आढळले पण याच वेळी अन्नमत्री ज्वालाप्रसादाच्या तोडून माहितीच्या ज्वाला बाहेर उफाळून सागत होत्या की, शेतकऱ्याजवळ जरूरीपेक्षा अधिक धान्य शिल्लक आहे ! मग असे जर होते तर त्याचे योग्य वाटप आखून अन्नान्न करून मृत्यूला कवटाळणाऱ्याना धान्य पुरविण्याकरिता शेतकऱ्यावर व व्यापाऱ्यावर कडक नियत्रण न घालता केवळ मनगटे चाटीत ज्वालाप्रसाद स्वस्थ का बसले ? इग्लडमध्ये १९३८ ते १९४३ सालापर्यंत धान्याच्या किमती वाढल्या त्या ६१ टक्के, तर त्याच कालात आपल्या भारतातील किमतीनी ४०० व ५०० टक्क्यानी वाढीची उच भरारी मारली! सरकारला अफाट वाटा देऊन अमूप फायदा घशात घालता येतो ना मग गरीब चिडेनात, मरेनात बिचारे ! १९४४ च्या अहवालात गिरणीमालक बेमुर्वतखोरपणे लिहितात की, ‘निर्यात माल वाटेल त्या किमतीस विकण्याची सरकारने परवानगी दिली असल्याने देशात कापड फार कमी उरेल!’ आपल्या प्राचीन इतिहासातील दाखला हवा असल्यास ‘राजतरगिणी’कार कल्हण सागेल की शक ८६० मध्ये दुष्काळ पडला असता वितस्ता नदीचे पात्र सडलेल्या प्रेताच्या राशीनी तुडुब भरले होते पण अशा स्थितीत लोकाना पिळून जो मत्री जास्तीत जास्त कर उपटून घेई त्यालाच मत्रीपदावर स्थिर केले जाई (मस्कृति–सगम पृ १०७ पाहा).

सर्वांत लुबाडला गेला असेल तर मध्यम व अत्यज वर्ग शेतकऱ्याची मिळकत युद्धकाळात तिपटीने वाढली. आणि गेल्या पाच वर्षांत काळा बाजार कसा नगा नाच घालतो आहे हे आपण पाहतोच आहोत इग्रजानी युद्धकाळात शेतकऱ्याना वीस कोटी पौडाची म्हणजे ३०० कोटी रुपयाची ‘सबसिडी’ म्हणजे आर्थिक मदत केली आणि भारतातील इग्रज सरकारने व आपल्या श्रीमत [illegible] अफाट लूट खिशात कोबली ! ब्रह्मदेश हातचा जाताच तिकडे जाणाऱ्या मालावर कडक बदी घालावयास पाहिजे होती, पण अफाट नफ्याने तोडाला पाणी सुटलेल्या धनिकानी ३ लक्ष ७० हजार टन धान्य बाहेर पाठविले व लक्षावधी परकीय युद्धकैद्यावर अफाट धान्य ओतले. मग आपला बगाली शेतकरी मरेना ? त्या बिचाऱ्याचे मागील

जन्मीचे पापच त्याला भोवत असले पाहिजे मिळालेल्या अमूप लुटीतून धनिकानी कुठे एखादे मदिर बाधले की देव झाला खूष ! जना दाखला गुप्ताचा. या गुप्त नावाच्या पेढीवाल्यानी भारताच्या शत्रूला मदत केली आणि अबू पहाडावर दहा कोटी रुपये खर्च करून सगमरवरी देवळे बाधली मग आणखी काय पाहिजे ? सिध व पजाबमधील सरकारने धान्याची किमत दर मणाची ५ न्द: ---न १२ रुपयापर्यंत वाढविली मग त्यामुळे काही उपासाने हताश होईनात स्वदेशी चळवळीला लुबाडले असेल कोणी तर धनिकानी ! युद्ध व स्वदेशी मालाची चळवळ यानी इग्लडातील भारतात येणारे कापड १९०५ ते १९३८ च्या वेळात दसपटीने खाली उतरले मात्र याचा फायदा लुटला श्रीमत गिरणीवाल्यानी १९४१ साली मुबईतील ६८ गिरण्यानी ६ कोटी ९४ लक्ष नफा लुटला १९३७ मध्ये तो १८ लक्ष ४० हजार होता म्हणजे ३८ ते ४१ या तीन वर्षांत नफ्याचे प्रमाण तीस पटीपेक्षा वर चढले ! हे आकडे गिरणीमालकाच्या समतीने फर्ग्युसन कपनी नावाच्या ऑडिटर्स कपनीने प्रसिद्ध केलेले आहेत हे आकडे सरकारी कर वजा जाताचे आहेत हेहि नमूद केले पाहिजे. शिवाय हे आकडे फक्त मुबईतील मुम्बईच्या बाहेर सुमारे २०० गिरण्या भारतात असून त्याच्या त्याच्या नफ्याचा आकडा वरील मुबईच्या गिरणीतील नफ्यावरून अदाजता येईल *

कुबेराच्या जामदारखान्यात लक्ष्मी पाशबद्ध होऊन पडली आहे ती तर अफाट आहेच, पण तिच्याहिपेक्षा अनतपट नुकसानकारक अशी दुसरी बाब म्हणजे खाजगी मालकीच्या अमदानीतील सपत्तीची बेताल उधळपट्टी ही होय आणि ही उधळपट्टी म्हणजे अत्तराचे दिवे लावणारी वैयक्तिक उधळपट्टी नव्हे, तर खाजगी मालकीप्रधान सर्व समाजयत्राच्या शरिरात भिनलेली उधळपट्टी होय खाजगी मालकीच्या समाजघटनेचे मुख्य कर्तव्य खाजगी मालमत्तेचे रक्षण हे होय या रक्षणाच्या काळजीमुळे केवळ रक्षणाला वाहिलेला व धनोत्पादनाच्या दृष्टीने निरुपयोगी असा प्रचड वर्ग निर्माण होत असतो न्यायखाते आणि पोलिसखाते ही बव्हशी अशीच

* सस्कृति-सगम पृष्ठ ३३६ पहा.

नाहीत का? कल्पना करा की राष्ट्रातील सर्व संपत्ति राष्ट्राच्या मालकीची झाली तर मग वारसा, दत्तक, भाऊबंदकी, वाटण्या व तज्जन्य अनेक दिवाणी फैसले सर्वच नाहीसे नाही का होणार? आणि नुसते दिवाणीच मनसुबे अंतर्धान पावतील असे नव्हे तर चोरीमारीसारखे फौजदारी गुन्हेसुद्धा मर्यादित होतील. मानवी मनःक्षोभातील गुन्ह्यांची मूलभूत प्रवृत्ति लक्षात घेता फौजदारी गुन्हे अजिबात नष्ट होतील अशी आशा करणे कदाचित् व्यर्थ होईल. पण बऱ्याच फौजदारी गुन्ह्यांच्या मुळाशी द्रव्यलोभ दडलेला असतो हे कबूल केले म्हणजे त्या तऱ्हेच्या गुन्ह्यांना तरी पायबंद बसेल असे मानणे निराधार होणार नाही. अर्थात् न्यायखात्याची गरज अगदीच जुजबी उरली म्हणजे त्याशी संबंध असणारा वकील व न्यायाधिशांचा बुद्धिमान पण निरुत्पादक वर्ग अधिक उपयुक्त कार्यास मोकळा होईल. गुन्ह्यांशी संबंध असलेले पोलिसखाते व तुरुंगखाते यांचीहि तीच गोष्ट. आज ह्या खात्यांवर जो पैसा निरर्थक खर्च होत आहे तो सर्व दरिद्रीनारायणाचे दैन्य दूर करण्याच्या लागी लागेल. अर्थात् खाजगी मालकीच्या घटनेमुळे आज ह्या न्याय, पोलिस, तुरुंग, रजिस्ट्रेशन वगैरे खात्यांवर जो खर्च केला जात आहे त्याला निरर्थक उधळपट्टी हेच नाव योग्य नाही का? पण त्या उधळपट्टीचे खरे स्वरूप म्हणजे ही नुसती पैशाचीच उधळपट्टी नसून ही बुद्धीचीहि उधळपट्टी होय! एरवी वकील न्यायाधीशांसारख्या बुद्धिमानांची बुद्धि केवळ कज्जेदलालीसारख्या निरुत्पादक धंद्यात खर्ची पडावी यात राष्ट्राचे हित ते कोणते?

## लष्करावर उधळपट्टी

न्यायखात्यासारख्या खात्याची जर ही स्थिति तर मग उधळपट्टीचा मूर्तिमंत अर्क असे जे लष्करीखाते त्याचे वर्णन कोणत्या शब्दांनी करावयाचे? इतर खाती मनुष्याच्या [illegible] विचारपूस करतात तर ह्या खात्याला एकच चिंता, ती म्हणजे मनुष्यसंहाराची होय. तुम्ही म्हणाल संहाराची नव्हे रक्षणाची, कबूल! पण परकीय आक्रमणाची धास्ती खाऊन प्रचंड पैका त्या होळीत लोटण्यापेक्षा परकियांशी समझोता करणे शक्य नाही का?

आज तसा सूर ऐकू येत नाही पण ते शक्य होईल अशी आपण आशा बाळगू या. आज या खात्यावर खर्च होणारी पै न् पै मनुष्याला ठार मारण्याकरिता खर्चिली जात आहे या अघोरी खात्यावर उमाप पैसा खर्च करून त्याच्या साहाय्याने बलिष्ठ व पुड राष्ट्रे दुर्बळाचे सर्वस्व हरण करीत असतात. या ठिकाणीहि धनलोभ हीच भूमिका असते. तीच जर नष्ट झाली तर लष्कराचे प्रयोजनहि नष्ट होईल आणि त्या स्थितीत सरक्षणाकरिताहि लष्करी खर्च सोसावा लागणार नाही हे उघड आहे. हा खर्च प्रचड आहे आणि तिसऱ्या जागतिक युद्धाच्या धास्तीने शस्त्रास्त्र–निर्मितीवर तर अफाट सपत्ति आज ओतली जात आहे हिंदुस्थानात उत्पन्नाच्या४५ टक्के अथवा ५५ कोटी रुपये केवळ या ·ा्ारखा ।। फस्त होत असत. उलट आरोग्याच्या खाती? त्यावर फार खर्च करून काय करावयाचा? आरोग्य देवच देतो आणि सहार? सहाराची नवनवी हत्यारे निर्माण करण्यात मानवाची बुद्धि गुतलेली असते अर्थात् सहारावर ५५ कोटी खर्च करून आरोग्याच्या खाती तो फक्त ६ कोटीच खर्चतो कालपर्यंत परतत्र असलेला भारत सोडून स्वतत्र इग्लड घेतला तरी तीच रडकथा तेथेहि सहार खात्यावर ११ कोटी पौड तर आरोग्यावर २ कोटी असेच उफराटे प्रमाण दृष्टीस पडे तोच प्रकार जर्मनी, रशिया वगैरे इतर राष्ट्रात असे. आणि असा खर्च का नाही होणार? एक लढाऊ जहाज बाधावयाचे म्हणजे ७० लाख पौड खर्च येतो आणि युद्ध सुरू झाले म्हणजे अनेक वर्षांची ही कमाई, करामत, सपत्ति, व बुद्धि एका टॉर्पेडोच्या टकरीबरोबर साफ रसातळास जाते! पण नवीन जहाजे व त्यापेक्षा नवीन विमाने बाधण्याचा हव्यास अलिकडे वाढतोच आहे पहिल्या महायुद्धाच्यापूर्वी ब्रिटनचा लष्करी खर्च ७ कोटी ७० लक्ष होता, तो नतर ११ कोटी २० लक्षावर आला, आणि २९ सालचा अमेरिकेचा खर्च तर १३ कोटीवर गेला होता. आणि हा नित्याचा खर्च होय युद्ध सुरू झाले म्हणजे तर या खर्चाच्या अगात बकासुरच शिरतो व तो इतर सर्व उपयुक्त खात्याना दाताच्या कण्या खावयास लावून सर्व उत्पन्न आपण स्वाहा करतो! मग दैन्य निवारण करण्याबाबत पैसा उरणार तरी कसा? पहिल्या महायुद्धात एकदर खर्च झाला

याचा आकडा ८५ हजार कोटीवर गेला होता. दुसऱ्या महायुद्धात तर त्याने सहा लक्ष कोटीचा उच्चांक गाठला असे म्हणतात! (के. गो. गोखले, रशियाचा सर्वोदय, २ रा भाग, पृ. ३८२)

ही पहिल्या महायुद्धातील उधळलेली अवाढव्य संपत्ति उपयुक्त कामी खर्ची पडली असती तर किती समाजसंवर्धक कामे झाली असती याची कल्पना आणून देण्याकरिता एकाने लिहिले आहे की, हा खर्च एवढा अवाढव्य आहे की एवढ्या खर्चात युद्धात एकमेकांचे रुधिरप्राशन करणारे जे इंग्लंड, फरान्स, जर्मनी, रशिया, अमेरिका, कॅनडा, ऑस्ट्रेलिया, बेल्जम, वगैरे देश, त्या सर्व देशातील यच्चयावत् कुटुंबांना प्रत्येकी पांच एकर जागेवर बांधलेले पांचशे पौंड किंमतीचे घर, अडीचशे पौंड किंमतीचे सामानसुमान, आणि दर वीस हजार कुटुम्बांमध्यें दवाखाना व विद्यापीठ एवढी बिनबोभाट चालविता आली असती! पण याऐवजी महायुद्धाने केले काय तर हजारो कुटुम्बाना सुखसोयी पुरविण्याऐवजी एक कोटी दहा लक्ष माणसांना यमपुरीत मात्र रवाना केले! !

आज समाजात जे दैन्य वावरत आहे ते पुरेशी संपत्ति उपलब्ध नाही या कारणामुळे नसून संपत्तीचा विनियोग अनाठायी होत असल्यामुळें आहे. हे सिद्ध करण्यास या लष्करी उधळपट्टीवाचून अन्य पुरावा कोणता पाहिजे? लष्कराकरिता होणारा हा सर्व खर्च माणसाच्या संहाराकरिता चालू आहे पहिल्या महायुद्धाच्या हिशेबानेच पाहिले असता एका शिपायाला मारण्याकरिता सुमारे दहा हजार पौंड खर्च होत असे. आणि एका माणसाच्या अन्नवस्त्राकरिता किंवा त्याच्या शिक्षणाकरिता किती खर्च केला जातो? हिंदुस्थानातील प्रजा ३३ कोटी आणि शिक्षणाकरिता खर्च १२ कोटी. म्हणजे प्रत्येक माणसाच्या शिक्षणाकरिता अवघा काहीं आणे खर्च! संपत्तीचा हा अघोर अपव्यय पाहिला म्हणजे माणसाला पशूच्यापेक्षा अधिक उच्चतर समाजघटना करता आली आहे की नाही याविषयी शंका उत्पन्न होते. कलह, मारामारी, परस्पर अविश्वास हे जे पशूचे जीवन व ज्याचें वर्णन मात्स्यन्याय या शब्दांत केले जाते त्यापेक्षा अधिक उच्चतर नीतिमत्ता मानवी समाजात अद्याप दिसू लागलेली नाही सर्वस्वाचा होम करण्यापर्यंत

व्यक्तिगत नीतिमत्तेची कड पोचलेली आहे पण सामुदायिक नीतिमत्तेत अविश्वास व स्वार्थ याचे प्राबल्य प्राचीन काळाइतकेच जारी आहे. तोंडाने शांतिपाठ चालू असता हाताने नवनवी शस्त्रास्त्रें निर्माण करण्याचा जो हव्यास सर्व बलिष्ठ राष्ट्रांत आज दिसून येतो त्याचा दुसरा अर्थ काय लावावयाचा? आणि या अविश्वासाचे मूळ काय ? तर दहांना लुबाडल्याशिवाय एकाला गबर होता येणार नाही ही स्वार्थी कल्पना पण वर वर्णन केलेली उधळपट्टी बंद करता आली तर दहांना न लुबाडता सर्वांनाच आजच्यापेक्षा अधिक सुखासमाधानाने नांदता येईल इतकी संपत्ति नवरत्ना वसुधरेत साठविलेली आहे हे ध्यानी येण्यास कठीण पडणार नाही.

## धनमत्तांच्या माकडचेष्टा

काय कठीण पडेल ते एवढेंच की कांही लक्ष्मीधराच्या विक्षिप्त विलासी मर्कटचेष्टांना आळा बसेल ! समाईक मालकीच्या अमलांत रेसेसच्या घोड्याकरिता, माकडाची लग्ने लावण्याकरिता, किंवा नर्तकीच्या कटाक्षाकरिता सहज लीलेने लाखो रुपये फेकून देणारांना मात्र आपल्या कपाळावर हात मारून खिन्न व्हावे लागेल ! शास्त्रशालेंत प्रयोग करून मानवी जीवनाच्या सुखसोयींत भर टाकणाऱ्या संशोधकाला पोटापुरतें वेतन मिळावे व त्या नवीन ज्ञानाचा काळाबाजार करणाऱ्यापुढे संशोधकाला जन्मभर मिळणार नाही इतक्या संपत्तीने लोळण घ्यावी, असली विषम अन्यायी पद्धति अशक्य होईल. पण असली पद्धत नांदत राहावी म्हणून खाजगी मालकीची समाजरचना, खाजगी मालकी टिकावी म्हणून लष्कर, आणि त्याच्या जोरावर शत्रूचा संहार करतां यावा म्हणून एकेका शिपायाला मारण्याकरिता दहा हजार पौंडाचा खर्च ! पण खाजगी मालकीची बेताल चैन सोडण्याइतकी निःस्वार्थता सत्ताधीशांत उदित झाली नसल्याने ही सर्व उधळपट्टी ते स्वाभाविक म्हणूनच स्वीकारतात.

ह्या उधळपट्टीचे स्वरूप बारीकसारीक तपशिलांत देखील दिसून येतें. लष्करी खर्च हा उधळपट्टीचा एक डोळेफोड प्रकार होय. पण त्याच्याशिवाय पैशाचा अपव्यय खाजगी मालकीच्या अमदानीत अनेक रूपानें

चालू आहे. तो लक्षात येण्यास हरएक व्यवसायात जी अनर्थकारक चढाओढ व स्पर्धा चालू आहे तिच्याकडे पाहिले म्हणजे पुरे आहे एकाच जिनसाची ओळीने असलेली दहापाच दुकाने पाहा. ह्या सर्व दुकानातून एकाच प्रकारचा माल विकला जातो अर्थात् ही सर्व दुकाने एक केली तर कितीतरी बचत होणार नाही का? जेथे देण्याघेण्याची गर्दी उसळलेली असते अशी मोठ्या शहरातील नगरशेटाची दुकाने सोडली तर लहान शहरातील सर्व दुकानातील नोकराना भरपूर काम असतेच असे नाही तेव्हा अशी दुकाने एकत्र करण्यापासून बचतच होईल शिवाय जिन्नस तयार करणाऱ्या मूळ कारखानदारापासून तो तो जिन्नस वापरणाऱ्या गिऱ्हाइकापर्यंत मध्यतरी अडते, दलाल, व्यापारी जितके कमी तितका जिन्नस गिऱ्हाइकास स्वस्त पडतो. म्हणजेच तितक्या प्रमाणात त्याची निर्धनता कमी होते. दलालाचा हा वर्ग जितका मोठा तितकी मूळ किमत फुगत जाते अर्थात् कारखान्यात जिन्नस तयार करणे व तो गिऱ्हाइकाच्या हातात आणून पोचविणे ही दोन्ही कामें एकच मोठी कपनी करीत असेल तर जिन्नसाची किमत स्वल्प होईल. या न्यायाने एकच जिन्नस तयार करणाऱ्या अनेक कपन्या असण्यापेक्षा त्या सर्व समाईक मालकीच्या असतील तर गिऱ्हाइकाचा फायदा झाल्याविना राहणार नाही.

तुम्ही विचाराल रॉकेल, तेल, लोखंड वगैरे सामानाचे कारखाने अमेरिकन रॉकफेलरसारख्या धनिष्ठानी एकत्र केले होते ना ? तर मग ह्या जिन्नसा स्वस्त का झाल्या नाहींत ? याचे उत्तर असे आहे की हे कारखाने एकत्र केले जात होते हे सत्य पण ते कशाकरिता तर आपसातील चढाओढी थाबविण्याकरिता खुल्या चढाओढीमुळे दर उतरतात व फायदा कमी होतो. अर्थात् ही चढाओढ आपसात सगनमत करून गाडून टाकावी व मग आपण ठरवू तो दर अशी स्थिति उत्पन्न करून जबर फायदा उकळावा या उद्देशाने धद्याचें एकीकरण होत होते ! हेच एकीकरण व्यापारी फायद्याच्या दृष्टीने न करता राष्ट्रीय फायद्याच्या दृष्टीने केल्यास निःसशय हितप्रद होईल. उदाहरण म्हणून पोस्टखात्याचा व्यवहार पाहा. पोस्टाचा व्यवहार खाजगी व्यक्तीला किंवा कपनीला करण्याची कायद्याने मनाई आहे. म्हणजेच

हें खाते राष्ट्राचे राखीवखाते किंवा समाईक मालकीचे खाते आहे यामुळेंच काशीपासून रामेश्वरापर्यंत बातमी पाठविण्यास अवघा अर्धा पाऊण आणा खर्च येतो आणि हा सर्व आतबट्ट्याचा व्यापार आहे की काय ? तर मुळीच नाही सालोसाल या खात्यात शिल्लकच उरत असते आणि या खात्यात पगारहि इतरासारखेच आहेत. मग हे खाते किफायतशीर कसे होते ? ते होते याचे कारण या ठिकाणी किफायतीचा अर्थ व्यापारी किफायतीइतका अवाढव्य गृहित नसतो हे होय कोणत्याहि खात्याची जमा त्या खात्यातील खर्चापेक्षा थोडी अधिक असली म्हणजे ते खातें किफायतशीर समजावयाचे खाजगी व्यापारात मात्र एवढ्याने भागत नाही तेथें रोजचा खर्च भागून शिवाय हजाराचे दसहजार,दसहजाराचे दस लक्ष कसे होतील ही चिंता शेटजीला नेहमी लागून राहिलेली असते उलट पोस्टासारख्या समाईक मालकीच्या खात्यात खर्च भागला म्हणजे सपले ! फायदा होऊ लागला तर त्याचा मालक असा कोणी नसल्याने तो फायदा राष्ट्रात वाटावयाचा म्हणजे गिऱ्हाइकाला माल पूर्वीपेक्षाहि स्वस्त दराने द्यावयाचा अर्थात फायदेशाही नष्ट झाली म्हणजे कितीतरी अडून राहिलेली संपत्ति दरिद्रीनारायणाच्या चरणी वाहू लागेल.

आजची उधळपट्टी व अपव्यय याचा विचार करताना आणखीहि एक गोष्ट ध्यानी घेतली पाहिजे, ती म्हणजे आज चालू असलेली निरुपयोगी जिनसाची निपज व उपयोगी जिनसाची प्रमाणाबाहेर उत्पत्ति ही होय ! खाजगी मालकी व घातुक चढाओढ याच्या [illegible] असे होते की एका धद्यांत जरा चार पैसे कोणाला मिळू लागले की त्या धद्यात दहा माणसे एकामागून एक घुसतात व जेथें दहा गाठीना मागणी असते तेथे पन्नास गाठी तयार होऊन पडतात ! त्या सर्व खपल्या नाहीत म्हणजे त्या धद्याला अजीर्ण होतें व काही कारखान्याचे मालक या अजीर्णाच्या वाऱ्याला बळी पडतात ! आणि याचे कारण एवढेंच की अमुक एक जिन्नस राष्ट्राला हवा आहे किती याची खाजगी कपन्याना कल्पना येणे अवघड असतें हे होय तेच जर सर्व प्रमुख जिन्नसाचे कारखाने राष्ट्रीय मालकीचे झाले तर सरकारी खात्याप्रमाणे त्याचा अदाजी अदमास अजमावून तेवढ्याच प्रमाणात ते जिन्नस उत्पन्न करणे मुळीच कठीण पडणार नाही.

असो. आता या प्रकारचा प्रयोग ज्या रशिया, चीन वगैरेत सध्या चालू आहे त्याच्याकडेच वळू या.

---

## प्रकरण दहावें

# साम्यप्रयोगाच्या प्रांगणांत

'राजा कालस्य कारणम्' हे सुभाषित मागे पडून 'श्रीमान् कालस्य कारणम्' या नव्या सुभाषिताने गेल्या शतकात सिंहासन गाठले आहे. प्रत्येक पुण्योत्सवाच्या मंत्राला 'श्रीमन् महागणाधिपतये नमः' या ज्या समाजगणाच्या उल्लेखाने आपण प्रारंभ करतो तो समाजगण नामशेष अथवा मंत्रपठणशेष होऊन सहस्रावर वर्षे होऊन गेली आहेत. पृथिवीपति विष्णु हा गेली सहस्रो वर्षे गर्जून गेला. पांच वर्षांपूर्वी स्वातंत्र्योत्सवाच्या प्रसंगी पृथिवीपतीच्या स्थानी प्रजापति निवडून देऊन भारताने राज्यपद्धतीत एक पाऊल पुढें टाकले. हा प्रजापति प्रजेकडे पति या नात्याने पहाणार की, 'स पिता पितरः तासां केवलं जन्महेतवः' या कालीदासोक्तीप्रमाणे प्रजेकडे पिता या नात्याने पाहणार आहे हे आता स्वतंत्र भारताने निश्चित करावयाचें आहे. लोकशाही स्थापन झाली आहे, किंवा निदान धूर्त इंग्रजांनी देणगी म्हणून बहाल केली आहे. ती देणगी समाजाच्या अगदी खालच्या व हातातोंडावर जगणाऱ्या थरापर्यंत पोचणार की वरिष्ठ पुंजीपतींच्या पूजनांतच खर्चिली जाणार हे आता आपल्या राष्ट्राने ठरवावयाचे आहे.

काही बाबतीत आपल्या स्वतंत्र भारताने योग्य दिशेने पाउले टाकण्यास सुरुवात केलेलीच आहे. संस्थानांचे विलीनीकरण, आगगाडी, मोटारी या वाहनांचे राष्ट्रीयीकरण, अन्नवस्त्रावरील नियंत्रण, जमीनदारी आवाक्यात आणण्याची खटपट, अशा बाबतीत आपले स्वतंत्र भारत योग्य दिशेने पाउले टाकीत आहे. पण वाट अडवून बसणारा भांडवलशाहीचा प्रचंड डोंगर जोंवर निर्धास्तपणें उभा आहे तोंवर स्वतंत्र भारताला स्वातंत्र्यातील मोकळे वारे पिण्याची हौस भागली असे कोणत्या तोंडानें म्हणता येईल? तसे शब्द त्याच्या तोंडून बाहेर येण्याचे तर राहूच द्या, पण त्याच्या

उल्हसित व हसतमुख चेहऱ्यावर काळया बाजाराने काळे फासण्याचा उद्योग वाढत्या प्रमाणावर चालू झाला आहे ! त्यामुळे आपण स्वतंत्र झालो ते वाट चुकून काटेरी रानात तर आलो नाही ना आणि आपल्या चेहऱ्यावर कोळीष्टके तर माजली नाहीत ना अशा विचाराने तो आपले गाल चोळू लागला आहे. स्वतंत्र उल्हसित भारताचे ध्येय स्वप्नात राहिले नसून प्रत्यक्ष व्यवहारात उतरले आहे व लोकशाहीची मुळे समाजाच्या अगदी खालच्या थरापर्यंत पोचली आहेत हे जेव्हा त्याच्या प्रत्ययास येईल तेव्हाच धनधान्य-समृद्धिरस्तु, शातिरस्तु, पुष्टिरस्तु हे आशीर्वाद त्याला व्यावहारिक वाटू लागतील

## रशियास नजरभेट

त्या दिशेने पाउले टाकावयाची तर ज्या बलाढ्य राष्ट्रानी या मार्गाने पाउले टाकली आहेत त्यानी ती कोणत्या दिशेने व कोणत्या धोरणाने टाकली, व ती टाकीत असता त्याना कोणत्या सकटाना तोड द्यावे लागले व ते देत असता त्याच्या हातून अघोर घातपाती अत्याचार हेहि कसे घडले ह्याची तोडओळख करून घेणे आवश्यक आहे. यातील प्रमुख राष्ट्र रशिया हे होय. आजमितीला रशियाच्या जोडीला आशियातील प्रचड राष्ट्र चीन व युरोपातील रशियाला लागून असलेली पोलड, हगेरी, रुमानिया, युगोस्लाव्हिया, झेकोस्लाव्हिया, बल्गेरिया, अर्धा जर्मनी अशी अनेक राष्ट्रें रशियाच्या वाटेने बराच मार्ग आक्रमण करून गेली आहेत. ती रशियाच्या आहारी जाऊन पुनश्च परतत्र होणार की रशियाच्या मार्गदर्शनाने पण स्वतत्रपणे पाउले टाकणार हे पुढील काही वर्षांत स्पष्ट होईल युगोस्लाव्हियाचा पुढारी टिटो हा साम्यवादी असूनहि रशियाची दादागिरी झिडकारून टाकणे त्याला अवश्य वाटले यावरून व रशियातील प्रत्यक्ष परिस्थिति परकीय पाहुण्याना पाहूच दिली जात नाही अशी तक्रार चालू असल्यानें रशियातील साम्यवादाचे यथार्थ चित्र रेखाटणे कठीण होऊन बसले आहे रशियातील हुकूमशाही साम्यवादी प्रयोगावर युरोपियन भाषांतून प्रचड साहित्य निर्माण झाले आहे, होत आहे त्यातील काही सर्वस्वी रशियाची पाठ

थोपटणारे तर इतर काही पाठीत खजीर खुपसणारे आहे हे सर्व गृहित धरूनहि उद्याच्या सस्कृतीतील साम्यवादाचा एक विराट प्रयोग या नात्याने त्याचे शक्य तेवढे आकलन करून घेण्याचा प्रयत्न आवश्यक आहे साम्य-वादाचे आदर्श ध्येय प्रत्यक्ष व्यवहारात उतरण्यास अजूनही कालावधि लोटेल हे रशियाहि उमगून आहे पण साम्यवादाच्या दिशेने त्याने जी मोठी उडी मारली आहे ती निरखून घेतली पाहिजे या दृष्टीने त्याचा त्रोटक आढावा घेऊ या

रशियातील समाजवादी क्रांति ही आणखी पाच वर्षांनी म्हणजे १९५७ साली आपली चाळीशी ओलाडेल कारण तिची मुहूर्तमेढ १९१७ साली रोवण्यात आली पहिल्या महायुद्धातील विपत्तीला तोड देतानाच रशियन सैनिक त्रस्त झाले होते देशातील अर्धपोटवाल्याना पोटाची खळगी भरणे कठीण होऊ लागले होते व त्याच वेळी छत्रपति झार मात्र आपल्या इष्टमित्रामह ऐश्वर्यात लोळत होता ! या परिस्थितीचा फायदा घेऊन व जनसमूहाची नाडी ओळखून लेनिनने झारशाहीला जमिनदोस्त केले व त्याच्या आडोशाने राहणाऱ्या जमिनदार व पुजीपति याना दूर लोटून राष्ट्राची सर्व जमीन व मालमत्ता ही समाजवादी राष्ट्राच्या मालकीची जाहीरपणे पुका-रली ! त्याचबरोबर बाहेरील राष्ट्राची कर्जे भस्मसात करण्यांत आली ! या साम्यवादी प्रयोगाने अ ज विराट स्वरूप धारण केले आहे पण ते येण्यास त्याचा प्रयोग गेली तीसपस्तीस वर्षे चिकाटीने चालू ठेवणाऱ्या राष्ट्राला किती हालअपेष्टाना तोड द्यावे लागले आहे त्याचे कठोर सत्य पारखले पाहिजे, व रशिया हा युरोपखडातील सगळ्यात मागासलेले राष्ट्र असताना साम्यवादाचा प्रचड प्रयोग प्रथम रशियात कसा उमळून आला तेहि समजावून घेणे आवश्यक आहे.

साम्यवादाचा विराट प्रयोग प्रथम रशियात केला जाईल ह्याचे स्वप्न साम्यवादाचा आचार्य मार्क्स यालाहि पडले नव्हते ! त्याचा जगाला आदेश अशा प्रकारचा होता की, जगातील सर्व कामकरी मजुरानी एकजुटीने साम्य-वाद पुकारावा व सर्व जग साम्यवादी करून सोडावे पण कल्पित चित्र व प्रत्यक्ष व्यावहारिक घटना या हातात हात घालून चालत नसल्याने

साम्यवादाचा पहिला यशस्वी प्रयोग मार्क्सच्या स्वप्नी नसणाऱ्या रशियादेशात व तोहि इतर राष्ट्रातील मजुराच्या साहाय्याविना केवळ रशियन खेडुताच्या एकजुटीने म्हणजेच मार्क्सच्या कल्पनेपेक्षा अगदी भिन्न अशा पद्धतीने करण्यात आला १८४८ मध्ये मार्क्सने आपला सुप्रसिद्ध साम्यवादी जाहीरनामा प्रसिद्ध केला व जगातील सर्व राष्ट्रातील कामगारानी सामुदायिक चळवळ उभारण्याचे ध्येय त्यांचेपुढे माडले. १८४८ मध्ये राजसत्ता झुगारून देण्याचे बाबतीत फ्रान्समध्यें भाडवलदारानीहि कामगाराना प्रारभी सर्वतोपरी सहाय्य केले। पण राजसत्ता उलथून पडूनच न राहता ती कामगारवर्गाच्या हातात जाणार हे पाहताच मात्र त्याच भाडवलदारानी कामगाराशी पूर्वी केलेले हस्तादोलन झुगारून देऊन कामगारवर्गाची कत्तल करण्यासहि कमी केले नाही। यामुळें भाडवलदाराचे सहाय्य घेण्याची घोडचूक कामगाराला स्पष्ट दिसू लागली म्हणूनच मार्क्सने जगातील सर्व कामगाराना स्वत च्या हिंमतीवर एकजूट करण्याचा सदेश दिला. मात्र त्या सदेशाचा प्रयोग थोड्याच कालात प्रत्यक्ष व्यवहारात उतरलेला आपणास पहावयास सापडेल व ध्येयाचे पहिले प्रयोग इग्लड, फ्रान्स, अमेरिका अशा औद्योगिक उन्नति व सामाजिक जागृति याचा विकास झालेल्या देशात केले जातील ही मार्क्सची कल्पनाही नुसती कल्पनाच ठरली!

१८७१ त फ्रान्समध्येच साम्यवादाच्या स्थापनेचा दुसरा प्रयोग झाला पण तोहि यशस्वी होऊ शकला नाही. त्या साली जर्मनीने फरान्सवर स्वारी करून पॅरिसला वेढा दिला असतां भाडवलदारानी काय केले तर नाक मुठीत धरून शत्रूला शरण जाण्याचा मार्ग स्वीकारला. या शरणागतीने चिडून जाऊन पॅरिस कामगारानी आपली सघटनाशक्ति पणास लावली. पण त्याचे पर्यवसान काय झाले? तर कामगार समाजाला आपल्या हजारो कामगाराची कत्तल उघड्या डोळ्यांनी पहावी लागली। म्हणजे १८४८ सालच्या पहिल्या प्रयोगाप्रमाणे १८७१ चा दुसरा प्रयोगहि फरान्समध्यें अयशस्वीच ठरला

इग्लडमध्यें एक ध्येयवादी गिरणीचालक ओवेन याने १८१५ च्या सुमाराइतक्यापूर्वी कामगाराना उच्च पातळीवर आणण्याचा प्रयोग केला व

तो त्याच्या कारखान्यापुरता बराच यशस्वीहि झाला त्याचबरोबर पार्लमेंट-मध्ये कामगाराच्यातर्फे हिरीरीने दावा माडून त्याचे कामाचे तास कमी करणे, लहान मुलाना कामावर जुपण्याची बदी करणे वगैरे ठराव या ओवेनने मोठ्या चिकाटीने कायद्यात ओवून घेतले साम्यवादाच्या दृष्टीने एवढी पाउले पुढे टाकण्यातहि त्याने जी चिकाटी व धैर्य प्रकट केले त्यामुळे त्याचे नांव चिरस्मरणीय झाले आहे. उतार वयात त्याने अमेरिकेतहि कामगाराना अनेक सवलती व स्वातत्र्य देण्याचा प्रयोग केला पण तेथे तो इग्लडमधल्या इतकाहि यशस्वी झाला नाही आणि धर्मावर हल्ले करताच त्याची लोकमान्यताहि ओसरू लागली.

साम्यवादाचा प्रयोग शेवटी यशस्वी झाला तो अगदी अकल्पित अशा देशात म्हणजे रशियामध्ये १८७१ मधला फ्रान्समधील क्रातीचा अदाज चुकल्यानतर पुढील वर्षी १८७२ मध्ये मार्क्स व एजल्स यानी आपल्या जाहीरनाम्याच्या नव्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत लिहिले आहे की, परिस्थिति बदलली असली तरी सामान्य तत्वे कायमच आहेत दहा व पधरा वर्षांनी म्हणजे १८८३ व १८८८ साली एजलसने जाहिरनाम्याच्या नवीन आवृत्त्या काढल्या त्यावेळीहि पहिला प्रयोग रशियात होईल याची त्यालाहि कल्पना नसावी. कामगार सघटनेची हीच स्थिति! १८६४ साली इग्लडमध्ये पहिली जागतिक कामगार सघटना स्थापन झाली व त्यात युरोपातील कामगार वर्गाचे पुढारी विचारविनिमयाकरिता एकत्र आणण्याचा पहिला प्रयोग करण्यात आला पण फ्रान्समधील क्रातिकारकाना चिरडून मारून टाकून भाडवलदारानी जी सत्ता काबीज केली त्या सत्तेपुढे टिकाव धरण्याचे चिन्ह लोपत चालल्याने १८७४ साली जागतिक कामगार सस्था सपुष्टात आली तथापि साम्यवादाचे ध्येयच सपुष्टात आले असे झाले नाही, हे मात्र स्पष्ट नमूद केले पाहिजे. त्या ध्येयाचा ध्यास घेतलेले व त्याकरिता आपल्या बौद्धिक व शारीरिक श्रमाची पराकाष्ठा पणास लावणारे पुढारी युरोपखडातील अनेक देशात विखुरलेले होते, पण त्यापैकी प्रथम यशस्वी होणाऱ्या प्रयोगाची कडक योजना स्वीकारून का होईना पण यशस्वी होण्याच्या पहिल्या प्रचड प्रयोगाची मुहूर्तमेढ कोठे रोवली गेली तर युरोपात सर्वांत मागासलेल्या रशियात हे आश्चर्य!

## साम्यवादाची मुहूर्तमेढ

ही साम्यवादी मुहूर्तमेढ अचानक आकाशातून खाली पडली ती रशियन भूमीत खोल शिरली असला प्रकार मात्र नव्हे कामगार संघटना इतर देशाप्रमाणे रशियात सुसंघटित झालेली नव्हती, यामुळे साम्यवादाचा पहिला प्रयाग रशियात अवतरेल याची कल्पना मार्क्सला तरी कशी येणार? पण रशियात समाजाच्या निराळ्या थरात असंतोष धुमसत होताच. तो निराळा थर कामकऱ्याचा नव्हे तर शेतकऱ्याचा पहिल्या महायुद्धाच्या शेवटी व त्या युद्धामध्ये अनेक हालअपेष्टांशी झगडणाऱ्या लोकामध्ये जी जागृति झाली, त्या जागृतीने शेतकरीवर्गामध्ये धुमसत असलेल्या अग्नीने प्रचंड पेट घेतला व त्या ज्वालानीच बाहेर युद्धाच्या प्रचंड अग्निकुंडात सैनिकांचे बळी दिले जात असता आपल्या प्रासादात चैनीत लोळणाऱ्या नृपतीची आणि एजीपतीची जाळून राख केली

जगाच्या इतिहासात साम्यवादाचा विराट असा हा रशियातला पहिलाच प्रयोग होय पहिल्या प्रयोगात अनपेक्षित अशा अनेक संकटाना धडाडीने तोंड द्यावे लागते आणि अशा धडाडीने अग्नि पेटवताना वाळलेल्या बरोबर ओलेहि जाळले जाणे अपरिहार्य होऊन बसते तसा प्रकार रशियातहि घडला अंदाधुंदी माजली, फाटाफूट झाली, साम्यवादाचे स्वप्न प्रत्यक्षात उतरविण्याकरिता ज्यानी खांद्याला खांदा लावून शत्रूशी लढण्यात हालअपेष्टा सोसल्या त्यांच्यात मनभेद उत्पन्न झाल्यावर मित्रत्वाच्या नात्याने गळ्यात गळा घालणारांनी परस्पराचे गळे कापण्यासहि कमी केले नाही हे नमूद केले पाहिजे पण काही प्रमाणात क्रौर्य स्वीकारून का होईना साम्यवादाचा प्रयोग रशियात यशस्वीपणे करण्यात आला, इतकेच नव्हे तर दुसऱ्या महायुद्धात जर्मनीने अल्पावकाशात गरुडभरारी मारून मास्कोची म्हणजे रशियाची मान छाटण्याचा जो प्रयत्न केला त्याला यशस्वी रीतीने तोंड देऊन उलट त्या जर्मनीचीच जरासंधाप्रमाणे आपादमस्तक चिरफाड केली व एक भाग आपल्या काबूत कोंबून टाकला हेहि विसरता उपयोगी नाही हा प्रयोग तेवढ्यावरच न थांबता साम्यवादाची पाउले दिवसेदिवस सर्व दिशानीं पुढे पडत चालले शीं आपण पहातच आहोत. आणि आज तर युरोपांतील

अर्धा भाग व आशियाखंडातील जवळ जवळ तीनचतुर्थांश भाग साम्यवादी शासनपद्धतीने पाउले टाकीत आहे

सध्याचा हा प्रचंड विस्ताराचा साम्यवादी प्रयोग हुकुमशाहीच्या दडपणाखाली अद्याप वावरतो आहे ह्याची आठवण मात्र ठेवलीच पाहिजे. आणि रशियासारख्या कणखर साम्यवादी राष्ट्राने साम्यवादाचे जू दुसऱ्या राष्ट्रावर बळजबरीने लादण्याचा साम्राज्यवादी प्रयोग केल्यास तोहि आपण झिडकारला पाहिजे हे सांगावयास नकोच. युगोस्लाव्हियाला रशियाच्या असल्या अन्याय्य दडपणामुळेच रशियाचा हात झिडकारावा लागला असा खुलासा युगोस्लाव्हियाचा साम्यवादी पुढारी टिटो याने जगापुढें उघडपणे मांडला आहे मात्र तो खुलासा मांडताना साम्यवाद त्याने झिडकारला नाही हे महत्त्वाचे आहे. राजेशाहीपेक्षा लोकशाही ही राज्यसोपानातील पुढची व वरची पायरी म्हणून आज आपल्या स्वतंत्र भारताने मान्य केलीच आहे व तिचे नुसते काल्पनिक चित्र उगाळीत न बसता सस्थाने खालसा करून त्या उच्च पायरीवर भारताने आरोहण केलेच आहे. त्याच न्यायाने व विचारसरणीने जागतिक राजकारणाचा सूर ओळखून व नुसता सूर ओळखून एवढेंच नव्हे तर शासनसस्था सुधारण्याच्या प्रगतिपथावरील दोन पाउले पुढे टाकण्याच्या दृष्टीनेहि साम्यवादाचा आपल्या परिस्थितीला व परंपरेला अनुसरून उघडपणे स्वीकार केला पाहिजे. साम्यवादाच्या दिशेने पाउले टाकीत असताना ज्या रशिया, चीन वगैरे राष्ट्रांनी गेल्या पांच पंचवीस वर्षांत बरीच मोठी मजल गाठली आहे त्याचे विहंगमावलोकन अवश्य असल्याने त्याकडेच आता वळू

## साम्यवादाचा विराट प्रयोग

साम्यवादाचा प्रचंड विराट प्रयोग काहीशी कठोरवृत्ति स्वीकारून का होईना पण यशस्वी रीतीने उरकण्यात आला तो रशियामध्यें. हा प्रयोगाचा वणवा प्रथम रशियात पेटेल याची कोणाला नीटशी कल्पना नव्हती आणि पेटला तरी लवकरच विझून जाण्याऐवजी उलट दुसऱ्या युद्धाच्या ज्वालेने तो अधिक भूप्रदेश व्यापून टाकील हे तर ध्येयसृष्टीत वावरण्यासारखेंच

होते. मात्र रशियात पेटलेला भडाग्नि अगदीच अवचितपणे पडणाऱ्या आकाशातील उल्केप्रमाणे उपटसुंभाने आलेला नसून त्या वणव्याचा मागोवा घेत चालले असता त्यामागील पन्नास पाउणशे वर्षे तो धुमसत होत हे दिसून येते. मागसलेल्या पण आतून धुसफुसत असणाऱ्या रशियन जनतेच्या मनाला प्रखर तडाखा कोणी दिला असेल तर तो जपानने. बुद्धाची जपमाळ ओढणारा, रानटी म्हणून समजला गेलेला आणि रशियासारख्या प्रचंड अजगरी देशापुढें उदराएवढा लहान दिसणारा जपान हा रशियाशीं दोन हात करण्यास पुढें सरसावेल याची कल्पना तरी कशी येणार? पण जपान नुसता पुढे सरसावला एवढेच नव्हे तर त्याने प्रचंड अजगरावर मुसंडी मारण्यासहि कमी केले नाही! अशा स्थितीत रशिया गाल चोळून पाहू लागला नसता तरच आश्चर्य! शिवाय त्या सुमारास रशियात काही गिरण्याहि सुरू झाल्या होत्या, जमीनदार शेत कसणारांना पिळून काढत होते व काहीं ठिकाणचे शेतकरी जमीनदारांना हाकलून लावीतच होते. या सर्वांचा सामुदायिक परिणाम म्हणून रशियातील गिरणी कामगारानी १९०५ मध्ये संप पुकारला व त्याला तोंड देण्याकरिता झारला पार्लमेंटच्या पद्धतीची ड्यूमा लोकशाही स्थापन करावी लागली मात्र हा प्रयोग लोकांच्या दडपणाखाली केला असल्यामुळें जरा स्थिरस्थावर होताच ती संस्था दडपून टाकण्यास त्याने कमी केले नाही आणि लेनिनच्या थोरल्या बंधूस तर फासावर लटकवण्यासही मागें पाहिले नाही यामुळे क्रांतिवादी पुढाऱ्यांना सैबेरियांत डांबून ठेवले जाणे टाळावयाचे असल्यास गुप्त रीतीने युरोपमध्ये पळ काढणे एवढाच मार्ग उरला होता. तोच पत्करून लेनिन स्वित्झर्लंडमध्यें पळून गेला.

तेथे रशियातील अनेक तरुण विद्याभ्यासाकरितां येत असत, त्यांच्या मनात युरोपातील स्वतंत्र वातावरणाने क्रांतीची बीजें पेरलीं जात होतीच. त्याकडे लक्ष जाताच या विद्यार्थ्यांना परत येण्याबद्दल झारने सक्तीने हुकूमहि सोडला व तो अमलांतहि आणण्यांत आला पण त्या युवकांच्या मनांत रुजलेलीं क्रांतीची बीजें करपलीं गेली नसून पहिल्या महायुद्धाच्या शेवटीं देशांतील गरिबांवर हालअपेष्टांचा वर्षाव होताच तीं बीजें जोमानें

अंकुर फुटून त्यानी क्रातीचे रान देशभर उठविले. त्याचाच परिणाम १९१७ साली जागतिक युद्धातील आपत्तीने हैराण झालेल्या सैन्याने झार बादशहाला व शाहीला खतम् करून कामकरी शेतकरी याच्या साम्यवादी राज्याचा झेंडा बळकट रीतीने रोवला हा होय

स्वित्सर्लंडमध्ये रहात असलेल्या लेनिनच्या कानावर ही वार्ता जाताच तो तडाख्याने निघून रशियात आला व तोच रशियाच्या क्रातिकारकाचा कर्णधार बनला. अशा पुढाऱ्याच्या अगी दृष्टीची विशालता आणि ध्येय प्रत्यक्षात उतरविण्याकरिता निरनिराळे प्रयोग हाताळण्याची काहीशी कठोर धिटाई ही दोन्ही असावी लागतात ह्या दोन्हीहि वृत्ती लेनिनमध्यें उत्कटत्वाने एकवटलेल्या होत्या म्हणूनच त्याने आपले साम्यवादी प्रयोग धुमधडाक्याने सुरू केले पहिल्या तडाख्यासच त्याने जाहीर केले की, सर्वत्र खाजगी समजली जाणारी सपत्ति यापुढे राष्ट्रीय मालकीची म्हणून समजली जाईल व उपयोगात आणली जाईल. एवढयावरच न थाबता परकीय देशातील धनिकाचे जे धन रशियात गुतलेले होते ते सर्वच्या सर्व रशियाच्या सरकारी खजिन्यात जमा करण्यात आले व त्यापैकी एक पैचीहि परतफेड करण्यात येणार नाही असा जाहीरनामा पुकारण्यासहि त्याने मागे पाहिले नाही.

या प्रकाराने आधीच साम्यवादाची धास्ती घेतलेली राष्ट्रें चडफडून फणा काढून उठली व त्यानी चारपाच वर्षे रशियाला अनेक बाजूनी टोले मारून नेस्तनाबूत करण्याचे प्रयत्न केले. पण प्रचड रशियाचा अजगर या सर्वांना पुरून उरला. एवढेच नव्हे तर दुसऱ्या महायुद्धात पूर्व जर्मनीपर्यंतच्या काही छोटया राष्ट्राना त्याने मोठा वळसा घालून आत्मसातहि केले गेल्या दोनचार वर्षांत तर चीन पाठीशी घालून आजच्या जगातील दुसरे एकमेव सामर्थ्यशाली राष्ट्र जे अमेरिका त्याच्या पुढें उघडपणे दड थोपटून राहण्यास रशियाने कमी केलेले नाही !

असले सामर्थ्य सुखासुखी प्राप्त होत नसते ते हस्तगत होण्याला अनेक संकटाना तोड द्यावे लागते. परकीयाशी उघडपणे लढावे तर लागतेंच, पण आपसातील फाटाफुटीनाहि कठोरपणे चिरडून काढावे

लागते आपल्याबरोबर खाद्याशी खादा देऊन स्वातंत्र्यप्राप्तीकरिता झगडणाऱ्यावरहि स्वत चा एकच पक्ष बलिष्ठ करण्याच्या दृष्टीने गोळी झाडण्यास समति द्यावी लागते हे इथातील कठोर सत्य आहे. लेनिन स्टालिन यानीहि तेच कठोरपणे स्वीकारले. लेनिनच्या हाती सत्ता जाताच त्याचा काटा उपटून काढण्याकरिता युरोपातील प्रमुख भाडवली राष्ट्रानी चग बाधला रशियाभोवती कडोळें उत्पन्न केले. त्याचा परदेशाशी सबध व व्यापार तोडून टाकला, व आज ना उद्या उपासमारीला कटाळून जनतेच्या असतोषाचा लोळ पेटेल व त्यातच साम्यवादी रशिया आपणहून जळून खाक होईल याची वाट पहात ती राष्ट्रें आवतीभोवती फेऱ्या मारीत बसली! अशी बाह्य स्थिति व खुद्द रशियासारख्या खडप्राय देशात अनेक भाषिक अशा निग्रो, मुसलमान, टार्टर व युक्रेनियन भाषा बोलणाऱ्या तीन कोटीचा प्रचड जनसमुदाय! या सर्वांना एकसूत्रात गुफणे व हाडीमाशी पिढ्यान् पिढ्या सावकारी व्यवहाराशी एकरूप झालेल्या यहुदी जनतेला काबूत ठेवणे अशा खडतर अरण्यातून मार्ग काढावयाचा होता अशा स्थितीत भरीस भर म्हणून १९२१ साली दुष्काळाने उग्र स्वरूप धारण केले तेव्हा साम्यवादी प्रयोग भस्मसातच व्हावयाचा! पण तो त्यातूनहि तो तावून सुलाखून बाहेर पडला व स्वत च्या पायावर उभा राहिला याचे श्रेय लेनिनची ध्येयवादी व्यापक दृष्टि ही व्यवहारवादी धोरणहि विसरली नव्हती हें होय

साम्यवादाचा १९१७ साली जेव्हां प्रथम झेंडा उभारण्यात आला तेव्हा सर्वच सपत्ति राष्ट्राची ठरवून व्यक्तीला स्वत.च्या मालकीचे असे काही ठेवलेच नाही. बाजारात खरेदीविक्री नाही की आगगाडीतून प्रवासाला तिकीट नाही. पण १९२१ सालचे दुष्काळाचे भीषण स्वरूप पाहताच त्याला तोड देण्याकरिता आपल्या कल्पित ध्येयाला मुरड घालून काहीं छोटया प्रमाणावर खाजगी व्यापार करण्यास व आगगाडीची तिकिटें विकण्यास लेनिनने मुभा दिली. १९२५ सालीं शेतकऱ्याना आपली खाजगी शेते १२ वर्षे कसण्याची परवानगी देण्यात आली. हा खाजगी व्यापार व शेती हळू हळू मूळ धरूं लागलेला पहातांच मात्र लेनिनने त्यावर पुन्हां

नवीन नियंत्रणे बसविण्यासहि मागे पाहिले नाही सर्व बँका तर सरकारच्या खजिन्यात सामील करण्यात आलेल्याच होत्या व मोठ्या उद्योगधंद्याचें राष्ट्रीयीकरण करण्यातहि कसूर केलेली नव्हती पण अल्प प्रमाणातील खाजगी व्यापारालाहि पुनश्च मुरड घालण्यात लेनिनने कसूर केली नाही.

## स्वैराचाराचा निषेध

नवा प्रयोग सुरू झाला अथवा नवे तत्त्वज्ञान माडले गेले म्हणजे त्याचा अतिरेकहि करण्यात येतो त्यावेळी अवसान राखून त्याला प्रतिबध घालणे आवश्यक ठरते झारशाहीमध्यें स्त्रियाची स्थिति 'पतिकुले तव दास्यमपि क्षमम्' या शकुतलेला उपदेशलेल्या तत्त्वानुरूप होती हा प्रकार नुसता रशियातच रूढ होता असे नव्हे तर रशियापेक्षा अनेक बाबतीत पुढारलेला म्हणून मिरविणाऱ्या इग्लडातहि होता. १८८२ पर्यंत पत्नी ही पुरुषाची खाजगी मालको असे कायद्याने मानले जात असून तिला स्वत ची मिळकत काडीचीहि नसे पार्लमेंटमध्ये सभासद होण्याचा तर राहू द्या पण मत देण्याचा किंवा वकिलीसारखा धदा चालविण्याचेहि स्वातंत्र्य देण्यात आले नव्हते या हक्काकरिता स्त्रियाना झगडावे लागले मग ते हक्क मान्य करण्यात आले पहिल्या महायुद्धानतर साम्यवादाच्या पुरस्कर्त्यांना या स्त्रियावर लादण्यात आलेल्या बधनाचीहि चीड आली असल्यास नवल नाही खुद्द मार्क्सने आपल्या जाहिरनाम्यात स्त्रीपुरुषावरील सर्व बधने झुगारून देऊन त्याना मुक्त करावे असे स्पष्ट प्रतिपादिले पण असल्या तत्त्वाचा दुराचारानें अतिरेक करण्यात सार्थक मानण्याचा देखावा जेव्हा लेनिनने पाहिला व या निरर्गल स्वैर वृत्तीने राष्ट्राचे बल व सामर्थ्य खच्ची झाल्यावाचून राहणार नाही हे जेव्हा त्याला मनोमन पटले तेव्हा त्याने मार्क्सला दुरून नमस्कार करून सयमाचा उपदेश करण्यास कमी केले नाही लेनिनच्या आठवणी लिहिणाऱ्या क्लॅरा झेटकिन् हिने हे नमूद करून ठेवले आहे.

पण याहिपेक्षा कठोरपणा स्वीकारावा लागतो तो आपल्या विशिष्ट पक्षाचे व मताचे वर्चस्व टिकविण्याकरिता. कालपर्यंत सहकारी म्हणून आपणाबरोबर हालअपेष्टा सोसणाऱ्या आपल्याच मित्राला हद्दपार करावा

लागावा किंवा गोळी घालावी लागावी यापेक्षा अधिक निष्ठुर झगडा तो कोणता ? तोच झगडा लेनिनच्या खाद्याला खादा लावून झगडणाऱ्या ट्रॉट्स्कीशी स्टालिनला द्यावा लागला शेवटी ट्रॉट्स्कीला हद्दपारहि करण्यात आले, इतकेच नव्हे तर बुखारीनसारख्या काही थोर सहकाऱ्याना यमसदनासहि धाडण्यात आले

असाच प्रकार अन्य राष्ट्रातहि घडलेला आढळून येतो त्यापैकी आयर्लंडमधील डी व्हॅलेराच्या जीवनातील एक प्रसग हृदयस्पर्शी आहे पहिल्या जागतिक युद्धानतर आयर्लंडला स्वातत्र्य अर्पण करण्यात आले. पण ते निर्भेळ स्वरूपाचे न देता शबल स्वरूपाचे देण्यात आले ज्याचा या शबल स्वरूपाशी प्रामाणिकपणे विरोध होता त्याच्यात व शबल स्वातत्र्य मान्य करणाऱ्यात दुफळी उत्पन्न झाली तिचा जो कठोर प्रतिकार डी व्हॅलेराला करावा लागला त्यात पूर्वीच्या एका विश्वासू अनुयायाला ठार मारण्याचे कटु निर्घृण कृत्य त्याला स्वत. उघडचा डोळ्यानी पाहावे लागले ! तुरुगात डाबून ठेवलेल्या आपल्या या अनुयायाला गोळी घातल्याचे वृत्त कानी येताच व्हॅलेराच्या डोळ्यातून अश्रुधाराचा पूर वाहू लागला व थोड्या वेळात त्याचे देहभानहि हरपून तो मूर्च्छित होऊन पडला म्हणे पण या प्रकरणात याहिपेक्षा कठोर उज्वलतेचे तेज उठून दाखविणारा शेवटचा भाग असून तो म्हणजे ज्याच्यावर गोळी घालण्यात आली त्याने आपल्या मृत्युपत्रात डी व्हॅलेराविषयी लिहून ठेवले आहे तो होय तो लिहितो कीं कर्तव्यपालनाकरिता मित्राला गोळी घालण्यासहि तू माघार घेतली नाहीस हें पाहून व्हॅलेरा, तुझ्याविषयीं माझा आदर वाढलेला असून माझी सर्व मालमत्ता मी तुला देऊन टाकीत आहे !)

१९२९ साली युक्रेनियामध्यें बड उभारले जाऊन शेतीची नासाडी करण्याचा प्रकार उघडकीस आल्यावर तेथील अनेकावर बदुका झाडण्यात आल्या व डॉक्टर, वकील, शास्त्रज्ञ वगैरेना हद्दपारीची शिक्षा देण्यात आली आज रशिया हे जगातील एक प्रमुख राष्ट्र म्हणून श्रेष्ठ पदवीस चढले आहे त्याच्या मार्गे तें सुखासुखी चढले नसून अनेक विरुद्ध शक्तीना धिटाईनें व जरूर तेथें कडकपणें तोंड देऊन धक्केबुक्के देतघेत वर चढले आहे

हे लक्षात ठेवले पाहिजे सुखासुखी क्रांति घडून आली किंवा निश्चितपणें विकास होत चालला तर तो कोणास नको? पण अशी क्रांति झाल्याची साक्ष इतिहास देऊ शकत नाही इंग्लड व फरान्समध्ये राजेशाहीला मार्गे टाकून लोकशाही राज्यपदारूढ झाली ती राजाला फाशी देऊन, सुखासुखी लोकमताचा कौल घेऊन नव्हे! चारपाच वर्षांपूर्वी इंग्रज आपणाला स्वराज्य बहाल करून हास्यमुखाने हस्तांदोलन करीत निघून गेले त्यात इंग्रजाची व्यापक दृष्टि व धूर्तता उठून दिसण्यासारखीच होती हे मान्य पण मूळ घर सावरण्यास मनुष्यबळ थिटे पडू लागल्यानेच येथून पाय काढला व जाता जाता मुसलमानाना पाकिस्तान अर्पण करून व संस्थानिकाना स्वातंत्र्य देण्याच्या मिषाने कलहबीजे पेरण्याचा उपक्रम करण्यास ते चुकले नाहीत हे आपण विसरता कामा नये पैकी पाकिस्तानने स्वराज्य मिळाल्याच्या मध्यरात्रीच वैराचा अग्नि पेटविला व सुखासुखी दान म्हणून मिळालेल्या स्वातंत्र्याला कठोर धक्का देण्यास कमी केले नाही आणि हैद्राबादला अचानकपणे सर्व बाजूनी गराडा घालून नाक घासण्यास लाविले नसते तर स्वातंत्र्य अर्पण करून जात असता इंग्रजानी भारताच्या पोटात जो खंजीर खुपसून ठेवला होता त्याने स्वतंत्र भारताचे धिडवडे झालेले जगाला पहावयास मिळाले असते. पाउलापाउलाने धिमेपणाने जाऊन शिखर गाठता येत असते तर मुद्दाम न झेपणाऱ्या उड्या मारून गुडघे फोडून कोण घेईल? हैद्राबादच्या बाबत, धिमेपणाचे चुचकारण्याचे प्रयत्न झाले नाहींत असे नाही पण ते यशस्वी होण्यासारखे नाहीत, उलट परिस्थिति ही भीषण होत असल्याची खात्री पटताच सुसज्ज सैन्याने चोहोकडून अचानक वेढा घालून निजामास हतबुद्ध केले. अशा प्रसंगी शांततेला डावलण्यात, तिचा अपमान करण्यात आला काय याचा वाचकानी शांत चित्ताने विचार करावा. अर्थात् अशा स्थळी झगडा हा अपरिहार्य होतो फक्त तो झगडा जितका सौम्य करतां येईल तितका सौम्य करण्याचा प्रयत्न करावा. महाभारतयुद्धाचे समयी श्रीकृष्णाची हीच भूमिका होती. शिष्टाई वगैरेच्या भानगडीत न पडता युद्धाला सरळ आव्हान द्यावे असे म्हणणारा पांडवांच्या बाजूचा एक पक्ष होता. पण श्रीकृष्णाने त्या सर्वांची समजूत घालून

कौरवाच्याकडे आपण होऊन जाऊन स्वतःला पकडले जाण्याचा धोका पत्क-रूनहि शिष्टाईचे सर्व प्रयत्न करून पाहिले पण ते फसल्यावर मात्र अर्जुनाचा सारथी होऊन स्वबांधवावर तीर सोडण्यास त्याचे मन कच खाऊ लाग-लेले दिसताच त्याला षंढ म्हणून हटकून व त्याच्या नीतिशंकाचे निरसन करून श्रीकृष्णाने त्याला युद्धाला प्रवृत्त केले कौरव पांडवाचे युद्धाने असंख्य लोकाना भस्मसात् केले तसाच काहीसा प्रकार रशियातहि झाला

या संबंधातील सर्वांत कठोर प्रयोग राष्ट्रातील प्रचंड शेतकी ही राष्ट्राच्या सामुदायिक मालकीची करण्याचा होय या प्रयोगातील अत्यंत अनपेक्षित अनुभव म्हणजे शेतकऱ्याच्या वृत्तीत घडलेली अचानक कलाटणी ही होय. जमिनदाराच्या-कुलाकाच्या जबरदस्त खंडणीने शेतकरी त्रस्त झाले होते व जमिनदाराला पिटाळून लावण्याचे व त्याची शेतवाडी लुटन आपल्या हाती घेण्याचे प्रयोगहि मधूनमधून झारशाहीच्या अमलातहि सुरू होतेच. अशा स्थितींत जमिनदाराची सत्ता झुगारून देऊन सर्व शेती कसणाऱ्याच्या हाती देण्यात आली तेव्हा या अकल्पित दानाने शेतकरी बेहोष खूष होऊन बळिराजाला धन्यवाद देण्यात रंगून झिंगून गेले असले तर यात नवल कसले?

## शेतकऱ्यांचा धिंगाणा

पण या झिंगण्यामुळे जो तडाखा त्याना खावा लागला तो मात्र अगदीं अचानक होता म्हणजे झाले असे की, कसेल त्याची जमीन या तत्त्वाचा पुरस्कार करतांच शेतकरी रंगून गेले पण या तत्त्वाची दुसरी बाजू जेव्हां घशात उतरविण्याचा प्रयत्न करण्यात आला तेव्हा ते हतबुद्ध होऊन कपाळा-वर हात मारून घेऊ लागले जमिनीच्या मालकीची दुसरी बाजू म्हणजे स्वतःच्या कुटुंबापुरते धान्य स्वतःसाठी ठेवून उरलेले धान्य राष्ट्राच्या हवाली करावयाचे हे होय! दुष्काळाने उग्र स्वरूप धारण केल्यावर तर स्वत.च्या कुटुंबापुरतेच धान्य राखून ठेवण्याच्या या पद्धतीवर कठोर सक्तीहि कशी लादण्यात आली असेल याची कल्पना करणें कठीण नाही त्या सक्तीचा परिणामहि झालाच. तो म्हणजे साम्यवादाच्या निशाणाखाली ज्या शेतकऱ्यानी धनिक कुलाकांच्या जमिनी हस्तगत केल्या त्याना त्या सार्वजनिक

मालकीच्या होत्या हे तत्त्व मात्र मुळीच पचविता आले नव्हते हे उघड झाले ! खायला वखवखलेल्याला किती खाऊ असे न झाले तरच नवल ! साम्य-वादाचा प्रयोग हा अवास्तव तुडुंब पोट भरण्याचा नसून सर्व जनतेला आवश्यक तेवढें अन्न देण्याचा होता पण हे कटु सत्य गिळणे खऱ्या साम्य-वादाची कल्पना नसणाऱ्या खेडुताना कसे झेपणार ? अर्थात् १९३०–३१ च्या दुष्काळाला तोंड देण्याकरिता प्रत्येक शेतकऱ्याकडून जबरदस्तीने धान्य घेण्याची मोहीम सुरू करावी लागली त्याचा परिणाम असा झाला की, मोठ्या मोठ्या जमीनदाराची हकालपट्टी करून साम्यवादाच्या निशाणाखाली जे छोटे जमीनदार शेतकरी पुढे सरसावले होते तेच शेतकरी आता आपल्या पोटापुरतेच धान्य ठेवण्याची सक्तीची लाट आपल्यावर उसळलेली पाहतांच हतबुद्ध झाले ! आणि त्याचा परिणाम काय झाला ? तर राजेशाहीला ठार मारणाऱ्या शेतकऱ्यानी साम्यवादी सत्ताधीशाच्या या धोरणाला कडाडून शिव्याशाप देऊनच न थाबता आपली गुरेढोरे सरकारच्या हाती जाऊ नयेत म्हणून स्वत च्या हातानी त्याना ठार मारून टाकण्यास मागे पाहिले नाही ! या सतापात किती गुराढोराना यमसदनाला पाठविले याची एकाने आकडेवारी दिली आहे ती म्हणजे शेकडा ५० गायी, ४६ घोडे, ४६ डुकरे, ३५ मेंढ्या वगैरे साम्यवादाच्या शत्रुस्थानी असणाऱ्या राष्ट्रातील हेरानीहिं शेतकऱ्याना शेतीची नासाडी करण्यास भर दिली. युक्रेनियनमध्ये हा प्रकार मोठ्या प्रमाणावर झाला. याला कडक प्रतिकार म्हणून अशानाअन्न तोडून, पाणी तोडून सक्तीने उपासमारीच्या तोंडात लोटून देण्याचा अघोर उपाय योजण्यास सत्ताधीशानी कमी केले नाही.

शेवटीं या आपत्तीतून साम्यवादी सत्ता जेव्हा बाहेर पडली तेव्हा या अन्नधान्य प्रश्नाचा एकदा कायमचा निकाल लावण्याचा जो प्रश्न त्याच्यापुढे उभा राहिला त्याला साम्यवादी सत्ताधीशानी धडाडीने व कठोरपणे तोंड देण्यास मागें पाहिले नाहीं या प्रसगी त्यानी खाजगी मालकीचा हक्क साग-णाऱ्या लहानमोठ्या सर्वांवरच साम्यवादाचे हत्यार उपसले. काही लोक शेती सोडून खेड्यातून पळ काढून शहरांतील कामकऱ्यात मिसळले, पण अशा रीतीने न मिसळता जे ताठर राहिले त्याना एकजात प्रचड सख्यने

आगगाडीत कोबून सैबेरियाच्या वाळवटात सक्तीने कामास जुपले. त्यापैकी कितीजण वाटेतच प्रेते होऊन फेकून दिले गेले असतील, सैबेरियातील हवा जिव्हारी बसल्याने कितीनी प्राण सोडले असतील, व कितीना सक्तीने कष्टाच्या कामी माना मुरगळून घ्याव्या लागल्या असतील त्याचा खुलासा जगापुढें केव्हा येईल तो येवो आज तरी तो ताबडचा थडग्यात पुरलेला आहे. या बाबतीत रशियातील साम्यवादी प्रयोगाकडे सहानुभूतीने पहाणाऱ्या वयोवृद्ध वेब दापत्याचा अभिप्राय वाचला तरी पुरे 'सोवियट कम्युनिझम्' या ग्रथात ने लिहितात की, या शेतीच्या राष्ट्रीयीकरणाच्या प्रयोगात मानवतेने किती हालअपेष्टा सोसल्या याची गणती करणेच अशक्य (The sum of human suffering involved is beyond all computation p. 567 We have no wish to minimise, still less to justify this ruthless expropriation and removal of the cultivators who were stigmatised as kulakas p. 571) देशातील अडीच कोटी शेतकऱ्यापैकी कुलाक जमिनदार जे होते त्या दहा लाखाना सक्तीने हद्दपार करण्यात आले एवढे सागितले म्हणजे सक्तीच्या उपायाच्या कठोरपणाची कल्पना येईल. उत्तर समुद्रातील किनाऱ्यावर व बेटावर हजारो कैद्यांना कोडल्याची व हालहाल केल्याची जेव्हा जागतिक ओरड झाली तेव्हा त्याची चौकशी करणारी समिति नेमली, (१९३०) पण तिचा अहवाल मात्र प्रसिद्ध करण्यात आला नाही ! त्या अहवालात कोणत्या भीषण कृत्याचा उल्लेख असेल याची कल्पना येण्याकरिता एवढे सागितले म्हणजे पुरे की हा अहवाल जरी प्रसिद्ध करण्यात आला नाही तरी या चौकशीनतर वरील समुद्रकिनारी व बेटावरील तुरुगाच्या ओव्हरसियर व वॉर्डरपैकीं अनेकाना तेथून उचलण्यात आले आणि अनेकाना फाशी देण्यात आले. अनेक अधिकाऱ्याना फाशी देण्यात आले यावरून त्यांनी किती शेंकडो, हजारो लोकाना क्रूरपणे यमलोकात हाकलून दिले असतील याची कल्पना येईल. मात्र हे काम वाचकाच्या कल्पनेवर सोपविलेले आहे कारण खरी हकीगत कटाक्षानें गुप्तच राखण्यात येत आहे (How

many special places of detention have been maintained is a carefully guarded secret–Webb p 585) सोव्हियट रशियाच्या साम्यवादी प्रयोगातील अत्यत काळाकुट्ट व आततायी भाग हा होय.

काही अधिकाऱ्याना जसे फाशी दिले तसे १९२७ सालीं कम्युनिस्ट पक्षातून ४६ हजार सभासदाना काढून टाकण्यात आले. १९२९ मध्ये युक्रेनियामध्ये बड उद्‌भवले तेव्हा डॉक्टर, वकील अशा ४५ पुढाऱ्याना हद्दपार करण्यात आले. १९३० साली फदफितुरीबद्दल आठ इजिनियराना फाशी देण्यात आले पुढील वर्षी १९३१ मध्ये चौदा प्रोफेसराना फाशीची शिक्षा सुनावण्यात आली त्यापैकी बाराना त्यानतर फाशीऐवजी दीर्घकालीन तुरुगवासात डाबून टाकण्यात आले पुढ दोन वर्षांनी १९३३ मध्यें २ ब्रिटिश व १० रशियन एजिनियराना एका विद्युत्केद्राचा नाश करण्याचा घाट घातल्याचे आरोपावरून अटक करण्यात आली. खटला भरून तिघाना पाच वर्षांची शिक्षा ठोठावण्यात आली १९१७ मध्यें प्रथम साम्यवादाचा झेडा रोविला गेला तेव्हापासून या झेडयाभोवती अनेक वादळानी थैमान घातले. त्या सर्वांना तोड देऊन वातावरण निवळत चालले असे वाटू लागलें ते सुमारे सतरा वर्षानतर १९३४ नतर मात्र हवा शात होत चालली त्याच साली इग्लडमधील एक नामवत लेखक वेल्स याने रशियात जाऊन स्टलिनची गाठ घेतली त्यावेळी त्याचा झालेला विचारविनिमय प्रसिद्ध झाला आहे त्याच्याकडे वळू म्हणजे आपल्या आजच्या जगातील दोन पुरुषश्रेष्ठाचे ओझरते दर्शनहि घेण्याचा लाभ मिळेल ते दर्शन घेऊन त्याचे सभाषण ऐकल्यावर रशियाने दुसऱ्या महायुद्धात साम्यवादाला कसे कसे मार्गदर्शन केले व चीन आदि राष्ट्रानी साम्यवादाचा स्वीकार कसा केला तिकडे वळू तरी आता थोडावेळ वेल्स-स्टालिन सवाद ऐकूया.

## स्टॅलिन–वेल्स संवाद

वेल्स हा रशियाला १९१४, १९२०, १९३० व १९३४ साली भेट देऊन आलेला आहे. त्यापैकी १९३४ साली त्याने स्टालिनची भेट घेतली.

ती मुलाखत इंग्लंडमधील 'न्यू स्टेटस्‌मन्‌' मध्यें छापून प्रसिद्ध झालेली असून लोकशिक्षणाच्या आक्टोबर नोव्हेंबर १९३५चे अकात तिचा अनुवाद देण्यांत आला आहे वेल्सला त्यावेळीं लेनिनविषयी आदर वाटे व स्टालिनविषयीं तितकासा नसला तरी त्याचा ग्रह उलटहि नव्हता १९४१ साली दुसरे महायुद्ध चालू असता अमेरिका व रशिया संगनमत करून जर्मनीला पिटाळून काढत होते. त्यावेळी वेल्सनें अमेरिकेला भेट दिली व तेथील जनतेला उपदेश केला की, तुम्ही रशियाशी पूर्ण सहकार्य करा नुसते युद्ध चालू आहे तोपर्यंतच नव्हे तर नतरहि ! अशा दृष्टीनें रशियाकडेहि पाहणाऱ्या वेल्सची मुलाखत पाहू या मात्र जाता जाता हेहि वाचकाना सागून ठेविले पाहिजे की, या वेल्ससाहेबाना लेनिन–स्टॅलिनविषयी आदर असला तरी साम्यवादाचा प्रधान पुरस्कर्ता जो कार्ल–मार्क्स त्याच्याविषयी आदर तर नव्हताच पण कमालीचा तिटकारा होता ! Outlook of Homo Sapines या पुस्तकात त्यानें स्वतः लिहून ठेविले आहे की, " मार्क्सचे विचार व आचार याविषयी मला नेहमीच तिरस्कार वाटला असून तो दिवसेदिवस वाढतच आहे " रशियांतील एका चित्रपटात स्टालिनची उमाप स्तुति केलेली पाहून स्टालिनविषयीहि वेल्सचा आदर कमी झाला. ते असो, आपणांस फक्त वेल्स कोणते प्रश्न विचारतो व स्टालिन त्याची काय उत्तरें देतो त्यावरच ओझरती नजर टाकावयाची आहे, तर आता ती ऐकू या

**वेल्स**—मि. स्टालिन, आपण मला मुलाखत देण्याचे कबूल केलेत याबद्दल फार आभारी आहे मी नुकताच अमेरिकेतील प्रेसिडेंट रूझवेल्टची गांठ घेऊन त्याची विचारसरणी समजावून घेतली. आता आपली कळावी म्हणून आलो आहे. लेनिन म्हणत की, व्यापारधदा शिकावयाचा तर तो शिकावा भांडवलदारापासून. तसेच आजच्या काली समाजवाद समजन घ्यावयाचा असेल तर तुमच्याकडूनच अमेरिकेतील प्रे रूझवेल्टची नियंत्रित आर्थिक योजनाही समाजवादी पद्धतीचीच मला वाटते.

**स्टालिन**—वेल्ससाहेब, असें म्हणणे बरोबर नाही कारण आमचे ध्येय अमेरिकेपेक्षा निराळे आहे भाडवलशाहीला टिकवून आर्थिक अडचणी दूर करण्याचा अमेरिकेचा प्रयत्न आहे. तर आम्ही आर्थिक व्यवस्था मळांतच

बदलली आहे आर्थिक नियोजनाने अफाट भाडवलशाहीवर थोडेंसे नियंत्रण बसेल, पण ती मुळापासून उपटली जाणार नाही आम्हाला मात्र ती मुळासकट उपटावयाची आहे भाडवलदाराची दृष्टि जनतेच्या गरजेपेक्षा नफेबाजीवर रोखलेली असते यामुळे नियंत्रित आर्थिक योजना मोठ्या प्रमाणात यशस्वी होणार नाही

वेल्स--आपले म्हणणे बरेचसे पटण्यासारखें आहे. पण आखीव नियंत्रित योजनेच्या मार्गाने जात जात भाडवलशाही नष्ट करता येणार नाही का ? मला वाटते अमेरिकेतील हा नवा उपक्रम समाजसत्तावादीच आहे.

स्टालिन--रुझवेल्ट हे निश्चयाचे महामेरू आहेत हे मीहि जाणतो ! पण हे महामेरू झाले तरी नफेबाजीला काही प्रमाणात आळा घालू शकतील एवढेच अफाट शेतकी, अजस्र कारखाने, मोठ्या बँका ही आपल्या मुठीतून भाडवलवाले सुखोने सोडतील ? शक्य नाही उलट, भाडवलशाही राष्ट्रात सरकारच भाडवलशाहीच्या मुठीत असते ते त्या मगरमिठीतून सुटेल असे मला वाटत नाही

वेल्स--आपली भिस्त राजकारणापेक्षा आर्थिक नियंत्रणावर आहे पण मला वाटते बँका व खाजगी कारखाने क्रमाक्रमाने सार्वजनिक मालकीचे करता येतील कारखान्यातील बुद्धिवान् यंत्रतज्ज्ञाना समाजवादी करणें कठीण नाही. त्या सर्वांची संघटना करून समाजसत्ता स्थापन केली तरच ती व्यवहार्य ठरेल.

स्टालिन--व्यक्तीचे हित हे समाजसत्तेलाहि मान्य आहेच. इतकेच नव्हे तर व्यक्तीचे व्यक्तित्व अधिक कसोशीने रक्षिले जाईल तर समाजसत्तावादी राज्यातच. पण याचा अर्थ बहुजनसमाजाला लुबाडून स्वत ची तुबडी भरणाऱ्या भाडवलवाल्याना स्वातंत्र्य बहाल करणे चुकीचे होय हाच होईल माझ्या माहितीप्रमाणे तरी मजूर व भाडवलदार या दोहोंच्याहि हितसबधाचा सलोखा अमेरिकेला साधता आलेला नाही. मी स्वत. अमेरिकेला फेरा टाकलेला नाहीं. पण राजकारणाचा मला स्वत:ला जो थोडा अनुभव आहे त्यावरून मी सागतो कीं, रूझवेल्ट जर जास्त कडक-

पणा स्वीकारील तर लक्ष्मीधर त्याला खाली ओढून दुसऱ्या आपणाशी जुळते घेणाराला अध्यक्षपदावर बसविल्याशिवाय रहाणार नाहीत!

**वेल्स**—केवळ नफेबाजीच्या पाठीमागे धाव घेणारा एक वर्ग असतो हे मलाहि मान्य आहे पण माझ्या मते हल्लीची समाजरचना असमाधानकारक आहे असे मानणारा मोठा वर्ग अमेरिकेतहि आहे विशेषतः युद्धोपयोगी यंत्र-शास्त्रज्ञामध्ये समाजवादाचा व विश्वकुटूंबवादाचा प्रचार करणे मला अधिक आवश्यक वाटते. नुसते वर्गयुद्धाचे ढोलके पिटीत बसणे मूर्खपणाचे नव्हे का?

**स्टालीन**—धनकरी आणि कष्टकरी याच्यामध्यें बुद्धिवानाचा एक मध्यम वर्ग असतो हे मलाहि मान्य आहे त्यातील काही सज्जन व प्रामाणिक असतात हेहि मान्य पण तो सबध समाज घेतला तर त्याचे धोरण निश्चित नसून कधी धनकऱ्याच्या बाजूने तर कधी कष्टकऱ्याच्या बाजूने तो आपले वजन टाकीत असतो यामुळे त्याच्यावर विसबून राहता येत नाही. म्हणूनच आम्ही धनकरी व कष्टकरी असे दोन वर्ग मानतो

**वेल्स**—मध्यम बुद्धिवान् वर्गाचे जसे आपण दोन भेद केलेत तसे श्रीमत भाडवलदारातहि स्वार्थी व स्वार्थत्यागी असे असतातच. अमेरिकेतली उदाहरणे घ्यावयाची तर लोखड व समुद्रवाहतूक याची सर्वस्वी मक्तेदारी आपल्या मुठीत ठेवून अमाप नफा लुटणारा जसा मॉर्गन आहे तसाच प्रचड देणग्या देणारे रॉकफेलर व फोर्ड हे आहेतच ना? (रॉकफेलरने शिक्षण-सस्थाना अनेक देणग्या मिळून एकदर ५० कोटी डॉलर्स अर्पण केले) वैयक्तिक नफेबाजीची समाजपद्धति मोडकळीस आलेली आहे हे दिसत आहे. यामुळेंच रशिया व इतर देश याचा मूलभूत विरोध न मानता या दोघाच्या सल्ल्याने तिसरा एकसूत्री मार्ग आपण का हुडकू नये? मला तर वाटते जुनी समाजघटना या मार्गानेच लवकर मोडकळीस येईल.

**स्टालिन**—भाडवलदाराना बाजूला सारीत असता आपण त्याची श्रेष्ठ बुद्धिमत्ता व कौशल्य याकडे मुद्दाम डोळेझाक करतो असे नव्हे. औद्योगिक सघटना करण्यात मॉर्गन चलाख होता हें आम्हीहि जाणून आहो व बुद्धिमान् भाडवलदाराकडून पुष्कळसे शिकण्यासारखें आहे ते आम्हीहि शिकत असतो पण भाडवलदार हा शेवटी नफ्याला कवटाळून बसणारा हे आम्ही

विसरू शकत नाही तसेच बुद्धिवान् यांत्रिक तज्ज्ञ हेहि नेहमी समाजवादाच्या बाजूनेच लढतील अशी खात्री नाही १९१७ सालातील आमच्या साम्यवादी राज्यक्रांतीनंतर आमची समाजरचना संघटित करण्याचे काही बुद्धिवंतांनी नाकारले या बुद्धिवान् वर्गाला आमच्या नव्या साम्यवादी राजघटनेत बद्धमूल करण्यास आम्हास फार कष्ट पडले आहेत. बुद्धिवान् वर्गाकडून सामाजिक पुनर्घटना घडवून आणता येईल असे फरान्स व इंग्लंडमधल्या तुम्हा बुद्धिवादींना वाटते, पण पहिल्या मालकाला टाकून पुनर्घटनेस जीव वाहून घेणारा बुद्धिवानांत एकंदरीत दुर्मिळच. शिवाय जागतिक पुनर्घटनेकरिता राजसत्ता हाती पाहिजेच. ती घेण्यास प्रचंड संख्येचा वर्ग पाहिजे व तो मजूरवर्गच मोठी जहाजेच लांबचा प्रवास करू शकतात

**वेल्स**––पण अशा जहाजांनाहि कर्णधार लागतातच ना?

**स्टालिन**––ते खरे पण मोठा सागर ओलांडायला मोठे जहाज पाहिजे ना?

**वेल्स**––हे मोठे जहाज म्हणजे अवघी मानव जात होय

**स्टालिन**––पण सगळीच सज्जन नसतात आणि भांडवलदाराच्या चांगुलपणावर तर माझा विश्वास नाही!

**वेल्स**––बुद्धिमान् वर्गहि आता समाजवादाची भाषा बोलू लागला आहे परवा शास्त्रीय संस्थेच्या अध्यक्षांनीहि सामाजिक पुनर्घटनेचा पुरस्कार केला शिवाय, बहुजनसमाज शिथिल असून बंडाची उठावणी करणारे हे नेहमीच मूठभर असतात ना?

**स्टालिन**––मान्य! पुढारी केव्हाहि मूठभरच असतात पण अफाट जनतेचा जाणता नेणता कसाहि असेना पण त्यांना पाठिंबा असतो तेव्हाच त्यांना यश येते

**वेल्स**––पण जुनी समाजपद्धति कोलमडतच जर चालली आहे तर जुलमी बंडखोराची आवश्यकताच काय उरली?

**स्टालिन**—जुनी समाजव्यवस्था मोडकळीस आली आहे हे मान्य पण तिला बळकट करण्याचे हरएक प्रयत्न केल्याशिवाय भांडवलदार थोडेच रहा-

तील? फॅसिझम हा याच प्रकारचा एक प्रयत्न आहे त्याना आपले मत आपण पटवून देऊ शकाल काय? तेव्हा त्याना तोड द्यावयाचे असेल तर अत्याचाराचा अत्याचारानेच प्रतिकार करण्याशिवाय दुसरा मार्गच उरत नाहीं. अत्याचार हा आदर्श नव्हे पण अपरिहार्य ठरल्यास त्याज्यहि नव्हे

**वेल्स**––मला तर वाटते की बडखोरीने समाजवाद स्थापण्याचा काल आता माग पडला आहे

**स्टालिन**––तुमच्या इग्लडमधील समाजपद्धति सतराव्या शतकात जीर्ण झाली होती असे म्हटले जात होते, पण ती जमीनदोस्त करण्यास राजाचा शिरच्छेद करावा लागलाच ना? रशियन भाडवलशाही ही १९१७ मध्ये सडत चाललेली दिसत होती तरीहि अनेक शत्रूना रक्त साडून आम्हाला तोड द्यावे लागलेच फरान्समध्येहि जुनी सरजामशाही कुजू लागली होतीच पण तिलाहि ढासळून पाडण्यास खून पाडावे लागलेच ना?

**वेल्स**––पण त्या फरेच क्रातिकारकात काही सुशिक्षित वकीलही होतेच ना?

**स्टालिन**––बुद्धिवानाला क्रातीमध्यें स्थानच नाही असे मला म्हणावयाचे नाही. पण बहुजन समाजाची उठावणी झाल्याखेरीज क्राति रूप धरूं शकत नाही भाडवलदार आपखुशीने माघार घेतील तर क्रातिकारक तरी कशाला त्याच्या वोटला जातील. पण लढाऊ वर्गाने जागरूक राहिलेच पाहिजे शरण न येणाराला ठोकूनच काढला पाहिजे- हे ज्याला उमगणार नाही तो सेनापति होण्याला नालायक ठरेल.

**वेल्स**––जबरदस्ती करणे काही वेळा भाग पडते हे मान्य पण बड पुकारण्याची पद्धति आता जुनी झाली नाही का? शिवाय वर्ग–विग्रहाच्या प्रचाराने सुशिक्षित वर्ग फुटून राहणार नाही का?

**स्टालिन**––इग्लड व फरान्समध्ये राज्यक्रात्या झाल्या त्यावेळी बराचसा सुशिक्षित वर्ग सनातनी वृत्तीचाच होता ना? बुद्धिवादी वर्गाचे महत्त्व मी जाणतो. त्यापैकी आपणास अनुकूल असलेल्यांचें सहाय्य अवश्य घ्यावे शिवाय सत्ताधीश सुखाने सत्ता सोडत असेल तर कठोरतेचा मार्ग सोडून केव्हाहि त्याचे स्वागतच करण्यात येईल!

**वेल्स**––असो. आपल्या या मुलाखतीबद्दल आपला फार आभारी आहे ज्याचा शब्दन् शब्द ऐकण्यास लोक उत्सुक असतात असे आज जगात दोनच पुढारी आहेत ते म्हणजे रूझवेल्ट व आपण मी नुकता कालच येथे आलो. पण येथील सुदृढ स्त्री–पुरुषाची हसतमुखे पाहून पुष्कळ कार्य आपण पार पाडले आहे असे वाटले १९२० सालानतरचा हा फरक खरोखरच आश्चर्य-कारक आहे असो आता मला गॉर्कीशी मोकळेपणाने चर्चा करावयाची आहे. आपण ते स्वातंत्र्य द्याल ना?

**स्टालिन**––आम्ही असल्या मतप्रदर्शनाला ‘आत्मपरीक्षण’ म्हणतो. आमच्या देशात ते सर्वत्र चालू आहे

## प्रकरण अकरावें

# समाजवादाचा दुसरा अंक

उद्याच्या संस्कृतीच्या वाटेवरील एक विराट प्रयोग या नात्याने पहिल्या जागतिक महायुद्धाच्या शेवटच्या कालात रशियाने समाजवादाचा पाया कणखरपणे रोवून त्यावर आपला इमला उठविण्यास कबर कसून कशी जिवापाड मेहनत केली, ही आपण पाहिली ही इमारत उठूच देऊ नये, तिला पायातच नेस्तनाबूद करावी, अशाकरिता तिला अतर्गत दुफळीचे व बाहेरील बहिष्काराचे सुरुग लावण्याचे कसे प्रयोग झाले, आणि या मानवी विरोधाला निसर्गानेही दोन वर्षे प्रखर दुष्काळ पाडून कशी साथ दिली याचे ओझरते दर्शन घेतले

मूळ ध्येयवाद प्रत्यक्षात उतरवीत असताना कधी जुळती मिळती मुरड घालावी लागते तर कधी कठोर कात्री लावावी लागते हे धोरण रशियाने उत्तम ओळखले होते म्हणूनच त्याने खाजगी व्यापार अजिबात नेस्तनाबूद करण्याचे धोरण थोडे बदलून काही प्रमाणात खाजगी धद्याना रान मोकळे केले, व सर्व मानव हा एकाच पातळीवरचा हे तत्त्वत मान्य असताही समाजसेवकाच्या भिन्न थराना एकपटीपासून दसपटीपर्यंत बदलता धारा देण्यास सुरुवात केली स्त्रीजातीवरील अन्यायाची प्रतिक्रिया म्हणून त्याना मार्क्सच्या विचारसरणीला अनुसरून व्यभिचारी वृत्तीने राहण्यास प्रथम मोकाट सोडले पण स्वातत्र्य म्हणजे स्वैराचार नव्हे हे ध्यानी ठसताच लेनिनने व्यभिचारी वृत्तीला तडाखे लगावण्यास मागे पाहिले नाही ! जमीनदाराची जमीन त्याच्या हातून हिसकावून घेत असता त्यापैकी असख्याना सक्तीने घराबाहेर काढून निष्ठुरपणे रानावनात पिटाळून लावण्यात आले, पण बाल—तरुणाना हाताशी धरून समाजात नवचैतन्य निर्माण केले यावरही आपण दृष्टि टाकली

नव्या घटनेचा पाया दृढ करण्यात १९१७ ते १९३७ पर्यंत म्हणजे २० वर्षे खर्ची घालावी लागली हे साहजिक पण या वीस वर्षांत नव्या समाजवादी प्रयोगाचा पाया इतका भक्कम कणखर करण्यात आला की दुसरे महायुद्ध

सुरू होऊन थोडया वेळात गरुड भरारी मारण्यास उत्सुक झालेल्या जर्मनीने प्रचड रणधुमाळी माजवून मास्कोवर हल्ला चढविला तेव्हा त्याला रशियन डुकराने यशस्वी रीतीने जमीनदोस्त केले युरोपमधील सर्व राष्ट्रे मनातून आपल्यावर रुष्ट आहेत व समाजसत्तेचा प्रयोग उलथून टाकण्याची सधि मिळाली असता ते तिचा हटकून उपयोग केल्याशिवाय राहणार नाहीत हे रशिया जाणून होता म्हणूनच युद्धाची चाहूल लागताच त्याने प्रथम काय केले असेल तर आपले सर्व महत्त्वाचे कारखाने पश्चिमेकडे नेण्यास ताबडतोब प्रारभ केला हे होय तसेच राष्ट्राचे भवितव्य वाढत्या पिढीवर असते हे ओळखून युद्धाचा वणवा कितीही प्रचड झोताने फिरू लागला तरी त्याची झळही आपल्या उदयोन्मुख कर्तबगार पिढीपर्यत पोहोचू नये म्हणून सर्व बालकाना मातापितराचा निरोप घ्यावयास सागून रणक्षेत्रापासून लाब दूरवर नेण्यात आले व तेथे त्याची राहण्याची आणि शिक्षणाची सर्व व्यवस्था करण्यात आली अशा प्रकारे वर्धमान बालकिल्ले व शस्त्रास्त्रे पुरविणारे प्रचड कारखाने हे युद्धाच्या आघाडीपासून दूर सुरक्षित स्थळी नेण्यात आले व सर्व शस्त्रे परजून तरुण पिढी मास्को राजधानीभोवती एकजुटीने लढवून, अफाट वेगाने प्रचड सख्येने येणाऱ्या जर्मनाना प्रथम यशस्वीपणे तोड दिले, व धीरे धीरे शत्रूलाच मागे दडपत नेत नेत शेवटी त्याच्या पूर्व भागाचा लचकाच तोडून त्यालाच नेस्तनाबूद केले।

मात्र हे अजिक्य पद रशियानें मिळवले ते केवळ स्वत च्या पराक्रमावरच मिळविले असे म्हणणे इतिहासाला धरून होणार नाही जर्मनीने आधीच इग्लड–फ्रान्सच्याहीवर तलवार उगारल्याने रशियाला अनपेक्षित असा या जवळच्या इग्लड, फ्रान्स या राष्ट्राचा व दूरच्या अमेरिका या राष्ट्राचा पाठिबा मिळाला त्यानी दिलेल्या सहाय्याच्या जोरावरच रशियाने जर्मनीला सर्व बाजूनी आवळत आवळत चिणून काढले दैवमेवात्र पचमम् असे जे भगवद्गीताकाराने यशाचे पाचवे कारण दिले आहे, ते अशाच अचानक अनपेक्षित प्रकरणाचा उलगडा करण्याकरिता गीतेतील दैव शब्दाचा देवाची इच्छा असा सकुचित अर्थ न घेता अनाकलित अनपेक्षित अशा घटना असा व्यापक अर्थ घेतला म्हणजे रशियाला धुळीस मिळविण्याचा चग बाधून धडाडीने धावून येणाऱ्या जर्मनीने आधीच इग्लड, फ्रान्स या राष्ट्राची कुरापत काढून त्याना चिडवून सतप्त करून नतर रशियाकडे वळण्याची घोडचूक करावी

याचा उलगडा झाला तर होतो या घटनेचा फायदा अती कुणाच्या पदरात पडला असेल तर तो रशियाच्या इग्लड अमेरिकेचे सहाय्य नसते तर एकट्या रशियाला जर्मनीशी झगडण्यात यशस्वी होता आले असते की नाही हे सागणे कठीण यशापेक्षा अपयशाचा सभव अधिक होता पहिल्या युद्धानतर जर्मन प्रबल होऊ लागलेला दिसत असताहि इग्लड–फ्रान्सने त्याला विरोध केला नाही कारण तो रशियाविरुद्ध उपयोगी पडेल ही आशा पण जर्मनी आपणावरच उलटलेला पाहून जर्मनीला गारद करण्याकरिता रशियाच्या समाजवादाकडे काणाडोळा करून त्याचे हात बळकट करण्याकरिता जितकी सामुग्री पुरविता येईल तितकी पुरविण्यास इग्लड अमेरिकेने मागे पाहिले नाही यात दोन हेतु होते जर्मनीला हाणून पाडावयाचा हा हेतु तर स्पष्ट होताच, पण रशियाला बल पुरवून जर्मनीशी लढण्यास लावण्यात जर्मनी व रशिया दोघेहि झगडता झगडता हतबल होण्याचाही सभव होता ! हा नुसता तर्क नसून अमेरिकन राष्ट्रपिता ट्रूमन याने नभोवाणीवरून केलेल्या एका भाषणात तसा स्पष्ट उल्लेखही केला होता २४।६।१९४१ मधील न्यूयॉर्क टाईम्समध्ये तर ट्रूमन स्वच्छ लिहितो, ‘जर्मनी विजयी होत असेल तर रशियाला पाठिबा द्या व रशिया बलिष्ठ होत असेल तर जर्मनीला मदत करा आणि या प्रकारे एकमेकाचा जितका नाश त्याना परस्पर करता येईल तितका करूद्या ’ कसेही असले तरी या द्वितीय महायुद्धात इग्लड, अमेरिकेने जर्मनीची धडकी घेऊन का होईना पण रशियाला सहाय्य केले, व त्याला बलिष्ठ केला आता तो कल्पनेबाहेर बलिष्ठ झाला म्हणून ते चवताळून गेले आहेत हे निराळे ! पण द्वितीय महायुद्धाच्या काळात मात्र रशियाचे पाठबळ मिळाले म्हणून इग्लड अमेरिका बेहद्द खूष होती प्रख्यात इग्रज लेखक एच् जी वेल्स लढाईच्या काळात अमेरिकेत जाऊन आला होता परत आल्यावर तो लिहितो की अमेरिकन लोकाना रशियातील बोल्शेविक साम्यवादाबद्दल व तेथील लोकाच्या अतीव श्रद्धेबद्दल, अतिशय आदर वाटू लागला आहे रशियाने जगावर उपकार केले असून एक नवीन धर्मनिष्ठाच प्रस्थापित केली आहे असे तो लिहिण्यास कचरत नाही ( Out look of Homo Sapines, p. 275 )

# बड्या राष्ट्रांचा रशियाला पाठिंबा

वेल्स हा साम्यवादाकडे सहानुभूतीने पाहणारा तेव्हा त्याने रशियाच्या सहाय्याचे कौतुक करावे हे स्वाभाविक चर्चिल हा तर कट्टर साम्राज्यवादी ना ? पण त्यालाहि रशियाशी हस्तादोलन करावे लागले हे विशेष ! पहिल्या महायुद्धसमाप्तीनतर हळूहळू जर्मनी सघटना करून प्रबळ होऊ लागलेला साम्राज्यवादी राष्ट्रे पाहत होती पण रशियाचा काटा काढण्यास, निदान बोथट करण्यास या जागृत जर्मनीची मदत होईल म्हणून साम्राज्यवादी राष्ट्रे जर्मनी व इटलीशी समझोता करीत होती १९२७ साली चर्चिलसाहेब रोम येथे गेले असताना त्यानी रेडियोवर भाषण करून इटलीच्या मुसलोनीविषयी गौरवपर उद्‌गार काढले इटलीने अबिसीनिया घशाखाली घातला तोही इग्लड, फ्रान्स वगैरेनी बिनदिक्कत घशाखाली घालू दिला ! जर्मनीने झेकोस्लाव्हाकिया पचविला त्याकडे दुर्लक्ष केले व जपानने माचूरिया हस्तगत केला त्याकडेहि बुद्धिपुरस्सर दुर्लक्ष करण्यात आले अमेरिका तर या सगळ्या प्रकाराकडे दुर्लक्ष करून आपली सपत्ति कशी वाढेल यातच गुरफटून गेली होती ! इतकी की लीग ऑफ नेशन्स—राष्ट्रसघाची—कल्पना माडण्याची व अमलात आणण्याची धडपड कोणी केली असेल तर अमेरिकेच्या राष्ट्रपति विल्सनने पण त्याकडे पाठ फिरवून अमेरिका पहिल्या महायुद्धाच्या शेवटी मिळालेली सपत्ति सुस्थिर करण्यात गुतली व दुसरे महायुद्ध पेटल्यावरहि बराच काल दोस्त राष्ट्राना आर्थिक मदत करण्यापलीकडे तिने काही केले नाही !

पण दुसऱ्या युद्धात ज्याचा पाठपुरावा आपण केला, ज्याला खायप्यायला घालून धष्टपुष्ट केला तो रशिया आता आपणालाही डोईजड होणार हे पाहताच मात्र अमेरिका गडबडली व कोरियाचे कुस्पट काढून अॅटमबॉबची भाषा बोलू लागली उलट ज्यू लोक पॅलेस्टाइन घशाखाली घालत असलेला व दक्षिण आफ्रिका काळ्या लोकावर जुलूम करीत असलेला तीच अमेरिका निमूटपणे पाहत आहे **नृपनीति ही वारांगनेप्रमाणे वागते हेच खरे नाही का ?** राजकारणात कोणत्या दोन राष्ट्राचे केव्हा सख्य होईल व केव्हा खडाष्टक माजेल ते सागणे कठीणच जो तो आपले आसन स्थिर व बलिष्ठ होईल याकडे पाहत असतो व ते होण्याकरिता कोणावर हात उगारणे व कोणाशी हस्तादोलन करणे

हे त्या त्या प्रसगी ठरवीत असतो तोच प्रकार द्वितीय महायुद्धात दिसून येतो रशियाचे बल वाढू नये व त्याच्या व आपल्यामध्ये एक बफर हत्ती असावा या दृष्टीने बलवान होत असलेल्या जर्मनीकडे इग्लड–फ्रान्सने काणाडोळा केला. पण त्या काणाडोळयाचा फायदा घेऊन जर्मनीने जेव्हा प्रचड सामर्थ्य निर्माण केले व त्याचा इग्लड–फरान्सवरच पहिला प्रयोग सुरू केला तेव्हा मात्र इग्लड डोळे चोळून पाहू लागले व साम्यवादाचा प्रयोग चालू ठेवणाऱ्या रशियाकडे तोड फिरवून त्याला अवाढव्य मदत करण्यास तयार झाले !

रशियाही वस्ताद! त्यानेही चर्चिलशी मिळते घेणे हेच श्रेयस्कर हे ओळखले एरवी साम्यवादी रशियाचा काटा उपटून काढावा याकरिता ज्या इग्लड, फरान्स, अमेरिका यानी रशियातील भाडवलदाराना कोटयवधि रुपयाची मदत केली तीच राष्ट्रे पुढे जर्मनीशी दोन हात करण्याकरिता रशियाशी मिळते घेतात ह्याचा दुसरा अर्थ काय ? दुसऱ्या जागतिक युद्धातील तपशिलाशी आपणास या ठिकाणी काही कर्तव्य नाही नमूद करावयाचे आहे ते येवढेच की पहिल्या महायुद्धाच्या शेवटी साम्यवादाने रशियात मूळ धरले तर दुसऱ्या महायुद्धात त्याने अर्धा युरोप ग्रासून प्रचड विस्तार केला आणि आता चीन-सारखा खडप्राय देश रशियाचा मित्र व सहकारी बनल्याने अर्धे जग साम्य-वादाचे निशाण फडकावीत असल्याचा देखावा दिसत आहे !

## अर्धे जग साम्यवादी

हे निशाण पाहत असता ते उभारताना अनेक थोर पुरुषाना त्याच्या पायाशी खच्ची करण्यात आल्याचे दृश्य मात्र पाहणारास अस्थिर केल्याशिवाय राहत नाही ते करण्यात वैयक्तिक झगड्यापेक्षा तात्त्विक झगड्यावर भर होता हे मात्र [illegible] नये लेनिनच्या पश्चात् रशियामध्ये स्टालिन व ट्रॉट्स्की हे दोन बलिष्ठ पुढारी होते त्याच्यात तीव्र मतभेद उत्पन्न झाला जगातील एकजात कामकरी एक होतील या मार्क्सवादी मताच्या विश्वासा-वर राजकारणाची उभारणी करावयाची की ज्याने त्याने आपले राष्ट्र प्रथम बलिष्ठ करावयाचे या प्रश्नावर वादळ माजले ! बाहेरच्या सगळ्या राष्ट्रातील मजुराची मदत ही कल्पना आकर्षक असली तरी मजुराच्यात अशा प्रकारे जागृति झालेली नसून अनेक साम्राज्यवादी राष्ट्राच्या सैन्यात मजुराची

भरती होत असलेली दिसत होती अशा स्थितीत स्वत च्या पायावर आपण उभे रहावे की परदेशीय मजुराच्या सहाय्याची अपेक्षा करावी याविषयी तीव्र मतभेद उत्पन्न झाला दोन विरोधी पक्षापैकी एकाचा काटा उपटून काढल्याशिवाय दुसरा नांदूच शकणार नाही असे दिसताच स्टालिनने ट्राट्स्कीला हद्दपार केला व बुखारिन झिनोव्हिफसारख्या बारा जगप्रसिद्ध श्रेष्ठ दर्जाच्या पुढाऱ्याना फासावर लटकावले! १९३७ साली नवी घटना अमलात आणली पण लागोपाठ अनेकाना फाशी देण्यात आले असल्या प्रकारानी रशियाविरुद्ध प्रचार करण्यास मोठेच साधन मिळाले पण जून १९४१ मध्ये जर्मनीने प्रथम फ्रान्सवर व नतर रशियावर स्वारी केलेली पाहताच मात्र जर्मनी बलिष्ठ होऊ नये म्हणून इग्लड–अमेरिकेने रशियाशी दोस्ती करण्यास मागे पाहिले नाही! झारने केलेल्या कत्तलीकडे डोळेझाक करावयाची, साम्यवादाच्या विरोधकानी केलेल्या अमानुष हल्ल्याकडे दुर्लक्ष करावयाचे, आणि ट्राट्स्कीला हद्दपार केले किंवा बुखारिनला यमसदनास पाठविले हणजे गिल्ला करावयाचा असा एकदरीत कावा असूनसुद्धा जर्मनी बलिष्ठ होत चालला हे पाहताच पूर्वीचा सर्व राग गिळून टाकून रशियाला मदत करण्यास इग्लड अमेरिका हिरीरीने पुढे आली

अॅटमबॉबच्या शोधाचा पत्ता मात्र लागू दिला नाही यामुळे अमेरिकेला यापुढें प्रचड सपत्ति मिळाल्याचे व जगातील प्रमुख राष्ट्र म्हणून मिरविण्याचे आकर्षक स्वप्न पडू लागले तर आश्चर्य कसले ?

दुसरे जागतिक युद्ध समाप्त झाल्यावर इग्लड मागासले व अमेरिका जागतिक प्रमुख राष्ट्र म्हणून पुढे आले आपण पुढे आलो ते अॅटमबॉबच्या शस्त्रावर या शस्त्राचा आपणावरच तेवढा वरदहस्त आहे अशा कल्पनेत जागतिक राज्यक्रातीची भाषा आता अमेरिकेला सुचू लागली होती पण विशाल चीनने रशियाशी दोस्ती करताच व रशियाच्या घरीही अॅटमबॉब मूळ धरू लागला आहे हे पाहताच सामर्थ्य मोजण्याची कसोटी लावून पहावी म्हणून कोरियन युद्ध सुरू झाले त्या सबधी आता हळूहळू प्रसिद्ध होत असलेली दोहोबाजूच्या लाखो सैनिकाच्या कत्तलीची बातमी वाचून, रशिया व अमेरिका या दोन्हीही प्रबल राष्ट्राना आपण समबल आहोत ही कल्पना पचवावी लागली असावी असा एकदर सूर दिसतो.

या सुरातून पुढे रणगर्जनेचे कोणते सूर बाहेर पडणार आहेत हे आज सागणे कठीण असल्याने आपण आता गेल्या महायुद्धानतर साम्यवादी राष्ट्राचा विस्तार कसा वाढला व साम्यवादाच्या काल्पनिक ध्येयातील कोणता भाग प्रत्यक्ष प्रयोगात उतरविला गेला, कोणत्याला मुरड घालण्यात आली व कोणत्यात अघोरी उपाय योजले याकडे नजर टाकूया

साम्यवादी प्रयोगाचे पाऊल दुसऱ्या महायुद्धानतर पुढे पडत चालले याचे एक कारण या युद्धाच्या धुमश्चक्रीत लाखो लोकाचा सहार होत असता या सहारातून अलोट सपत्ति धनिकाच्या कोठारात ओतली जात होती हे होय ! रशियातून जर्मनीची पिछेहाट सुरू होताच बाल्कन, ग्रीस, युगोस्लाव्हिया याचे पाऊल नि[illegible] साम्यवादाच्या दिशेने पडण्याची चिन्हे दिसू लागली. अर्थात् इग्लड अमेरिकेने स्थापन केलेल्या अन्रा (युनायटेड नेशन्स रिलीफ) या सस्थेने युगोस्लाव्हियाला मदत देणे बद केले पण बाल्कन व ग्रीस या भाडवलशाही राष्ट्राना यानी जी कोटयवधि पौडाची मदत केली त्यापैकी प्रचड रक्कम त्या देशातील नवकोट नारायणानीच मधल्यामध्ये फस्त केली ! एकीकडे लाखो लोकाच्या रक्ताच्या नद्या वाहत असता दुसरीकडे पुजीपतीच्या रत्नाकराला तुफान भरती येत होती साम्यवादाच्या प्रसाराची धास्ती घेऊन अमेरिकेने फरान्सला मत्रिमडळात साम्यवादी असतील तर मदत मिळणार नाही अशी उघड धमकी दिली १९४७ साली ग्रीसला मदत करताना अमेरिकेने आपले धोरण म्हणून व्यक्तिस्वातत्र्य, धर्मस्वातत्र्य, मतस्वातत्र्य व वित्तस्वातत्र्य याचा पुरस्कार केला व खाजगी भाडवलदाराना पाठिबा न दिल्यास रशियासारखी हुकूमशाही राज्यारूढ होईल असे बजाविले असे असताही पोलड, हगेरी, झेकोस्लोव्हाकिया, युगोस्लाव्हिया, रुमानिया, बल्गेरिया ह्या सर्व राष्ट्रात बडया धनिकाची सपत्ति राष्ट्रीय मालकीची करण्याचे प्रयोग सुरू झाले व युद्धात कष्ट सोसलेल्या या राष्ट्रातील बहुजन समाजाने साम्यवादी रशियाशी हस्तादोलन केले यामुळे अर्धे युरोपखड रशियाच्या धोरणाने पावले टाकू लागले

पोलडमध्यें १९४७ च्या प्रारभी निवडणुकी होऊन साम्यवादी बलिष्ठ ठरले व इग्लडला आपल्या बँकेत ठेवलेले पोलडचे ४० लक्ष पौंडाचे कर्ज परत करावे लागले येथून पुढे युरोपखडाचे पूर्व व पश्चिम असे भेद पडून

पूर्व साम्यवादी व पश्चिम लोकशाहीवादी अशी शकले झाली पश्चिम युरोपमध्येही साम्यवाद मूळ धरू पाहतो की काय ही धास्ती अमेरिकेला होतीच कारण दारिद्रय हे साम्यवादाचे स्वागत करण्यास साहजिकच उत्सुक असते म्हणून अमेरिकेने पश्चिम युरोपला अनेक प्रकारचा माल पुरविला व युद्धोपयोगी माल रशियात पाठविला जाणार नाही असा त्याच्याकडून करार करून घेतला दुसरे महायुद्ध समाप्त झाल्यानतर अमेरिका व रशिया या दोनच राष्ट्रात फक्त झुझ उरली बाकीची सर्वच राष्ट्रे मागे पडली. यामुळे पुढील काळात सर्व जगभर राज्य करावयाचे ते अमेरिकेने की रशियाने असा प्रश्न डोळे वटारून पाहू लागला त्याचीच थोडीशी चुणुक आज आपल्याला कोरियन युद्धाच्या आखाड्यात दिसत आहे या झगड्यात साम्यवादाचा पुरस्कार करणारी रशियादि राष्ट्रे व त्याला तोड देण्याकरिता भाडवलशाहीचे पुनरुज्जीवन करणारी अमेरिका, इग्लड वगैरे राष्ट्रे उलट दिशेने पावले टाकीत चाललेली आहेत इग्लडात साम्यवादी पक्षाचा पराभव होऊन भाडवलशाहीचा पुरस्कर्ता चर्चिलपक्ष स्थानापन्न व्हावा हे त्याचेच सूचक ग्रीस व बेल्जम यातील पूर्वीच्या राजाना गादीवर बसविण्याचे प्रयोगही झाले तेही याचेच निदर्शक

दुसऱ्या बाजूने रशियाच्या मार्गदर्शनाखाली पूर्व युरोपमधील राष्ट्रे साम्यवादाच्या दिशेने पावले टाकीत चालली आहेत धान्य व वस्त्र ह्या मूलभूत गरजा असल्याने राष्ट्रातील सर्व जमीन ही राष्ट्राच्या मालकीची करणे हा प्रश्न सर्वच राष्ट्राना आज सोडवावयाचा आहे रशियाने या बाबतीत प्रचड आघाडी मारली पण ती मारीत असता हत्याकाडही माजू दिले इतर राष्ट्रानी त्यापासून धडा घेऊन एकदम धडाडीने सर्व जमीन राष्ट्राची करण्याच्या धाडसाला मुरड घालून क्रमाक्रमाने ती सर्व राष्ट्रीय मालकीची करण्यास प्रारभ केला आहे या बाकीच्या छोट्या राष्ट्राना आपल्या पायावर स्वतत्रपणे उभे राहण्यास काही काळ जावा लागेल तेव्हा त्याना सोडून साम्यवादी प्रमुख राष्ट्र जे रशिया व दोन वर्षांपूर्वीच साम्यवादाचे निशाण फडकविणारे राष्ट्र जें चीन त्याच्याकडे दृष्टि टाकूया

दुसऱ्या महायुद्धात रशियातील वीस कोटी लोकसख्येपैकी दोन कोटी दहा लाख इतकी प्रचड लोकसख्या भस्मसात झाली. असे असताही या भेसूर वण-

व्यातून रशिया वर्षभराने पुन्हा दड थोपटून उभा राहिला तो कोणत्या प्रचड शक्तीच्या जोरावर हा विचारास चालना देणाराच प्रश्न आहे यातील मुख्य सूत्र म्हणजे समाजातील वैषम्यावर तडाखे हाणून तो शक्य तितका समतोल करणे व त्यावर सक्तीने लादलेली बधने उखडून काढणे हे होय भाषावार प्रात-रचना ही एक साधीसुधी व महात्मा गाधीसारख्या थोर पुढाऱ्यानी सर्वस्वी मान्य केलेली योजना पहा ना ! ती अमलात आणण्यास आज आपले भारत सरकार भाडवलदाराच्या दडपणाखाली कच खात आहे पण रशियाने हा प्रश्न धडाडीने सोडविला रशियामध्ये रशियनखेरीज एस्किमो, ज्यू, जिप्सी, तुर्क, स्लाव्ह वगैरे अनेक भाषिक व अनेक धार्मिक लोक राहत आहेत त्या सर्वांना रशियाने आपल्या भाषेत आपला कारभार चालविण्यास स्वातत्र्य दिले अमेरिकेत निग्रोना वाळीत टाकण्यात येते व आफ्रिकेत गौर वर्णीयेतराची शहरातून दूर हकालपट्टी होते पण असले प्रकार रशियाने सपूर्ण उखडून काढले

## रशियांतील सुधारकशाही

येवढेच करून न थाबता जनतेला जन्मभर उदरनिर्वाह करता यावा या-साठी सर्वाना निवृत्तवेतन देण्याचे मान्य केले इतकेच नाही तर प्रत्येकाने विमा उतरविणे सक्तीचे केले झारशाहीत मुसलमानाना राजवाड्यात प्रवेश-ही मिळत नसे आता तेथे सर्वाना प्रवेश असून पूर्वीचे धनाढ्याचे राजवाडे आता रुग्णालयाना देण्यात आले आहेत युद्ध चालू असता धान्यावर नियत्रण होते, पण युद्धात कोट्यवधि सपत्ति नष्ट झाली असताही धान्यावरील नियत्रण युद्धसमाप्तीनतर अवघ्या सहा महिन्यानी उठविण्यात आले हे आश्चर्य-कारक नव्हे का ? रशियातील या जागृतीत स्त्रियानीही मोठा वाटा उचल-लेला आहे नुसत्या शिक्षण खात्यात १० लाखापैकी ७ लाख स्त्रिया शिक्षिका आहेत येवढे नमूद केले म्हणजे स्त्रियाच्या देशसेवेची कल्पना येईल हे देशप्रेम प्रबल करण्याचे साधन म्हणून वेश्याव्यवसाय गाडून टाकण्यात आला व मनुष्यबल वाढविण्याच्या हेतूने गर्भपातावर शिक्षा व अधिक सततीवर अधिक वेतन अशा धोरणाचा पुरस्कार करण्यात आला याला सुधारकशाही वाटल्यास म्हणा.

राष्ट्राचे बल वाढावयाचे असेल तर राष्ट्राची भूमिगत नैसर्गिक सपत्ति

शोधून काढणे हे महत्त्वाचे कार्य होय हें ओळखून अन्नवस्त्र, यत्र या प्रमुख गरजा पुरविण्यात राष्ट्र स्वयसपन्न कसे होईल याचे प्रयोग करण्यात राष्ट्रातील सर्व बुद्धिवत तज्ज्ञाना त्याच्या खात्यात शोध करण्याचा सदेश देण्यात आला

त्यापैकी ज्याचा विशेष उल्लेख करण्यात येतो तो प्रयोग म्हणजे **प्रो लायसेंको** याने धान्यवाढीवर केलेला प्रयोग याच्या प्रयोगाप्रमाणे कोणत्याही राष्ट्रात कोणतेहि धान्य पिकविणे अशक्य नसून बीज पेरण्यापासून फळ हातात पडेपर्यंतच्या काळातल्या वाढीला जवळजवळ चाळीस पचेचाळीम दिवसाची कात्री लावण्यात येणे शक्य झाले आहे आणि अशाच प्रकारचे प्रयोग जनावरावर करून भारतात दर मेढीपासून अवघी अडीच पौड लोकर मिळते तर रशियाने प्रयोग करून दर मेढीवर चाळीस पौडपर्यंत लोकर मिळविण्यात यश सपादन केले आहे असे म्हणतात तसेच मासाहारात डुकराच्या मासाला प्राधान्य असल्याने डुक्कर जितका अधिक धष्टपुष्ट तितके मास अधिक यामुळे बलिष्ठ डुक्कर निर्माण करण्याचे प्रयोग सुरू केले सततीचे बल हे मातापितराच्या बलावर अवलबून असते म्हणून बलिष्ठ नराकडून डुकराची सतती निर्माण करण्यात येते पण त्यापेक्षा विशेष उल्लेख करण्यासारखा प्रयोग म्हणजे नवीन शास्त्रीय विद्येचा उपयोग करून बलिष्ठाचे वीर्य सकलित करून एका बलिष्ठाचे वीर्य अनेक माताच्या गर्भाशयात टाकण्यात येते हा होय एका वळूचे वीर्य १५३६ गायीना देण्यात येते असे त्यानी आकडेही प्रसिद्ध केले आहेत

सकस जनावराच्या निपजेच्या जोडीला निकस ठरलेल्या जमिनीला सकस करण्याचा प्रयोगही यशस्वी रीतीने करण्यात आला रशियातील मधला मोठा प्रदेश वाळवटाचा व उत्तरेकडील प्रदेश बर्फाच्छादित या दोहोवरही मात करण्याचे प्रयोग करण्यात आले वाळवटात साकसूल झुडुपे लावण्यात आली व उत्तर ध्रुवाकडील बर्फाच्छादित जमीनीवर काही खोलीवर शीतोष्ण बधक थर घालून उत्तर ध्रुवाच्या आसपासच्या प्रदेशातही शेतीचे प्रयोग केले या बाबतीत आणखी उल्लेख करण्यासारखा प्रयोग म्हणजे दलदलीच्या प्रदेशात विमानातून बी पेरण्याच्या पद्धतीचा होय या सर्व प्रयोगानी धान्योत्पादन तर

वृद्धिगत झालेच, पण ते सर्व धनिकाच्या कोठारात कुजून न जाता सर्वांना त्याचा वाटा मिळण्याची परिस्थिति निर्माण केली हे महत्त्वाचे

हाच प्रकार धनिकाच्या कोठारातील सपत्तीबाबत दुसऱ्या महायुद्धाचा फायदा घेऊन रशियातील काही लोकानी जनतेची उमाप सपत्ति लुटली पण त्यावर कडक उपाय योजला तो म्हणजे नवे रुबल्स सुरू करून नव्या एका रुबलची किमत जुन्या दहा रुबल्सइतकी ठरविली त्यामुळे झाले काय तर धनिकानी साठवून ठेवलेल्या जुन्या नाण्याची किमत एकदम दसपटीने खाली आली ! या व्यापक [illegible] कामकरी स्त्रीला बाळतपणापूर्वी पाच आठवडे व प्रसूतीनतर सहा आठवडे भरपगारी रजा देण्यात येऊ लागली, स्त्रियाच्यावरील कामाचा बोजा हलका करण्यात आला व जितकी अपत्ये जास्त, तितका पगार जास्त देण्याची सोय केली भट-भिक्षुकाच्यासबधी स्वीकारलेली कडक वृत्तीही दुसऱ्या महायुद्धाच्या काळात सैल करण्यात येऊन त्याना मताचा अधिकार देण्यात आला उलट स्वैर वृत्तीला आळा घालण्याकरिता सोळा वर्षांखालील मुलाना प्रौढाचे बोलपट, नाटके पाहण्यास व विडचा ओढण्यास बदी केली आणि बालकाना खास बोलपट दाखवावयाचे व ते सध्याकाळ होताच बद करावयाचे असा नवा पायडा पाडला रशियाने समाजसेवा केली ती भाकरी पुरविण्यापुरतीच नसून अनेक सामाजिक गरजा पुरविणारी होती या सर्व गोष्टी जनतेला समत होण्यासारख्याच असल्याने सामान्य जनतेचा पाठिबा मिळाला असल्यास नवल नाही

## कुबेरावर कुऱ्हाड

कठोर व अप्रिय वृत्तीही काही क्षेत्रात स्वीकारली धनवान कुलवतावर (Koolack) तर कठोर शस्त्र परजण्यात आले १९३० साली सैबेरियात सक्तीने पाठविलेल्या श्रीमत कुटुबाची सख्या १० लाखावर होती असे रशियाकडे एकदर सहानुभूतीने पाहणारा लेखक मॉरिस हिडस लिहितो या सर्व लोकाना सैबेरियात हाकलून वेठीने कामास जुपले व त्याची अलोट मालमत्ता सरकारच्या तिजोरीत समाविष्ट करण्य त आली. ही सुखासुखी होण्यासारखी गोष्ट नव्हतीच पण सत्ताधाऱ्यानी ससेहोलपट करण्यास मागे पाहिले नव्हते काही जिप्सी या मागसलेल्या लोकानी एक घोडा

पळविल्याबद्दल त्याना जाळून टाकण्यात आले टर्किस्टानमध्ये सैन्याच्या जोरावर सक्ती लादण्यात आलेली पाहून स्टालिनलाही तेथील पुढाऱ्याना यशाने धुद होऊ नका असा इषारा पाठवावा लागला अशा परिस्थितीचा गुड कसा अतिरेकी फायदा घेत असतील याची कल्पना सहज करता येण्यासारखी आहे. स्वातत्र्य टिकवावयाचे तर यत्रसामुग्री आवश्यक ती बाहेरून आणणे काही काळ तरी अपरिहार्य होते त्यासाठी दूध, लोणी, फळे असले महत्त्वाचे पदार्थ प्रचड प्रमाणावर बाहेर पाठविण्यात येऊन देशातील गरिबाना बटाटे व पालेभाज्या यावरच निर्वाह करावा लागला ! यापेक्षा अन्य तऱ्हेने वागून देश बलिष्ठ करणे अशक्य होते असे या प्रकाराचे समर्थन करण्यात येत असते अर्थात् तेथील वयस्क वयोवृद्ध लोकाना हे नवीन धोरण पटणे व पचविणे किती कठीण गेले असेल याची कल्पनाच करावी !

अतिरेक हा क्रातिकालाच्या पाचवीलाच पुजलेला क्राति म्हणजे आमूलाग्र बदल त्याकरिता केवढी प्रचड किंमत द्यावी लागत असेल त्याची कल्पनाच केली पाहिजे इग्लडमध्ये क्रॉमवेलने चार्लस राजाला फाशी दिलेच पण अनेकाची कत्तल केली फ्रान्समध्ये तोच प्रकार घडला अमेरिकेत व ऑस्ट्रेलियात मूळच्या रहिवाश्याची एकजात ससेहोलपट करण्यात वसाहतकारानी कसूर केली नाही आपल्याकडे शिवाजीने सुरत दोनदा लुटले व अफजलखानास व चद्रराव मोरे यास यमसदनास पाठविले तोच प्रकार रशियातही मोठ्या प्रमाणावर घडला आणि हा लुटीचा प्रकार आपआपसातला असल्याने त्याला उग्र त्वेषाचे स्वरूप प्राप्त झाले

ही बडाळी उखडून निघाल्यावर स्थिरस्थावर होण्याला जेव्हा सधी मिळाली तेव्हा मात्र आदर्श साम्यवादाला व्यवहाराच्या भूमिकेवरून अनेक मुरडी घालण्यात आल्या स्वत चे घर बाधणाराला सरकारी बँकेतून कर्ज देण्यात येऊ लागले व एका कुटुबाला स्वत करिता १ गाय, १० शेळ्या व पाऊण एकर जमीन ठेवण्याची मुभा देण्यात आली फक्त पिकातील शेकडा १५ सरकारला माफक भावाने विकण्याची सक्ति लादण्यात आली पण ध्येयवादी साम्यवादाला सर्वांत डोळेफोड मुरड घातली असेल तर ती सरकारने आपल्या नोकराना देऊ केलेल्या पगारात ती खालच्या नोकरापासून वरिष्ठापर्यंत दसपटीवर नव्हे तर पन्नास साठपट तर चढेच सामान्य बापेचा

नागर चालविणाऱ्या ड्रायव्हरला ३७५ रुबल्स महिना मिळतात तर एखाद्या लोकप्रिय ग्रथकार वा चित्रकाराला रॉयल्टी–स्वामित्वहक्क–म्हणून वर्षाला पाच लाख किंवा महिना चाळीस हजार रुबल्सही देण्यात येतात ! अर्थात् मूळ साम्यवादी ध्येयाशी ही विसगति विशेष उठून दिसणारी आहे लोकमान्य लोकप्रिय ग्रथकाराला सन्मान द्यावा, त्याचा जाहीर रीतीने प्रचड समुदाया-समोर सत्कार करावा, त्याला लागणाऱ्या सर्व सुखसोयी मोफत देऊन त्याच्या प्रतिभेस लोकसेवा करण्यास जास्तीत जास्त वाव द्यावा हे पटण्यासारखेच आहे पण एका हाताने साम्यवादाला शुभाशीर्वाद देत असता दुसऱ्या हाताने एकाद्या कलावताला अफाट स्वैर दान द्यावे याचे समर्थन कसे करणार ? खरा प्रतिभावान् हा द्रव्याच्या लोभाने उत्कृष्ट कृति निर्माण करू शकतो ही कल्पनाच चुकीची आहे यामुळे साम्यवादी समाजाने आपल्या सपत्तीची अशी उधळपट्टी करणे हे मला वाटते असमर्थनीयच होय

## स्वप्नमय साम्यवाद

दोन वर्षांपूर्वी रशिया हा खऱ्या अर्थाने साम्यवादी आहे का यावर अमेरिकेत एक जाहीर वाद झालेला होता त्यात स्पष्ट केलेले रशियन अधिकाऱ्याचे पगार उल्लेखण्यासारखेच आहेत १९३८ च्या कायद्याप्रमाणे लोकनियुक्त सभा-सदाना महिन्याला १ हजार रुबल पगार मिळत असून प्रत्यक्ष सभेस उपस्थित असताना त्याशिवाय रोज १५० रबल्स देण्यात येत घटक राष्ट्रातील अध्य-क्षाना महिन्याला १२॥ हजार रुबल पगार असून घटक राष्ट्रसघाच्या अध्य-क्षाला तर २५ हजार रुबल्स दरमहा पगार असतो !! सामान्य कामकऱ्याला साधारण २५० ते ३०० रुबल्स मिळतात त्यावरून साम्यवादाचे स्वप्न हे अद्याप बरेचसे स्वप्नसृष्टीतच कसे आहे याची कल्पना करणे अवघड नाही

या स्वप्नाचे स्वरूप अधिक उघड करण्याकरिता कामकऱ्यावर जी निय-त्रणे घातली आहेत त्याचीही नोद आवश्यक आहे ती नियत्रणे म्हणजे प्रत्येक कामकऱ्याला दैनदिनी ठेवावी लागते व किती तास काम केले, गैर-हजर किती दिवस याची नोद करावी लागते पण त्याहिपेक्षा त्याच्या माने-वरील निर्बंधक जू म्हणजे कारखान्याच्या प्रमुखाच्या परवानगीवाचून त्याला कारखाना सोडून जाण्याची सक्त मनाई ठेवली आहे हे होय ! ह्या कायद्या-

चा भग केल्यास १० वर्षेपर्यंत शिक्षा देण्याची तरतूद केलेली आहे पासपोर्ट-शिवाय जेथे काम करीत असतो त्या गावाबाहेर त्याला जाता येत नाही, आणि पासपोर्टशिवाय देश सोडून जाणाराला तर फाशीची शिक्षाही देण्याची तरतूद आहे ! खोटी नाणी तयार करणे, जनावराना निष्कारण मारून टाकणे अशा अपराध्यानाही फाशीची शिक्षा देण्याची परवानगी कायद्याने देण्यात आली आहे सशयास्पद लोकाना सक्तीने तुरुगात कोबणे व त्याना भोवळ येईपर्यंत दिवसरात्र उभे करणे, डोळयावर झगझगीत प्रकाश पाडून गोधळून टाकून हवा तो जबाब वदविणे वगैरे प्रकारही चालतात असे म्हणतात याचा अर्थ हा की रशियातील साम्यवादाचा प्रयोग हा अद्याप प्राथमिक प्रयोगावस्थेत आहे सर्व समाजाच्या अन्नवस्त्रादि आद्य गरजा भागवण्यात त्याने यश मिळविले आहे पण कोठे उमाप पगार तर कोठे कडक सक्ति ही दोन्ही विसवादी रूपे अद्याप एकाच देशात एकाच राज्ययत्राखाली नादत आहेत त्यावरून भरतखडात साम्यवादाचा प्रयोग चालू करिताना कोणत्या दिशेने पाउले टाकावी लागतील याची कल्पना येण्यास मदत झाल्यावाचून राहणार नाही वाचका हो ! हजार दीड हजार वर्षापूर्वी चीनमधून फा हायन, युवान च्वाग असे विद्वान् धर्मगुरु आपल्या भरतखडात विद्योपासनेकरता येत असत आज चीनने आघाडी मारली असून त्याचे समाजवादाचे प्रयोग पहाण्याकरिता आपले नेते तेथे जात आहेत ! यास्तव उद्याच्या सस्कृतीकडे नेणाऱ्या वाटे-वरील खाचखळग्याकडे लक्ष वेधण्याकरिताच रशियातील साम्यवादी प्रयोगा-कडे वाचकाचे लक्ष वेधले आहे

## चीन देश

आता आपण रशियातून बाहेर पडून सुमारे दोन तीन [illegible] म्हणजे आक्टोबर १९४९ मध्ये ज्या चीनने साम्यवादाच्या आखाड्यात उडी घेतली व नतर [illegible] लढाईत अमेरिकेला फेरविचार करावा लागेल अशी तुल्यबल सेना रशियाच्या मदतीने का होईना पण उभी केली त्या चीनकडे वळू कोरियन युद्धात अमेरिकेशी समबल ठरण्यात चीनला रशियाचा पाठिबा आहे हे तर स्पष्टच आहे पण या पाठिब्याने का होईना चीनसारखा खडप्राय प्रचड लोकसख्येचा अफाट देश साम्यवादाचा पुरस्कर्ताच नुसता नव्हे

तर प्रयोगकर्ता म्हणून वावरू लागला असल्याने त्याचे ओझरते दर्शन घेण्याकडे वळूया

अलिकडे आपले पुढारी चीनमध्ये जाऊन आले आहेत त्यानी दिलेल्या हकीगतीवरून चीनने काही बाबतीत रशियाच्या पाउलावर पाउले टाकली आहेत तर काही पाउले स्वतत्र दिशेने रोखलेली आहेत असे दिसते रशियाप्रमाणेच विरुद्ध मताचे प्रतिपादन करणारे वाङमय नष्ट करणे, नवी विचारसरणी नव्या पिढीवर लादण्याकरिता Change Brain university 'मेदूमादक विद्यालया'सारख्या सस्था काढणे, सशयावरून पकडून अनेकाना तोफेच्या तोडी देणे हे प्रकार चालू आहेत मात्र आपल्या भारत देशाप्रमाणे चीनमध्येहि यापूर्वी स्त्रियावर जी बधने होती ती आता दूर केली आहेत इतकेच नव्हे तर केद्रीय प्रमुख सरकारात ३६ भगिनी उच्च पदावर अधिष्ठित आहेत व खालच्या निरनिराळया क्षेत्रात त्याची सख्या लाखानी मोजण्याइतकी झाली आहे नुकत्याच स्थगित झालेल्या कोरिया युद्धात स्त्रियानीही डॉक्टर, नर्स या नात्याने मोठा भाग उचलला होता देशातील धद्याचे राष्ट्रीयीकरण केले पण परदेशी कपन्याना हात लावला नाही चढाओढीत त्या आपोआप मागे पडतील अशा योजना आखणे फक्त चालू होते हॉगकॉगमधील ब्रिटिश व्यापारी कोटयवधि धनावर उदक सोडून नुकतेच इग्लडमध्ये परत आल्याचे आपण वाचलेच असेल शेतीची जमीन ही राष्ट्राच्या मालकीची करण्यास सक्तीची भूदान पद्धति स्वीकारली, पण रशियातील प्रयोगातील भीषणपणा ओळखून क्रमाक्रमाने पाउले टाकीत जाण्याची योजना आखली कसेल त्याची जमीन ही घोषणा आधुनिक चीन देशाचा पहिला प्रमुख नेता डॉ सन्यत्सेन याने केलीच होती पण जमीनदाराना फटके मारून त्याची धिड काढून त्याच्या जमिनी लोकाना लुटू द्यावयाच्या पद्धतीची चूक लक्षात आल्यावर धीरे धीरे पाउले टाकण्याचा कार्यक्रम आखण्यात आला सर्वांना एकजात एका ठेक्यासरशी समान पातळीवर आणणे हे अव्यवहार्य व सामुदायिक सुखाच्या कल्पनेच्या विरुद्ध आहे हे ध्यानी घेऊन जमिनदार, श्रीमत, मध्यम, गरीब, शेतकरी, निव्वळ राबणारा कामकरी असे

पाच सहा वर्ग लक्षात घेऊन आस्ते आस्ते त्याच्यातील वैषम्य कमी करण्याचे प्रयोग चालू केले

## रशियाचें नेतृत्व

नवीन प्रयोग बद्धमूल होण्याकरिता अनेक आपत्तीना रशियाला तोंड द्यावे लागले तसेच चीनलाही द्यावे लागले चीनच्या राष्ट्रीय कारखान्यात जो पगार दिला जातो त्यापेक्षा परदेशी कपन्या त्याच्या दसपट पगार देतात यामुळे सामान्य जनतेची राहणी पूर्वीपेक्षा खालावली असली तर नवल नाही याचा अर्थ वैयक्तिक पिळवणुकीने आता राष्ट्रीय पिळवणुकीचे स्वरूप धारण केले आहे हा होय। त्यातून सुटका होईल तेव्हाच साम्यवाद प्रत्यक्ष पदरात पडला असे जनतेला वाटू लागेल। मात्र आवश्यक वस्तूच्या किमती माफक ठेवण्यात व लाचलुचपतीला पिटाळून लावण्यात चीनने यश मिळविले आहे आता हे सर्व करीत असता रशियाचा उदोउदो करण्यात कसूर केली जात नाही चिनी नौदलात व हवाई दलात दहा हजार रशियन तज्ज्ञ पोसले जातात व ते पेकिंग व शाघाय येथील आरामगृहात चैनीने आणि थाटाने रहात असतात प्रत्येक पोलीस स्टेशनवर फोटो लावण्यात येतो तो कोणाचा तर रशियाचा राष्ट्रनेता स्टालिन याचा। कामगाराना सक्तीने कामास जुपण्यास व त्याचा सपाचा हक्क हिरावून घेण्यात रशियाच्याच पावलावर पाऊल टाकून चीन चालत असलेला दिसतो याहीपेक्षा जागतिक शाततेच्या दृष्टीने दुर्लक्ष न करण्याची बाब म्हणजे चिनी लष्कराचे सामर्थ्य फार प्रचड प्रमाणावर वाढत चालले आहे हे होय लष्कराचे सामर्थ्य बलिष्ट होण्यात सैनिकाची अफाट सख्या व त्या अफाट सख्येला नुसतेच अफाट नव्हे तर दुर्दम्य करणारी अजस्त्र शस्त्रेही आवश्यक पैकी ४० कोटी लोकसख्येच्या चीनला मानव-बलाचे सामर्थ्य निसर्गानेच बहाल केले आहे आणि त्याच्या हातात शस्त्रे पुरविण्याला शेजारचा रशिया आज उत्सुक आहे। गेल्या १९५१ च्या आक्टोबरमध्ये चीनने स्वतत्र लोकशाही राष्ट्राचा द्वितीय वर्षदिन साजरा केला त्यावेळी लाखो-प्रेक्षकाच्या समोर तुफानी सैन्याची प्रचड मिरवणूक काढ-ण्यात आली यदा १९५२साली नुकत्याच झालेल्या वार्षिक समारभाचे भव्य चित्र तेथे जाऊन आलेले आपले प्रतिनिधी रेखाटत असल्याचे आपण वाचीत आहोच.

चीनमधील सैनिकाची सख्या आता ५० लक्षापर्यंत गेली असून विमानाचे व नौदलाचे सामर्थ्य दिवसेदिवस वृद्धिगत होत आहे याला प्रतिशह म्हणून चीनच्या शेजारच्या राष्ट्राला म्हणजे ॲटमबॉब टाकून सपूर्ण नेस्तनाबूत केलेल्या जपानला आता अमेरिकेने सपूर्ण स्वातत्र्य बहाल केले आहे कोरियात अमेरिका व चीन यानी परस्पराचे बल अजमावून पाहिले व शत्रूचा काटा सहज उपटून काढू ही कल्पना स्वप्नमय ठरली

## साम्यवादाचा विराट प्रयोग

तूर्त आपणास रशिया, चीन व अर्धा युरोप या प्रचड प्रदेशात साम्यवादाच्या झेड्याखाली लढणाऱ्या राष्ट्राचे पाऊल पुढे पडत आहे याकडे लक्ष द्यावयाचे आहे आणि तेही साम्यवादाची मूलभूत भूमिका ही सस्कृतीच्या मार्गावरील राजेशाही, लोकशाही, याच्या पुढची एक पायरी आहे या दृष्टीने कोणताही नवा प्रयोग होत असता त्याला अतिरेकी स्वरूप येत असते तसेच या रशिया चीन वगैरे प्रदेशात येत आहे त्याच्याकडेही डोळे उघडे ठेवून पाहिले पाहिजे, म्हणजे आपल्या भारतीय सस्कृतीला उद्या ज्या वाटेवर आणून सोडावयाचे आहे त्यातील खाचखळगे आपणास टाळता येतील

साम्यवादाचे प्रयोग जगाच्या इतिहासात प्रचड प्रमाणावर करण्यात आले ते आजच्या रशिया—चीनमध्येच या तऱ्हेचे ८५ कोटी जनतेच्या जीवनाला वळण लावणारे विराट प्रयोग जगाच्या इतिहासात यापूर्वी झालेले नाहीत अर्थात् असल्या प्राथमिक अवस्थेतील प्रचड प्रयोगात अनेक घोडचुका झाल्या असल्या, वाळल्याबरोबर ओलेहि जाळण्यात आले असले व हिरीरीने हुल्लडीचे स्वरूप धारण केले असले तर ते काहीसे अपरिहार्य होते इग्लड फ्रान्समध्ये लोकसत्तेचे पहिले निशाण फडकावले ते राजाचा शिरच्छेद करूनच याची प्रतिक्रिया होऊन राजेशाही काही काळ पुन्हा रूढ झाली तरी अती लोकशाहीने तिला खाली ओढलेच तसाच प्रकार रशिया—चीनमध्ये होणार की काय हे भविष्यकालच ठरवील पण राजेशाही नष्ट करण्याकरिता राजाची शिरे कापण्यात आली, तशीच प्रबल साम्यवाद्यानी आपल्या शत्रूचा शिरच्छेद करण्यास कसूर केलेली नाही हे सत्य उघडेनागडेपणे मानवतेसमोर उभे आहे या बाबतीत एका गोष्टीचा उल्लेख केला तरी पुरे ती बाब म्हणजे १९१७

आक्टोबरच्या पहिल्या क्रातीची मुहूर्तमेढ ज्या श्रेष्ठ अशा २२ पुढाऱ्यानी रोविली त्यापैकी थोड्याचे नव्हे तर १७ चे स्टालिनशाहीत खून करण्यात आले ही होय तोच प्रकार दुसऱ्या महायुद्धात पोलड, हगेरिया, बल्गेरिया, झेकोस्लोव्हाकिया या देशात घडला म्हणजे तेथल्या अनेक पुढारी कम्यूनिस्टाना देशद्रोही म्हणून ठार करण्यात आले याहीपेक्षा निर्घृण प्रकार म्हणजे अखिल समाजाची मुस्कटदाबी करण्यात आली हा होय सप करणे हे तर बेकायदेशीर ठरविलेच पण छापखाने, वर्तमानपत्रे व सार्वजनिक सभा ही लोकशिक्षणाची सर्व हत्यारे बेकायदेशीर ठरविण्यात आली सोव्हियट सरकार म्हणेल तेच सत्य, तेच एकमेव सत्य, तेच त्रिकालाबाधित सत्य इतके हट्टाचे सत्तासपादन करण्याकडे पारा झुकत चालला आहे

त्याचे एकच सुप्रसिद्ध उदाहरण दिले म्हणजे पुरे ते उदाहरण म्हणजे शेतीखात्यातील एका तज्ज्ञाला लाचारपणे माफी मागावयास लावून त्याला सैबेरियात पाठविण्यात आले हे होय हा क्षेत्रज्ञ व्हाविलॉव्ह (Vavilov) हा होय वनस्पतिशास्त्रातला एक तज्ज्ञ म्हणून तो प्रख्यात् असून लेनिनने त्याची कृषिशास्त्रज्ञ सघटनेचा अध्यक्ष म्हणून नेमणूक केली होती त्याची कीर्ति सर्व युरोपभर पसरली व इग्लडमधील रॉयल सोसायटीने तो रशियातून हद्दपार व नापत्ता झाल्यानतर त्याला आपल्या सस्थेच्या सभासदाच्या यादीत घालण्याचा मान दिला. पण त्याच्या पूर्वी पाचसहा वर्षापासून त्याची लोकमान्यता ढासळू लागली होती अन्नाचा प्रश्न हा रशियात महत्त्वाचा प्रश्न होता त्या प्रश्नाची शास्त्रज्ञाच्या पद्धतीने तपशीलवार अशी सथपणे तपासणी तो करीत होता अशा स्थितीत अन्नाचा प्रश्न झटापटीने सोडविता येईल हे ज्याना पटले नाही त्यापैकी मागे उल्लेख केलेला लायसेको हा पुढे आला व त्याने अन्नधान्याच्या उत्पादनाला लागणारा काळ हा दीडदोन महिन्यानी कमी करता येईल, इतकेच नव्हे तर वाटेल त्या प्रदेशात कृत्रिम वातावरण निर्माण करून अन्नधान्याचा प्रश्न झपाट्याने सोडविता येईल अशी भूमिका घेतली बीजक्षेत्राच्या पूर्वापार श्रेष्ठ–कनिष्ठतेच्याच वादाचा हा नवा अवतार होता !

## बीजक्षेत्रवाद

**या प्रश्नाला शास्त्रीय स्वरूप देणारा विख्यात शास्त्रज्ञ मेडेल हा होय.**

त्याच्या प्रयोगाप्रमाणे मातापित्यातले गुण अपत्यामध्ये काही ठराविक पद्धतीने उतरत असतात या उतरणाऱ्या गुणावर परिस्थितीचा परिणाम होतो की नाही यावर वाद माजून मेंडेलवादी बीजाला प्राधान्य देतात, तर रशियन लायसेको-वादी क्षेत्राला किंवा परिस्थिति वातावरण वगैरेला महत्त्व देतात आपणास या ठिकाणी उत्पादन प्रक्रियेच्या *तपशिलात शिरावयाचे नमल्याने येथे येवढे नमूद केले म्हणजे पुरे की अल्पावकाशात धान्य पिकविता येईल या लायसेकोच्या घोषणेने, म्हणजेच बीजक्षेत्रयुतीत क्षेत्राला महत्त्व देण्याच्या घोषणेने प्रमुख पुढाऱ्याना आकर्षून घेतले व या तत्त्वाचा पुरस्कार करणारा लायसेको हा धान्योत्पादन खात्याचा प्रमुख नेता नेमण्यात आला

पण येथे मुख्य नमूद करावयाची गोष्ट म्हणजे या सरकारमान्य तत्त्वाला पाठिबा न देणाऱ्याना कामावरून काढून तर टाकण्यात आलेच पण त्याच्या-कडून आपले विवेचन चुकीचे आहे असा कबुलीजबाबहि दडपशाहीच्या ठोके-बाजीने त्याच्या तोडून वदविला ! १९३६ मध्ये मेडिको जेनिटिकल सस्थेचा स्थापक सालोमन लेव्ही यानेही नव्या पिढीचे गुणदोष परिस्थितीपेक्षा पिडावर अधिक अवलबून असतात या तत्त्वावर जोर दिला तेव्हा त्याच्याहि तोडून आपण हा विज्ञानाचा अपमान केला असा कबुलीजबाब काढून घेतला व त्याला हद्दपार केला त्याच्या आधी दोन वर्षे याच मुद्द्यावर फेरी लेव्हिटस्की, अगोल अशा अनेकाना हद्दपार करण्यात आले तोच प्रकार वर उल्लेखिलेल्या वाविलोव्हचा १९४० पर्यंत तो शेतकी शास्त्रसभेचा अध्यक्ष होता उत्पादन झपाट्याने कसे वाढविता येईल हे शोधून काढण्याचा त्याच्या पाठीमागे ससेमिरा लावण्यात आला पण या प्रयोगाना पाच वर्षे तरी लाग-तील असा त्याने खुलासा करताच त्याला बडतर्फ करण्यात येऊन सैबेरियात पिटाळले गेले त्याच्यावर ब्रिटिशाचा गुप्तहेर असल्याचा आरोपहि ठेवण्यात आला व पुढे दोन वर्षांनी सैबेरियातच तो इहलोक सोडून गेला इग्लडमधील रॉयल सोसायटीने या वाविलॉव्हचे काय झाले, तो केव्हा व कोठे मृत्यु

---

*अधिक विवेचन माझ्या ‘ वादळी वारे ’मधील अनुवशशास्त्राचे बुजगावणे या लेखात पहा

पावला याचा खुलासा अनेक वेळा रशियन सरकारकडून मागविला पण त्याचे उत्तरच देण्यात आले नाही ! *

जाता जाता मागच्यामागची गोष्ट म्हणजे याच वेळी १९४१ मध्ये इग्लिश लेखक एच जी वेल्स हा अमेरिकेत जाऊन व्याख्याने झोडत होता की रशियाशी मैत्री राखण्यात आपले एकदर हित आहे! (Out took for home sepınes).

विरुद्ध मताचा गळा दाबून त्याचा प्राण घेणे हेच जर साम्यवादाच्या प्रच।-राचे मुख्य सूत्र असेल तर त्या साम्यतेचे वाभाडे साम्यवादीच अत्यत निर्घृण-पणे काढीत आहेत असे म्हणावे लागेल बडाचा प्रत्यक्ष उठाव करणाराला बदिस्त करणे हे स्वत चे आसन स्थिर राखणाऱ्या कोणत्याही सत्तेला आवश्यक होय पण भिन्न व निराळ्या विचारसरणीची मुस्कटदाबी करण्यात आली तर साम्यवाद हा लोकशाहीच्या पुढची पायरी न ठरता प्रतिगामी विकृती ठरेल ! याचे एक कादबरीमय चित्र Darkness at noon यामध्ये पहावयास साप-डेल दुसरे वास्तविक चित्र एलिनार लिपर नावाच्या जर्मन डॉक्टरीण बाईचे साम्यवादाने आकर्षून १९३७ मध्ये ती रशियात गेली पण तेथे तिला जे तुरुगात डाबण्यात आले ते अकरा वर्षे आपल्यासारखे हजारो कैदी तुरुगात लोटण्यात आल्याचे व एका स्त्रीला अठरा दिवस रात्र उभे केल्याची हकीगत तिने प्रसिद्ध केली आहे, (रीडर्स डायजेस्ट १९५१) रशियात प्रमुख प्रातीय भाषाना स्वातत्र्य देण्यात आले आहे असा प्रचार असता नुकत्याच २०–३–५२ ला युनायटेड असोशिएशनचा वार्ताहर लिहितो इस्त्राएलच्या पतप्रधानाने रशियाला लिहिले होते की रशियातील ज्या यहुदी लोकाची इस्त्राएलमध्ये येण्याची इच्छा असेल त्याना पाठविण्यात यावे पण त्या पत्राला रशियाने उत्तरच दिलेले नाही ! उलट नुकतेच जानेवारीत रशियाने आपल्या यत्राचे जे भव्य प्रदर्शन मुबईत भरविले होते त्यावेळी रशियन वकिलाने पत्रकाराना मुलाखत देताना सागितले की परदेशी वृत्तपत्रावर रशियात नियत्रणे आहेत ही समजूत निराधार आहे तेव्हा या भिन्न प्रकाराचा मेळ कसा घालावयाचा?

वर वाविलॉव्ह शास्त्रज्ञाला सैबेरियात हद्दपार केल्याचा उल्लेख केला तसा दुसऱ्या एका सुप्रसिद्ध शास्त्रज्ञाचा उल्लेख करावयाचा म्हणजे आस्ट्रे-

---

*Sovıet genetıcs by Julion Huxley.

लियन शास्त्रज्ञ अलेक्झाडर वाइझबर्ग याचा यालाही फाशीची शिक्षा देण्यात आली होती, पण आइनस्टाइन व ज्युलिया क्यूरी या जगविख्यात् शास्त्रज्ञानी मध्यस्थी केल्याने त्याची फाशीची शिक्षा रद्द करण्यात आली ! मदाधकारी सत्ता ही मरस्वतीलाही पायाखाली तुर्डविण्यास मागे पाहत नाही दुसऱ्या महायुद्धात आइनस्टाइन हा यहुदी असल्याने त्याला जर्मनी सोडून अमेरिकेत आसरा घ्यावा लागलाच ना ? जर्मनी काय की रशिया काय सत्तेने मदाध झालेल्याचे पाऊल उर्मटपणेच पडत असते यामुळेच साम्यवादाचा पहिला विराट प्रयोग या दृष्टीने सहानुभूतीने रशियाकडे पाहत असताहि रशियाच्या प्रयोगातील दुटप्पी चित्रे डोळ्याआड करणे युक्त नव्हे

## अमेरिकेचें दुटप्पी धोरण

त्याचबरोबर जी अमेरिका आज रशियाविरुद्ध गुरगुरत आहे त्याच अमेरिकेने गेल्या महायुद्धात रशियाची कशी पाठ थोपटली ह्याबद्दल एच जी वेल्सचे उद्‌गार वर उद्‌धृत केले आहेत त्याची आठवण ठेवली पाहिजे त्यानतर तीन वर्षानी अमेरिकन चेबर ऑफ कॉमर्सचा अध्यक्ष ए जॉनसन लिहितो की, रशियात मोटारीचा धदा मोठ्या प्रमाणात सुरू करण्यात कोणाची मदत झाली असेल तर ती अमेरिकन फोर्ड कपनीची होय ! युद्धकाळातील प्रचड कारखाने उभारण्यात उमाप साधनसामुग्री मिळाली असेल तर ती अमेरिकेकडून याचा स्टालिनने एका भाषणात कृतज्ञतापूर्वक उल्लेखहि केला होता †

आज अमेरिका कितीही ओरडत असली तरी धनसपादनाच्या धुदीत गेल्या युद्धामध्ये रशियाला जी प्रचड औद्योगिक साधने अमेरिकेने पुरविली त्यावरच आज रशिया बलिष्ठ झाला आणि आता तर त्याला प्रचड असा चीन सहाय्यक झाल्याने इग्लड, फ्रान्स, अमेरिका ही राष्ट्रे डोळे चोळून पाहू लागल्यास नवल कसले ? कोरियन युद्धात दड थोपटूनही अमेरिकेने पाहिले, पण तेथेहि काही पाय धरेना तेव्हा आता जपान व जर्मनी या पूर्वोक्त बदिस्त शत्रूना मुक्त करून त्याना शत्रूवर सोडण्याचे कारस्थान चालू आहे व्यक्तिस्वातत्र्याचा दावा अमेरिका माडत असताही गेल्या डिसेबरमध्ये यूनोच्या सभेस उप-

† We are all in it–by Eric Johnson

स्थित होऊन पॉल रॉब्सन या निग्रो गवयाने अमेरिका आपला वशोच्छेद करीत आहे असा प्रगट आरोप केला यूनो हे आपल्या बलिष्ठाच्या हाताखालचे माजर अशी जी अमेरिका, इग्लड यानी समजूत करून घेतली होती तिलाहि, गेल्याच महिन्यात २२।४।५२ रोजी यूनोमध्ये राष्ट्रसघातून फुटून निघण्याचा स्वयनिर्णयाचा हक्क सर्व राष्ट्राना आहे असा ठराव इग्लड, फ्रान्स व अमेरिका उघडपणे विरुद्ध असता अकरा विरुद्ध पाच या सख्येने स्वीकारण्यात आल्याने, जबर धक्का देण्यात आला आहे! टयूनिशिया फ्रेचाच्या मगरमिठीतून सुटू पाहत आहे त्यासबधी इग्लडने भूमिका स्वीकारली आहे ती कोणती तर तटस्थ रहाण्याची !

आपणा भारतीयाना हे इग्लड–अमेरिकेचे धोरण परिचित आहेच कोरियात प्रतिकाराची नुसती ठिणगी पडताच जी अमेरिका क्षणाचाही विलब न करिता किंवा यूनोच्या समतीची वा अस्तित्वाची दखलगिरीही न घेता प्रचड सैन्य रवाना करते तीच अमेरिका पाकिस्तानने गडप केलेला भारताचा काश्मीरातील प्रदेश परत करण्याचा प्रश्न आला की जाभया देत दोन चार वर्षे तो दिरगत ठेवीत आहे! तसेच पोर्तुगाल व फ्रान्स ही लोकशाहीचा झेडा मिरविणारी राष्ट्रे असताही खडतुल्य भारतातील गोवा, पादेचरीसारखी मूठभर बदरे सोडून देण्याचीही उदारता [illegible] ढकलून देत आहेत ! यावरून नृपनीति ही वारागनेप्रमाणे वावरते यापेक्षा अधिक समर्थक चित्र कोणते रेखाटता येईल ? तोच प्रकार दक्षिण आफ्रिकेतही चालू आहे यूनोचा सभासद असताहि व यूनोने म्हणजे राष्ट्रसघाने गोरेतराना गोऱ्यापासून दूर सारू नका असा आदेश दिला असताहि यूनोला धुडकावून गोरेतराची प्रमुख नगरातून हकालपट्टी करण्याची धमकी दक्षिण आफ्रिकन गोरे सरकार आज उघडपणे देत आहेच ना ? या सर्व देखाव्यावर नजर टाकली असता रशिया व अमेरिका ही जी दोन बलिष्ठ राष्ट्रे आज ना उद्या आपल्या शत्रूची खच्ची करणाऱ्या रणकदनात आपले प्रचड रक्त ओतणार आहेत त्यापासून आपल्या भारताने तटस्थाचा तृतीय गट स्थापन करावा व त्याला जगातील सर्व मागासलेल्या राष्ट्राचा एकमुखी पाठिंबा मिळवावा हेच एकदरीत व्यवहार्य असे धोरण ठरेल *

* रगून येथे गेल्या महिन्यात (८–४–५२) भरलेल्या समाजवादी परिषदेने हे धोरण मान्य केले नाही हे दुर्दैव होय

तिसऱ्या युद्धाचा वणवा पेटला तर त्यापासून भारताला किती काळ दूर राहता येईल हे काळच ठरवू शकेल, पण गेल्या द्वितीय जागतिक युद्धात आयर्लंडने जी तटस्थाची भूमिका घेतली व युद्धाची प्रचड आग पेटली असताही जे आगीपासूनच नव्हे तर धुरापासूनही निर्लेप राहिले त्याचा आदर्श आपल्या भारतापुढे ठेवणे इष्ट नाही का ? तो पुढे येणारा प्रसग असल्याने आज त्याचे विशेष विवेचन नको पण साम्यवादी रशिया आणि व्यक्तिस्वातत्र्यवादी अमेरिका या दोघाच्याही घोषणातील खरे स्वरूप न्याहाळून ठेवून त्याच्यातील अनुकरणीय प्रयत्नाचेच तेवढे स्वागत करण्याची भूमिका समाजाला पटवून देणे हेच स्वतत्र भारताच्या सस्कृतीचे सध्याचे कर्तव्य होय त्याच्याकडे पुन्हा एकदा शेवटी वळू तूर्त उद्याच्या सस्कृतीचे स्वरूप ठरविणाऱ्या रशिया व अमेरिका याच्या धोरणाकडे आणखी थोडी नजर टाकू या

## रशियाचे दुटप्पी डावपेंच

ती नजर टाकली असता ध्येयवादाचा पुरस्कार करीत असता त्या ध्येयाला व्यवहारात कितीदा मुरड घालण्यात आली याकडे मुख्यत लक्ष वेधले जाते त्या दृष्टीने पाहिले म्हणजे द्वितीय महायुद्धात रशियाने प्रथम जर्मनीशी तह केला पण तो आपणावर उलटणार असे पाहताच इग्लड अमेरिकेशी हस्तादोलन करण्यास मागे पाहिले नाही तोच प्रकार चीनच्या बाबतीत प्रथम रशियाने चाग कायशेकला पाठिबा दिला पण या कायशेकने जून १९४६ मध्ये दोन शाततावादी प्राध्यापकाना फाशी दिले, व २७ लाख टन धान्य जे बाहेरून आणले त्यातले कम्यूनिस्टाना फक्त २ टक्के देऊ केले अशी माहिती चीनमध्ये युद्धकाळात जाऊन आलेल्या एका अमेरिकनाने दिली आहे † आधुनिक चीनचा पहिला पुढारी डॉ सन्यत्सेन याने 'कसेल त्याची जमीन' या तत्त्वाची घोषणा केली होती पण चाग कायशेकने बडया [illegible] पक्ष उचलून धरला १९४६ मध्ये मोठे कारखाने सुरू करण्याकरिता अमेरिकेची भाडवलाकरिता त्याने याचना केली पण तिने हात आखडता घेतला शिवाय शेजारी जपानचा धोका होताच या सर्वांना तोड देण्याकरिता चिनी कम्युनिस्ट माओत्से

† China Shakes the World—by J. Belden

तुग याने चाग कै शेकशी मिळते घेतले, पण जपानचा ॲटम बॉबने निकाल लागताच चीनच्या अन्तर्गत दुफळी उफळून आली व ४२३ खेड्यातील सुमारे ४०० माणसाना कोरड्या विहिरीत फेकून जिवत पुरण्यात आले फोर्मोसा-मध्ये तर शाळेतल्या अनेक मुलावरही गोळ्या घालण्यात आल्या अशा रीतीने जनता अत्यत चिरडली गेल्याने माओत्से तुगने जेव्हा साम्यवादाची घोषणा केली तेव्हा त्याला प्रचड बहुमत मिळाले व चाग कायशेकला बाहेर पळ काढून फोर्मोसाच्या बेटात जाऊन अमेरिकेच्या आश्रयास रहावे लागले

## साम्यवादी चीन

माओत्से तुगने आता साम्यवादी धोरणाने देश बलिष्ठ करण्यास प्रारभ केला मैनिकानाही आरामात न ठेवता श्रमास जुपले व हुइ नदीचे धरण पचवीस लाख लोक विनावेतन कामास जुपून उरकण्यात आले ! रशियाप्रमाणे जमीनदाराची जमीन चीनच्या शेतकऱ्यानीही लुटून घेतली मात्र हे करीत असता जमीनदाराला ठार मारू नका असा इषारा देण्यात येत असे असल्या इशाऱ्याला गुड कितपत धूप घालीत असतील ते सागावयास नकोच ! सैनिकाना जो दहा कलमी हितोपदेश करण्यात येई त्यात जिताना ठार करू नका, व कर्ज फेडल्याशिवाय राहू नका याचा समावेश केलेला आहे उलट गेल्या दोन वर्षांत थोड्याथोडक्या नव्हे तर १५ लक्ष बडखोर समजल्या गेलेल्याना यमसदनास पाठविले असेही वृत्त वाचावयास मिळत आहे मात्र असल्या बातम्या साधार किती हे ठामपणे सागावयाचे सध्याच्या प्रचारकी वातावरणात कठीणच आहे

चीनच्या परराष्ट्रीय मत्र्याची भावजय मा शुन यी ही चीनच्या राष्ट्रीय धोरणाला कटाळून फोर्मोसामध्ये जाऊन राहिली आहे तिने सुमारे दीड वर्षापूर्वी रेडियोवर भाषण करून चीनमधील नव्या राजवटीचे जे चित्र रेखाटले आहे त्यावरून रशियाच्या पावलावर पाऊल टाकून चीनहि हुकुमशाहीचा दरारा गाजवू लागली आहे असे दिसते १९४५ मध्ये तिच्या पित्याचे कम्युनिस्टानी हाल हाल केले व शेवटी त्याला ठार मारले तेव्हा स्वत चा व तीन मुलाचा प्राण वाचविण्याकरिता ती शाघायला पळून आली व तेथेही हल्ला होणोसा पाहताच तिने १९४९ मध्ये तैवानला धूम ठोकली तिची मुख्य तक्रार आहे ती हीच की

साम्यवादाच्या विरोधकाची क्रूरपणे मुस्कटदाबी करण्यात कसूर केली जात नाही विचारस्वातत्र्याची गळचेपी करणे म्हणजे तर साम्यवादाच्या काळजा-वरच हत्यार चालविणे होय ही गळचेपी चालू असल्याने त्यापेक्षा मृत्यु बरा या भावनेने पाच पचवीस माणसे रोज नदीत उड्या टाकतात असा मा शुन यीचा आरोप आहे हजारो वर्षे चालत आलेली कुटुबसस्था मोडकळीस आणण्याकरिता नवराबायकोला मुद्दाम वेगळचा कारखान्यात कामास जुपण्यात येते आणि काम देण्यात येते ते मूळच्या गावापासून दूर गावी व ते सोडून बाहेर जाण्यास पोलिसची परवानगी घ्यावी लागते, असेहि ती सागते प्रत्येकाकडून सक्तीने काम उरकून घेण्यावर भर दिला जात आहे व प्रतिनिधी निवडण्याबाबत मतदानाचा अधिकार तत्त्वत सार्वत्रिक केला असताहि साम्यवादी पक्षाशी विरोध करणाराला प्रतिगामी ठरवून त्याचा मत देण्याचा हक्क हिरावून घेण्यास कमी केले जात नाही याचा अर्थ हाच की तत्त्वत लोकशाही असली तरी प्रत्यक्ष राजकारणात एका माओत्से तुग पक्षाची हुकुमशाहीच नादत आहे या हुकुमशाहीच्या जोरावरच मोठमोटचाची सपत्ति जप्त करण्यात येत आहे

मा शुन यी सागते की तिच्या घरावर अशीच जप्ती एके दिवशी आणण्यात आली व तिच्या पित्याकडून ३०० औंस सोन्याची मागणी करण्यात येऊन घरातील चीजवस्त विकून ती पुरविण्याची सक्ति लादण्यात आली पुन्हा काही दिवसानी त्या कुटुबाच्या मालकीच्या १६०० एकर शेतजमिनीवर धाड टाकून तीही जप्त करण्यात आली व सगळे कागदपत्र पुढे न करण्याच्या आरोपावर मा शुन यीची एक प्रतिगामी म्हणून गावातून धिड काढण्यात आली आणि ती कशी तर तिचे हात बाधून व पाठीवर 'एका प्रतिगामी पुढाऱ्याची पोर' अशी अक्षरे लिहिलेला फलाटा अडकवून! अशा प्रकारे अनेकाची घरेदारे लुटून त्याना बाहेर हाकलण्यात येते आणि आश्रयाला स्थान न राहिल्याने पुष्कळा-ना सैन्यात कोबून सैन्याचे बल वाढविण्यात येते अशा बळजबरीने कोडण्यात आले असता त्यानी बड केले तर नवल कसले? अशाच एका नव्या जुलमी भरतीच्या सैनिकानी चिडून आपल्या साम्यवादी अधिकाऱ्याना ठार केले आणि त्याचा परिणाम काय झाला तर साम्यवादी सरकारने त्या सर्व सैनिकाना जिवतपणे जमिनीत पुरून टाकले! असे सध्याच्या साम्यवादी चीनचे चित्र एका स्त्रीने चित्रित केले आहे ती साम्यविरोधी चाग कैशेकच्या फोर्मोसा-

मधून हे चित्र रेखाटीत आहे येवढे लक्षात ठेवले म्हणजे ते अतिशयोक्त असून त्यातील तथ्यांश तेवढाच ग्राह्य हे वाचक ओळखतीलच

उद्या आपल्या संस्कृतीला कोणते वळण लावावयाचे आहे हा स्वतंत्र भारतापुढे रोकडा प्रश्न उभा असल्याने लोकशाहीच्या पुढची पायरी जी समताशाही तिचे प्रात्यक्षिक व्यावहारिक प्रयोग जे आज रशिया, चीन वगैरे ठिकाणी चालू आहेत त्यातील गुणदोष निरखीत राहण्याकरिता त्याच्या उलट-सुलट चित्राकडे आपण नजर टाकीत राहिले पाहिजे

## युगोस्लावियाची तक्रार

साम्यवादाचा प्रयोग विराट प्रमाणात करताना कोणत्या बाबतीत पुढे पाउले टाकली जात आहेत व कोणत्या बाबतीत धटिंगणपणाचा अवलंब केला जात आहे ह्या दोन्हीकडे लक्ष पुरविले पाहिजे म्हणूनच रशिया व चीनमध्ये साम्यवादाच्या झेंड्याखाली चालू असलेल्या दडपशाहीच्या पखाखालील छोट्या राष्ट्रावरील दडपशाहीचा उल्लेख आवश्यक ठरतो या दडपशाहीमुळेच युगोस्लाव्हिया हा ध्येयाने साम्यवादी असताहि रशियाचे जोखड झुगारून देणे त्याला इष्ट वाटले असावे द्वितीय महायुद्धानंतर हंगेरी, रुमानिया, पोलंड वगैरे जी राष्ट्रे साम्यवादी रशियाच्या अंकित झाली त्या सर्व राष्ट्रातील प्रमुख कारखान्यावर प्रचंड पगार घेणारे अधिकारी आहेत ते रशियन आणि त्यांचा पगार किती तर युगोस्लाव्हियाच्या मंत्र्याला बारा हजार तर बेलग्रेडजवळच्या पुलाच्या उभारणीच्या रशियन सूत्रधाराला महिना पन्नास हजार ! या छोट्या राष्ट्रात ठेवलेल्या रशियन सेनेचा खर्चहि अवाढव्य येवढे सांगितले म्हणजे या लुटीची कल्पना येईल शिवाय या छोट्या दोस्त राष्ट्राकडून जरूर तो माल आपण कमी किंमतीत घ्यावयाचा व इतर राष्ट्रांना भारी किंमतीने विकावयाचा हे चालूच ! १९४८ मध्ये कोळशाची किंमत टनाला १४ ते २० डॉलर असता पोलंडने ६ लक्ष टन कोळसा रशियाला विकला तो टनाला १½ या दराने आज युगोस्लाव्हिया रशियाच्या संघातून फुटून निघाला तो अशाच प्रचंड आर्थिक शोषणेमुळे पोलाद तयार करण्याला लागणारा एक पदार्थ टनाला पाच लाख या महागाईने उत्पन्न केला जाई पण रशिया तो कोणत्या भावाने विकत घेई ? तर पंचेचाळीस हजारास ! असल्या पिळवणुकीमुळें

टिटो चिडला तर नवल कसले ? गेल्या पाचसात वर्षांत रशिया जो प्रचड यत्रसपन्न बनला आहे त्यात या अकित राष्ट्राकडून घेतलेल्या लुटीचाही मोठा वाटा आहे असे ' न्यू सोव्हिएट एम्पायर ' कर्ता डेव्हिड डॅलिन याने प्रतिपादले आहे, (नवशक्ति ११–४–५२)

शिवाय रशियातील सर्व माहिती बाहेर फुटू नये याचा कटाक्ष बाळगला जातो तो निराळाच [illegible], खार्कोन्ह वगैरे २२ शहराना जाण्यास परकीय वकिलाच्यावर अलीकडे बदी घालण्यात आली आहे बाहेरच्या उन्मुख [illegible] लोकाना आपल्या देशात येण्यास बदी करणे म्हणजे आपले कुठेतरी खुपत आहे हे पर्यायाने मान्य करणेच होय तसाच प्रकार जुन्या लोकनायकाची काही विचारसरणी आज उपयुक्त वाटत नाही म्हणून त्याच्या ग्रथाचे पुनर्मुद्रण करताना कल्पित शोध घालणे किवा जुन्याची शुद्धीकरणाच्या रूपाने हकालपट्टी करणे असेहि प्रकार रशियाने अवलबिले आहेत अशी तक्रार आहे कैदखान्यात प्रचड सख्या डाबली गेली आहे हे तर हर्बर्ट मारिसनबरोबर झालेल्या चर्चेत रशियाचे अधिकृत पत्र प्रावदा याने मान्य केले होते

असल्या दहशतवादाची कल्पना आपल्या महाराष्ट्राला अगदीच अपरिचित नाही सातारा जिल्ह्यातील लोकाच्या पायाला पत्र्या ठोकणारे पत्री गुड दिवसेदिवस आवाक्याबाहेर जात चाललेले आपण पाहत आहोच ना ?

## भारताचा तटस्थ तृतीय गट

याचा अर्थ एवढाच की भारताने रशिया, चीन, अमेरिका या सर्वांकडेच तटस्थ वृत्तीने पाहून त्याच्यातील आदर्श भाग आत्मसात करून आपली एक स्वतत्र शक्ति निर्माण केली पाहिजे छोटी राष्ट्रे या विराटाच्यापुढे छोटी असली तरी सहकार्याच्या जोरावर ती बलिष्ठ तिसरी शक्ति निर्माण करू शकतील ती करीत असता बलिष्ठाच्या बलाचे मर्म निर्मलपणे निरखत राहिले पाहिजे यामुळेच रशियाला आज जे प्रचड सामर्थ्य प्राप्त झाले आहे ते केवळ हुकुमशाहीच्या जोरावरच असे मानून समाधान न पावता अधिक खोल पाहिले पाहिजे रशियाने प्रतिगामी कपूना बदिस्त केले असले तरी दुसऱ्या महायुद्धात जे प्रचड सामर्थ्य त्याने दाखविले त्यामागचा जनतेचा

उत्साह समजावून घेतला पाहिजे जर्मनीची धाड रशियावर चालून येताच स्वत प्रचड खर्चाने बाधलेला नीपर नदीचा बधारा (डॅम) शत्रूच्या हाती पडू नये म्हणून रशियाने स्वत उडवून दिला पण शत्रूला पिटाळून लावल्यावर अवघ्या वर्षाच्या आत तो धक्का रशिया पुन्हा उभारू शकला यातील मर्म नीट समजून घेतले पाहिजे लेनिनग्राड, स्टॅलिनग्राड या शहरावर प्रचड हल्ले येणार हे ओळखून महत्त्वाचे कारखाने शेकडो मैल दूर नेण्याची योजना आधीच आखून ठेवली होती म्हणूनच जर्मनीची धाड येताच प्रचड कारखाने व लाखो कर्तबगार कारागीर याना शेकडो मैल दूर नेण्यात आले व तेथे महिनाभरात कारखाने पूर्ववत् चालू झाले जर्मनी हटत चालल्यावर तर सुप्त उत्साह उलट जोराने बाहेर आला आणि १९४२ च्या डिसेबर महिन्यात सुप्रसिद्ध न्यूटनचा त्रिशत् सावत्सरिक उत्सव मोठ्या थाटाने साजरा करण्यात आला

## त्रिगिरी कारखाना

आता शेवटी रशियातील राहणीची व विचारसरणीची वानगी म्हणून एका कारखान्याची व धर्मगुरूची ओझरती भेट घेऊ या रशियात जे बडे कारखाने आहेत त्याची कल्पना येण्याकरिता मास्को ट्रेख गॉर्का ('ट्रेख गार्का' म्हणजे 'त्रिगिरी' अथवा तीन टेकड्याचा समूह) येथील एका [illegible] एकदोन गोष्टीचा उल्लेख केला म्हणजे पुरे सोव्हिएट राज्यपद्धतीपूर्वी हा कारखाना एका कोट्याधीशाच्या मालकीचा होता स्वत ला [illegible] व प्रार्थना मदिरासाठी असे तीन भव्य राजवाडे त्याने उठविले होते तर कारखान्यातील कामगाराना राहण्याकरिता मात्र लाकडी झोपड्या होत्या साम्यवादी सरकारने या झोपड्या पाडून त्याऐवजी चारपाच मजली भक्कम इमारती बाधून त्यात कामगाराना राहण्याची सोय केली, व अधिकात अधिक काम करणाऱ्याला मोठी बक्षिसेही देण्याची तरतूद सुरू केली मात्र त्याच बरोबर ह्या सुखसोयीनी आळशीपणा न वाढता काटकसरीपणा वाढीस लागावा व काम पूर्वीपेक्षा अधिक उठावें या दृष्टीने अधिकाऱ्याच्या परवानगीशिवाय नोकरी सोडण्यावर व परगावीही जाण्यावर बदी घालण्यात आली असून कामावर येण्यास २० मिनिटापेक्षा अधिक उशीर झाल्यास शिक्षाही ठोठावण्यात कसूर केली जात नाही कारखा-

न्याच्या डिरेक्टरला असे अधिकार देण्यात आले आहेत पण त्याच बरोबर हेही सागितले पाहिजे की एकादा असिस्टट फोरमन महिन्याला दोन हजार रुबल्स पगार मिळवू शकतो तर या डिरेक्टरला महिना चौदाशे रुबल येवढाच पगार मिळतो व कारखान्याला मिळणाऱ्या बक्षिसाच्या वाटपातूनही त्याला अलिप्त रहावे लागते! तो दर आठवड्यातून दोनतीनदा कामगाराची गाऱ्हाणी ऐकून घेत असतो १९४० साली या कारखान्याला चार कोटी रुबल्स-चा नफा मिळाला पैकी आठ लक्ष रुबल्स कामगाराच्या सुखसोयीची वाढ करण्याकरिता राखून ठेवून बाकीची ३ कोटी ९२ लक्ष रुबल्स येवढी रक्कम सरकारी तिजोरीत भरण्यात आली

हा प्रचड कारखाना म्हणजे लहानसे गाव असून त्यातील सिनेमा, व्याख्याने, वर्तमानपत्रे, ग्रथालये, शिशुविहार, लष्करी शिक्षण, गायन, वादनादि कला, फुटबॉल, हॉकी वगैरे खेळण्याकरिता तीन हजार प्रेक्षक बसतील असा स्टेडियम आहे सुखसोयीचे कार्यक्रम कामगाराचे पुढारीच चालवितात विद्यार्थ्यांना मोफत शिक्षणच नुसते नव्हे, तर कपडालत्ता व जेवणखाण हेही मोफत देण्यात येते दोन तास विद्यालयीन शिक्षण देण्यात येऊन बाकीचे चार ते आठ तास कारखान्यात उमेदवार म्हणून काम करावे लागते त्या कामा-बद्दल त्याना महिन्याला सुमारे दीडशे रुबल्स मोबदलाही दिला जातो उन्हाळ्याच्या सुट्टीत विद्यार्थ्याना ओका नदीकाठच्या कारुशिया गावात रहाण्याची सोय करण्यात येते गेल्या दुसऱ्या जागतिक युद्धात जर्मनीने खुद्द मास्कोवर हल्ला चढविला तेव्हा उरल पर्वतावर झोपड्या बाधून त्यामध्ये राहण्याकरिता सुमारे हजार बालविद्यार्थ्यांना व त्याच्या शिक्षकाना राहण्याची सोय करून त्याना तेथे सुरक्षितपणे पोचविण्यात आले दुसऱ्या जागतिक युद्धात यशस्वी झाल्यावर तर वरील प्रकारच्या समाज कार्यक्षम करणाऱ्या योजना अधिक प्रमाणावर आखण्यात व व्यवहारात उतरविण्यात येत आहेत

झारच्या अमदानीत युझबेकिस्तान नावाचा प्रदेश उजाड होता पण आता नव्या प्रयोगाने त्यात श्रेष्ठ प्रकारचा कापूस पिकविण्यात येत आहे. युद्ध चालू असता वेडेल विल्की, मॉरिस डॉब यासारखे थोर पुढारी रशियात जाऊन पाहून आलेले लिहीत होते की रशियन गिरणीतील कामगार हा इग्लड अमेरिकेतील कामगाराच्या दीड पटीने उत्पादन करीत आहे युद्धापूर्वी

कामाची वेळ दिवसास फक्त सात तास असे युद्धकाळात ती वाढविणे अवश्य झाल्यास नवल नाही पण ते कष्ट सोसूनच रशियाने जय मिळविला प्रचड कारखान्याला अधिक मजुर पुरविणे शक्य होत चालले याचे एक कारण म्हणजे शेतीही प्रचड यत्रसामुग्रीने ७ लाख ट्रॅक्टरने चालविण्यात आल्याने मुजिक (कुणबी) कारखान्याना मजूर म्हणून मिळू लागले हे होय

## धर्मक्षेत्र रशिया !

आता रशिया हा धर्माला अफूची गोळी म्हणतो म्हणून जे रशियावर रुष्ट आहेत, त्याच्याकरिता शेवटी एका सुप्रसिद्ध इग्रज धर्मगुरूचे रशिया-वरील प्रवचन ऐकून रशियाची रजा घेऊ परमेश्वर, प्रसाद, दीक्षा, वगैरेवर आधारलेला कोणताही धर्मपथ आजचा रशिया मानीत नाही मार्क्सने तर अदृष्ट शक्तीवर आधारलेला धर्म हा व्यावहारिक ऐहिक जीवनाकडे डोळस-पणे पाहणाऱ्यास धुदी आणणारी अफूची गोळी होय असा शेरा मारला होता अशा स्थितीत इग्लडमधील सुप्रसिद्ध कँटरबरीचा धर्मगुरु याने स्वत रशियात जाऊन, तेथील परिस्थिति पारखून रशियाच्या नव्या समाजघटनेला हार्दिक पाठिबा द्यावा हा प्रकार लक्ष वेधण्यासारखाच नाही का ? मात्र त्यात अगदी-च आश्चर्य वाटावयास नको कारण एका गालफडीत मारली असता दुसरी पुढे करा असा उपदेश करणाऱ्या येशू ख्रिस्ताचा धर्म मानणारी बडी राष्ट्रे आज गोरेतराना पायाखाली तुडवीत आहेत व एकमेकावर अणुबॉब टाकण्या-ची तयारी करण्यात गुतलेली आहेत ! अशा स्थितीत येशूची शिकवण काही अशाने तरी कोठे व्यवहारात उतरविली जात आहे का हे पाहण्याची आतुरता उत्पन्न झाली तर नवल कसले ? महात्मा गाधीच्या नि शस्त्र प्रतिकार व असहकार या तत्त्वाने व चळवळीने अनेक ख्रिस्ती धर्मगुरूचे लक्ष रोखले गेले होते तेही यासाठीच

त्याच प्रकारे रशियातील नव्या साम्यवादी प्रयोगाने इग्लडमधील एका प्रख्यात् धर्मगुरूला वेधून सोडले दहा वर्षांपूर्वी म्हणजे १९४२ साली दुसऱ्या महायुद्धाच्या धुमश्चक्रीच्या काळात तो रशियात होता तो रशियातील जीवनाविषयी लिहितो की, " रशियातील जनतेवर आज अनेक बधने घातली आहेत व त्याना सक्तीने कामास जुपण्यात येत आहे याबद्दल इतर

राष्ट्रे रशियाच्या साम्यवादाचे वाभाडे काढीत आहेत का? तर आज इग्लडमध्ये व्यक्तीला अधिक स्वातत्र्य आहे म्हणून! कोणते स्वातत्र्य? तर लक्ष्मीधराना गिरण्या वाटेल तेव्हा बद करण्याचे व अमाप नफा घेऊन जनतेला लुटण्याचे आणि कामकऱ्याना काम मिळाले नसता खुशाल हवा खात पडण्याचे! असले स्वातत्र्य इतर राष्ट्रानी दिले आहे हे खरेच! तसे स्वातत्र्य रशियात नाही हे मान्य! पण जनतेच्या स्वातत्र्यावर नियत्रण घातले असले तरी तिच्यात अधिक जिवतपणा ओतला आहे ना? (Less liberty but more life) आणि तसा ओतला नसता तरच नवल कारण ज्यानी साम्यवादाचा पुरस्कार करण्याकरिता हाडाची काडे केली त्या मार्क्स व लेनिन या पुढाऱ्याना जनता विसरेल कशी? जर्मनीतून हद्दपार केल्यावर मार्क्स हा आपल्या पत्नी व छोटचा बालकासह पॅरिसमध्ये राहिला त्यावेळी दोनतीन महिन्याचे घरभाडे थकल्यामुळे पोलिसानी त्याचे काही सामान जप्त केले अशा बेकारी अवस्थेत मार्क्सने प्रचड वाचन केले व आपला ग्रथराज लिहून काटला तसेच खडतर जीवन लेनिनचे त्याचा भाऊ अलेक्झाडर हा क्रातिकारक म्हणून त्याला फासावर चढविण्यात आले व खुद्द लेनिनची विद्यापीठातून हकालपट्टी करण्यात आली पण त्यामुळे चिडून न जाता अत्यत कसोशीने अभ्यास करून चार वर्षांऐवजी दोन वर्षांतच त्याने विद्यापीठाची पदवी सपादन केली! क्रातीच्या या नेत्यावर १९१८ साली म्हणजे क्रातीनतर काही महिन्यानीच एका मार्थेफिरूने गोळी झाडली पण ती वर्मी न लागल्यामुळे तो पुढे सहा वर्षे नव्या साम्यवादी कार्यक्रमाला भक्कम पायावर उभा करण्यात आपली सर्व शक्ति खर्च करू शकला याच लेनिनने मार्क्सलाही थोडे बाजूला सारून स्त्रीपुरुषस्वैराचारी वर्तनाचा स्पष्ट निषेध करण्यास मागे पाहिले नाही कडक धोरण स्वीकारल्याशिवाय कोणताही नवा प्रयोग यशस्वी होऊ शकत नाही आणि त्यास अडथळा आणणारे काटे वाटेत येऊ लागले तर त्याचा काटा शस्त्राने कणखरपणे उपटून काढावा हेच रास्त! हातची सत्ता व सपत्ति सुखासुखी सोडण्यास कोण तयार होईल?" यामुळे कँटरबरीचा आचार्य मोकळेपणाने लिहितो की, "**अशा प्रकारच्या हत्येंत पाप नाहीं हें आपण स्पष्ट केलें पाहिजे** वर्गकलह हा नीतीवरच आधारलेला आहे लाखो मजुरानी काम करून उमाप सपत्ति निर्माण करावी आणि चारदोन

लक्षाधिपतींनी तिचा भला मोठा हिस्सा गिळंकृत करावा हीच धादात अनीति होय आजच्या यांत्रिक युगात जी प्रचंड संपत्ति निर्माण करता येऊ लागली आहे तिचा वाटा सर्वांना मिळावा हेच न्याय्य व नीतिकारक होय ख्रिस्ती नीतिमत्तेला सर्वात जुळते तत्त्व असेल तर ते हेच होय "

आचार्यांची ही विचारसरणी तर्कशुद्ध आहे हे साध्य होण्याकरिता अनेक थोर निस्वार्थी [illegible] फासावर चढविण्यात आले व लाखोंना आज तुरुंगात डांबून कामास जुंपण्यात येत आहे त्याचे समर्थन मात्र होऊ शकत नाही हे निराळे तो मुद्दा सोडला तर या आचार्यांनी केलेले रशियातील राहणीचे मान एकंदरीत आपल्या इंग्रज अमदानीतील भारतापेक्षा वरच्या दर्जाचे आहे हे मान्य होण्यासारखेच आहे तो लिहितो की, हिमालयाच्या उत्तर भागात राहणाऱ्या तुर्की बालकांवर रशिया वर्षाला ३९ पौंड स्टर्लिंग खर्च करते तर इंग्रजी राजे भारतीय बालकांवर फक्त १।। शिलिंग खर्च करतात * भूमिगत द्रव्य (कोळसा, लोखंड वगैरे हरतऱ्हेचे) [illegible] प्रत्येक राष्ट्र थोडाबहुत पैसा खर्ची टाकते पण रशियाचा त्यावरील खर्च हा भारून टाकणारा आहे ब्रिटिश अमदानीतील भारतात या खात्यात काम करणाऱ्या तज्ज्ञांची संख्या चाळीस देखील नसे तर रशियात त्याच्या संख्येने हजारांची पल्याड गाठली होती रशियाच्या मध्यभागात अशी एक कोळशाची प्रचंड खाण शोधून काढली आहे की तिचा कोळसा [illegible] तीन शतके पुरून उरेल येवढा आहे असे म्हणतात आणि उरल पर्वतात तर लोखंडाच्या प्रचंड खाणीचा शोध लागला आहे

पण यात विशेष लक्ष वेधण्यासारखी गोष्ट म्हणजे या नव्या संपत्तीचा उपयोग सर्व लोकसमुदायाची राहणी एकंदर निकोप व सुखकर करण्यात होतो हा होय १९३७ मध्ये एक अमेरिकन भेषजशास्त्राचा प्राध्यापक रशियात जाऊन आला त्याने लिहिले आहे की तांत्रिक साधनांच्या विपुल पुरवठ्यात अमेरिका रशियाच्या पुढे असली तरी वाकबगारपणे व शिस्तीने काम करण्यात रशियानेच दोन पाउले पुढे टाकली आहेत आणि लोकशिक्षणाच्या सर्व क्षेत्रातहि तसाच उच्चांक गाठला आहे १९३७ मधील वार्सा व ब्रुसेल्स

* नुसत्या असल्या आकड्यांनी राहणीच्या फरकाची योग्य कल्पना येत नसली तरी स्थूलमानाने दोहोंतील विरोध लक्षात येईल

येथे भरविलेल्या तिसऱ्या जागतिक चढाओढीत पियानो व व्हायोलिन या वाद्यवादनात रशियन तरुणानीच पहिली बक्षिसे मिळविली मास्को येथील डायनामो अद्ययावत् कारखान्यात इंग्रज एजिनियर टस्टिन हा १९३४ साली तेथे गेला होता त्यानेही रशियन युवक अत्यत हौसेने काम करतात असाच शेरा दिलेला आहे

आज रशियाविरुद्ध इंग्लडादि राष्ट्रे दात खात असली तरी गेल्या काही वर्षात प्रथम अफाट सपत्तीच्या लोभाने व नतर युद्धात स्वार्थरक्षणाच्या धोरणाने रशियाला हरतऱ्हेची उमाप मदत इंग्लडादि राष्ट्रानी करण्यास कमी केले नाही या सधीचा फायदा घेऊन व यत्राने शेती करण्याचे धोरण स्वीकारून रशियाने लाखो कामगाराना मोकळे केले पण त्याना भुकेकगाल न ठेवता नवे प्रचड उद्योगधदे निर्माण करून व कामाचे तास रोजी सातावर आणून बसविण्यात आणि कामगाराना भरपगारी सुट्या देण्यात आघाडी मारली ती विशेष उल्लेखनीय होय (दुसरे युद्ध सुरू झाल्यावर कामाचे तास वाढवावे लागले ते अपरिहार्यच होते) आणि या बाबतीत साम्यविरोधी सोडून सर्वाना—स्त्री-पुरुषाना व गोऱ्या—काळ्याना सारखेच वागविण्यात येते हे वैशिष्टच होय अभ्यासक्रमात व लोकशिक्षणात ही अशीच व्यापक दृष्टि ठेवण्यात आली आहे शेक्स्पिअरच्या त्रिशत् पचविशति सावत्सर उत्सवप्रसगी रशियातील ३०० नाटकगृहात सबध आठवडाभर शेक्स्पिअरची नाटके दाखविण्यात येत होती यावरून विशिष्ट प्रकारचेच वाङमय जनतेपुढे माडण्यात येते या आक्षेपाला अर्थ रहात नाही तेच धोरण धार्मिक आचारासबधी रशियन सरकार कोणत्याच धर्माचा पुरस्कार करीत नाही धर्मावर सरकार पैही खर्च करीत नाही पण व्यक्तिश धर्माला वाहून घेण्यास कोणालाच बदी नाही सर्वांना समान सर्वी हेच धर्माचे तरी प्रधान तत्त्व ना? मग ते शक्य तेवढेच लागू करणारा रशिया धर्माचा शत्रू असे कसे म्हणण्यात येईल? साम्यवादाचे उच्च ध्येय सर्वाची रहाणी सारख्याच उच्च पातळीवर नेणे हे होय ते प्रत्यक्ष व्यवहारात उतरण्याचा काळ अद्याप यावयाचा असला तरी भिन्नवर्गाच्या व व्यक्तीच्या राहणीतील अतर कमी करण्याचा प्रयत्न चालू आहे, व बेकारी, रोगराई, व वर्णभेद, जातिभेद, लिगभेद याचे उच्चाटन करण्याचा प्रयत्न चालू आहे यामुळे नव्या पिढीस

अपूर्व उत्साह निर्माण करण्यात आला आहे या प्रकारे उच्च तत्त्वाकरिता लढणारा हा रशिया **येशुखिस्ताचा वैरी नसून खरा मित्रच आहे**

अशा प्रकारे इग्लडातील एका थोर श्रेष्ठ धार्मिक पुढाऱ्याने रशियातील नव्या राहणीचे केलेले हे वर्णन आहे आणि ते वर्णन अनेक शहरात दिवसा-रात्री वाटेल त्यावेळी स्वतत्रपणे हिडून जे दृश्य दिसले त्यावरून केले आहे असे त्याने लिहिले आहे

त्याकडे वाचकाचे लक्ष वेधावयाचे ते येवढ्याच करिता की रशिया हा धर्माच्या विरुद्ध आहे या धडकीने रशियापासून काहीही शिकण्यास ज्याना सकोच वाटतो त्यानी या प्रसिद्ध ख्रिस्तीधर्मपुढाऱ्याचे मत निदान ऐकून ठेवावे 'सर्वे न सुखिन सन्तु सर्वे सन्तु निरामयः ।' व 'ज्यासि आपगिता नाही । त्यासि धरी जो हृदयी । तोचि साधु ओळखावा । देव तेथेचि जाणावा ॥' असे आपले ऋषी व सत सागतात ना ? आता हे ध्येय ज्या थोड्या प्रमाणात अन्यत्र उतरले आहे त्यापेक्षा अधिक प्रमाणात रशिया उतरविण्याचा प्रयत्न करीत आहे, त्याकडे या ख्रिस्ती आचार्याला लक्ष वेधावयाचे आहे आणि त्याचे मत या ठिकाणी उद्धृत करीत आहे, त्याचे कारण, रशियातील साम्यवादाच्या पहिल्या प्रयोगात अनेक क्रूराचार घडले असले तरी, मानवतेचे पाऊल उद्याच्या सस्कृतिकडेच कसे जात आहे हे लक्षात यावे म्हणून.

---

# प्रकरण बारावें

# भारतीयांची आध्यात्मिक परंपरा

रशिया व चीन या खडप्राय देशातील अफाट जनतेला समान भूमीवर आरूढ करण्यात येत असताना अतिरेकी व अत्याचारी प्रयोगानाहि जे तोंड द्यावे लागले ते शक्य तितके टाळून, व या साम्यवादी दिशेने जाणाऱ्या राष्ट्रापासून योग्य तो धडा घेऊन आपल्या भरतखडाने यापुढे पाउले टाकिली पाहिजेत, असा पक्ष मागील प्रकरणी माडला आहे

आता रशियाच्या नास्तिकतेने धडकी घेतलेल्या विचारवताची भेट घेऊया

## वन्य जातीचा वध !

दुसऱ्या महायुद्धात अमेरिका व रशिया या दोन्ही देशाना भेट देणारा इग्रज ग्रथकार वेल्स याचा उल्लेख मागे आलाच आहे आता पुन्हा एकदा त्याचा उल्लेख करीत आहे तो रशियातील वश, जाती वगैरेची समतोलता त्याला एके काळी मान्य नव्हती हे . ˜ . ˜ साम्यवादाचे गोडवे गात असताहि कार्ल मार्क्स या व्यक्तीबद्दल त्याला तिटकारा असे हे मागे पाहिलेच तोच प्रकार अमेरिकेतील ˜ . ˜ . . ˜ अमेरिका साम्यवादाकडे सनदशीरपणे पाउले टाकीत चालली आहे असे तो म्हणे पण काही वर्षांपूर्वी त्याने लिहिलेल्या आगामी समाज (Anticipations) या ग्रथात त्याने भावी मानवसृष्टीचे जे कल्पित चित्र रेखाटले आहे त्यात मानव येथून तेथून सारख्याच दर्जाची आहे ही स्वप्नमय कल्पना टाकून काही मोठमोठ्या जमाती मूलत हीन आहेत व त्याची हकालपट्टी झाल्याशिवाय राहणार नाही हे डार्विनच्या 'जगेल तो जगेल' या तत्त्वाला धरूनच होईल, असा पक्ष माडला आहे या हलक्या ज-˜ ˜ ˜न काही श्रेष्ठ पुरुष पुढे येऊन चमकले तरच त्याचे भाग्य नाही तर मृत्यू त्याना कवटाळाण्यास उभाच आहे तो त्यानी मोकळेपणे स्वीकारावा कारण मृत्यूच त्याना गुदमरून सोडणाऱ्या कष्टातून सोडवील आगामी आदर्श समाजात घोर गुन्हेगाराना तुरुगात डाबण्याऐवजी किंवा इस्पितळात त्याच्यावर

उपचार करण्याऐवजी त्याना सरळ यमलोकी पाठविण्यात येईल तोच प्रकार मागासलेल्या जमातीनाही लागू होईल वन्य जाती सुधारणार नसतील तर त्याचे काटे साफ उपटून काढण्यात येतील! अशा प्रकारचे वेल्सने चित्र रेखाटले आहे जर्मन नित्सेनें तर स्पष्ट प्रतिपादन केले आहे की कष्टकऱ्याचे कष्ट वाढवून प्रनिभावानाना अधिक स्वास्थ्य मिळेल तरच कलेची वाढ होईल गेल्या दुसऱ्या महायुद्धात वेल्स ज्या रशियाची पाठ थोपटीत होता त्या रशियाने मात्र काळचा व भटक्या जातीना यमसदनास न पाठविता त्याना शिस्त लावून कामास जुपले आहे आणि सुधारलेली अमेरिका निग्रोवरील अत्याचाराचे अद्यापीहि पूर्ण उच्चाटन करू शकलेली नाही ! पण कार्लमार्क्सचे नाव घेतले की ज्याना पोटात कालवल्यासारखे वाटू लागते त्याना हे सागून काय उपयोग ?

## बुद्धिवंत अप्रबुद्ध

इग्रज वेल्सला उद्याच्या सस्कृतीच्या साम्यवादी स्वरूपाचा पुरस्कार करणाऱ्या मार्क्सबद्दल कसा तिटकारा वाटत असे हे जसे पाहिले, आता आपल्यातील आध्यात्मिक परपरेत मुरल्यामुळे मार्क्सवादाकडे काहीशा कलुषित दृष्टीने पाहणाऱ्या स्वत ला विनयाने 'अप्रबुद्ध' म्हणणाऱ्या पण ग्रथाच्या पानोपानी विद्वत्तेची चमक दाखविणाऱ्या 'दोन साम्यवाद' या ग्रथाच्या लेखकाच्या विचारसरणीचे ओझरते दर्शन घेऊया वेल्सप्रमाणेच हा ग्रथकारही बजावतो की, कोणत्याही अवस्थेत सपूर्ण मनुष्यजात सुखी होणे अशक्य असल्याने सपूर्ण मनुष्यजात सुधारण्याची भाषा बोलणे हे असमजसपणाचे आहे हा भारतीयाचा सिद्धान्त होय (पृ ११७) सापत्तिक भेद नाहीसे झाले म्हणजे सर्व भेद निर्विकल्प होतील ही कल्पना आम्हास मान्य नाही (पृ १२०) यावर प्रथम हे स्पष्ट केले पाहिजे की अशा कल्पनेच्या आहारी जाईल त्याला भोळसट समजून खुशाल बाजूला सारा ! कारण साम्यवादी समाजघटना अस्तित्वात आली म्हणजे कुरूप स्त्रिया सुरूप होतील, कुब्जेची कालिदी होईल, किवा साम्यवादी योगपुरुषाने वरदहस्त मस्तकावर ठेवनाच कोणचाही कुड्या बुद्धीचा कोळी कालिदास होईल वा भाकऱ्या बडवणाऱ्या बल्लवाचा भास्कराचार्य होईल असा दावा कोणी सुबुद्ध माडील का ? मार्क्सनेही असा दावा माडलेला

नाही मग साम्यवादी जो दावा माडीतच नाहीत त्याचा फोलपणा उगाळीत बसण्यात अर्थ काय ?

## विज्ञानाची केविलवाणी हतबुद्धता !

असाच काहीसा प्रकार पाश्चात्य सस्कृतीच्या स्वरूपाविषयी अप्रबुद्धानी माडलेल्या विचारात दिसतो पाश्चात्य हे विज्ञानात गेल्या दोनतीन शतकात भारताच्या फार पुढे गेले आहेत हे विमाने व नभोवाणी घरघरून व सुस्वर गाऊन जगाला सारखे सागत आहेत पण त्याच्या ज्ञानाची ही प्रचड झेप उघडपणे मान्य करण्याऐवजी अप्रबुद्ध लिहितात की, " अर्वाचीन शास्त्रज्ञाची घमेड आता नाहीशी होऊन अनिश्चिततेचि ( Indeterminacy ) कबुली देण्याची केविलवाणी स्थिति प्राप्त झाली आहे " केविलवाणी हा शब्द मद्दाम लक्ष वेधणारा आहे कारण त्या शब्दावरून अप्रबुद्धाची विचारसरणी तर केविलवाणी नाही ना अशा शकेचा चटका मनाला झटकून गेल्याविना राहत नाही अर्वाचीन शास्त्रज्ञ विश्वाचे कोडे उलगडले अशा भरमसाठ बौद्धिक भराऱ्या मारीत नाहीत हा त्याचा केविलवाणीपणा ? अर्वाचीन शास्त्रज्ञ आपल्या ज्ञानाच्या मर्यादा प्रामाणिकपणे नमूद करतात हा त्याचा मोठा घोर अपराध म्हणावयाचा की त्याच्या विनयशीलतेची तारीफ करावयाची ? पण पाश्चात्य म्हणेल ते असत्य व भारतीय माडील ते सत्य अशीच कुढी समजूत करून घेतल्यावर आपल्या ज्ञानाच्या मर्यादा आपण ओळखतो असे प्रामाणिकपणे माडणाराच्या उद्गाराना केविलवाणी कबुली अशी शेलकी द्यावी यातले सौजन्य प्रबुद्धानीच ठरवावे ! केविलवाणे आधुनिक पाश्चात्य विज्ञान बाजूला सारा आणि आपल्या देशातील [illegible] साक्ष काय पडते ते पहा आपल्या देशात योगशास्त्राची जोपासना फार कसोशीने केली गेली होती त्याचा योग्य अभिमान बाळगणे भारतीयाचे कर्तव्य होय पण या योगशास्त्रालाहि मर्यादा आहेत हे मोकळेपणाने मान्य करण्यातच प्रामाणिकपणा उठून दिसेल योग्याना अतर्क्य अशा सिद्धि प्राप्त झाल्या असतील पण त्या सिद्धीचा राष्ट्राच्या उन्नतीकडे ते उपयोग करू शकले नाहीत म्हणजेच त्याचे सामर्थ्य केविलवाणे नसले तरी मर्यादित होते हे ऐतिहासिक सत्य अमान्य करावयाचे काय ?

# ज्ञानदेव व रामदेव

श्रीज्ञानेश्वराचे उदाहरण वाचकाना या ठिकाणी आठवेलच ते योगी म्हणून प्रसिद्ध होते व त्या काळी योगविद्येची जोपासना जोराने सुरू होती तत्कालीन चागदेव वटेश्वर याने आपल्या तत्वसार ग्रथात योगिराजाची एक मोठी मालिका दिली आहे पण असे असताहि मुसलमानाची धाड येताच हे योगिराज त्याला तोड देऊ शकले नाहीत किवा त्यानी दिले नाही हे ऐतिहासिक सत्य आहे ना ?

' हे विश्वचि माझे घर ' असे म्हणणाराना मुसलमान परके दिसतील कसे असा प्रश्न तुम्ही टाकाल पण तो टिकणार नाही कारण सत स्वत च्या समाजाला सर्वस्वी विसरले नव्हते ' धर्मरक्षणासाठी करणे अटीतटी आम्हासि ' या प्रकारची त्याची वृत्ति स्पष्ट होती ज्ञानेश्वरानी रामदेवरावाचा गौरव पूर्ण उल्लेख ज्ञानेश्वरीच्या शेवटी, तसा काही विशेष प्रसग नसताहि, केला याच्या पाठीमागची भूमिका हीच ना ? म्हणजे स्वधर्म टिकविण्याची ना ? मग असे असता मुसलमानी टोळधाड येऊन रामदेवरावाचा नामर्दपणा उघड पडताच समाधि घेण्याचे विचार ज्ञानेश्वराना का सुचावे ? ते सुचले हे ऐतिहासिक सत्य आहे पुढील दोनतीन शतकात साधुसतानी स्वधर्म आणि स्वभाषा अत्यत चिकाटीने टिकविली हे भूषणास्पद होय पण योगसामर्थ्यावर मुसलमानाना त्याना पिटाळून लावता आले नाही किवा यौगिक सामर्थ्याच्या जोरावर त्याचा बुद्धिपालटहि त्याना करता आला नाही असेच इतिहास दर्शवितो ना? यामुळे योगविद्येला विज्ञानापेक्षा मोठेपणा देताना योगविद्येच्याहि मर्यादा लक्षात बाळगणे युक्त नाही का ? पण तसे मोकळेपणाने न म्हणता ग्रथकार लिहितो की, " योगशास्त्राचा उपयोग मानवी सुखसोयीसाठी का केला नाही ? कदाचित् तिकडे त्याचे लक्ष गेले नसेल सुखसाधनाची वाढ म्हणजे सुखाची वाढ नव्हे हे त्यानी ओळखले होते खरी सुखाची किल्ली कळल्यावर साधनाची काहीच मातब्बरी वाटत नाही हे त्यानी ओळखले होते "

असे जर होते तर ज्ञानेश्वराना रामदेवरावाचा उल्लेख मुद्दाम करण्याची आवश्यकत वा औचित्य का वाटावे ? इतर सतानाही धर्मरक्षणाचा टाहो

फोडत बसणे आवश्यक का भासावे ? रामदासाना 'यत्न तो देव जाणावा' यावर भर का द्यावा लागला ? खुद्द अप्रबुद्धाचेहि सर्वस्वी समाधान झालेले दिसत नाही योगाचे प्रचड सामर्थ्य हाताशी असताही ज्ञानदेव–नामदेवाना उघडचा डोळचानी मुसलमानी धर्माचे आक्रमण पहावे लागले याचे समर्थन करावयाचे कसे ? म्हणून लेखक पुढे लिहितात, " कसेहि असो ! या गोष्टी-कडे त्याचे लक्ष गेले नाही हे खरे आहे वाटल्यास हा दुर्दैवयोग म्हणा " (पृ २०) दुर्दैवयोग म्हटले म्हणजे वादाला अवसरच उरत नाही ! 'धाता यथा पूर्व अकल्पयत' असा जर सर्वत्र क्रम ठरलेला असेल तर मानवी प्रयत्ना-ला वावच रहात नाही म्हणूनच योग्यानी कुडलिनीचे सुप्त सामर्थ्य ओळ-खले हे मान्य केले तरी त्यातील अणिमा गरिमा या सिद्धीच्या मर्यादा मान्य करणेच प्रामाणिकपणाचे होणार नाही का ? योगेश्वरानी आक्रमकाच्यावर मूठ मारावयास हवी होती असे मला म्हणावयाचे नाही पण सिद्धयोगीदेखील आक्रमकाचे मन वळवू शकले नाहीत हेच इतिहासावरून दिसते ना ? तात्पर्य, त्रिकालदर्शी योग्यालाही पुढील सकटे टाळता येत नाहीत असाच ना याचा अर्थ ? एकीकडे योगसामर्थ्याच्या मर्यादा मान्य करावयाच्या नाहीत, दुसरीकडे योग्याच्या डोळचादेखत मौलानानी धर्म व भाषा यावर केलेल्या आघाताकडे डोळेझाक करिता येत नाही त्यामुळे दैवदुर्विलासाचे आवढे गिळण्यापेक्षा अप्रबुद्धाच्या पुढे दुसरा उपायच नव्हता हे आवढे गिळणे हा मोकळेपणा ! आणि पाश्चात्य शास्त्रज्ञानी शास्त्रीय अनिश्चिततेची प्राजल कबुली देणे ही मात्र केविलवाणी स्थिति ! !

## योगाच्या मर्यादा

परकीयाचे हल्ले थोपविण्यास योगमार्ग अपुरा पडला हे खोचत असल्याने ते पुन्हा अन्यत्र लिहितात की, " योगशास्त्र म्हणजे ज्या सूक्ष्म साधनाच्या अभावी अर्वाचीन शास्त्र अडून बसले आहे ती साधने निर्माण करणारे शास्त्र त्यात अद्भुत काही नाही " नसेल पण मुसलमानी सत्तेपुढे योगसामर्थ्य पुरे पडले नाही हे ऐतिहासिक सत्य ! ते पचविणे तर कठीण म्हणून अशा प्रकारच्या विचारवताला धर्माला अफूची गोळी म्हणून झिडकारणारा जो मार्क्स त्याविषयी काय धिक्कार वाटत असेल त्याची कल्पना करता येईलच

ग्रथकार उघडपणे लिहितो की मार्क्स हा यहुदी या लोकानी त्याचा छळ करणाऱ्या लोकाच्या विरुद्ध केलेल्या गुप्त व उघड चळवळीतून बोल्शेविझम् पोसला गेला असे वाटण्याइतका इतिहासात देखावा आहे येवढे खरे (पृ ३५) मार्क्स यहुदी असो की यादव असो त्याच्या तत्त्वज्ञानातील फोलपणा दाखवा अथवा त्यात भर टाका नुसते टाले देऊन काय होणार ? पण ज्ञानी राजाच्या चारित्र्याचा आदर्श कोठे असेल तर तो भारतातच अशी एकदा मनाला अढी घालून घेतली म्हणजे परकीयाच्या प्रत्येक गोष्टीत दोषच उठून दिसू लागले तर नवल कसले ! ग्रथकार लिहितो, " ख्रिस्ती धर्माच्या तुटपुजेपणामुळे भाडवलशाहीने व यत्रयुगाने झालेल्या ---- कम्युनिझम्ची उत्पत्ति झाली ही गोष्ट कोणीहि नाकारू शकत नाही " खरेच आहे साम्यवाद हा भाडवलशाहीच्या ताणलेल्या गर्भाशयातून बाहेर फुटून निघालेले मूल आहे हे सर्वमान्यच आहे भाडवलवाले हे बहुजन समाजाच्या सपत्तीच्या रक्ताचे जळवाप्रमाणे रक्त शोषीत आहेत जळवाची उपमाहि कमीच पडेल, कारण जळवा अशुद्ध रक्त शोषून घेतात उपमा द्यावयाची तर जळवाप्रमाणेच रक्त शोषणारे दुसरे काही किडे आपल्या महाराष्ट्रातील महाबळेश्वर प्रातात आहेत त्याची द्यावी लागेल ह्या महाबळी जळवा अशुद्धाप्रमाणे शुद्ध रक्तहि शोषून घेतात व ते घेत असताना कळूहि येणार नाही इतक्या हळुवार सूक्ष्म पद्धतीने ! शोषिताला अशक्तपणा मात्र येत जातो तेव्हा भाडवलवाले लोकाना पिळतात हे सर्वांनाच मान्य, पण ते भाडवलवाले पाश्चात्य व ख्रिस्ती ना ? तेव्हा ते तसेच असावयाचे हा समाधानाचा सुस्कारा ! ग्रथकार लिहितो की, " भारतीय तत्त्वज्ञान ' कोहं 'चा प्रश्न सोडविण्याच्या तळमळीतून वाढले असल्याने त्याची जशी व्यवहाराशी सागड बसते तशी मार्क्सच्या तत्त्वज्ञानाशी बसणे शक्य नाही "

## वर्णमार्गाचें उच्चतर तत्त्वज्ञान

व्यवहाराची सागड कशी बसविली ? तर वर्ण जातीचा उच्चनीचपणा मानून, अस्पृश्याना गावाबाहेर लोटून व यावनी युवतीना नृपतीपरिसरात गुगत ठेवून ! मनुस्मृति प्रतिपादते की शूद्र वेद म्हणेल वा ऐकेल तर त्याच्या तोडात व कानात तापलेले शिसे ओतावें ! आणि कालि-

दासाचा दुष्यन्त प्रवेश करतो तो यावनीच्या घोळक्यात ! भागवतधर्माने आत्मोद्धारापुरते हे जन्मगत वैषम्य दूर झाडले व स्त्रिया, वैश्य, शूद्र या सर्वांना परागति मिळेल असा निर्वाळा दिला याबद्दल त्याना धन्यवाद ! येवढी तात्त्विक समताहि काहीना झोबल्यावाचून राहिली नाही सत बहिणाबाई व कचेश्वर गीता वाचू लागली असता वर्णवैषम्य झिडकारणारी गीता हातातहि धरू नका असे बजावण्यास त्याच्या वडिलानी कमी केले नाही, असे त्यानीच लिहून ठेवले आहे " नामाचा विटाळ आमुचिये घरी । गीताशास्त्र वैरी कुळी आम्हा ॥ " भागवत धर्मियानी तत्त्वज्ञानाची व्यवहाराशी सागड घातली ती हीच की, वेदान्ताच्या आत्मोद्धाराच्या पातळीवर सर्व समान आहेत हे मान्य केले व्यवहारात जातिभेद, श्रेष्ठ कनिष्ठता, अस्पृश्यता, दैन्य, दारिद्र्य असेनात बिचारी ! तात्त्विक वेदातिक श्रेणीवर तर आपण सर्व समान आहोत ना ! मग व्यवहारात दरिद्रि किवा अस्पृश्य असलो तर काय फिकीर ! जगात आदर्श समाज असेल तर तो आपल्या भरतखडाचा हा अभिमान काही प्रमाणात योग्य असला तरी तो सर्वच गोष्टीना जोडू लागलो म्हणजे त्याचे कापड फाटून तुटल्याशिवाय राहणार नाही

## पांढऱ्या पायाचे गोरे

ग्रथकार लिहितो की, इग्रज लोकाच्या पाढऱ्या पायाखाली भारत-वर्ष तुडविला जाण्यापूर्वी सुवर्णभूमि म्हणून तो गाजत होता उद्योगधदे, कला-कौशल्य यात कोणीही त्याचा हात धरू शकत नव्हता निवृत्ति आणि सन्यास याच्या मागे लागून उदास झालेले लोक जर हे सारे सपादू शकत असतील तर ' प्रवृत्तिपेक्षा निवृत्ति ही लाखपट बरी ! ' यावर साहजिकच असे विचारावेसे वाटते की तुम्हाला सुवर्णभूमि प्राप्त झाली असताना व अणिमा गरिमा अशा यौगिक सिद्धि तुमच्या पुढे हात जोडून उभ्या असताना सातासमुद्रापलीकडून आलेले मूठभर लोक तुम्हाला खुशाल लुबाडू शकतात हे कसे ? त्याना पाढऱ्या पायाचे म्हणून शिवी देण्यात समाधान मानीत असलात तर माना खुशाल ! सत्याच्या सशोधनापायी कष्ट सोसणारे न्यूटन, गॅलिलिओ अथवा सत्याकरिता विष प्राशन करणारा साक्रेटीस पाढऱ्या पायाचे आणि शूद्र शबराचा व वानर वालीचा वध करणारा चापबाणधर युवा रामचद्र हा

काय काळ्या पायाचा की काय ? क्षत्रिय कुलाचा प्रचंड संहार करणारा परशुराम, भारत युद्धात अठरा अक्षौहिणीचा फडशा पाडणारे कौरव–पांडव, आप्तेष्टांचा संहार करून यादवी शब्द रूढ करणारे यादव, लाखोंना बळी देऊन पश्चात्तापित झालेला अशोक, राजाला ठार करून गादी बळकावणारा सेनापती पुष्यमित्र, विजापूरच्या युसफअल्लीला आपली बहीण देणारा मुकुंदराव ब्राह्मण, बिदरच्या अमीराला मुलगी देणारा मराठा सरदार साबाजी, अल्लाउद्दिनास मुलगी देणारा ज्ञानराजाने उल्लेखिलेला रामदेवराव, पुतण्याच्या खुनाकडे काणाडोळा करणारा राघोबा यांपैकी पांढऱ्या पायाचे कोण ? पण हे पुराण अधिक उगाळत बसण्यात अर्थ नाही कारण भारतीय हे पुण्यवान् व पाश्चात्य हे पापी अशी ज्यांनी एकदा कायमची श्रद्धागाठ बांधली त्यांची ती कोण सोडवू शकेल ? मग हे पुराण उगाळीत बसावे तरी कशाला ? तर उद्याच्या संस्कृतीत रूढ कल्पनांना दुरून नमस्कार करण्यास मन तयार व्हावे यासाठी

## निवृत्तीचा अट्टाहास

निवृत्तीच्या मागे लागलेले लोक कलाकौशल्यात निष्णात होत असले तर 'प्रवृत्तिपेक्षा निवृत्ति लाखपट बरी' असा जो टोमणा मारला आहे तोहि इतिहासाला धरून नाही. धर्मशास्त्रकारांनी बाण करणारा लोहार व शस्त्रक्रिया करणारा वैद्य या दोघांनाहि खालच्या दर्जाचे म्हणून श्राद्धास अपात्र ठरविले ( मनुस्मृति अ ३ ) तरीहि त्यांना राजाश्रय मिळत राहिल्याने त्या कलांची भरभराट झाली निवृत्तिवादामुळे सुवर्णधूर दिसू लागला नसून [illegible] असंख्यांना जोडल्यामुळे सुवर्णधूर दिसू लागला हे ऐतिहासिक सत्य ! बौद्धातील महायान पंथाने धर्माकरिता का होईना कलांचा लेणी, पुतळे, स्तंभ वगैरेंनी पुरस्कार केला म्हणून सुवर्णधूर दिसू लागला, निवृत्तीने टाळ कुटीत बसण्यामुळे नव्हे देवाची पूजा करताना 'सायुधं सशक्तिकं आवाहयामि' 'इष्टकामप्रसिद्ध्यर्थं पुनरागमनाय च' म्हणावयाचे आणि पुन्हा निवृत्तिवादाच्या घंटा वाजवायच्या याचा अर्थ काय ? यापेक्षा धर्माबरोबर अर्थ आणि काम यांचा उघड पुरस्कार केलेला योग्य नव्हे का ?

## व्यासांचा कंठशोष

ज्या तोडाने ' अर्थ अनर्थ भावय नित्य ' हा मत्र घोळावयाचा त्याच तोडात मत्रसमाप्तीनतर पक्वान्नाचा घास द्यावयाचा हे विसगत नाही काय ? या असल्या प्रकाराला चिडूनच महाभारतकार व्यास महर्षीला—आपल्या ग्रथाच्या शेवटी हताश होऊन उद्‌गार काढावे लागले की, ' अरे ! मी हात वर करकरून सागतो आहे की ज्या धर्माच्या योगाने अर्थ आणि काम या दोहोतही तुमचे समाधान होईल तोच धर्म स्वीकारा पण माझे ऐकतो कोण ! '

ऊर्ध्वं बाहु विरोमि एष नच कश्चित् शृणोति माम् ।
धर्मात् अर्थश्च कामश्च सधर्म कि न सेव्यते ?

निवृत्तीवर भर देण्यात येऊ लागला तेव्हा व्यासाना असा आक्रोश करावा लागला

व्यासाची शिकवण अगदीच फुकट गेली नाही. हळूहळू समाज जागृत झाला व धर्मशास्त्राच्या जोडीला अर्थशास्त्र, कामशास्त्र, नाट्यशास्त्र यावर जगाला थक्क करून सोडील असे प्रौढ वाङमय कौटिल्य, वात्स्यायन, भरत अशा श्रेष्ठ साहित्यिकानी निर्माण केले

## धर्म ही अफूची गोळी

निवृत्तिवादाची पडछाप गडद होत गेली असती तर वरीलसारखे जागतिक मोलाचे ग्रथ निर्माणच झाले नसते अशी आपत्ति ओढवू नये म्हणूनच व्यासाला कठशोष करावा लागला ! तोच प्रकार मार्क्सच्या बाबतीत घडला खिश्चन धर्माने बौद्धाप्रमाणेच निवृत्तिवादावर भर दिल्यामुळेच मार्क्ससारख्या सुधारकाला धर्म ही अफूची गोळी हा कडक शब्दप्रयोग वापरावा लागला व्यास हात वर करून हताश होऊन ओरडतो तर मार्क्स हा धर्मावर म्हणजे निवृत्तिवादावर अफूची गोळी झाडतो इतकेच !

## जडवादी मार्क्स

पण अप्रबुद्ध मार्क्सवर चिडतात याचे कारण तो जडवादी आहे हे होय याबाबत प्रथम असा खुलासा स्पष्ट केला पाहिजे की आजच्या शास्त्रज्ञानी

परमाणूचे जे सूक्ष्म निरीक्षण केले आहे त्यावरून जड व अजड यात आता मूलत भेद उरलेला नाही सर्वांचेच मूळ जे प्रोटॉन इलेक्ट्रॉन ते जड नसून गतिमान आहे हे आता शास्त्रज्ञाना स्पष्ट झाले आहे ! मार्क्सच्या वेळी पदार्थविज्ञान शास्त्राची इतकी वाढ झालेली नव्हती म्हणून तो जडवादावर जोर देई आजच्या साम्यवाद्याना जडवादावर जोर देण्याची परिस्थिति राहिलेली नाही नाविन्योद्भव उत्क्रांतितत्त्वाप्रमाणे (emergent evolution) जडामध्ये जे चैतन्य सुप्त असते ते अजडामध्ये जागृत होते ते कसे होते याचा अभ्यास करणे हीच ज्ञानेश्वराची उपासना मार्क्सचा मुख्य भर ईश्वराच्या प्रार्थनेपेक्षा मानवाने सृष्टीचे कोडे उलगडून तिचे नियम हस्तगत करावे यावर होता 'सर्वेन सुखिन सन्तु', किंवा 'परोपकार पुण्याय', अथवा 'दया करी पुत्री तेचि दासा आणि दासी' हाच धर्म ना ? मग त्याचाच पुरस्कार मार्क्स करीत होता 'ठेविले अनते तैसेचि रहावे' या तत्त्वावर मात्र तो अवलबून नसल्याने या तत्त्वाचा पुरस्कार करणाऱ्या धर्माला अफूची गोळी म्हणून [illegible] 'ज्यासि आपगिता नाही त्यासि धरी जो हृदयी। तोचि साधु ओळखावा, देव तेथेचि जाणावा।' असल्या जनताजनार्दनाला नाकारण्याचे समाजसत्तावाल्यालाही कारण नाही तसे पाहिले तर जनताजनार्दनाचा प्रामाणिक पुरस्कर्ता साम्यवादीच होय यामुळे तो व्यापक धर्माच्या विरुद्ध नाही पण जो धर्म या जन्मी जे नाही ते पुढील जन्मी मिळेल यावर भर देईल व समाजातील कृत्रिम वैषम्य मागील जन्मीच्या पापाचे फल आहे असे ठासून सागेल त्याला मात्र धर्म ही अफूची गोळी म्हणून ठोकून सागण्यास तो मागे पाहणार नाही !

खरा धर्म आकलन झाला असेल तर तो भारतीयानाच अशी समजूत करून घेणाराचे डोके धर्माला अफूच्या गोळीची उपमा ऐकून फिरून गेले नसले तरच नवल म्हणूनच अप्रबुद्ध चिडून जाऊन मार्क्सला लत्ताप्रहार देतात की 'प्रवृत्ति च निवृत्ति च जना न विदु आसुरा' या गीतावाक्याप्रमाणे मार्क्स हा असुर आहे असेल बिचारा ! पण वैदिक काळी देवानाही असुर म्हणत तेव्हा हा टोमणा सन्मानार्थी आपण समजू या ! पुढे एके ठिकाणी तर साम्यवाद्याना शेलापागोटे अर्पण करताना ताशेरा मारतात की, 'साम्यवादी लेखकाची बोलणी मानभावाची व करणी कसाबाची' (पृ ७१) बरोबरच !

क्षत्रियाची लाडगेतोड करणारा परशुराम हा दशावतारापैकी एक ईश्वरी अवतार, आणि साम्यवादी हे क्रूर कसाब ! का तर ते पुढे लिहितात की साम्यवादी हे देव, धर्म नष्ट करण्यास कबर कसणारे असल्याने जगाच्या अस्तनी-तील निखारा होऊन बसण्याचा सभव आहे पुढे बाराव्या प्रकरणी मार्क्सच्या तत्त्वज्ञानावर चौफेर हल्ला चढविला असल्याने त्या प्रकरणाचा मथळाच ‘ विश्वध्वसक तत्त्वज्ञान ’ यानी मढविला आहे

## अस्तनींतील निखारा

पण मार्क्सच्या तत्त्वज्ञानातील व भारतीय तत्त्वज्ञानातील ‘ सर्वेन सुखिन सन्तु ’ अशासारखे प्रमुख तत्त्व दोहोतही उत्कर्षाने झळकत असल्याने मार्क्सचा अस्तनीतील निखारा ग्रथकाराला चटके दिल्याशिवायही रहात नाही ते लिहितात, “ भारतीय व रशियन सस्कृति या शास्त्रशरणता, वर्गहीन-तेची धडपड, शासनसत्तेचा नायनाट, प्रत्येक जीवाला सुखोपभोगाची सारखी सधी मिळवून देणे या बाबतीत एकसारख्या असूनहि सिधु व ब्रह्मपुत्रा याच्या-प्रमाणे त्याचे ओघ भिन्न दिशेने गेले आहेत ”(पृ २४) या विचारसरणीतील घोटाळा उघड केला पाहिजे ‘ सर्वेन सुखिन सन्तु ’ ही घोषणा करणाऱ्या वैदिक कालापासून, ‘ ज्यासि आपगिता नाही त्यासि धरी जो हृदयी । तोचि साधु ओळखावा देव तेथेचि जाणावा ।। ’ या आधुनिक वारकरी घोषणेपर्यंत-च्या दीर्घ काळात या तत्त्वाची घटा साधुसतानी वाजत ठेविली हे आपला इतिहास मोकळेपणाने सागत आहे पण तोच इतिहास, दिग्विजय करणाऱ्या क्षत्रियानी लाखोना कठस्नान घातले, समाजघटनेचा आदर्श माडणारे स्मृतिकार वेदपठण करणाऱ्या नव्हे तर ऐकणाऱ्या शूद्राच्या कानात शिसे ओतावे असे बेडरपणे सागण्यास डरले नाहीत हेही नमूद करण्यास विसरलेला नाही ना ? मग त्याकडे डोळेझाक का करावयाची ? अशाच प्रकारच्या विसगती अन्यत्रहि विखुरलेल्या आहेत उदाहरणार्थ, अन्यत्र मार्क्सविषयी ते लिहि-तात, “ उग्रकर्माण वगैरे गीतेमध्ये असुराचे वर्णन केले आहे ते मार्क्सच्या मताला ततोतत लागू पडते यात काय शका ? ” उग्रकर्मा हे विशेषण मार्क्स-ला देऊ केले तर मार्क्सवादीही ते मान्य करतील कारण ‘एका गालफडात मारली तर दुसरी पुढे करा ’ या तत्त्वाचा मार्क्सने पुरस्कार केलेला नाही व सकटें

येतात ती निमूटपणे सोसणे हेच आदर्श जीवन होय असा दावाहि त्याने माडलेला नाही पण ज्या थोर वीराना आपण भारतीय ईश्वरी अवतार समजतो त्या वामन, परशुराम, धनुर्धारी राम, कृष्ण या सर्वांनी आपल्या शत्रूना शस्त्रानी चिरून काढले हे कसे विसरावयाचे ?

## अस्तनींतील परशुराम

कामगाराना आपल्या पायातल्या शृखला तोडून फेकून द्या असे सागणारा मार्क्स हा उग्रकर्मा पण बळीला पाताळात लोटणारा वामन, क्षत्रियाचा सहार करणारा परशुराम, शबर व वाली याना कठस्नान घालणारा श्रीराम व अनेकाना यमलोकात फेकणारा श्रीकृष्ण हे साक्षात् ईश्वरी अवतार अशी विसवादी भूमिका टिकेल का ? ज्याना ईश्वरी अवतार म्हणून आपण समजत आलो त्यानी मानवी समाजाला सकटापासून वाचविले यास्तव त्याच्याविषयी आदर व कृतज्ञता व्यक्त करण्याकरिताच ना ? मग धनाढ्य वर्ग गरिबाना पिळून काढीत असताना त्या धनाढ्याच्या हातून सपत्ति हिसकावून घेऊन सर्वाच्या पदरात पाडा अशी घोषणा करणाऱ्या मार्क्सला मात्र 'उग्रकर्मा' हे शेलापागोटे का अर्पण करावे ? धर्माला ग्लानी येऊ लागल्यामुळे त्याला जागृत करण्याकरिता श्रीकृष्णाने अनेकाचा वध करणारा अवतार धारण केला म्हणून तो सात्विक पूर्णावतार, पण जनतेला लुटून मिळालेल्या सपत्ती-तून देवळे बाधण्यास समति देणाऱ्या धर्माला अफूची गोळी म्हणून झिडकार-णारा मार्क्स हा मात्र उग्रावतार !

## बोथट योगशास्त्र

असो हे गुन्हाळ सपण्यासारखे नाही आपल्या भरतखडातील एका दृढमूल झालेल्या विचारसरणीचे प्रतीक या दृष्टीने तिच्याकडे लक्ष वेधले आहे आता शेवटी ज्या योगमार्गावर 'प्रबुद्धाचा' भर आहे व ज्याच्या अध्ययनाच्या अभावी भौतिकशास्त्राची केविलवाणी स्थिति झाली आहे अशी त्याची विचारसरणी आहे त्या योगशास्त्राला पुन्हा एकदा कौल लावून 'प्रबुद्धा'चा निरोप घेऊ ! योगशास्त्रात आपण भारतीयानी फार भरारी मारली हे मान्य,

पण राष्ट्रावर सकट आले असता हा योगमार्ग योगमुखात जप करीत बसण्या-पलीकडे प्रत्यक्ष प्रतीकाराचे काही मार्गदर्शन करू शकतो काय ? इतिहास तरी असा दावा माडीत नाही ज्ञानेश्वरादि योग्याची व सताची साक्ष तरी याला उलट जाणारी दिसते ना ? हिदुधर्मावर व भाषेवर इस्लामी आक्रमणाचे सकट ओढवले असता मात्र त्या सकटाला सतानी जोरकसपणे तोड दिले हे इतिहास सागतो पण आक्रमकाना हाकून लावण्याला शिवाजीचा अवतार उदयास यावा लागतो त्या अभावी योगशास्त्र थिटे पडते असाच ना याचा अर्थ ? ज्ञानेश्वरानी भित चालविली असेल, जठराग्नीवर चपात्या भाजून घेतल्या असतील, रेड्याच्या तोडून वेदपठण करविले असेल, पण असे सामर्थ्य असणाऱ्या योगीराजाने पडलेली भित पुन्हा उभी केली नाही किवा मदिरे फोडणाऱ्या इस्लामाचे मन वळवले नाही ही रुखरुख मनाला लागल्याशिवाय रहात नाही मग भौतिक शास्त्रावर केविलवाणी शास्त्रे असे नाक मुरडून योग-शास्त्राची पाठ थोपटण्यात मिळविले काय ? यापेक्षा भौतिक शास्त्राप्रमाणे योगशास्त्राचेहि क्षेत्र मर्यादित आहे असा पक्ष माडणे वस्तुस्थितीला अधिक धरून होणार नाही का ? काही योगीराज या मर्यादा मोकळेपणाने मान्य करतानाहि आढळतात *

ज्ञानियाच्या राजाला असा प्रश्न विचारण्याचा तुला अधिकार काय ? असा सवाल टाकून विचारणाराचे तोडच बद करावयाचे असले तर मार्ग खुटलाच पण असली मुस्कटदाबी केली तर योगसामर्थ्यहि मर्यादित तर नसेल ना ? ही शका मनात अधिक खोल रुजतच जाईल योग-सामर्थ्य खरोखर अचाट असेल तर ज्ञानेश्वरकालीनच काय पण आपल्या विद्यमान योगीराजानाही ते एक आव्हानच आहे असे स्पष्ट म्हणावे लागेल आजकाल एखादा योगीराज समाधि घेतो असे जाहीर होताच तो असामान्य वाटणारा प्रयोग पहाण्यास जनतेचे असख्य ताडे तेथे लोटतात मग आता ऑस्ट्रेलियामध्ये जो ॲटम्बॉबप्रयोग होणार आहे त्या ठिकाणी जाऊन योगप्रभावाने त्या आग ओतणाऱ्या बॉबची आग विझवून टाकण्याचे किंवा बॉब टाकणाऱ्याचे मन वळविण्याचा प्रयोग करण्यास एखाद्या योग्याने का

* द के केळकर 'विचारतरग' पृष्ठ ३३ पहा

पुढे येऊ नये ? ते त्याचे कार्यच नव्हे असे म्हणावयाचे तर ' धर्मरक्षणासाठी करणे अटीतटी आम्हासी ' असे तुकोबाना का सागावे लागले असते व ज्ञानोबा-ना रामदेवरावाचा उल्लेख करणे का इष्ट वाटले असते ? यामुळे योगी-राजाच्या सामर्थ्याला मर्यादा असावी असे मानण्याकडेच मन कलू लागते

## योगी अरविंद घोष

अगदी अलीकडचे उदाहरण जगप्रसिद्ध अरविद घोषबाबूचे आपणापुढे आहेच ना ? इग्रजाचा ससेमिरा चुकविण्याकरिता ते पादेचरीला पळून गेले आणि योगसामर्थ्यात फार उच्च कोटीला गेले असताही शेवटी मूत्रपिड-विकाराच्या हातात हात घालून ते देह सोडून गेले भारताच्या स्वातत्र्याबद्दल आस्था असूनही या योगीराजाने स्वातत्र्य केव्हा मिळेल याचे भविष्य प्रगट केले नाही व त्याकरिता लोकामध्ये जागृति करण्याच्या पूर्वाश्रमीच्या श्रमास-ही हातभार लावला नाही अरविद बाबूचा उल्लेख करितो आहे तो अशा-करिताच की ज्ञानेश्वर–तुकाराम या सताप्रमाणे अरविदानीही सच्चारित्र्य व समर्थवाङमय यानी जनतेची उमाप सेवा करण्यातच आयुष्य अर्पिले पण परकीय आक्रमणाला तेहि तोड देऊ शकले नाहीत ना ? शकले नाहीत याचा अर्थ ते सामर्थ्य अपुरे पडत असावे असाच ना ? आणि खरोखरच ते अपुरे असेल तर पाश्चात्य भौतिकशास्त्राच्या अनिश्चिततेच्या प्रामाणिक कबुलीला केविलवाणीचा टोला देण्यात साधले काय ?

अशाच विचाराचे हेलकावे अनेक ठिकाणी विखुरलेले आहेत यामुळे अप्रबुद्धाना स्पष्ट काय प्रतिपादन करावयाचे आहे ते कळत नाही लेखाक १५ ला मार्क्सवादाची सत्य बाजू अमा मथळा देऊन त्या लेखाच्या शेवटी ते कबूल करतात की, " मार्क्सचा आर्थिक सिद्धात सत्य आहे वाद उत्पन्न झालाच तर त्याच्या उपाययोजनेसबधी होऊ शकतो " म्हणजे मार्क्स हा असुर आहे व सत्यवानहि आहे म्हणावयाचा ! रशियनेतर साम्यवादी समाजा-लाहि रशियात ज्या पद्धतीने साम्यवाद स्थापन करण्याचा प्रयत्न केला जात आहे त्याच पद्धतीने तो शक्य आहे हा हट्ट मान्य होण्यासारखा नाही किंबहुना सुलभ उपायानी ध्येय हस्तगत होत असताहि कठोर उपाय योजावे असा दावा कोणी माडला आहे का ? साधेल तर सुलभ साधनानीच साधू,

अन्य साधनाना हात घालणार नाही, असा दावा मात्र मार्क्सवादी माडत नाही मागील प्रकरणी वेल्स—स्टालिन याच्या सवादात स्टालिनने हे स्पष्ट केले-च आहे तैमुरलगाची स्वारी व महमद गजनीच्या स्वाऱ्या या परकीयाच्या आक्रमक स्वरूपाच्या होत्या म्हणून सोडून द्या पण सभाजीने केलेले शिरकाण किंवा गारद्यानी केलेला नारायण पेशव्याचा खून हा तर आपआपल्यातलाच ना ? मग त्या वेळी ' न धरी शस्त्र करी मी ' हे तत्त्व यशस्वी झाले का ? सतानी तीन शतके टाळ पिटीत बसून स्वातत्र्याची धुगधुगी कायम राखली याबद्दल त्याना धन्यवाद पण स्वातत्र्याचा उज्ज्वल दीप चकाकू लागण्यास सुरत लुटणारा व अफजलखानाला यमसदनी पाठविणारा शिवाजीच पुढे यावा लागला, याचा अर्थ अत्याचार समर्थनीय आहे असे नव्हे, तर तो जेथे अपरिहार्य असेल तेथे त्याकडे डोळेझाक न करिता तो शक्य तेवढा कमी करण्यास झटावे येवढेच हिदुधर्म सागतो पण यामुळे तो आसुरी ठरतो का ?

## धर्म ही अफूची गोळी

खिस्ती धर्माने या तत्त्वाकडे डोळेझाक केली व अहिसेचे अट्टाहासाने समर्थन केले म्हणूनच इग्लडमधील कॅटरबरीच्या धर्माचार्याला रशियातील रक्तपाताचे अपरिहार्य म्हणून समर्थन करावे लागत आहे मार्क्स धर्मास विरोध करतो तो त्यातील एका विशिष्ट विचारसरणीला इहलोकीचे सुख-दु ख भ्रामक असून परलोकी व पुढील जन्मी खरे सुख मिळेल असा दावा माडून इहलोकीचे मानवनिर्मित वैषम्य उखडून काढणाऱ्याची नागीच धर्म मोडून काढू पहातो तेव्हा मार्क्स शस्त्र उपसतो, एरव्ही नव्हे ' आर्त त्राणाय व शस्त्र न प्रहर्तुमनागसि ' हा कालिदासाने माडलेला सिद्धात याच अर्थाचा ना ? दुष्काळापायी मृत्युमुखात ओढली जात असलेली अफाट जनता जो श्रेष्ठी वर्ग मोकळेपणाने पहात असेल त्यावर दुष्काळामुळे अगी त्राण न उरलेल्याच्या बाजूने शस्त्र वापरणे पापी कसे ठरेल ? अर्थात् रशियातील शस्त्र आर्तत्राणाकरिता जितक्या प्रमाणात उपयोगात आणले असेल तितके ते धर्म्यच ठरणार नाही का ? मला येथे रशियातील अतिरेकाचे समर्थन करावयाचे नाही हे सागावयास नकोच तात्पर्य, रशियातील प्रयोगापासून जे

शिकण्यासारखे आहे तेवढे शिकावे पण रशिया आपले शहाणपण इतरावर लादू लागला तर जागरूक रहावे हेच धोरण एकदरीत इष्ट ठरेल

असो अप्रबुद्धाच्या विचारसरणीची ओळख वाचकाना करून दिली त्याचे कारण रूढ सनातनी म्हणविणाऱ्या प्रवृत्तीची ती एक प्रतीक आहे हे होया साम्यवादी विचारसरणी ही धर्माच्या म्हणजे समाजधारणेच्या व्यापक दृष्टील विरुद्ध नाही म्हणूनच सनातनी वातावरणात वाढलेला इग्रज धर्माधिकारी-ही ती मान्य करतो हे आपण पाहिले

## तत्त्वज्ञानाची बैठक

अशाच प्रकारच्या विचारसरणीची कास तत्त्वज्ञान्यानी धरलेली आहे' तिच्यावर आता नजर टाकू या ज्ञाताच्या कुपणावरून अज्ञाताच्या अतराळात उडण्याची उत्कट इच्छा ही मानवी स्वभावात उपजतच आहे यामुळे बुद्धि जेथवर झाप टाकू शकते तेथवर टाकल्यावर कल्पनाशक्तीला चेतवून मानव आपली उच्च भरारी मारण्याची इच्छापूर्ति साधून घेत असतो व ज्ञातापेक्षा अज्ञातावर भर देऊ लागतो !

नुसता भर न देता ज्ञातापेक्षा काल्पनिकावर अधिक विश्वास तो दर्शवू लागला म्हणजे मात्र ऐहिक, व्यावहारिक जीवितच सुखमय, आनदमय करण्याची ईर्षा धरणारा साम्यवादी त्याच्याकडे साशक दृष्टीने पाहू लागला तर आश्चर्य कसले ? उदाहरणार्थ आपल्या महाराष्ट्रातील श्रेष्ठ तत्त्वज्ञ प्रा रा द रानडे याच्यासारख्याकडे तो साशक मुद्रेने पाहू लागतो आपल्या 'उपनिषद्रहस्य' या ग्रथात रानडे लिहितात की, 'उपनिषदातील तत्त्वज्ञान प्रत्यक्ष आत्मसाक्षात्काराच्या पायावर उभारले असल्याने त्यास कोणत्याहि शास्त्राचा विरोध शक्य नाही ' पण त्यानाच पुढे एकदोन उपनिषदातील जारण–मारणाचे उपाय व मत्रबलाने शत्रूला ठार करण्याचे देवपरिमरासारखे प्रयोग याचा उल्लेख करावा लागला तो अध्यात्मशास्त्रावरील कलक म्हणूनच ! मग आत्मसाक्षात्कारावर आधारलेल्या तत्त्वास कोणत्याहि शास्त्राचा विरोध नाही म्हणण्यात स्वारस्य काय ? जारणमारणाचे उल्लेख आहेत ते उपनिषदात आणि तेहि बृहदारण्यक व कौषीतकी अशा प्राचीन सर्वमान्य उपनिषदात ! तेव्हा ते कलक असले तरी साक्षात्काराच्या पायावर

उभारलेले ! म्हणून लेखक आपले समाधान मानून घतो की ' हे दोष औप' निषदिक विचाराचे सौदर्य कमी न करता उलट ते जास्त उज्ज्वल करतात ! ! या तत्वज्ञात्याचा निर्वाळ्यावर माझ्यासारखा सामान्य माणूस भाष्य काय करणार ? मागील भागात एके ठिकाणी अनेक यतीना कोल्ह्याच्या तोडी दिल्याची बढाई मारणाऱ्या इद्राचा उल्लेख केला आहे तो या कौषीतकी उपनिषदातीलच होय येवढी आठवण करून दिली म्हणजे पुरे ! पण उप-निषत्काराना कळले तेच श्रेष्ठ तत्त्व अशी एकदा ठाम बैठक घेतली म्हणजे इतर विचाराच्याकडे दृष्टि टाकण्याची आवश्यकताच भासत नसली तर आश्चर्य कसले ?

प्रा रानडे अलाहाबाद विद्यापीठातून सेवानिवृत्त झाल्यावर त्याचीच जागा अलकृत करणारे व यदाचे (१९५२) पुणे येथील तत्त्वज्ञान परिषदे-चे अध्यक्ष प्रा अनुकूलचद्र मुकर्जी यानीही ' नवभारता 'च्या खास तत्त्वज्ञान विशेषाकाकरिता लिहिलेल्या लेखात असेच प्रतिपादिले आहे ते सागतात " खरे तत्त्वज्ञान हे आदर्शनिष्ठ आणि चैतन्यवादी असले पाहिजे असे मला वाटते पाश्चात्य विचारावर हल्ली वास्तववादाचा पगडा बसलेला दिसत आहे ी माझ्या मते एक दुर्दैवी घटना होय त्यामुळे आदर्शनिष्ठ चैतन्यवादाची प्रगति थाबली आहे त्याच्या विचाराची 'दशा जरी बरोबर असली तरी तत्त्वज्ञानाच्या अभ्यासकापुढे जे प्रश्न उभे ठाकतात त्याची उत्तरे आधुनिक चैतन्यवाद देऊ शकत नाही "

यावर साहजिकच असा प्रश्न उभा राहतो की प्राचीनानी तरी या प्रश्नाचे उत्तर दिले आहे काय ? प्राचीनानी दिलेले उत्तर उच्चतम का तर त्याना प्रा रानडे सागतात त्याप्रमाणे आत्मसाक्षात्कार झाला होता म्हणून आत्म-साक्षात्कारी ऋषिवर्यांनी जारणमारणाचे मार्गदर्शन केले तरीही हरकत नाही कारण ते साक्षात्काराने पूत झालेले ऋषिवर्य ! तेव्हा उद्याच्या सस्कृतीने मार्क्स व आजचे रशियातील कम्युनिस्ट सागतात त्याप्रमाणे क्रूर जडवादी बनावे की प्राचीन ऋषिवर्यांनी व आचार्यांनी प्रतिपादिल्याप्रमाणे जारण-मारणाचा स्वीकार करून क्रूर चैतन्यवादी बनावे ?

## जड अजड यांचें उच्चाटन

वस्तुत या वादाला आता विशेष प्राधान्य देण्याचे कारणच उरलेले नाही.

कारण मी वर निर्दशित केल्याप्रमाणे आजच्या वैज्ञानिक प्रगतीने जड आणि चैतन्य यातील भेदच वरवरचा असून मूलभूत नाहीच असे ठरविले आहे जडाच्या अणुपरमाणूचे पृथ करण करीत करीत इलेक्ट्रॉन या अविरत गतिमान रूपापर्यंत पोचले म्हणजे जड व चैतन्य यातील भेदच नष्ट होतो तेव्हा आजच्या जडवाद्याची कैफियत उरली आहे ती येवढीच की, मूलभूत विश्व हे जड मानण्याऐवजी चैतन्यमय अनिश्चित स्वरूपाचे मानले तरी त्याचे ते अगदी सूक्ष्मरूप सोडले तर स्थूलरूपाने नियमबद्ध असे असून ते नियम उमजून घेऊन त्याचा सदुपयोग करावा हाच योग्य मार्ग होय

## शेषशायी भगवान्

ईश्वराने जग निर्माण केले, त्याला नियम घालून दिले व तो शेषावर जाऊन निद्रिस्त झाला ही शेषशायी कल्पना काव्यमय असली तरी भक्ताच्या हाकेने ईश्वर जागृत होऊन धावून येतो या कल्पनेपेक्षा अधिक वास्तविक आहे ईश्वराने जग निर्माण केले व त्याला नियमबद्ध करून तो निद्रिस्त झाला हे मान्य केले म्हणजे आस्तिक व नास्तिक यातील झगडाच सपुष्टात येईल पण 'देव भावाचा भुकेला' या कल्पनेचा पुरस्कार करीत जगातील एक एक कोडी सोडविण्याचा प्रयत्न सोडून देवाची आळवणी करीत मानव बसेल तर देव म्हणेल, "अरे मानवा, आता तू दिवसेदिवस मोठा होत चाललास ना? मग बालकासारखा माझ्या माडीवर किती दिवस लोळणार व किती काल मला आळवीत बसणार? ऊठ स्वतच्या पायावर उभा रहा! उभा राहिलास म्हणजे तुझी दृष्टि दूरवर फाकू लागेल पुढची पिढी तुझ्या खाद्यावर आरूढ झाली म्हणजे तिची दृष्टि तर अधिक दूरवर पोहोचेल तुला आता दूरदर्शक दुर्बीण व सूक्ष्मदर्शक सूक्ष्मीण हस्तगत झाली आहे ना? त्याने विश्वाच्या स्वरूपाचे आकलन करण्याचा प्रयत्न कर, त्याचे विश्वव्यापी नियम उमगून घे, त्याचा सदुपयोग कर व दुरुपयोग करणार नाही असे मानवतेला हडसून खडसून साग अणुशक्तीचा उपयोग मानवतेच्या सुखसोयीत भर टाकण्यात तुला खर्चिता येणार नाही का? मग आता बालकासारखे 'विठाई माउली' करीत टाळ बडवीत का बसलास? मानवा! तुला मी बुद्धि दिली आहे तिचा सदुपयोग केलास तर तुझ्या पृथ्वीवर स्वर्गसुख उतरेल व तूच

नराचा नारायण होशील तर मानवा ‘ उत्तिष्ठत जाग्रत प्राप्य वरान् निबोधत ’ ऊठ, जागा हो व विश्वाला जे नियम मी घालून दिले आहेत त्याचा अभ्यास कर आता या शेषशायी भगवानाला सुप्त होऊ दे ! ”

## मायावाद

मायावाद्यालाही साम्यवादी म्हणेल की आज आपणास आपल्या समाजात जे वैषम्य, नैर्घृण्य दिसत आहे ते तुम्ही प्रतिपादन करता त्याप्रमाणे मूलत खरे नसून स्वप्नातील अनुभवाप्रमाणे कल्पित असेलही, पण हे स्वप्न मानवतेच्या दृष्टीने दीर्घकाल टिकणारे आहे ना ? मग वैषम्य, नैर्घृण्य हे आभासात्मक आहे येवढेच सागून आमचे कसे समाधान होणार ? या आभासात्मक विश्वालाही परमेश्वराने काही नियम लावून दिलेले आहेत ना ? हजारो वर्षे सूर्य पूर्वेकडेच उगवतो आहे ना ? पावसाळा, हिवाळा क्रमानेच येतो आहे ना ? चद्रसूर्याला गिळणारे राहूकेतू हेहि कसोशीने नियम पाळणारेच आहेत ना ? मग ते नियम समजून घेऊन मानवी जीवन सुखमय करण्यास झगडण्याऐवजी वैषम्य, नैर्घृण्य हे आभासात्मक आहेत या समाधानावर मानवाला टोलविण्यात हशील काय ?

जगाच्या मूल स्वरूपाचे मानवाला आकलन झालेले नसले तरी जे स्वरूप त्याला आज ज्ञात आहे ते नियमबद्ध आहे हे तर मान्य ना ? मग त्या नियमाचा सूक्ष्म अभ्यास करून जीवित सुखमय करण्यास त्याने झटावे की वैषम्य, नैर्घृण्य हे आभासात्मक आहे असा सुस्कारा टाकून समाधान मानून घ्यावे ? जग हे क्षणाक्षणाला बदलत आहे याचा अनुभव सर्वांनाच आहे भागीरथी नदी आज हजारो वर्षे वाहत आहे असे आपल्या भारताचा इतिहास जलप्रवाहाच्या गभीर नादाने हजारो वर्षे सागत आला आहे पण क्षणाक्षणाला तिचे पहिले जल समुद्रात लोटले जाऊन नवे जलकण हिमालयाच्या शिखरावरून ओघळत येत असतात ना ? असे असताहि म्हणजे क्षणोक्षणी तिच्यात नवे जलकण येत असताही तिचे पवित्र जल ‘ भागीरथी, भागीरथी ’ अशी प्रार्थना करीतच आपण प्राशन करतो ना ? आज दिसणारा भागीरथीप्रवाह हा कालचा प्रवाह नव्हे या अर्थी तो आभासात्मक असेल पण त्यात सुसूत्रता व अखडता आहे ना ? आणि अशी अखडता या आभासात्मक जगात असेल

तर त्या अखडतेचे म्हणजेच विज्ञानाने उमगणारे अखड नियम समजून घेऊन जीवित सुखमय करण्याकरता का झटू नये ? तसे न करिता वैषम्य, नैर्घृण्य हे स्वप्नमय आहे अशा मानीव समाधानात गुरफटून जाण्यात व जनतेला हतबुद्ध करण्यात मिळवल काय ?

## अजर अमर

दिसते तसे नसते व जग क्षणोक्षणी बदलत असते हे सर्वमान्य पण त्यात सुसूत्रता आहे ना ? मग तिचा खोल अभ्यास करून ती सुसूत्रता मानवी जीवन सुसूत्र करण्यात का खर्ची घालू नये ? दिसते ते क्षणभगुर असेल, स्वप्नमय असेल व त्याच्या मुळाशी असणारे तत्त्व तेवढे अक्षय व यथार्थ असेल, पण स्वप्नात झाले तरी अखड मानवाच्या सुखाकरिता का धडपडू नये ? 'जीवेत शरद शतम्' असे विचार ज्येष्ठ श्रेष्ठ प्राचीनतम उपनिषत्कारही माडतो ना ? मृत्यू केसाला धरून ओढीत आहे असे समजून धर्माचे आचरण कर 'गृहीत इव केशेषु मृत्युना धर्ममाचर' असे उत्तरार्धात सागणारा सुभषितकार आपण अजर व अमर आहोत आसे मानून विचारवताने विद्येची व सपत्तीची अखड जोपासना करीत असावे "अजरामरवत् प्राज्ञ. विद्या अर्थ च साधयेत्" असे पूर्वार्धात सागण्यास विसरलेला नाही ना ? मग केव्हा एकदा या इहलोकीच्या जजाळातून सुटेन यावर धर्म जर भर देऊ लागला तर त्याला अफूच्या गोळीची उपमा बहाल केली असता त्याने का रुष्ट व्हावे ? सकटाना धैर्याने तोड देणाराबद्दल शेषशायीला कौतुक वाटेल की सकटे ही मानण्यावर असल्याने आधी मन मुडा या टाळ-पिटीने त्याला समाधान होईल ? शेषशायीला काय वाटत असेल याच्या क्षेत्रात अधिक खोल जाण्याचे कारण नाही कारण शेषशायीला काय वाटत असेल असे म्हणताना आपण न कळत शेषशायीवर मानवी विचारभावनाचा आरोप करीत आहोत तेव्हा निद्रिस्त शेषशायीला दुरून नमस्कार करून ऐहिक मानवी जीवन सुखमय करण्यावर आपण भर देऊ या

## समाजधारणेचा धर्माला विरोध नाहीं

धर्माला अफूची गोळी म्हणून झिडकारताना धर्माच्या परिसरात वावर-

बाऱ्या सर्वच गोष्टीना हाकून न लावण्याची जागरूकता मात्र राखली पाहिजे आपल्या धर्मशास्त्रकारानी 'इष्ट धर्मेण योजयेत्' या दृष्टीने आपल्या सर्वच विचारसरणीची व आचारसरणीची धर्माशी सांगड घालून टाकली होती त्याच्या दृष्टीनेही समाजधारणा हेच धर्माचे मुख्य सूत्र होते. 'धारणात् धर्म इति आहु धर्मो धारयति प्रजा' ह्या व्यापक दृष्टीने व्यक्तीव्यक्तीमध्ये आपुलकीची भावना स्थिर होईल अशी विचारसरणी, व तद्विरुद्ध आचरणाला कलाटणी हेच धर्माचे कर्तव्य मानले जाई. ते कर्तव्य 'दया धर्मका मूल है' या प्रेमळपणाने, 'सर्वे न सुखिन सन्तु' या व्यापक बुद्धीने व निष्कारण त्रास देणाराला 'मोजुनि माराव्या पैजारा' या तर्क-कर्कश दृष्टीने पार पाडण्यावर भर दिला जाई पण यापुढे जाऊन 'जन्माला आलो तेच मुळी पूर्वजन्मीच्या पापामुळे, ऐहिक जीवन म्हणजे दुःखाचा पर्वतायेवढा डोंगर,' असे मानून 'जितक्या लवकर सुटू तेवढे पुण्यवान्—' अशी विचारसरणी धर्म माडू लागला म्हणजे मात्र धर्माला अफूच्या गोळीचा वास येऊ लागतो व मार्क्ससारखे पुढारी तो फेकून द्या असे ठासून सागू लागतात एरवी 'सर्वे न सुखिन सन्तु' या धार्मिक प्रार्थनेला साम्यवादी झाला तरी विरोध कशा करिता करील ?

आता विरोधाचे ककण बाधले म्हणजे विरोधक हाही दुसऱ्या बाजूची शीग पोचवीत असतो हा अनुभव मार्क्सच्या विचारसरणीतही दिसून येतो यामुळेंच जीवन सुखमय करण्यावर भर देण्यावरच न थाबता जीवन हे जडच आहे, या जडवादाचा पुरस्कार करण्यास त्याने कमी केले नाही पण साम्यवादी समाज-धारणेचे तत्त्व स्वीकारणे म्हणजे जडवादाचा स्वीकार करणे असे समीकरण मांडणेही योग्य नव्हे सुमारे शभर वर्षांपूर्वी मार्क्स आपल्या विचारसरणीला आकार देत होता त्यावेळी विज्ञानाच्या वाढीने सृष्टीचे समग्र कोडे सोडविता येईल अशी सुखस्वप्ने वैज्ञानिकाना पडू लागली होती. पण विज्ञानाचा गरुड आकाशाचा अत पाहण्याकरिता भरारी मारीत जसजसा वर चालला तसतसे त्याला विश्वाचा व्यापक पसारा पाहून घेरी येऊ लागली. आज तरी तो आपली भरारी थकली आहे अशी Indeterminable ची म्हणजे अनि-श्चिततेची कबुली मोकळेपणाने देत आहे.

मार्क्सच्या वेळी या अनिश्चिततेच्या तत्त्वाची पुसट कल्पनाही नव्हती व विज्ञानाची प्रगति धडाडीने टप्पे गाठीत असल्याने या उड्डाणात विश्वाचें कोडे आपणास अनुत्कलनीय ठरेल याची पुसट शकाही त्याला आली नसेल. प्रण आज विज्ञानाकडेहि अनिश्चितता टवकारून पाहू लागली आहे यामुळें साम्यवाद स्वीकारणे म्हणजे त्याच्या गळयात अडकविलेले जडवादाचे लोढणे स्वीकारणे आवश्यक होय अशी समजूत करून घेण्याचे कारण नाही

## पूर्वजन्मास मान्यता

आपल्या भारतीय धर्माने मानलेले पूर्वजन्माचे तत्त्व मानण्यासहि कचर-ण्याचे कारण नाही हे विधान वाचून तुम्ही डोळे चोळून पाहू लागाल पण त्रयस्थ दृष्टीने पहा पुनर्जन्माची कल्पना ही की माणूस मृत्यु पावला म्हणजे तो आपला स्थूल देह येथे ठेवून जातो, पण सूक्ष्म लिंगदेह तेथून बाहेर पडून भटकत असतो बीजाला ओली जमीन आढळताच ते मूळ धरू लागते व यथावकाश शाखापल्लवानी समृद्ध अशा वृक्षाचे रूप धारण करते, तसेच हे मानवी सूक्ष्म लिंगबीज योग्य स्थानी पडताच आकार धरू लागून पुन जन्म घेते अशी पुनर्जन्मवादी तत्त्वज्ञाची विचारसरणी आहे ही विचारसरणी मूलत सत्य असो वा मिथ्या असो या विचारसरणीला झिडकारणे साम्य-वादाला आवश्यक नाही माणूस जन्मास येतो त्यावेळी पूर्वीच्या अनेक पिढ्याचे गुणावगुण घेऊनच येतो असे असताहि सर्वांना सुख मिळो असाच आशीर्वाद साधुसत तुम्हा आम्हा सर्वांना देतात ना ? मग तोच न्याय पूर्व-जन्माला लागू करण्यात वावगे काय ? मातापितराचे रोग घेऊन मूल जन्माला येते तसेच मागील जन्माचे रोग घेऊनहि ते जन्माला येते असे मानण्यास हरकत कोणती ? मातापितराचे रोग पिंडगत घेऊन आलेल्याच्या रोगाला हटविण्याचे प्रयत्न आरोग्यशास्त्र व वैद्यशास्त्र करीत आहेतच ना ? मग तसेच प्रयोग समाजधारणेच्या व्यवस्थेतहि पूर्वजाची सपत्ति समाईक करून टाकण्यात का करू नयेत ? निरोग्याच्या पोटी जन्मास येणे अथवा रोग्याच्या पोटी जन्मास येणे अपत्याच्या हाती नसते तरीही रोगबीजेच समाजातून उखडून काढण्याचे प्रयत्न आरोग्यशास्त्र करीत आहेत ना ? मग पूर्वजन्मीच्या लिंगदेहातून जे शारीरिक व मानसिक रोग आलेले असतील

त्याच्याकडेहि वर्ण, जाति, अस्पृश्यता, वडिलार्जित धनसपन्नता या दृष्टीने हतबुद्ध होऊन न पाहता मूलभूत गरजा भागविण्याबाबत सर्वांना मी समान पातळीवर आणीन अशी आकाक्षा साम्यवादाने धरली तर त्यात वावगें काय ?

असे करण्यात जुन्या बुरसटलेल्या पुनर्जन्माच्या कल्पनेला आपण पुन्हा कढ देतो आहोत असे हेटाळणीचे उत्तर देण्यातहि हशील नाही साम्यवादाला पुनर्जन्माची कल्पना ही एक आपल्या मार्गांतील अडगळ आहे अशी समजूत करून घेण्याचे कारण काय ? पूर्वजापासून पिढीगत मिळणारे शारीरिक व मानसिक दोष विज्ञानाच्या सहाय्याने दूर करण्याचा प्रयत्न मानव करीत आहेच ना ? मग पूर्वजन्मानूनहि मानवाने काही रोग बरोबर आणले असले तरी धान्य–वस्त्रादि सर्वांच्या प्राथमिक गरजा पुरविण्याच्या मार्गाने मूलभूत वैषम्याचे अकूर शक्यतेवढे तोडून टाकण्यास त्याने झटावे हे स्वाभाविकच नाही का ? असे असेल तर साम्यवादाचे तत्त्व स्वीकारावयाचे असता पुनर्जन्माचे तत्त्व फेटाळून लावले पाहिजे असाहि दावा माडण्याचे कारण नाही मातापितराचे दोष आपल्यामध्यें सक्रमित होतात तसे पूर्वजन्मीचे काही दोष लिंगशरीरद्वारा या जन्मी अवतरत असतील पण ते दूर करण्यास झटणे यातच मानवाचे मानव्य आहे, हताश होऊन पूर्वदुष्कृताकडे नैराश्यवादाने पाहण्यात मात्र नाही

## मनोगाहिनी विद्या

आज अमेरिकेतील काहीं मनोगाहिनी प्रयोगशाळेत चालू असलेल्या प्रयोगात पूर्व जन्मीच्या कथा सागणाऱ्या व्यक्तीहि आढळून आल्या असल्याचे संशोधन जगापुढे येत आहे * निरीया नावाची बाई अनेक शतकापूर्वी ग्रीस देशात आपण जन्मास आलो त्या वेळची हकीगत स्वप्नात सागताना आढळली आहे तसेच प्राचीन काळच्या इजिप्तची नोना राणी 'रोजमेरी' म्हणविणाऱ्या दुसऱ्या एका बाईच्या अगात येऊन इजिप्तच्या अथवा मिसर देशाच्या प्राचीन भाषेत बोलत असलेली आढळून आली आहे या देशचा तिसरा

* Ralf Shirley याचा Problem of Rebirth यावरील ग्रथ किंवा चालू वर्षाच्या पुरुषार्थाच्या एप्रिल-मे अकातील श्री भागवत याचा लेख पहा.

ओमेन होटेप याचे मसाला घालून सुकविलेले प्रेत सापडले असून त्या राजाला अनेक गळवे होती असे नोना राणीने सागितले व प्रेत तपासता तें खरे ठरले ! रोशा नावाच्या दुसऱ्या एका स्त्रीने तर मागील अकरा जन्माची हकीगत सागितली आहे आपल्याकडील सत बहिणाबाईने पूर्वीच्या अनेक जन्माची हकीगत अशीच नमूद करून ठेवली आहे हे सुशिक्षिताना सागावयास नकोच

बाकी पूर्वजन्मीची आठवण तुम्हाआम्हास उरत नाही हे भाग्यच म्हणावयाचे कारण पूर्वजन्मीच्या हालअपेष्टाची जाणीव शिल्लक राहती तर बालवयातला उत्साहच गारठला असता ! पाच पाच वर्षांनी मृत्यू येऊन दहाव्या जन्मी मागील दहा मातापितरे बालकास पहावयास सापडली तर त्याचा काय गोधळ उडेल याची कल्पनाच केलेली बरी ! यामुळे पूर्वजन्माची आठवण न राहिल्याने नवीन बालक नवजन्मात जोमाने पाऊल टाकते हेच एकदरीत श्रेयस्कर होय

असल्या गोष्टी अतर्क्य म्हणून आश्चर्यानेच त्याच्याकडे पहाणे अथवा त्या जुन्या भोळचा धार्मिक दृष्टीतल्या म्हणून त्याची हेटाळणी करणे ही दोन्ही वर्ज्यच होत मनोगाहनातील नवीन शोध मान्य केले पाहिजेत मनाचा वेग प्रचड असेल तर क्षणार्धात मागील अनेक जन्मात भरारी मारून येणे त्यास अशक्य का व्हावे ? प्रकाशाचा वेग सेकदाला एक लक्ष सव्वीस हजार मैल असतो, असे शास्त्रज्ञ सागतात या द्रुतगतीने ज्याचे किरण आपणापर्यंत येण्याला वर्षानुवर्षे लागतात असे काही तारे आहेत ना ? म्हणजे त्याचे किरण आपणापर्यंत येईपर्यंत त्या ताऱ्याचे मूळचे रूप बदलले असेलही. याचा अर्थ आज आपण ज्या एखाद्या ताऱ्याकडे बोट दाखवून 'तो तारा पाहिला का' म्हणतो, तो तारा त्या स्वरूपात खूप वर्षांपूर्वी होता असे आजचें खगोलशास्त्र आपणास सागत आहे मग प्रकाशाच्या गतीपेक्षाहि वेगवान् अशी गति मनाला असेल व त्याला प्राचीन कालात जाण्याची उलट गतीहि साध्य असेल, तर हजारो वर्षांच्या मागील कालात त्याला निमिषार्धांत उडी घेणे अशक्य आहे असे मानण्याचे कारण काय ? हजारो मैलावरून बोललेले भाषण जर निमिषार्धात नभोवाणीवरून ऐकू येऊ शकते, तर हजारो वर्षांपूर्वीच्या कालात मनाला उड्डाण करता येणे अशक्य मानण्याचे कारण काय ? तात्पर्य, साम्यवादाचा पुरस्कार करीत असतान निर्भेळ जडवादाचा अथवा

ज्ञात जगताचाच तेवढा पुरस्कार केला पाहिजे अशी सक्ति लादणें हेहि भोळसटपणाचें ठरेल.

विज्ञानाच्या वाढीनें जड व अजड यातील भेद संपुष्टात येत चालला आहे व देश आणि काल यातील अंतरहि तुटत चालले आहे त्यामुळे जगाच्या कोड्याकडे हताश दुर्बल दृष्टीनें पाहणें आता सोडून देणे इष्ट होईल जगाच्या विकासात, बीजातून वृक्षाला येणाऱ्या आकाराप्रमाणे काही पूर्वनियोजित आकार येत असेल व धात्याने पूर्वी सकल्पित केल्याप्रमाणे त्याचा विस्तार होत असेल त्या विस्ताराचे मूलगामी नैसर्गिक नियम कोणालाच मोडता येणार नाहीत हे सत्य, पण त्या नियमाचा हुषारीने उपयोग करून त्याना खुषीने आपल्या तैनातीत जुपणे मानवाला साधत चालले आहे ना ? मग पूर्व सकल्पाप्रमाणेच सर्व घडून येणार म्हणून कालाचा ओघ अपरिहार्य आहे या नियतिबद्धतेच्या ( Determinism ) तत्त्वाचा पुरस्कार साम्य-वाद्यानी करण्याचे कारण काय ?

सृष्टीच्या पोटात शिरून तिचे गूढ उकलता येईल असा आत्मविश्वास उदय पावला नव्हता तोवर 'ठेविले अनते तैसेचि रहावे ' याशिवाय दुसरा विचार सुचण्यासारखा नव्हता पण विज्ञानाची वाढ होऊन मानवी जीवन सुखमय करण्याची साधने अधिकाधिक उपलब्ध होत असताहि इहलोकापेक्षा पर-लोकावर भर दिलेला पाहिला, किवा आपणच मनाने निर्माण केलेली काळ्या गोऱ्या जमातीतील उच्चनीच कल्पना अटळ म्हणून तिला कवटाळीत बसलेला समाज अवलोकिला म्हणजे डोळे बाधून घेऊन आधळ्याचे सोग आणणाऱ्याचें चित्र दिसू लागते. पण असे प्रकार अलीकडच्या काळातहि तत्त्वज्ञान्याच्या विचारसरणीत आढळतातच

इहलोकीच्या खस्ता खाऊन त्रस्त झाल्यामुळे मानवाचा मायावादाकडे व इहलोकीच्या निवृत्तिपर जीवनाकडे कल झुकू लागला तर नवल नाही मात्र आपणावर कोसळणारी काही सकटें निसर्गाच्या अवकृपेने कोसळत असली तरी काही सकटें मानवी समाज आपण होऊन आपणावर ओढवून घेत असतो हे ध्यानी वागविले पाहिजे ती नष्ट करण्याची धडपड करण्याऐवजीं इहलोकात रमण्याची इच्छा हीच मुळी सकुचित दृष्टीची व मायाध:कारात तोड खुपसून बसण्याची आहे अशाहि कल्पना समाजापुढें मांडण्यांत येऊ

लागल्या अनतकोटि ब्रह्माडात रज कणाप्रमाणे सतत कोठेतरी फेकला जात राहण्यापेक्षा अनतकोटि ब्रह्माडाला व्यापून दशागुळे उरलेल्या ब्रह्माडनायकाशी एकरूप होणे हें परमोच्च ध्येय का पुढे ठेवू नये असे विचार तत्त्वज्ञान्याला साहजिकच सुचू लागतात आणि मग तो ज्ञाताच्या कुपणातून अज्ञाताच्या अनत अन्तराळात भराऱ्या मारण्याचा प्रयत्न करीत सुटतो

मूठभर देहात रुतून गुतून बसण्यापेक्षा विश्वव्यापी विभूशी एकरूप होण्याची कल्पनाच मुळी भव्य आणि उदात्त अशी आहे या कल्पनेंत तो रमला म्हणजे ऐहिक जीवनातील औटघटकेच्या अल्प कालात आणि साडेतीन हाती देहयष्टीच्या परिवेष्टनात गुफलेले ऐहिक जीवन हे क्षुद्र, जीर्णवस्त्राप्रमाणे फेंकून देण्याच्या योग्यतेचे असे वाटू लागले तर नवल काय ? अनत काल आणि अनत आकाश या भव्योदात्त कल्पनानी मानव भरून गेला म्हणजे मूठभर देहासाठी व वीतभर पोटासाठी अटीतटी करीत बसण्याचा मोह झाडून टाकला पाहिजे अशी विचारसरणी त्याच्या मनाची पकड घेऊ लागली तर आश्चर्य कोणते ? मग ' अणोरणीया तोकडा, तुका आकाशा येवढा ' या कल्पनेत तो रमून गेला तर साहजिकच नव्हे काय ? अनत ब्रह्माडाकडे पाहू लागले म्हणजे मानवी जीवन ते काय क्षुद्र ? मग यात गुरफटून जाण्यापेक्षा अनताशी एकरूप होऊन जाण्याची धडपड हेच जीवनाचे श्रेष्ठ ध्येय मानून याचा ध्यास त्याने घेणे हे स्वाभाविकच होय.

तत्त्वज्ञ त्याला सागतो की जितक्या लवकर या मोहपाशातून तुला सुटता येईल तितक्या लवकर सुटण्याच्या प्रयत्नाला तू लाग कारण तू जे जीवित म्हणून समजतोस ते विकृति असून मृत्यू हीच मूळची तुझी प्रकृति होय.

' मरण प्रकृति शरीरिणा विकृति जीवित उच्यते बुधै '

अशा प्रकारच्या विचाराचा अहर्निश मारा मनावर होत चालला तर इहलोकीचे जीवन सुखमय करण्याची मानवी वृत्तीच लुळी होऊ लागेल. तसा काहीसा अनुभव आल्यामुळेंच अर्थ काम साधणारा जो धर्म त्याची सेवा तुम्ही का करीत नाही असे आर्जवी उद्गार व्यासाला काढावे लागले. आणि शैशवात विद्या शीक, यौवनात सुख सेवन कर व शेवटी योगाने देहत्याग कर असा आदर्श कालिदासाला माडावा लागला एका सस्कृत सुभाषितकाराने जो आदेश जनतेच्या पुढें माडला आहे तो असा कीं विद्या आणि सपत्ति

याची साधना करताना आपण अजरामर आहोत या चिकाटीने करावी, पण धार्मिक आचार मात्र मृत्यू आपल्या शेंडीला धरून ओढून नेऊ लागलाच आहे अशा धास्तीने उरकून टाकावेत "अजरामरवत् प्राज्ञ विद्या अर्थच साधयेत्। गृहीत इव केशेषु मृत्युना धर्म आचरेत्।"

पण हा सरळ आदेश समाजाला देण्याऐवजी इहलोकातून सुटून जाण्याचा आदेश तत्त्वज्ञानी देऊ लागतात आपल्याकडच्या तत्त्वज्ञानानी दिला तसाच जीवनादेश पाश्चात्य तत्त्वज्ञानीहि दिलेला आहे इहलोकीच्या जीवनापेक्षा व्यापक व विभू असे दुसरे जीवन असले पाहिजे व त्याचा अनुभव आपण घेतला पाहिजे अशी अतरीची तळमळ माणसाला लागून राहिलेली असली म्हणजे मग इहलोकीचे जीवन सुखमय करणाऱ्या विद्या ह्या हलक्या अपरा व अक्षरविश्वात नेऊन सोडील ती परा असा आदर्श माडला जातो 'अथ परा यया तत् अक्षर अधिगम्यते।' अफाट विश्वाशी एकरूप होण्याचा असला अनुभव पाश्चात्य तत्त्वज्ञ वुइल्यम् जेम्स यानें आपल्या 'The will to believe' या ग्रथात नमूद केला आहे आणि तो अनुभव कोणत्या साधनानी मिळाला ? योगसाधनानी नव्हे तर नायट्रस ऑक्साइड गॅस हुगल्यावर ! हा गॅस हुगल्यावर त्याला अशी उन्मनी अवस्था प्राप्त झाली की 'मी', 'तू' वगैरे द्वैत सर्व विरघळून जाऊन नानात्वातील एकत्वाचा साक्षात अनुभव आपणास आला हे त्याने स्वत च लिहून ठेवले आहे हे अनुभव खोटे नाहीत, कल्पितहि नाहीत पण ह्या अनुभवाशी क्षणिक एकरूप होण्यातच जेम्स तत्त्वज्ञानी रमलेला आहे त्या अनुभवात कायमचा रमलेला तो राहू शकेल का आणि लाखातला एखादा असा राहिला तरी बाकीच्या असख्याना ते शक्य आहे का ? शक्य आहे का येवढेच नव्हे तर इष्ट आहे का ? आणि गॅस हुगल्याने जी धुदी येते ती जर समाधी तर मग दारू पिऊन धुद का होऊ नये ? दारूने ही धुदी येतेच ना ? सर्वांचे व्यक्तिमत्व अनतात मुरून गेल्यावर तेथे मानवी जीवनातील सर्व प्रश्नच लुप्त होतात मग लोकशाही काय, साम्यवाद काय आणि कसले काय ?

हा उच्चतम अनुभव सर्वांनाच येऊ लागल्यावर जीवनाचा प्रश्नच सुटला ! पण तो न येता अनेक सकटाशी झगडावे लागत असल्याने ती सकटे टाळता येतील अशा रीतीने विज्ञानाची जोपासना व समाजाची घटना करणे हेच मान-

वाचे कर्तव्य ठरते म्हणून तत्त्वज्ञानी हा ऐहिक मानवी जीवनापेक्षा व्यापक तात्त्विक जीवनावर अव्याहत भर देऊ लागला म्हणजे त्याला सागावे लागते की वीतभर पोट का होईना ते भरले म्हणजे मी तुझ्या तत्त्वज्ञानात काही काळ रमून जातो व अलौलिक आनदाची झुळुकही माझ्या मनाला स्पर्श करून जाते पण पोटात कावळे कोकल लागले म्हणजे ब्रह्मानदाच्या अफाट सागरातून व्यावहारिक जीवनाच्या खडकावर आदळून मी विव्हल झाल्या-विना कसा राहणार ? अशाहि स्थितीत ब्रह्मानदात विलीन होणारे लोकोत्तर महात्मे असतात हे मी ऐकतो, वाचतो पण ते लाखो क्रोडोतून एखाद दुसरे मज पामराला मात्र याचि देही याची डोळा सुख पाहिजे असते

## नैराश्यावर भर

मग सामान्य माणसाचे जीवित सुखमय कसे करता येईल याकडे लक्ष पुरवावयाचे की इहलोकीचे जीवन हे स्वप्नमय आहे असा पक्ष माडून जीवनातील सुखातून त्याला निवृत्त करण्याची आटापीट करावयाची? धनाढ्य श्रीमत जीवनातील अनेक सुखफळे मिटक्या मारीत खात असतो, वाटप करण्याच्या मिषाने दोन माजराना फसवून सबध लोणी स्वत तोडी घालणाऱ्या माकडाप्रमाणे काळचा बाजाराने लोकाना लुटून गबर होत असतो अशा स्थितीत त्याने स्वत च्या गरगरीत पोटावर हात फिरवीत, दुष्काळात पोट भकास झालेल्या कगालाला जर सागितले की अरे विव्हळतोस का ? खरे सुख येथे नसून परमेश्वराच्या घरी आहे, तेथे जा तर त्या कगालाचें काय समाधान होणार ? पण असे सागणारे तत्त्वज्ञ पुढे येतातच अफाट सपत्ति काही धनिकाच्या मजूषेत कोडून गेलेली पाहून ती मजूषा फोडून सर्वांना ती सपत्ति देऊन टाका असा आदर्श न माडता तत्त्ववेत्ते हाकाटी करू लागतात की " अरे हे शहरी जीवितच त्याज्य तुम्ही विरागी फकीराचे जीवन अव-लोका म्हणजे तुम्हाला कल्पनातीत आनदाची लयलूट मिळेल या शहरातील धनिकाच्या सुखाकडे वळताच कशाला ? ते खऱ्या सुखात आहेत का ? छे ! खरे सुख ते आत्मानदात " हे तत्त्वज्ञान म्हणजे अल्पसख्य लुबाडू धनिकाना सुखात तरगत ठेवणारे व अफाट जनतेला निवृत्तीच्या सागरात लोटून देण्यासारखें असते पण सत्ताधीशावर मात करण्याची निराशा वाट लागल्या

वर नैराश्यमय जीवन हेच खरें जीवन अशी मानव आपली समजूत करून घेऊ लागतो

तत्त्ववेत्तेहि त्या नैराश्याचाच पुरस्कार करू लागतात उदाहरणार्थ, जगभर प्रवास करण्याची ऐपत व सपत्ति गाठी असणारा व आपल्या भरतखडात पायधूळ झाडून गेलेला जर्मन तत्त्वज्ञ केसरलिग त्याचेच उद्‌गार ऐका तो आपल्या प्रवासी वृत्तात लिहितो की, "ज्ञान आणि निष्ठा याच्यात कोणी उच्चाक गाठला असेल तर तो हिंदु फकिरानी. मानव हा ब्रह्माचाच अश होय हे भारतीय तत्त्वज्ञान जितक्या लवकर मानवाच्या पचनी पडेल तितक्या लवकर त्याच्या पायातील मायेच्या बेड्या गळून पडून तो मुक्त होईल!" म्हणजे जीवनातील दुःखे दूर करण्यावर भर देण्यापेक्षा कल्पितसुखावर भर देण्यात या तत्त्वज्ञान्याचा जोर! ते स्वतः सुखात लोळत असतात हे निराळे कालिदासाने मेघदूत काव्यातील यक्षाच्या तोडी अशाच प्रकारचे तत्त्वज्ञान घातले आहे की सुदैव, दुर्दैव हे पाणचक्कीतील घटाप्रमाणे क्रमाक्रमाने यावयाचेच घट खाली जावयाचा, पुन्हा वर यावयाचा आणि पुन्हा खाली जायचा असा हा 'चक्रनेमिक्रम' आहे कालिदासाचा यक्ष येवढ्यानेच समाधान मानून घेतो आहे प्रत्येक सस्कृतीचा उदयास्त हा नियतीसिद्ध असून तो टाळणे व्यर्थ आहे असा सिद्धात ठोकणाऱ्या जर्मन स्पेंगलरची या ठिकाणी वाचकास आठवण होईल (सस्कृतिसगम पृ ४०२ पहा) बर्गसाँ या फ्रेंच तत्त्ववेत्त्याने भर दिला तो मूलभूत चैतन्याच्या विकासावर जगाचा विकास हा जड स्वरूपावानसून त्याच्या आतून चैतन्य उसळत आहे असा पक्ष त्याने माडला आज आता चैतन्य व जड यातील भेदरेषाच पुसट होत चालली आहे हे आपण मागे पाहिलेच शिवाय जे चैतन्य उसळत असेल त्या चैतन्याचे काही नियम जर समजून घेता आले तर त्या चैतन्याची मर्जी सभाळणे अशक्य होण्याचे कारण नाही. म्हणून ईश्वरी आराधनेपेक्षा सृष्टिनियम समजून घेऊन त्याचा समाजाच्या सुखसपत्तीत भर टाकण्याच्या दृष्टीने उपयोग करीत राहणे हेच मानवापुढे ध्येय माडणे योग्य नव्हे का? पण असे बुद्धीला चेतना देईल असे ध्येय माडण्याऐवजी तिला मरगळ येईल असे माडण्याची स्पर्धा सुरू झाली, आणि एकीकडे मार्क्स आपला साम्यवादी जाहीरनामा इग्लडमधून फडकावीत असतां तिकड जर्मनीमध्ये शोपेनहॉर, नित्शे असे वेदान्ती मायावादावर भर

देण्यांत हिरीरीने पुढें येत होते 'आधी मन मुडा बा मन मुंडा' या तत्त्वाचा शोपेनहॉर मत्रजागर करू लागला तर कनिष्ठावर अधिकार गाजवणे हा श्रेष्ठाचा हक्कच नव्हे तर कर्तव्यहि आहे असे प्रमेय नित्से हा गर्जून मांडू लागला या ग्रथकाराला समाजातील वर्णवैषम्याचे ठाशीवपणे समर्थन करणाऱ्या मनुस्मृतिकाराबद्दल अत्यादर वाटला नसता तरच आश्चर्य त्याने लिहिलेच आहे की मनुस्मृति व बायबल ही दोन नावे एका श्वासात उच्चारणे म्हणजे शुद्ध पाप होय श्रेष्ठ जमातीनी आपला अहकार मारून न टाकता उलट फुलवून ठेवला पाहिजे कारण व्यक्तीचे श्रेष्ठत्व उठून दिसत असेल तर त्याच्या अहकारी वृत्तीतच उठून दिसते ! (Beyond Good and Evil)

दिसते त्याच्या पलीकडे काही असते याच्यावर सर्व तत्त्ववेत्त्याचा भर, आणि याच्यावर भर दिला म्हणजे मग वैषम्य नैर्घृण्य असेना बिचारे ? ते सारे असावे असा ईश्वरी सकेतच आहे इहलोकीचे सर्वच क्षुद्र, उपेक्षणीय तिकडे पाहताच कशाला ? आत्मानदात रगून जा ना इहलोकीची सकटे होतील तितकी कमी करण्याची जबाबदारी टाळण्याची ही विचारप्रवृत्ति आहे विज्ञानाची वाढ झाली नव्हती तेव्हा विक्राळ सृष्टीपुढे साष्टाग दडवत घालण्यापलीकडे दुसरे काही करता येण्यासारखे नव्हते पण आता तुम्ही तिचे हितगुज हळूहळू ओळखू लागला असता तिला खुलवून तिच्याकडून तिचा वरप्रसाद स्वीकारणे युक्त नाही का ? सृष्टीच्या मूलतत्त्वाचा शोध घेण्याचा हव्यास मानवी बुद्धीने बाळगावा हे रास्त, पण ते मूळ रूप अवलोकिल्यावर त्याच्या दर्शनी विस्ताराकडे म्हणजे ऐहिक जीवनाकडे तुच्छतेने पाहण्याचे कारण काय ? पण तत्त्वज्ञानी हे मूलभूत तत्त्वचितनात इतके गढून गेलेले असतात की क्षणोक्षणी बदलणाऱ्या व्यावहारिक जीवनाकडे ते उपेक्षेने पाहू लागतात चालती बोलती सृष्टि ही क्षणोक्षणी बदलत असेल पण "क्षणोक्षण यत् नवता उपैति तदेव रूप रमणीयताया" अशा सृष्टिसुदरीच्या हरघडी बदलणाऱ्या रमणीयतेत त्याने का रगून जाऊ नये ?

सृष्टि रमणीयच असते असा दावा मात्र मला माडावयाचा नाहीं हे स्पष्ट केले पाहिजे ती विचारसरणी एकानिष्ठ होईल सृष्टि ही सुदरहि आहे आणि सहारकहि आहे याहिपुढे जाऊन स्पष्ट म्हटले पाहिजे की सृष्टीवर हे जे सौंदर्याचे किंवा भीषणतेचे पोषाख आपण चढवितों ते आपल्या कल्पना-

विलासाचे तृप्तीकरिता मुळात ती कशी आहे ते कोण सागणार ? सत्य ज्ञान अनत ब्रह्म असे तिचे आपले वेदाती वर्णन करतात व सत्य, सौदर्य व शुचिता हे तिचे आगिक मूलभूत गुण होत असा पक्ष पाश्चात्य तत्त्वज्ञ माडतात पण हे सर्व मानवी मनाचे खेळ तर नव्हेत ? या ज्या मानवकल्पित कल्पना, त्याचा अध्यारोप तर आपण अनाकलनीय तत्त्वावर करीत नाही ही शका डोकावतेच म्हणूनच तत्ववेत्याला 'नेति नेति' अशावर शेवटी येऊन ठेपावे लागते पण मूळ स्वरूप न कळले तरी जे स्वरूप आपल्या प्रत्ययास हरघडी येत आहे ते स्वरूप उमगून घेऊन जीवित सुखमय करण्याचा प्रयत्न करीत राहणे हेच इष्ट नाही का ?

मग तत्त्ववेत्ते काही म्हणोत आपले वेदाती दिसते.तें नसते असे प्रतिपादोत, किवा ब्रॅडलेसारखा पाश्चात्य वेदाती ठासून सागो की दिसते ते सर्व माया व भुलभुल्यावणी होय ! असेलही ! * दिसते तसे मुळात नसेल ! पण जे दिसतें त्यातील आनद का लुटू नये ? हा आनद प.रमार्थिक दृष्टया स्वप्नमय असेल असो बेटा ! पण स्वप्नात झाले तरी जीवित सुखमय करण्याचा प्रयत्न का करू नये ? वेदान्ती म्हणेल की सुखमय करण्याच्या प्रयत्नाला लागलात म्हणजे त्यात गुरफटून जाल व जन्ममरणाच्या फेऱ्यात डाबले जाल आपण म्हणूया की जाऊ की, काय हरकत आहे ? मागील जन्म असला तरी त्यामागील जन्मीची आठवण नाही ना ? जन्मास येतो तो ताज्या दमानेच येतो ना ? मागील जन्मींची आठवण होत असती तर मात्र जीविताला कटाळलो असतो पण ती आठवण नसल्याने इहलोकाचा कटाळावयाचें कशाला ? घटका गेली, पळे गली, तास वाजे घणाणा । आयुष्याचा नाश होतो राम का रे म्हणाना ? असा घणाणा आमच्या कानाशी कशाला ठेवता ? ज्या काही चार घटका येथे काढावयाच्या असतील त्या एकमेकाच्या सहकार्याने, खेळीमेळीच्या वातावरणात आनदाने घालवू या. एकमेका सहाय्य करून अवघे सुपथ धरू या सृष्टिनियमाची धास्ती न घेता तिचे हृद्गत ओळखून 'इहैव फलमश्नुते' याचा अनुभव घेऊ या 'जीवेत शरद शतम्' असे ध्येय माडणारे आपलेच तत्त्वज्ञ आहेत ना ? मग त्याच्याच मार्गानें जाऊ या '

---

* Deception and cheat.

या मार्गाला पोषक अशी म्हणजे· साम्यवादी समाजघटना पूर्वी प्रत्यक्षात उतरविणे विज्ञानवृद्धीच्या अभावी अशक्य ठरले असले तरी आज तसा प्रयोग करण्याकडेच वळावयास नको का? ध्येय नवीन नाही मार्ग मात्र निराळा नव्या प्रयोगाने सर्वच आपत्ति नष्ट होतील अशा भ्रमात रहावयाचे नाही पण जीवित सुखमय करण्याच्या मार्गावरील एक पुढचे पाऊल या दृष्टीने त्याकडे पाहू या ते पहाण्यासाठी या पुढच्या मार्गाचे श्रेष्ठ मार्गदर्शक प्राचीन भारतीय ऋषिवर्य व अर्वाचीन दर्शनकार मार्क्स याची धूळभेट घेऊ या कपिल कणादासारखे दर्शनकार आपल्याकडे पूर्वी होऊन गेले त्यासारखा-च कार्ल मार्क्स हा अर्वाचीन कालचा दर्शनकार होय कपिल कणादाची सर्व विचारसरणी जशीच्या तशी न घेता जीविताच्या अनुभवात भर टाकीत मानव चालला आहे त्याच दृष्टीने मार्क्सच्या विचारसरणीकडे आपण पुढील प्रकरणी वळूया

---

## प्रकरण तेरावें

# प्राचीन महर्षि व अर्वाचीन मार्क्स

साम्यवादाच्या तत्त्वज्ञानाची परपरा ' सर्वे न सुखिन सतु ' हा आदर्श माडणाऱ्या वैदिक कालाइतकी जुनी असली तरी तिला सार्वत्रिक व्यावहारिक स्वरूप प्राप्त करून देण्याचे विचार आणि आचार हे नवे असून त्यानी नुक-तीच कोठे शताब्दि उलटली आहे ' सर्वे अत्र सुखिन सन्तु सर्वे सन्तु निरा-मया: ।। ' ही आपली वैचारिक परपरा प्राचीन आहे दुसऱ्याचे पोट जाळून जो केवळ स्वत चे पोट भरतो तो साक्षात् पापमूर्तीच होय " केवलाघो भवति केवलाघी " असे आपले पुरातन ऋषिवर्य आपणास ठासून सागत होतेच चाभार, कुभार, रथकार या सर्वांना माझा नमस्कार असो, ' चर्मकारेभ्यो नम कुलालेभ्यो नम रथकारेभ्यो नमः ' अशा उच्च पातळीवरून मार्गदर्शन करणारा आपला रुद्रसूक्तकार ऋषिवर्य सर्वांना समान पातळीवर आणून नमस्कारार्ह अशा उच्च पीठावर बसवीत होता आणि हा ऋषिवर्य ईश्वरा-घरची आपण सर्व लेकरे असल्याने ईश्वरकृपा सपादण्यापुरतेच आपणात साधर्म्य आहे असे सागत नाही चाभार कुभाराना नमस्कार करणारा हा सूक्तकार केवळ आध्यात्मिक पातळीवरूनच ऐक्याचा पुरस्कार करीत आहे असे नव्हे तर भौतिक पातळीहि त्याच्या दृष्टिआड नसल्याने जीवनाच्या ध्येयात " घृत च मे मधु च मे सुखच मे शयन च मे " याचाहि अन्तर्भाव करण्यास तो विसरत नाही

## सामुदायिक सुख

आणि हे सुख सामुदायिक पद्धतीने आपण स्वीकारूया ही विचारसरणीहि अन्य ऋषिवर्यांनी स्पष्टपणे माडलेली आहे आपण सर्वजण एकसध वागूया, एकत्र जेऊया, एकत्र लढूया, तेजस्वी होऊया, आपसातील विद्वेष गाडून टाकूया आणि मग शाति, तुष्टि, पुष्टि या सर्व आपणास लाभू द्या– सहना भवतु सहनौ भुनक्तु सह वीर्यं करवावहै । तेजस्विनाधीतमस्तु मा विद्विषा-

वहे । ॐ शाति शाति शाति । असा आदेश आपल्या पूर्वजानी समाजा पुढे माडलेला आहे आता 'सर्वेन सुखिन' उक्तीतील 'सर्व' ही मज्ञा 'आब्रह्मस्तभपर्यंतम्' या आध्यात्मिक पातळीवर सर्वांना लागू असली तरी व्यावहारिक क्षेत्रात ती मर्यादित असे हे मात्र विसरता कामा नये

सर्वांना अशा प्रकारे मार्गदर्शन केले तरी आदर्श माडावयाचा तो सत्ताधीशापुढेच माडणे इष्ट व आवश्यक या तत्त्वास अनुसरून आपल्या ऋषिवर्यांनी नृपतीच्या पुढे विश्वजित यज्ञात दानाचे ध्येय माडण्यास मागें पाहिलेले नाही या विश्वजित यज्ञात सर्वस्वाचे दान करावयाचे असते सम्राट् हर्ष हा दर पाच वर्षांनी अशाप्रकारचे दानोदक जनतेच्या हातावर सोडीत असे चिनी प्रवासी युवान च्वाग याने पाहिलेल्या पाचव्या समारभाचे वर्णन लिहून ठेवले आहे हा समारभ ७५ दिवस चालून ब्राह्मण, भिक्षु, अनाथ, अपग या सर्वांना धनधान्य वाटण्यात आले असे त्याने नमूद केले आहे * दुसरा उल्लेखनीय विशेष म्हणजे सार्वजनिक मदिरे, तलाव, पाणपोया बाधून पुण्यसपादनाच्या इष्टापूर्तीचा आदर्शहि राजापुढे माडण्यास भारतीय समाजनेते विसरलेले नाहीत

## अनियंत्रित लहरी राजेशाही

पण ही ध्येये नृपतीच्या पुढे माडली तरी लहरी नृपति ती ऐकेलच अशी सक्ति त्याच्यावर कोठून लादावयाची हा प्रश्न प्राचीन ऋषिवर्यांच्या पुढे होताच तो सोडविणे कठीणच होते वेन राजाला ठार मारल्यासारखे एखादे भारतीय तुरळक उदाहरण इतिहासाने नमूद करून ठेवले आहे पण तोच इतिहास काश्मीरच्या कित्येक राजानी प्रजेला अनेकदा, अनेकश छळले असता प्रजा हतबल, हतबुद्ध होऊन तो छळ असहायपणे सोशीत होती हेच सागतो. अलीकडच्या काळातले उदाहरण राघोबा पेशवे याचे नारायणराव पेशव्याच्या वधास कारणीभूत होणाऱ्या या राघोबास समाज काय शासन करू शकला? न्यायाधीश रामशास्त्र्याने राघोबास तू गुन्हेगार आहेस हे ठासून सागण्यास मागें पाहिले नाही आणि न्यायाधीशाची पदवी फेकून देऊन तो काशीयात्रेस निघाला हेच विशेष. असल्या स्पष्टवक्त्या निस्वार्थी न्यायाधीशाचे उदाहरण

* संस्कृतिसगम पृ २७१ पहा.

हेहि दुर्मिळच पण न्यायाधीशाच्या या निकालाची पर्वा न करता प्रजेने राघोबाला चालवून घेतलेच ना ? न चालवून करणार काय ? कारण राजाला राजपदावरून खाली ओढणे हे सघटित प्रजेला अशक्य नाही याची जाणीव-देखील त्याकाली लोकात उदय पावलेली नव्हती

## ईश्वरीकृपेची मागणी

अशा स्थितीत समाजामध्ये साम्यतेची जाणीव उत्पन्न करणे हे ईश्वरी-कृपाप्रसादाचा वा अनुग्रहाचा टाहो फोडीत राहण्यानेच तेवढे शक्य होते ते सतानी निरलसपणे चालविले व "ज्यासि आपगिता नाही त्यासि धरी जो हृदयी। तोचि साधु ओळखावा। देव तेथेचि जाणावा॥" असा गजर समाजाच्या कानी सारखा आदळत ठेवला "हे विश्वचि माझे घर" असे व्यापक आदर्श माडण्यास मागे पाहिले नाही "दया धरम का मूल है" हे सहस्रावधी बैराग्याच्या तोडून अहोरात्र जनतेस ऐकवले पण सत्तालोलुप व मत्तालोलुप राजपती व धनपती त्याना थोडेच दाद देणार ? अथवा जनतेची सपत्ति लुबाडून घेण्यास मागे पहाणार ?

'दया धरम का मूल है' ह्या तत्त्वाचे विडबन करण्याचीहि अर्थलोलुप वणिजानी फिकीर केली नाही लॉर्ड क्लाइव्ह या परकी इग्रजाला आपल्या हिंदी बाधवाविरुद्ध हेरगिरीची व देशद्रोहाची मदत करणाऱ्या वित्ताध गुप्त नावाच्या व्यापाऱ्याची आठवण वाचकास होईलच या गुप्तानी अफाट सपत्ति मिळविली आणि अबू पहाडावर सगमरवरी दगडाची कोटयावधि किमतीची मदिरे उभारली 'देव भावाचा भुकेला,' असला तरी देशभक्तीची भावनाच उदयास आली नसल्याने देवाची भूक तरी या अपुष्ट भावनेने कशी भाग-णार ? म्हणून लोकाचे पैसे लुबाडावे व गुप्त व्यापाऱ्याप्रमाणे देवताना त्यातील काही हिस्सा अर्पण करून खूष ठवावे हा कार्यक्रम चालू राहिला अशा स्थितीत देवाच्या दृष्टीने आपण सर्व समान पातळीवर आहोत असा टाहो फोडीत राहण्यापेक्षा सत तरी दुसरे काय करणार ? 'मऊ मेणाहूनी आम्ही विष्णुदास, कठिण वज्रास भेदू ऐसे' असे उच्चस्वराने सतानी ठासून सागितले, ते आध्यात्मिक भूमिकेवरून योग्यच होते पण - पेश-व्यास वाचविण्याला वज्राचे भेदन वेगळ्या प्रकाराचे लागते. आणि औरग-

जेबाचे सैन्य पढरपूरच्या दिशेने येण्याचा सभव दिसू लागला तेव्हा मूर्तिरक्षणार्थ भक्तगणाने केले काय ? तर देवाची मूर्ति उचलून दूर नेऊन ठेवली !

## वायफळ रुद्रपठण

आणि नदीवर पूल बाधण्यास श्रुतिसामर्थ्य तरी पुढे आले का ? तर तेथेहि नकार घटाच नाना फडनीसाला काशीसमीप कर्मनाश नदीवर पूल बाधावयाचा होता अर्थात त्याने ते काम तेथील बाधकामविशारदावर सोपविले पण वाळूच्या व जलाच्या घसरडीपणामुळे पुलाचा पायाच स्थिर होईना तेव्हा 'भावाच्या भुकेल्या' रुद्रदेवाची आळवणी करावी म्हणून ब्राह्मणानी रुद्राभिषेकाची आवर्तने सुरू केली पण जेव्हा शेषशायी भगवान् जागाच होईना तेव्हा नाना फडनीसाने कलकत्त्याच्या बेकर नावाच्या विलायती तत्रज्ञास बोलाविले आणि त्याने देवाचा धावा करीत न बसता बबाने पाणी हटविण्याचा धडाका सुरू करताच पहाता पहाता पूल पायावर उभा राहिला !! अर्थात् परमेश्वराचा धावा केल्याने तो प्रसन्न होऊन आपल्या सर्व आकाक्षा तृप्त होतील अशा भावनेत गुरफटून गेलेल्या मनाला वरील पूलबाधणीच्या दृष्टाताने धक्का बसावयास पाहिजे पण डोळे झाकून घेणाराच्या मनाला धक्का काय बसणार आणि तो त्यापासून धडा तरी काय शिकणार ? अशा स्थितीत "ठेविले अनते तैसेचि रहावे" हा मत्र म्हणत काल कठणे येवढेच उरेल !

सतानी सच्चारित्र्याचा झेडा रोविला आणि फडकावित ठेवला या त्याच्या उपकाराबद्दल त्याना शतश धन्यवाद ! पण सत्तालोलुप सर्पिणीपुढे सत झाले तरी किती टिकाव धरणार ? त्याला वाघनखाने उदर फोडणारा शिवाजीच पुढे यावा लागतो शिवाजीने अधिकाऱ्याना जमीनदारी देण्याऐवजी नक्त पगार देण्याचा नवा पायडाही पाडला मात्र पुढीलाना त्याचा कित्ता गिरवणे न साधल्याने सरदेशमुखीने पुन्हा मुसडी मारण्यास मागे पाहिले नाही हे निराळे वरीलसारख्या परिस्थितीत जनतेच्या हाती सत्ता येणे व स्थिर होणे दुर्घट नव्हे तर अशक्यच होते शेंकडो खेड्यापाड्यात पसरलेली जनता एकत्र येणार कशी आणि आणणार कोण ? सैनिक मोठ्या प्रमाणात एकत्र असत पण त्याच्यातील एकोपा फोडन काढण्यास व राजास खास सरक्षण

देण्यास राजकर्त्याभोवती पुढील काली गाड्याची गर्द सेना गर्जत उभी असेच अशा स्थितीत ज्याची धमक असेल त्याने पुढे यावे व नसलेल्यानी हतबुद्ध होऊन तो देईल ते उपकार समजून गुजराणा करावा येवढाच मार्ग मोकळा होता.

## यंत्रशक्तीचा अवतार

इतर देशात म्हणजे युरोप–अमेरिकेत हाच प्रकार चालू होता त्यातून त्याची वाट बाहेर काढणे सुचण्याची परिस्थिति तेथे जी निर्माण झाली ती वाफेच्या व यत्रशक्तीच्या धडाक्याने या यत्रशक्तीची कामगारवर्गाने प्रथम धडकीच घेतली चारसहा कामकऱ्याचे काम एकटा उरकू लागला तर बाकीच्याच्या पोटावर पाय येईल याची जाणीव सोळाव्या शतकातल्या एका कारखानदाराला झाली तेव्हा त्याने अनेकाना उपाशी मरत ठेवण्या-ऐवजी एकाला यमसदनास पाठवावे या न्यायाने शोधकालाच यमपुरीस पाठविले ! (कॅपिटल, प्रकरण १५) शेपन्नासाचे काम यत्रसहाय्याने एकटा उरकू लागला तर बाकीच्या पाचपन्नासानी माशा मारीत हवा खात बसावयाचे की काय ? यामुळे यत्रे फोडून टाकण्याचे व कारखाने जाळून टाकण्याचे प्रयत्नहि झाले पण ते फोल ठरले कारण यत्रसामर्थ्याच्या पाठोपाठ दडपेगिरीचे सामर्थ्यहि वाढत गेले आणि साम्राज्यशाहीच्या विस्ताराबरोबर बाहेरच्या लुटीतील चार दाणे कामकऱ्याच्या तोडावर फेकून त्याचे तोड बद करण्याचे तत्र अवलबण्यास धूर्त व्यावहारिक कारखानदार विसरला नाही तरीहि मूठभर धनाधीशाच्या तुबडीत अलोट सपत्ति तुबून पडावी व लाखो शेतकरी-कामकऱ्याना वेळी अर्धपोटी झिजत रहावे लागावे याचे चटके बहुजनाला बसतच होते ते चटके असह्य झाले म्हणजे धनाधीशाची शेते जाळून टाकण्याचा शेतकरी सपाटा चालवीत त्याचा परिणाम येवढाच होई की धनाधीशाच्या मजूषेतील काही थोडी सपत्ति बाहेर पडे पण शेतकऱ्याला धान्य कापण्याच्या बरोबर आपली मानही कापून घ्यावी लागे गेल्या शतकात आयलंडमधील शेतकऱ्याची असल्या आपत्तीनी जी ससेहोलपट केली ती हेंच दर्शविते

इग्लडमध्यें प्रॉटेस्टंट लोकाचे राज्य बलिष्ठ झाल्यावर आयलडमधील हजारो रोमन कॅथॉलिकाच्या जमिनी हिसकावून घेऊन त्याना कुपणाबाहेर

हाकलण्यात आले त्याच्यावर अधिक नागर फिरविण्याकरिता शेती पिक-
विण्याऐवजी जास्त किंमत आणणारी खिलारी जनावरे पोसण्यात आली
यामुळे सतापून शेवटी शेतकऱ्यानी शेकडो कुरणे जाळून टाकली ! स्विफ्ट
बार्क्लेसारख्या लेखकानी जमीनदाराच्यावर आपली कठोर लेखणी चालविली
पण ते अशा लेखणीच्या फटकाऱ्याला दाद थोडीच देणार ? शेदीडशे वर्षे हा
झगडा चालूच होता इ स १८२९ मध्यें पडित जमिनी शेतकऱ्याना द्याव्या
असा ठराव लोकशाहीने मजूर केला पण धनिक लॉर्डांनी तोहि धुडकावून
लावला अशा रीतीने इग्लडमध्ये चैनीत राहणारे आयरिश धनाढ्य आयर्लंड-
मधील शेतकऱ्याना वर्षानुवर्ष लुबाडीत होते इग्लडमध्ये बाहेरून सपत्ति येत
असल्याने इग्रजाना आपल्या कामगाराना त्यातल्या त्यात खूष ठेवता आले
वाफेची यत्रे निघाल्यावर प्रथम इग्रजही हतबुद्ध झालेच मात्र विज्ञानाच्या
वाढीबरोबर शस्त्रे भेदक होत जाऊन त्याच्या जोरावर आशिया आफ्रिकेतून
लुटलेल्या उमाप सपत्तीपैकी थोडी कामकऱ्याला देऊन खूष ठेवता आले पण
ज्या या वाफेच्या शक्तीने अनेकाना बेकार केले त्याच शक्तीने गिरणी काम-
गाराना शेवटी मोठ्या सख्येने एकत्र आणले व त्याना भाडवलदाराशी सघटित-
पणे तोड देण्याचा बीजमत्र सुचविला

हा मत्र नुसता मत्रपठणातच न राहता व्यवहारात मूर्तरूप धारण
करावयाचा तर त्याला तत्रहि योजावे लागते या तत्राचा द्रष्टा सुप्रसिद्ध
कार्ल मार्क्स हा होय. जगातील सर्व कामगाराना सामुदायिक सघटित
सामर्थ्याने एकवटणे हे ते तत्र होय असे मार्क्सने जनतेपुढे माडले जागतिक
कामगाराना त्याने आदेश दिला तो हा की तुम्ही सर्वांनी एकजुटीने वागा व
भाडवलशाहीविरुद्ध प्रचड गट उभारा सामुदायिक गरजा, सामुदायिक श्रम,
सामुदायिक सपत्ति, सामुदायिक सघटना या कल्पना नव्या नव्हत्या काम-
गाराच्या असतोषातून या कल्पना अधूनमधून उसळी मारून वर येण्याची
धडपड करीत होत्याच पण या विस्कळित सैराट ओढ्याना एका विशाल
तुडुब नदीपात्रात आणून तुफान भरतीच्या वेगाने धावते केले तरच त्यात
महान् वृक्ष मुळासकट उपटून प्रवाहाबरोबर सागरार्पण करणे शक्य होते, असे
मार्क्सने प्रतिपादन केले

हे ध्येय जसेच्या तसे प्रत्यक्ष व्यवहारात उतरले नाही हे निराळे कारण साम्यवादाचा पहिला विराट प्रयोग ज्या देशात मूळ धरण्याइतका यशस्वी झाला त्या रशियात तो प्रयोग तेथील जनतेच्या स्वत च्या सघटित शक्तिसामर्थ्यानेच यशस्वी झाला अन्य देशातील कामगारानी काही ठिकाणी सघाची उभारणी केली पण त्यात फारसा जोम नव्हता हे ओळखून जागतिक कामगाराच्या सघटनेची कल्पना रशियाचा नेता स्टालिन याने पुढे सोडून दिली. दुसरा एक श्रेष्ठ नेता ट्रॉट्स्की याने जागतिक सघटनेचा हिरीरीने पुरस्कार केला पण स्टालिनचा पक्ष जोरदार ठरल्याने ट्रॉटस्कीला रशिया सोडून अमेरिकेचा आश्रय घ्यावा लागला

## न पचलेला ध्येयवाद

आणि व्यापक दृष्टीने विचार करता स्टालिनने ट्रॉटस्कीविरुद्ध टाकलेले हे पाऊल योग्य दिशेने टाकले असेच दिसून येते ‘ जगातील कामगारानो एकमुखाने बहिष्कार पुकारा ’ हा आदर्श आकर्षक असला तरी तो व्यवहारात उतरणारा नव्हता असा अनुभव लेनिन–स्टालिनला रशियातच येऊन चुकला होता कसेल त्याची जमीन ह्या अर्धवट साम्यवादी घोषणेने रशियातील शेतकरी प्रथम बेहोष खूष झाले पण ज्याच्या त्याच्या कुटुबापुरतेच धान्य जवळ ठेवून बाकीचे सरकारजमा करण्याचा धडाका सुरू होताच त्याच शेतकऱ्यानी नव्या साम्यवादी सरकारच्या हाती आपली गुरे देण्याऐवजी त्याची स्वहस्ताने प्रचड प्रमाणात कत्तल करण्यास मागे पाहिले नाही याचा उल्लेख मागे केलाच आहे ! दुसऱ्या जागतिक युद्धातहि रशियास तोच अनुभव आला कामगारामध्ये जागतिक एकत्वाच्या कल्पनेने मूळ धरले असते तर सर्वच लढाऊ देशात एकमेकाविरुद्ध प्रचड सैन्य उभारणे हे स्वप्नमयच ठरले असते रणागणावर लढणाऱ्या असख्य सैनिकाना आपण जगातील मजुराना स्वातत्र्य मिळवून देणाऱ्या तत्त्वाकरिता लढतो आहो याचे भान असते तर भाडवलशाही राष्ट्राना सैनिक मिळणेच कठीण गेले असते या अनुभवावरूनच रशियाला दुसऱ्या महायुद्धाच्या धुमश्चक्रीत जागतिक कामगाराना एकत्रित करण्याच्या कल्पनेला मूठमाती द्यावी लागली

कामगाराच्या जागतिक ऐक्यातील मुख्य धोंड म्हणजे कामगार हा स्वभावत.च साम्यवादी आहे ही भोळी समजूत होय. कारण आशिया–आफ्रिका लुटून

आणलेल्या संपत्तीतील चारदोन चोथे कामगाराच्या पुढे फेकले की त्याच्या विरोधाला मरगळ येई असेच इतिहास सांगतो. यामुळेच जगातील मजुराच्या सामुदायिक उठावणीची कल्पना स्वार्थी मनात मूळ धरू शकली नाहीं आपल्या भारतातील जातीजातीतील वैषम्य काढून टाकण्याचा प्रयत्न करणारांना हाच अनुभव चाखावा लागला आहे ज्या कनिष्ठ जातींना आपण वरिष्ठात समाविष्ट व्हावे अशी उत्कंठा असते त्या जाती आपल्यापेक्षा खालच्या वर्गातील कनिष्ठतर जातींना आपल्या जातीत समाविष्ट करून घेण्यास मात्र तयार नसतात !

रशियाच्या साम्यवादी प्रयोगातील दुसरी एक घटनाही मार्क्सच्या कल्पनेशी न जुळणारी अशीच घडली मार्क्सची कल्पना होती की, साम्यवादी रणांगणाच्या बिनीवर प्रथम शौर्याने लढतील ते गिरण्या कारखान्यातील मजूर लढतील आणि अशा प्रकारच्या प्रयोगाचे निशाण प्रथम उभारले जाईल ते जर्मनीसारख्या देशात ! पण पहिला प्रचंड प्रयोग यशस्वी रीतीने उभारण्यात आला तो मागासलेल्या रशियात ! आणि या प्रयोगाचा रशियाच्या प्रचंड वाळवटात झेंडा उभारणारे कोण ? तर ते नांगरहाके शेतकरी ! यंत्र चालविणारे गिरणीकामगार नव्हेत !

मार्क्सचा आणखी एक आदर्शहि अव्यवहार्यच ठरला बंधमोक्षाच्या कल्पनेच्या आहारी जाऊन मार्क्सने कुटुंब म्हणजे कुटणखाना असल्याने तो जमीनदोस्त करून नरनारींना स्वैराचारास मोकाट सोडावे हा जो आदर्श मांडला त्या मार्क्सच्या आदेशासहि मुरड घालणे लेनिनला कसे आवश्यक वाटले हे मागे नमूद केलेच आहे

तसेच मार्क्सच्या एकांतिक जडवादाच्या पुरस्कारालाहि विज्ञानाने दुर्बल ठरवून जड-अजड यातील भेद दाखविण्यास आपण असमर्थ आहोत असे स्पष्ट कबूल केले आहे कारण प्रकाशाचे मूळ शोधता शोधता ते परमाणूचे कण आहेत की लाटा आहेत हे निश्चित ठरविणे आज विज्ञानाला अशक्य होऊन बसले आहे याचेही ओझरते दर्शन मागे घेतलेच आहे.

## चीनमधील शेतकरीसंघटना

रशियाच्या मार्गदर्शनाखाली साम्यवादाच्या सोपानावरील पायऱ्या चढणाऱ्या चीननेहि प्रथम हाताशी धरले ते शेतकऱ्यांना, गिरणी मजुरांना नव्हे ! आणि

याचे कारण सगळ्यात मोठा असंतुष्ट वर्ग शेतकऱ्याचा होता हे होय गिरणी कामगाराच्या तोंडावर वार्षिक अफाट उत्पन्नातील चतकोर नितकोर बोनस फेकले की तेहि श्रमसार्थकतेचा उसासा टाकीत बसणारे यामुळे चीनमधील साम्यवादी प्रयोगहि मार्क्सच्या कल्पनेपेक्षा निराळ्या रक्तानेच रंगविले जात चाललेले आपण पाहत आहोत

मार्क्सचा नियतिबंधनाचा ( Determinism ) सिद्धांतहि अढळ नाही मार्क्स त्याच्या आहारी गेला तो हेगेल या जर्मन तत्त्वज्ञाच्या प्रभावी विचारसरणीने हेगेलच्या मताने विश्वाचा विकास हा ठराविक विकासपद्धतीने होत असतो व तो होत असता जडातील सुप्त चैतन्य प्रगट व प्रभावी होत जाऊन जग विकसित होत जाते हेगेलच्या दृष्टीने चैतन्य हे आद्यतत्व व त्याचा सर्वगामी विस्तारमय स्रोत म्हणजे विश्व या विचारसरणीतील विकासाचे तत्त्व मार्क्सने स्वीकारले, मात्र मूलभूत तत्त्व चैतन्य न मानता जड मानून त्याचा विकास हा नियतिबद्ध असतो या दृष्टीने हेगेलच्या सिद्धांताला वळचणीचे पाणी आढयाला जाते या प्रकारे उलटे रूप दिले

पण मूलभूत अजडातून दृश्यमय जड निर्माण झाले असे मानलें काय किंवा जडातून अजड चैतन्य उद्भूत झाले असे मानले काय ही सर्व प्रक्रिया नियतिनियमबद्ध होय असे स्वीकारले म्हणजे मानवी बुद्धीच्या सामर्थ्याला स्वतंत्र स्थानच उरत नाही आणि ते उरते हे मानल्याशिवाय आपल्या बुद्धीच्या प्रभावाने निसर्गाचे मूलभूत नियम शोधून काढून तिला दिमतीस लावून आपले जीवित सुखमय करण्यात मानव जो पुढे पाउले टाकीत चालला आहे त्याला अर्थच राहत नाही नव्या कल्पना सुचणे व त्याचे प्रयोग करून पाहण्यात बुद्धीला व शरीराला वेठीला धरून त्याच्याकडून अविश्रांत काम झोडपून घेणे या शास्त्रविकासाच्या मार्गावरून मानव आजवर उत्क्रांत होत आलेला आहे हा सर्व विकास नियतिनियमबद्ध प्रक्रियेने होत असतो असा सिद्धांत मांडला म्हणजे मानवाच्या बुद्धीचे स्वातंत्र्यच हिरावून घेतले जात नाही का ? मानवी प्रतिभेला ज्या नव्या नव्या कल्पना स्फुरत असतात त्या पारखून त्याची सुसबद्ध मांडणी बुद्धिसामर्थ्याने करून सृष्टीची गूढे उकलण्याचा अविरत उद्योग मानव करीत आलेला आहे तो सर्व उद्योग नियतिबद्ध होय हे तत्त्व स्वीकारले म्हणजे

मानवाचे मानव्यच सपुष्टात येते मानव आपली बुद्धि लढवीत असतो असे मानण्याऐवजी मानवाच्या बुद्धीचा विकास बीजांतून वृक्षाचा विकास व्हावा त्या पद्धतीने नियमित पद्धतीने होत असतो असे मानले म्हणजे मानवाच्या विचारस्वातत्र्याला अवसरच राहत नाही आणि तो नसेल व मार्क्सला सुचलेली विचारसरणी ही कालमानाप्रमाणे सुचणारी अशीच असेल तर मार्क्सच्या प्रतिभेलाहि स्वतत्र उड्डाणाचे भव्यत्व शिल्लक उरणार नाही!

प्रतिभेला नवीननवीन कल्पना सुचत असल्या तरी त्या प्रत्यक्ष सामाजिक व्यवहारात उतरविण्यास सामाजिक विकासावस्था अनुकूल असावी लागते येवढ्या अर्थीच नियतिबद्धतेचे तत्त्व लागू पडेल उदाहरणार्थ, वाफेने नाव चालविता येते हे दोन हजार वर्षापूर्वीच एका ग्रीक शास्त्रज्ञाने मुलाच्या खेळण्याची एक छोटीशी नाव वाफेने चालवून सिद्ध केले होते पण ते खेळणे म्हणून त्याचे कौतुक करण्यापलीकडे मानवाची सामाजिक बुद्धिमत्ता व व्यवहार ही विकसित झालेली नव्हती म्हणून त्या प्राचीन शास्त्रज्ञाची प्रतिभा त्याच्या मनातच झिरपून गेली तात्पर्य, नव्या कल्पना सुचणे हेहि सर्वस्वी विश्वविकासाच्या नियतीवर अवलबून आहे हा पक्षहि टिकण्यासारखा नाही. नुसत्या मानवालाच नव्हे तर : ·,-·- आपली बुद्धिमत्ता अल्प प्रमाणात का होईना पण स्वतत्रपणे चालविता येते यातच त्याचा जिवतपणा आहे. आपल्या बोटावर आता बसलेली माशी ही क्षणभराने उडून जाईल ती डावीकडे की उजवीकडे, वरती की खालती ह्याचे कोणतेच भविष्य आपणास वर्तविता येत नाही यातच बुद्धिस्वातत्र्य गृहीत आहे माणूस हा एक यत्र होय असा पक्ष माडणारे यत्रवादी बिहेव्हियरिस्ट याचमुळे एकातिक ठरतात जन्मजात कुडलीप्रमाणे सर्वच जीवित नियतिबद्ध असते ही फलज्योतिषाची एक विचारसरणीहि अशीच एकातिक होय मार्क्सला सुचलेला साम्यवाद हा जर निसर्गनियमाप्रमाणेच सुचला असेल तर त्याच्या स्वतत्र प्रतिभेला वावच उरणार नाही आणि कालमानाला अनुसरून नियतिनियमबद्धतेने जर नवे विचार सुचत असतील तर त्यातील काही फोल तरी का ठरावे ? मार्क्सची कल्पना ही नियतिबद्ध असेल तर साम्यवादाचा प्रयोग जर्मनी, फ्रान्स, इग्लड यापैकी कोणत्या तरी देशात प्रथम होईल ही त्याची कल्पना फोल का ठरावी ?

## नियतीची मर्यादित बंधनें

मग नियतीची बधनेच अजिबात नसतात असा पक्ष माडावयाचा की काय ? नाही तोहि अर्धसत्यास धरूनच होईल नवीन नवीन कल्पना सुचणे हे मानवाच्या बुद्धिस्वातत्र्याचे लक्षण तर खरेच, पण ज्या कालात तो रहात असतो त्या कालाच्या विचारसरणीपेक्षा फार उच भरारी तोहि मारू शकत नाही आणि मारली तरी ती व्यवहारात उतरविता येत नाही हीच त्याच्यावरील नियतिनियत्रणा होय वाऱ्याच्या झोताने पाणचक्की चालविणे हे मानवाला प्राचीनकालीच सुचले पण प्रचड जलौघाने विद्युत्शक्ति निर्माण करणे ही कल्पना सुचण्याला विज्ञानाच्या वाढीने शास्त्रज्ञाच्या बुद्धीची मशागत अनेक शतके होऊन राहिलेली हवी होती अर्थात् मानवी बुद्धीला स्वतत्र कल्पना सुचण्याचे स्वातत्र्य आहे, पण त्या कल्पनेच्या भराऱ्या पूर्वविकसित बुद्धीच्या क्षेत्रापेक्षा फार उचीवर जाऊ शकत नाहीत ही मर्यादाहि आहे यामुळे "धाता यथापूर्वमकल्पयत्" हा एकातिक नियतिवाद सोडून देऊन उत्क्रातीच्या पाठोपाठ बुद्धीची धारणा विकसित होत जाते हे उत्थानउत्क्रातीचे (Emergent Evolution) तत्त्व स्वीकारणे विज्ञानाला धरून होईल

## मार्क्सची अर्धवट माहिती

मार्क्सची व एजल्सची भारतविषयक भौगोलिक व ऐतिहासिक माहिती कशी अर्धवट होती ह्याचे माझ्या 'सस्कृति सगमात' (पृष्ठ ३८७ ते ३९३ पहा) विवरण केले असल्यानें त्याचा त्रोटक उल्लेख करून पुढे जाऊ उद्योगधद्याची वाढ हिंदुस्थानात झाली नाही याची तीन कारणे म्हणजे शेतीच्या खाजगी मालकीचा अभाव, दळणवळणाच्या साधनाची त्रोटकता व खेड्यातील बलुतेदारीबद्ध स्वयपूर्ण जीवन अशी मार्क्सने दिली आहेत पण खाजगी शेती रूढ होती, दळणवळणाला वाहिलेला लमाणाचा प्रचड ताडा नेहमी फिरत असे, आणि छोट्या गावगाड्याबरोबर लाखो रहिवाशी राहतील अशी विजयनगरासारखी शहरेहि होती येवढें नमूद केले असता मार्क्सच्या या अपुऱ्या माहितीच्या आधारावर उभारलेल्या मताचे अधिक परीक्षण करण्याची जरूर नाही·

## अर्थोत्पत्ति हाच इतिहासाचा पाया

मानवी इतिहासाची सर्व जडणघडण ही आर्थिक उत्कर्षाच्या व आर्थिक स्वामित्वाच्या पायावरच उभारली जाते असा जो मार्क्सचा सिद्धात म्हणून माडला जातो त्यालाही काही मुरड एजल्सला घालावी लागली इ स १८९० ते ९४ या चार वर्षांतील मार्क्स व एजल्स पत्रव्यवहारातील काही निवडक पत्रे पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाली आहेत त्यापैकी एकात तो लिहितो, "आम्हाला सिद्धात माडावयाचा आहे तो एवढाच की मानवी इतिहासाला वळण देणारी मूलभूत कडेकपारी म्हणजे आर्थिक उत्पत्ति ही होय पण यातील मूलभूत शब्दाकडे दुर्लक्ष करून जीवनाला वळणे देणारी एकमेव शक्ति म्हणजे आर्थिक व्यवस्था होय असा पक्ष माडिला तर त्याला अर्थच उरणार नाही! मूळ पाया आर्थिक व्यवस्थेचा असला तरी त्यावरील भव्य इमारत ही कायदेकानू, तत्त्वज्ञान आणि धार्मिक कल्पना याच्या स्तभानी व मनोऱ्यानी उठविलेली असते यामुळे या भव्य प्रासादाच्या मूळ आर्थिक पायावरही ताण पडल्याशिवाय रहात नाही"

पाकिस्थानातील आपल्या अफाट सपत्तीवर लाथ मारून भारतात येणाऱ्या धनाधीशाचा या ठिकाणी नुसता उल्लेख केला तरी पुरे

मार्क्सच्या प्रतिपादनातील आणखी एकदोन मुद्याचा उल्लेख केला पाहिजे पहिला मुद्दा म्हणजे मार्क्सने आपल्या भाडवलदारी समाजनियमात समाजाची विभागणी भाडवलदार व कामगार या दोनच वर्गांत केली आहे हा होय सुशिक्षित असा जो मध्यम वर्ग त्याला त्यानें स्थानच दिले नाही मध्यम वर्ग हा व्यापक दृष्टीने पाहिले तर नोकरी चाकरीला वाहिलेला चचलवृत्तीचाच असतो हा मार्क्सचा दृष्टिकोण सर्वस्वी चुकीचा नाही. मध्यमवर्गाचे जीवन धनाधीशाच्या कृपाप्रसादावर अवलबून असल्याने तो धनाधीशाचा भाट स्तुतिस्तोत्रेवाला झालेला असतो दिल्लीवल्लभाच्या कृपाकटाक्षात आपण तारुण्य घालविले असे अभिमानाने सागणारा जगन्नाथ पडित किंवा राघोबा पेशव्याचा 'राघवो रघुपते समकीर्ति' म्हणून उल्लेख करणारा अलकार-मजूषाकार अथवा दुसऱ्या बाजीरावावर लावण्या लिहिणारे शाहीर ही उदाहरणे प्रसिद्ध आहेत पण मध्यमवर्गातहि दोन तट असतात. पैकी वर

उल्लेखिलेला पंडित वर्ग हा धनाधीशाला हाणून पाडणाऱ्या लढ्यात भाग घेण्याचे धाडस करणार नाही हे स्पष्ट आहे

## मध्यम वर्गातील देवभक्त व देशभक्त

पण मध्यमवर्गात दुसरा एक निस्वार्थी स्वतंत्र विचाराचा व तत्त्वाकरिता हालअपेष्टा सोसण्यासहि तयार असलेला वर्ग असतो त्याची उपेक्षा करणे म्हणजे मात्र त्या वर्गावर अन्याय करणे होईल मुसलमानी आक्रमणाच्या काळात धर्म, भाषा व स्वत्व कसोशीने टिकवण्यात ज्ञानेश्वर–एकनाथासारखे मध्यमवर्गीय ब्राह्मणश्रेष्ठहि होते ना ? आणि इतक्या जुन्या काळाकडे वळण्याचेहि कारण नाही कारण आज आपला भारत देश जो स्वतंत्र झाला आहे, तो होण्यास स्वातंत्र्यप्राप्तीच्या ध्येयाची ज्योत परकीय अमलाखाली तळपत ठेवून कारागृहवासाचे खडतर आयुष्य स्वीकारणारा वर्ग हा प्रारंभी तरी प्रामुख्याने मध्यमवर्गच होता ना ? भारताचे नाव जगभर पसरविणारे टिळक, गांधी सुभाष बाबू, पंडित नेहरू हे सर्व मध्यमवर्गातलेच ना ? पण ते कशाला ? मध्यमवर्गाकडे दुर्लक्ष करणारा मार्क्स हा स्वत हि मध्यम वर्गाचा ! व विद्यार्जनाला अखंड वाहिलेला असाच होता !! लेनिनचा पिंडहि मध्यम सुशिक्षित वर्गात पोसलेला रशियातून झारने हद्दपार केल्यावर चार वर्षांचा अभ्यासक्रम दोन वर्षांत पुरा करून त्याने जर्मन विश्वविद्यालयाची पदवी संपादन केली याचा मागे एका ठिकाणी उल्लेख केलाच आहे याचा अर्थ हाच की कामकऱ्याची एकजूट व्हावयाची असल्यास व त्यापुढे एक ध्येय मांडून त्यांना कार्यप्रवण करावयाचे असल्यास दिवसभर कामात गुंतलेला कामकरी पुरा पडत नसून जन्माने नव्हे तर विद्याभ्यासाने मध्यमवर्गात मोडणारा समाजघटक त्याच्या मार्गदर्शनाला अवश्य असतो पण स्वत मार्क्स हा मध्यमवर्गातील प्रतिभावान व अभ्यासू वृत्तीचा असताहि त्याचे या वर्गाकडे योग्य ते लक्ष गेले नाही हे खरे

## यंत्रविशारद मध्यमवर्ग

मात्र मध्यमवर्गातील असा स्वार्थत्यागी वर्ग एकदरीने अल्प असतो हेहि ध्यानी ठेवले पाहिजे हजारो मैलावरून आलेले अल्पसख्याक इंग्रज हे अजस्रसख्याक भारतीयावर दीडदोन शतके अधिराज्य चालवीत होते तें

भारतातील मध्यमवर्गीय सुशिक्षिताना हाताशी धरूनच ना ? परकीय नृपतीशी हस्तादोलन करणारा हा वर्ग स्वराज्यातहि भिक्षापतीचा धाक घेऊन धनपतीच्या मागे लागणार नाही असे थोडेच ? विज्ञान जसे वृद्धिगत होत आहे तसे हरएक धद्यात यत्रविशारद मध्यमवर्गाचे स्थान उच्च व अपरिहार्य होत चालले आहे. म्हणजेच मध्यमवर्गांतीलच हा एक गट स्वतत्र तिसरा बलशाली वर्ग होऊ पहात आहे. मार्क्सच्या वेळी विज्ञानाची वाढ आजच्या इतकी डोळेफोड झालेली नव्हती म्हणून भाडवलदार व कामगार या दोन वर्गांवरच त्याचे लक्ष केद्रित झाले भाडवलदारीचा विकास होत जाईल तसा छोटा भाडवलवाला नष्ट होऊन मूठभर बडे भाडवलदार व असख्य कामगार याच्यात सर्व समाज वाटला जाईल अशी मार्क्सची कल्पना होती पण विज्ञानाच्या वाढीबरोबर भाडवलदाराच्या शेजारी तत्रविशारदाचा वर्गहि दिवसेदिवस दिमाखाने मिरवू लागला आहे. रशियात लेनिन स्टालिनने मार्क्सच्या विचारसरणीला अनुसरून या मध्यम, बुद्धिमान्, बुद्धिजीवि वर्गाची प्रथम हेटाळणी, हेळसाडच नव्हे तर कुतरओढहि केली पण पुढे चूक कळल्यावर फाशीची शिक्षा ठोठावण्यात [illegible] काहीना यत्राच्या कामावर जुपण्यात आले. तात्पर्य मध्यमवर्गांतील स्वार्थत्यागी, लोकसेवारत, प्रतिभावानाना क्रातीच्या दणदणाटातहि विसरणे हीही मार्क्सच्या विचारसरणीतील उणीवच होती

ही उणीव निर्माण होण्याच्या परिस्थितीकडे लक्ष दिले तर ती स्वाभाविकच वाटेल ती परिस्थिति म्हणजे मार्क्स ज्या कालात वावरत होता त्या कालात मजुराचे जिणे कल्पनातीत कष्टमय होते ही होय अतिशय ओरड झाल्यावर १८६० मध्ये नॉटिंगहॅम येथे सभा भरविण्यात आली त्यावेळी अध्यक्षानी जी माहिती सागितली ती सतापजनकच होती ती आज ऐकल्यावर विश्वासदेखील बसणार नाही. पण अध्यक्षानी फितीच्या कारखान्यातील मजुराची जी हकीगत सागितली ती अगावर शहारे आणणारी होती नऊदहा वर्षांच्या बालकाना पहाटे तीन वाजता अथरुणावरून हुसकून जे कामाला जुंपण्यात येई ते किती तास ? तर दुसऱ्या रात्रीच्या दहाअकरा वाजेपर्यंत म्हणजे जवळजवळ वीस तास ! याच सुमारास म्हणजे १८६३ साली बालकामगार चौकशी समिती नेमली गेली त्या समितीने वुड नावाच्या

एका आठव्या वर्षीच कामास जुपलेल्या पोराची हकीगत दिली आहे ते पोर् सकाळी सहा वाजता कामास सुरवात करी ते रात्री नऊ वाजेपर्यंत म्हणजे पधरा तास ! आणि काम कसले ? तर लोखडाच्या भट्टीतले ! ( मार्क्सने कॅपिटल ग्रथाच्या १० व्या प्रकरणात अशी अनेक उदाहरणे दिली आहेत )

## अतिरिक्त मूल्य

मार्क्सचे नाव ज्या सिद्धातप्रस्थापनेकरिता प्रामुख्याने गाजलेले आहे त्या अतिरिक्त मूल्याच्या सिद्धाताचे दर्शन घेऊन मार्क्सचा निरोप घेऊया या सिद्धाताचे सूत्रमय वर्णन असे करता येईल की कामकऱ्याकडून काम चोपून घेत असता नफ्याचे योग्य वाटप मात्र त्याच्या पदरी पडत नाही नफ्यातील जादा वाढावा ( Surplus value ) हा पुजीपतीच्या पुजीत ओतला जातो पुजीपतीने गुतविलेल्या भाडवलावरील व्याज, कारखान्यास येणारी घस भरून काढण्याकरिता राखून ठेवलेली पुजी, भावाच्या चढाओढीत काही वेळा सोसावे लागणाऱ्या नुकसानाची तरतूद व मार्गदर्शक म्हणून मिळणारे वेतन ही खर्चाची सर्व खाती लक्षात घेऊनहि अती जो नफा उरतो तो मालक व कामगार याच्यात समतेने का वाटला जाऊ नये असा मार्क्सचा सवाल आहे सघटित कामात तर हे तत्त्व अवश्य पाळले पाहिजे एकटे दुकटे स्वतत्र कामगार अलग तऱ्हेने जे काम उरकतात त्यापेक्षा सघटित काम करणारे कामगार अधिक काम उरकीत असतात हे गवताच्या प्रचड गजी सामुदायिक पद्धतीने हसतखेळत रचण्यात येत असताना ज्यानी पाहिले आहे त्याना पटवून देण्याची आवश्यकता नाही गवताची एक गज तीस माणसें एका दिवसात उरकत असली तर तीच गज एका माणसास उरकण्यास किती दिवस लागतील असा प्रश्न तुम्ही तुमच्या बालगोपाळाना विचारलात तर ते तीस दिवस लागतील असे ताडकन् ठासून उत्तर देऊन मोकळे होतील पण गज रचणाऱ्या बाप्याला विचाराल तर तो डोके चोळून विचार करू लागेल त्याने एकट्याने हे काम रेटावयाचे तर त्याला तीस दिवस मुळीच पुरे पडणार नाहीत. कारण सामुदायिक कामात जो उत्साह असतो तो या एकलकोंड्या कामात कोठून येणार ? याचा अर्थ एक माणूस तीस दिवसात जे काम उरकतो त्यापेक्षा तीस माणसे एका दिवसात सघटित

पद्धतीने अधिक काम उरकतात असाच होय सघटित कामातहि चुकारतट्टू असतात त्याना तूर्त बाजूला सारूया पण कामगाराचे वेतन एकदा ठरले म्हणजे ठराविक कामगाराची सख्या शभराची दोनशेवर गेली व उत्पादनात वाढ दुपटीपेक्षा अधिक झाली तरीहि कामकऱ्याचे वेतन वाढीस लागत नाही उलट उत्पन्नातील वाढ ही मात्र भाडवलदाराची जादा मिळकत होऊन बसते अर्थात ही लूट होय येवढ्यापुरती मार्क्सची विचारसरणी योग्य वाटेने जात आहे पण एखाद्या धद्यात लक्षावधीचे भाडवल गुतवीत असता त्या धद्यातील नफातोटचाचा अदाज घेण्यात भाडवलदाराची जी विशाल बुद्धि खर्ची घातली जात असते अथवा तो धदा यशस्वी करण्यात स्वार्थी बुद्धीने का होईना पण त्याची जी मति काही ठराविक तास नव्हे तर दिवसरात्र गुगलेली असते त्याचे आर्थिक मूल्य ठराविक कसावर घासून ठरविणे योग्य होईल का ? मार्क्सने याकडे लक्ष दिलेले नाही धनाचा हव्यास घेणाऱ्या अशा धनपतीपैकी काही तर धद्याच्या वावटळीत आबादानी व अब्रू या दोन्हीवर वज्राघात झालेला पाहून आगठीतील रत्न चावून प्राण देण्यासहि मागे पहात नाहीत उत्पादन व वाटप यावर नियत्रण नसते तोवर स्वार्थी चढा–ओढीत तेजीमदीच्या प्रचड लाटा सपत्तीच्या रत्नाकरावर उसळल्याशिवाय रहात नाहीत

'जैसे थे' 'जैसे थे' म्हणणारे विचारवत अशा प्रसगी समजूत काढतात ती ही की त्या तेजीमदीच्या वादळी लाटा मधून मधून उसळत असल्या तरी मूलभूत धनसागर हा शातच असतो पण तो शात होण्यापूर्वी आपल्या तुफानी लाटानी ज्या होड्या गलबताना ठार बुडवून टाकतो त्याचे काय ? यावर 'जैसे थे' विचारवत शातपणे उत्तर देतो की ' हे असे चालायचेच सृष्टीचाच हा नियम आपण तरी काय करणार ?' सृष्टीचे नियम आपणाला बदलता येत नाहीत पण वादळ सुरू झाल्याची निशाणी फडकताच आपले तारू प्रवाहात न सोडणे हाती असते ना? मग तो मार्ग लक्ष्मीपती का स्वीकारीत नाही? तर या सागरात बुडून राहिलेल्या मोत्याचा त्याना हव्यास सोडता येत नाही म्हणून ! यापेक्षा एकदर आपल्या राष्ट्राच्या गरजा कोणत्या आहेत यावर दृष्टि रोखून त्यावरच आपली शक्ति राष्ट्राने खर्च करणे इष्ट नव्हे का ? आणि असे करण्यात

सृष्टिनियमाना आपण धाब्यावर बसवितो असे मानणेहि मानवी बुद्धिस्वातन्त्र्याचा अपमान केल्यासारखे होईल

पुजीपतीच्या पुढील पिढीला विनासायास सपत्ति मिळते हे सोडले तर पुजीपति स्वत ला बौद्धिक कष्टाला वाहून घेत असतो हे खोटे नाही आता या बौद्धिक श्रमाचे व प्रचड तूट आल्यासहि सोसण्याच्या बौद्धिक धैर्याचे हे वजन कामकऱ्याच्या शक्तीच्या कोणत्या मापाने तुम्ही मोजणार ? कुशल कारागीर हा मद कारागिरापेक्षा अनेक पट काम उरकतो येवढेच काय ते, असे मार्क्स म्हणतो तेही याम्ुळेच उथळ ठरते शभर वाल्या कोळी एका वाल्मिकीचे स्थान लुबाडून घेऊ शकतील का ? तर मग पुजीपतीची सपत्ति राष्ट्रीय मालकीची करण्याचे जे ध्येय माडण्यात येते त्याला आधार कोणता ? तर आधार हा की धनाधीशाच्या मजूषेत अनेक रत्ने चमकत असली तरी केवळ त्या रत्नानी कारखाना चालत नाही,तर बुद्धिजीवि व श्रमजीवि याच्या सहकारी कष्टाच्या हातभाराने चालत असतो उद्या अफाट जनतेने असहकारिता पुकारली तर रत्नागारात लोळणाऱ्या धनाधीशाला प्रचड सपत्ति उराशी असूनहि दुष्काळात गाजलेल्या विश्वामित्राप्रमाणे कुत्र्याचे हाड चोखाळावे लागेल व तेहि न मिळाल्यास रत्ने चाऊन खाऊन मृत्यूच्या दरीत उडी घ्यावी लागेल

हे भयानक चित्र कल्पनेतील आहे प्रत्यक्षातील नाही हे खरेच कारण यात पुजीपतीला वठणीवर आणण्याकरिता अफाट जनता सघटित होईल ही कल्पना गृहीत धरली आहे पण अफाट जनता ही एकसघ नाही तिचे अनेक भाग हे सपत्तिसोपानाच्या अनेक खालवरच्या पायऱ्यावर उभे असून वरच्या पायरीवरच्या पुजीपतीचा स्वार्थ जसा मार्ग रोखून उभा असतो तसेच खालच्या अनेक पायऱ्यावरील स्वार्थहि ताठ उभे असतात हे मधले स्वार्थ तात्रिक ज्ञानाच्या तटबदीमागे सरक्षण घेण्याचा प्रयत्न केल्याशिवाय राहणार नाहीत म्हणूनच मार्क्सच्या कल्पनेपेक्षा अधिक काळ साम्यवादाला ताटकळत काढावा लागला पण तो काळ द्वितीय महायुद्धानतर झपाट्याने पाउले टाकीत चाललेला असल्याने अफाट चीन व अर्धे युरोपखड हे आजच बिनीवरील रशियाच्या मागोमाग चालले आहे ते का ? तर समाजात अनेक थर असले तरी बहुजनसमाज हा सपत्तिवानाच्या वरवट्याखालीं चिरडला जात असतो म्हणून ! आशिया—आफ्रिकेतून लूट मिळत होती तोवर युरोपातील सत्ता-

धीशाना काबाडकष्टयाच्यापुढे चार दाणे फेकता येत होते पण ही लूट जशी घटत जाईल तसे युरोपमधील जीवनाला निराळे वळण लागल्याशिवाय राहणार नाही ते पुढील काल ठरवील

आपणास मार्क्सच्या अतिरिक्त मूल्याच्या तत्त्वावर भर न देता समान हक्कावर भर द्यावयाचा आहे म्हणूनच 'दया धर्म का मूल है' अथवा 'वैष्णवजन तो तेने कहिये जे पीड पराइ जाणे रे' अशी आळवणी करीत न बसता कारखान्याच्या कमाईवर आपला सर्वांचा हक्क आहे असे जे मार्क्सने जनतेपुढे ठासून माडले त्यावर भर द्यावयाचा आहे त्यावरच मार्क्सची थोरवी ताठ उभी आहे कामगारात सघटना नव्हती तोवर दयाधर्मावर जोर देण्या-व्यतिरिक्त अन्य मार्ग नव्हता आता कामगार सघटित झाले असल्याने देव भावाचा भुकेला म्हणत लक्ष्मीपतीची विनती करीत न बसता राष्ट्राच्या सपत्तीवर आमचा हक्क आहे असे ठासून आत्मप्रयत्नाने सागण्याचा काल आला आहे हे मार्क्सने जनमनावर बिबविले हीच त्याची थोर कामगिरी

'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे' असे लोकमान्य टिळकानी पुकारताच अफाट जनता राष्ट्रीय भावनेने थरारून गेलीच ना ? मग राष्ट्रीय सपत्तीवर माझा जन्मसिद्ध हक्क आहे असे कडाडून सागणाऱ्या मार्क्सच्या उद्गाराने अनेक राष्ट्रातील दलित प्रजा थरारून गेली असल्यास नवल कोणते ? म्हणूनच मार्क्सच्या विचारसरणीतील अनेक खाचखळगे व अपूर्णता वर दर्शविल्या तरी साम्यवादी मार्गानेच आपण उच्च चढू ही त्याची विचार-सरणी अभग अशीच उभी आहे, हे स्पष्टपणे पुकारले पाहिजे आपल्या भारतीय परपरेतील एक दाखला दिला म्हणजे हा मुद्दा स्पष्ट होईल प्रस्थान-त्रयीतील ब्रह्मसूत्रे ही आपल्या द्वितीय अध्यायातील प्रथम पादात साख्य व योग या दर्शनकाराची मते खोडून काढतात, पण त्याच प्रस्थानत्रयीतील भग-वद्गीता ही 'सिद्धाना कपिलो मुनि' असा साख्याचा गौरव करते याचा अर्थ हाच की सर्वच बाबतीत विचाराची एकजूट नसली तरी आपआपल्या क्षेत्रात दर्शनकारानी जी पर्वतशिखरे गाठली आहेत ती तत्त्वज्ञानदर्शनात्मकरीत्या उच्च उभी राहतील अशीच भक्कम बाधलेली आहेत त्याच न्यायाने मार्क्सचे आधुनिक काळातील द्रष्टा या नात्याचे स्थान अढळ आहे

## एंजल्सची भर

मागे उल्लेखिल्याप्रमाणे घडाडीने उच्च शिखरावर उडी मारणाऱ्या मार्क्स-च्या विचारमाडणीतही काही दोष राहून गेले असल्याची जाणीव त्याचा स्नेही एजल्स यालाहि होती ते दोष शक्य तितक्या लवकर झाडून टाकावे या इच्छेने तो 'वेतन, काम व भाडवल' या मार्क्सच्या ग्रथाच्या पुढील आवृत्तीच्या प्रस्तावनेत लिहितो त्याचा उल्लेख करून मार्क्सचा निरोप घेऊ तो लिहितो की," या ग्रथात काही चुकीची विधाने दुर्दैवाने राहून गेली आहेत त्यास्तव ती दुरुस्त करणे माझे कर्तव्य होय पूर्वीच्या आवृत्तीत काम करणारा आपले काम धन्याला विकत देतो असा उल्लेख आहे त्याऐवजी आता कामाला लागणारी शक्तीच तो विकत देतो अशी दुरुस्ती केली आहे " त्याच्या म्हणण्याचा आशय असा दिसतो की काम हे ठराविक कालमापाने मोजण्यासारखे असले तरी कामकऱ्याची शक्ति ही काल मापाने मोजण्याच्या पलीकडची असते तल्लख काम करणारा असेल तर त्याच कालात इतरापेक्षा अधिक शक्ति तो कामास जुपवील आणि काम सामुदायिक असेल तर विस्कळित व्यक्तिगत शक्तीपेक्षा अधिक शक्ति ओतली जाईल आणि ही जी अधिक शक्ति ओतली जाते त्यातून निर्माण झालेली सपत्ति ही कामकऱ्याच्या पदरात न टाकता मालक आपल्या थैलीत टाकतो कामकरी ही थैली कसली म्हणून विचारील तर ती थैली हाताने कुरवाळीत मालक हा कामकऱ्याकडे हसत पाहत राहील व म्हणेल बारा तासाच्या कामाला तुम्हाला तीन रुपये द्यावयाचा करार झाला होता ना ? मग आता त्या मालाची किमत बाजारात सहा रुपये झाली तर उरलेले तीन रुपये सर्वस्वी माझे होत हे वाटल्यास आण घेऊन मी आपणास सागतो * यामुळे मालाला दोन तऱ्हेची किमत तयार होते एक कामकरी व मालक याच्या कामातून निर्माण झालेली व दुसती सघटित कामामुळे व्यक्तिगत कामापेक्षा अधिक उत्पादनाने त्या मालावर चढलेली अशा रीतीने कामकऱ्याच्या शक्तीतूनच निर्मित मालाचे सर्व मूल्य निर्माण होत असते.

---

* The Capitalist swears that value of twelve hours is only three marks; and if I demand six he laughs at me !

The working class alone produces all values ! मूळ ग्रथात मार्क्स असेच उद्गार काढतो की, For the surplus value the Capitalist pays no equivalent ! मार्क्स व एजल्स यानी केलेला खुलासा हा असा आहे मालकाच्या श्रमात त्याच्या बौद्धिक शक्तीचे, धडाडीचे, धोक्यास तोड देण्याचे श्रम त्यानी लक्षात घेतलेले नाहीत पुजीपतीच्या हाती असलेल्या पुजीत पूर्वजाच्या निढळाच्या घामातून निर्माण झालेली जी सपत्ति असते तिच्या जोरावरही तो कामकऱ्याकडून अधिक उत्पादन करून घेऊ शकतो ह्याकडे त्यानी लक्ष वेधले आहे ते रास्त असेच आहे

मागच्या पिढीने मिळविलेले धन पुढील पिढी ऐतखाऊपणाने खात असली तरी त्या धनात निदान मागील पिढीचे श्रम तरी खर्ची पडलेले असतात पण अशी मागील पिढीची शक्ति पाठीशी उभी नसताहि काही वेळा किंमती जेव्हा अचानकपणे वाढतात त्यावेळचा नफा हा सर्वस्वी अनार्जित असा असतो उदाहरणार्थ, तुमच्या घरावरून एखादा नवीन रस्ता बाधला गेला असता तुमच्यावर थोडाफार कर जरी बसविला तरी घरभाडे जे अवाच्यासवा वाढते ती सर्वस्वी तुमची फुकट मिळकत होईल म्हणूनच सामुदायिक सुखाच्या दृष्टीने नियत्रित योजना आखणे हे सरकारचे कर्तव्य ठरते ही योजना आखताना व्यक्तीच्या कामसूपणापेक्षा व्यक्तीच्या गरजा पुरविण्यावर जसजसा भर दिला जाईल तसतसा 'सर्वे न सुखिन सतु' या मार्गाने मोठा पल्ला गाठला असे म्हणता येईल आपल्या प्राचीन ऋषिवर्यांप्रमाणे मार्क्सनें हेच जनसमुदायाच्या सुखाचे ध्येय समाजापुढे माडले म्हणूनच आधुनिक काळातील दर्शनकार या नात्याने त्याच्याकडे पाहिले जाते

पण नुसते आश्चर्यवत् पश्यति या दृष्टीने मार्क्सकडे व त्याचे ध्येय व्यवहारात उतरविणाऱ्या लेनिन, स्टालिन्, माव त्से तुग याच्याकडे पहात न बसता आपण आपल्या परिस्थितीला जु तील असे त्याच्यासारखे प्रयोग करण्यास कबर कसली पाहिजे या मार्गाने आपल्या नेत्यानी गेल्या पाच वर्षांत कोणती पाउले टाकली आहेत व कोणता मार्ग यापुढे त्यानी आक्रमिला तर समतेच्या प्रागणातील खुल्या वातावरणाच्या मोकळ्या हवेचा आनद आपणास मिळेल याकडे आता पुढील शेवटच्या प्रकरणात वळूया.

## प्रकरण चौदावें

# ॥ राजा कालस्य कारणम् ॥

आपल्या भारताची सस्कृति मानवी सस्कृतीच्या विकासावस्थेत कोणत्या दिशेने पाउले टाकीत चालली आहे हे पाच वर्षांपूर्वी स्वातत्र्यात पदार्पण कर-ताच तिने परपरागत नृपशाहीला निरोप देऊन व लोकशाहीला सिहासनारूढ करून स्पष्ट केले आहे 'राजा कालस्य कारणम्' या न्यायाने सस्कृतीला ज्या मार्गाने पाउले टाकीत जावयाचे असेल त्या मार्गावर दृष्टि रोखून जाणारी शासनसस्था निर्माण करणे हे त्या सस्कृतीचे आद्य कर्तव्य "नैव राज्य न राजाऽसीत्" या अगदी प्राथमिक अराजक अवस्थेतून आपली सस्कृति वैराज्य, गणराज्य, नृपराज्य, साम्राज्य या सोपानावरून चढत लोक-राज्याच्या पायरीवर आज येऊन उभी आहे आणि साम्यवादाच्या वाटेवर नजर टाकण्यास तिने सुरवातही केली आहे

**राष्ट्राची संस्कृति म्हणजे त्या राष्ट्राचे विचार व आचार** विचार व आचार हे परस्पराशी सलग्न असून प्रगतीच्या मार्गावर या दोहोनी हातात हात घालून चालले तरच सस्कृतीची पाउले पुढे पडतात राष्ट्रापुढे ध्येय माडणे हे विचाराचे क्षेत्र व ते ध्येय व्यवहारात उतरेल अशी शासनसस्था उभारणे हे आचाराचे कर्तव्य

साम्यवादाची विचारसरणी आपणास नवीन नाही ती वेदाइतकी प्राचीन आहे पण ती विचारसरणी आचारात व व्यवहारात उतरविणारी शक्ति ज्या शासनसस्थेच्या हाती असते त्या सस्थेने ती विचारसरणी उचलून धरून ती व्यवहारात उतरून दाखविली तरच ती फल धरू शकते म्हणूनच ध्येयवादी समाजधारणाची वैचारिक कल्पना स्वप्नमय न ठरता प्रत्यक्ष व्यवहारात उतरवावयाची असल्यास शासनसत्ता हस्तगत करणे हे आद्य कर्तव्य होय राजा बलिष्ठ असेल व प्रजा विस्कळित असेल तर राजा जनतेला लुबाडून घेत असता 'आले देवाजीच्या मना' म्हणत कपाळावर हात मारीत बसण्यापलीकडे हतबुद्ध जनतेला दुसरा मार्गच नसतो. प्रजेच्या प्रारब्धाने तिला सुष्टदुष्ट राजा

मिळतो असे उद्गार राजतरंगिणीकार काढतो ते या हतबुद्धतेनेच पण यंत्रावर चालणाऱ्या [illegible] परिसरात अथवा एकाच जहागिरदाराच्या प्रचंड कृषिक्षेत्रात मोठ्या संख्येने कामकरी-शेतकरीवर्ग एकत्रित होऊ लागला म्हणजे समुदायात उत्पन्न होणाऱ्या शक्तीची जाणीव त्याच्यात उदय पावू लागते आणि एकमेका सहाय करू । अवघे धरू सुपथ ।। ही भावना मूळ धरू लागते तसेच विद्यासंपन्न पुढाऱ्यांनी विज्ञानविद्येचा अद्ययावत् अभ्यास करून जनतेचे पुढारी-पण स्वीकारले तर विचारशक्ति बलवती होत जाते अर्थात् साम्यवादाच्या दिशेने उद्याच्या संस्कृतीने पाउले टाकीत जाण्यास ,बहुजनहिताचा ध्यास घेणाऱ्याच्या हाती सत्ता पाहिजे, स्वप्नमय ध्येयवादी चित्रे रंगविणाऱ्यापेक्षा व्यावहारिक बुद्धिगम्य ध्येये मांडणाऱ्या विद्वानांच्या हाती शिक्षण पाहिजे, आणि विज्ञानाच्या वृद्धीने व्यावहारिक जीवन सुखमय करण्याची ईर्षा असणाऱ्या शास्त्रज्ञाच्या हाती शास्त्रसंशोधनसाधने पाहिजेत हा त्रिवेणी संगम घडून आल्यास मानवी जीवितगंगेला तिच्यातील कष्टमय जीवितांचा कृष्णवर्ण लोपत जाऊन सुखमय जीविताचा शुभ्रवर्ण येऊ लागेल

## प्रजासत्ताक भारत

[illegible]ने स्वराज्याचे दानोदक भारताच्या हातावर सोडण्यात जें औदार्य दाखविले ते जगाच्या इतिहासात नमूद होण्यासारखेच आहे पण नृपनीतीला वारांगनेप्रमाणे अनेकरूपाने मिरविण्याची खोड असल्याने भार-ताला एका हाताने स्वातंत्र्य अर्पण करीत असता दुसऱ्या हाताने भारतवर्षाचे [illegible] दोन हात तोडून व [illegible] अनेक संस्थानांना मोकाट सोडून बजबजपुरी माजवून सोडण्याचा डाव टाकण्यास राजनीति-वारांगनेने मागे पाहिले नाही

अशा परिस्थितीत सरदार पटेल यांसारखा श्रेष्ठ चारित्र्यवान् पुढारी कण-खरपणे उभा राहिला आणि अवघ्या एका वर्षाच्या अवधीत मोकाट सुटू पाहणाऱ्या संस्थानिकांना नाक घाशीत आपली संस्थाने भारतात विलीन करण्यास संमति देण्यास त्याने भाग पाडले हे सुदैव [illegible] धडाडीने जो प्रश्न त्यांनी सोडविला तो म्हणजे निजामशाही हैद्राबाद संस्थानाच्या [illegible] स्वतंत्र इस्लामी हैद्राबाद हा भारताच्या पोटात इंग्रजांनी

जाताजाता मारून ठेवलेला खजीर होता. तो काढण्याच्या कामी सामदामाचे सौम्य उपाय हाताळून ते दुर्बल ठरले अशी मनाची खात्री पटताच हैद्राबाद सस्थानाला अचानक पण धडाडीने सर्व बाजूनी वेढा घालून आणि सर्व जग चकित होऊन उलट बाजूने हाकाटी सुरू करण्यापूर्वी अवघ्या चारपाच दिवसात निजामाला आपल्या पायावर लोटागण घालावयास लावून स्वतत्र भारताच्या इतिहासफलकावर सरदार पटेलानी आपले नाव कायमचे कोरून ठेवले

हैद्राबाद अद्यापि पूर्ण विलीन झाले नसले तरी त्याच्या हाती लष्करी सत्ता ठेवलेली नाही ही महत्त्वाची बाब होय हैद्राबादेतील जमीनदाराच्या घरी अनेक गरीब गुलामगिरीत गुरफटलेले होते त्याची मुक्तता करण्यात आली हाहि उल्लेखनीय विशेष होय. भारतातील सर्वच गुलामगिरीचे उच्चाटन झाले आहे असे नाही बारडोलीच्या टापूत 'हाली' नावाने ओळखले जाणारे लोक अर्धवट गुलाम आहेत याची सख्या थोडी नसून लाखाच्या वर जाणारी आहे हैद्राबादसारखे धडाडीचे धोरण काश्मीरच्या बाबतीत योग्य काली स्वीकारण्यात आले असते तर आज चारपाच वर्षे रेगाळत पडलेला काश्मीरचा पाकिस्तानने पादाक्रात केलेला भाग परत भारतात विलीन होण्याचा प्रश्न तडाख्याने सुटला असता पश्चिमोत्तरेकडील काश्मीरप्रमाणे पूर्वोत्तरेकडील नाग लोकानाहि स्वातत्र्याची मागणी करण्याची चिथावणी देण्यात येत असावी. त्या बाबतीत वेळेवर कणखर धोरण स्वीकारले जाईल अशी आपण आशा करूया.

काही बाबतीत प्रगति चालू आहे तार व टपालखाते ही सरकारी मालकी-ची पूर्वीपासून होतीच. त्यात जनतेच्या वाहतुकीची मुख्य साधने जी आगगाडी व मोटारी त्याचेहि राष्ट्रीयीकरण करण्यात आणि अन्नवस्त्रा-सारख्या प्रमुख गरजू वस्तूच्या भावावर नियत्रण घालण्यात स्वतत्र भारताने पुढे पाउल टाकले आहे

याहीपेक्षा अधिक उल्लेखनीय प्रगति म्हणजे जमीनदाराच्या जमिनी मोठ्या सख्येने व काही ठराविक दराने विकत घेऊन टाकणे ही होय. तेल-गणात कम्युनिस्टानी त्या सक्तीने हिसकावून घेतल्या तेव्हा त्याचा प्रतिकार करण्याकरिता भारत सरकारने पाच कोटी रुपये खर्चून लष्कर धाडले व कम्यु-निस्टाचा उठाव मोडून काढला. आता जमीनदाराना त्या जमीनीची किंमत

सरकार देण्याचा विचार करीत आहे आणि कम्युनिस्ट स्थानबद्धांपैकी बहु-सख्येला बंधमुक्त करण्यात आले आहे जमीनदारीच्या बाबतीत विशेष उल्लेखनीय प्रयोग नुकताच २ जुलै १९५२ रोजी मोठ्या धिटाईने आणि थाटाने करण्यात आला तो प्रयोग म्हणजे त्या शुभप्रसगी उत्तर प्रदेशातील लाखो जमीनदाराची जमीन सरकारने आपल्या ताब्यात घेतली हा होय या आनदोत्सव प्रसगी कैद्याना मिष्टान्न अर्पण करण्यात आले आणि मुलाबाळाना खाऊ वाटण्यात आला भारत सरकार जमीनदाराना काही मोबदला देणार आहे पण काश्मिरात शेख अबदुल्लानी जमीनदाराना पैचाहि मोबदला न देता जमिनी शेतकऱ्याना वाटून टाकल्या हे नमूद केले पाहिजे.

शेतकरी अडाणी आणि आळशी तेव्हा त्याच्याकडून पैसे उपटण्याच्या अनेक क्लृप्त्या जमीनदार सावकार लढवीत असत दहा रुपयाचे कर्ज महिन्याला रुपयाप्रमाणे वर्षाअखेर बारा रुपयाने फेडावयाचे म्हणजे शेकडा २० टक्के व्याज पडे ते मान्य ठरलेले होते पण या व्यतिरिक्त १० रुपयाच्या कर्जापैकी मुनीम, शिपाई, लेखक याची हातमिळवणी व धर्मदाय असे मिळून आठ आणे कापण्यात येत आणि दलाल स्वत च दलाली म्हणून आठ आणे उपटी ते निराळेच शिवाय सावकारालाहि नजराणा द्यावा लागे सावकार आपली थैली उघडे तेव्हा या उघडण्याच्या पुण्याबद्दल म्हणजे ‘ गाठखुलई ’ बद्दल कर्जातून रुपयाला एक आणा सावकार कापून घेई हा पुण्याचा पैसा देवळात न जाता सावकाराच्या पेढीतच रेगाळत असतो कर्ज देताना गहाण म्हणून सोन्याचे किरकोळ दागिने सावकारापाशी ठेवण्यास देत त्या दागिन्यापेक्षा कर्जाची रक्कम नेहमीच कमी असावयाची कर्जाची फेड झाली नाही की हे सर्व अधिक किंमतीचे दागिने सावकाराच्या खात्यात जमा होत. खेड्यातून गरिबाला फुकटात वेठीलाहि जुपण्यात येते ग ग ग ा रा ा मुनीम कर्जवसुलीस आला म्हणजे कित्येक वेळा वसुली, कागदावर नोद न करिता स्वत च्या खिशातच ढकलतो सावकार खोटा हिशेब दाखवितात तो निरा-ळाच. अशा अनेक रीतीने अज्ञानी जनता लुबाडली जात असते तो प्रकार आता बद होईल

## भूदान सुटे गिरान !

या सरकारी प्रयत्नाच्या जोडीला स्वयस्फूर्तीने पुढाकार घेऊन विनोबा भावे यानी तेलगणापासून दिल्लीपर्यंत पायी प्रवास करून जनतेला भूदान यज्ञाची जी स्फूर्ति दिली ती उल्लेखनीय अशीच आहे. तैलगणात कम्यु-निस्टानी जमीनदाराच्या जमिनी सक्तीने काढून घेतल्या होत्या पण त्याच तैलगणात भूदानयज्ञाची थाळी फिरवीत खेडोपाडी आपण निर्धा-स्तपणे हिडत होतो व शेतकऱ्याच्या घरी भजनाचा टाळ-मृदग पूर्ववत् वाजत होता असे विनोबानीच लखनौ येथील आपल्या भाषणात मोकळेपणाने सागितले याच तैलगण प्रदेशात श्री. रामचद्र रेड्डी या सद्गृहस्थाने शभर एकर जमीन दान देऊन विनोबाच्या भूदानयज्ञाच्या सफलतेची मुहूर्तमेढ रोवली विनोबाच्या भूदानयज्ञाने बगलोर येथील सय्यद हुसेन हे इस्लामी जमीनदारहि आकर्षिले गेले व त्यानी राष्ट्रपती राजेद्रप्रसाद याच्या वाढ-दिवशी सहाशे एकर कोरडवाहू व चारशे एकर ओली अशी एक सहस्र एकर भूमि भूदानयज्ञाला अर्पण केली तसेच माधवनाडा गावी १२ हजार एकर जमीन दान मिळाली. अशा रीतीने गेल्या अवघ्या सहा महिन्यात विनोबाना थोडी नव्हे तर दोन लाख दहा हजार एकर जमीन भूदान म्हणून जनसेवेला अर्पण करता आली ही उत्साहकारक परिस्थिति होय विनोबाच्या मार्गाने पावले टाकणाऱ्या सेवासघाने तर पुढील दोन वर्षांत पचवीस लाख एकर जमीन दान म्हणून मिळवून जनसेवेला वाहण्याचा सकल्प सोडला आहे ! रशियात कुलाकाच्या जमिनी जप्त करण्यात आल्या त्या जमीनदाराची ससेहोलपट करून व प्रचड सख्येला सैबेरियातील वाळवटात हाकून देऊन. अशा प्रकारचा विराट प्रयोग हा जगाच्या इतिहासात रशियात प्रथमच उरकण्यात आला त्या प्रसगी ज्या अघोर उपायाचा वापर करण्यात आला त्यापासून योग्य तो बोध घेऊन साम्यवादाच्या वाटेने जाणाऱ्या चीन व युरोपातील काही राष्ट्रे यानी जमिनीचे राष्ट्रीयीकरण हे एकदम तडाख्याने न करता पायरीपायरीने करीत जाण्याचे प्रयोग सुरू केले आहेत चीनमधून नुकतेच जाऊन परत आलेले डॉ अमरनाथ झा यानी सागितले की, चीनमध्ये

सर्वस्वी कम्युनिस्ट अमल आहे ही कल्पना खरी नसून तेथे भिन्न पक्षाचे मिळून संयुक्त मंत्रिमंडळ आहे.

याच प्रकारचा एक सात्त्विक प्रयोग आचार्य विनोबा भावे करीत असलेले आपण पाहत आहोत. या सात्त्विक प्रयोगाला कल्पनेप्रमाणे यश येत गेल्यास तामसी वृत्तीने जमिनी हिसकावून घ्याव्यात असा दावा कोण जनता-सेवक मांडील ? मागे पृष्ठ २०२ वर स्टालिन-वेल्स यांचा संवाद संक्षिप्त रूपाने दिला आहे त्यातहि बंड उभारण्याशिवाय शांततेने क्रांति होत असेल तर ती कोणालाहि मान्यच होईल, असेच उद्गार स्टालिननें काढले आहेत. " भांडवलदार आपखुषीने माघार घेतील तर क्रांतिकारक तरी कशाला त्यांच्या वाटेला जातील ? सत्ताधीश सुखाने सत्ता सोडत असेल तर त्याचे स्वागतच करण्यात येईल ! " ही स्टालिनची वाणी होय अर्थात् भूदान यज्ञाच्या विनोबांच्या प्रयत्नाला यशाचा फुलोरा येत जाईल तर जगाला थक्क करणारा एक आदर्श प्रयोग भारताने यशस्वी केल्याचे श्रेय त्याला मिळेल! नरमेध व अश्वमेध या हत्यामूल यज्ञरूढीला भागवत धर्माने दानयज्ञ, तपोयज्ञ यासारखे उज्ज्वल रूप दिले त्याच मार्गाने परभणी येथें संत पांचलेगांवकरांनी कृषिसेवायज्ञास प्रारंभ करून नवयुगाला धरून यज्ञ-संस्थेला नवीन वळण देण्याचा प्रयोग सुरू केला आहे, तोहि उल्लेखनीय होय.

## तिजोरींत लोळणारी संपत्ति

मात्र अखिल भूक्षेत्र राष्ट्रीय मालकीचे केले म्हणजे सर्वच प्रश्न सुटतील असे नव्हे सेफ डिपॉझिटमध्ये ठेवलेली जी धनाची गुरुकिल्ली, हिरे, माणके आणि बँकांतून व कारखान्यांत ओतलेली अफाट संपत्ति ही राष्ट्राच्या मालकीची केल्याशिवाय सामुदायिक संपत्तीचा प्रश्न समाधानकारक पद्धतीने सुटला असे कोण म्हणणार ? हैद्राबाद निजामाच्या कोठारांत केवढी प्रचंड संपत्ति दडपून ठेवलेली होती हे आता बाहेर येऊं लागले आहे. आज ना उद्या आपणाला आपली दिखाऊ पदवीहि सोडावी लागेल, हें निजामसाहेब ओळखून आहेत म्हणून त्यांनी एक विश्वस्तनिधि निर्माण केला असून नुकतीच त्यास भारतसरकारची मान्यताहि मिळविली आहे. या

विश्वस्तनिधीच्या खजिन्यात जी प्रचड सपत्ति ओतली आहे ती पाहून तुम्ही थक्कच व्हाल ज्येष्ठ राजपुत्राला एक कोटी ब्यायशी लक्ष, द्वितीय राजपुत्र याना एक कोटी ब्यायशी लक्ष, आणि युवराज्ञीला दोन कोटी बारा लक्ष ! अशा रीतीने एकूण सोळा कोटी विश्वस्तनिधीवर भारतसरकारने समतीचा शिक्का मारला आहे. त्याशिवाय जडजवाहीर जे परराष्ट्रात आधीच पाठविण्यांत आले आहे ते निराळेंच. अशा रीतीनें कोटयावधि रुपये एका कुटुबाच्या आणि तेहि पूर्वीसारख्या लढाऊ वृत्तीच्या नव्हे, तर ऐतखाऊ कुटुबाच्या तिजोरीत लोळत पडावे, यापेक्षा आजच्या समाजरचनेचे अधिक विक्षिप्त चित्र ते कोणते असणार ?

हा प्रकार आपल्याच देशात चालतो असे मात्र नव्हे हे नमूद केले पाहिजे हैद्राबादच्या नबाबाच्या कोटयावधि धनसपत्तीचे वर्णन आज आपण एकीकडे वाचीत आहोत तोच दुसरीकडे इजिप्तमधून राज्य सोडून बाहेर पळून गेलेल्या पदच्युत फरुक राजाचा थाटमाट जो वाचावयास मिळतो तोहि असाच डोळं चोळावयास लावणारा एका युरोपियन गिरणीमध्ये त्याचे दशलक्षाचे शेअर्स पडून राहिलेले आढळले सध्या हे राजेसाहेब इटलीच्या काप्री बेटावर असून ज्या हॉटेलात आपल्या परिवारासह ते ऐषआरामात राहतात त्या हॉटेलवाल्याला किती चदी चारीत असतील ? महिन्याकाठी चार-दोन हजार रुपये ? छे त्याचा रोजचा मुशाहिराच दोन हजाराचा आहे ! म्हणजे महिन्याकाठी नुसत्या राहण्याजेवण्यावर तो साठ हजार रुपये फेकून देत असतो असल्या उधळपट्टीकडे डोळे झाकून ‘ ठेविले अनते तैसेचि रहावे ’ असे म्हणत कपाळावर हात मारून ‘ आधि मन मुडा बा मन मुडा ’ याची जपमाळ ओढीत बसावयाचे असेल त्यानी बसावे कोणतेहि जागृत राष्ट्र असे बसणार नाही नव्या लोकशाही इजिप्त सरकारने शेती सामुदायिक मालकीची करण्यास हात घातला आहे हे ोग्य दिशेने टाकलेले पाऊल होय पुजीपतीच्या कोठारात कुबेराला लाजवील अशी सपत्ति लोळत असावी आणि पजाभर धान्य मिळत नाही म्हणून खेडुताने आपले पोट दामटून टाकावे हा मानवतेला कलक नव्हे का ? सस्थानिकाची सस्थाने व जमीनदाराच्या जमिनी त्याच्या हातून काढून घेऊन राष्ट्रीय मालकीच्या

करण्यात जी धिटाई आपल्या नेत्यानी दाखविली त्याच धिटाईने ते खाजगी पेढ्या आणि खाजगी कारखाने राष्ट्रीय मालकीचे करतील तेव्हाच समाजसौख्याच्या दिशेने पाऊल स्पष्टपणे पुढें पडले असे म्हणता येईल

## भूमिगत लक्ष्मी

आपल्या राष्ट्राने यासबधी तूर्त नवीन धोरण स्वीकारले आहे ते म्हणजे प्राप्तीकर दडपून ठेवणाऱ्या धनिकाची भूमिगत सपत्ति उजेडात आणण्याची मोहीम सुरू करणे हे होय. हा प्रयोग सुरू होताच किती कोटी सपत्ती दडवून ठेवलेली उजेडात आली ? थोडीथोडकी नव्हे तर ९४ कोटी, आणि ही प्रत्यक्ष उजेडात आलेली याशिवाय आणखी किती कोटी सपत्ति भूमीत दडून बसली असेल ते भूमातेलाच माहीत ! यासबधी सरकारी चौकशीतून बाहेर आलेल्या माहितीवरून भाडवलदारानी हिशेबाच्या वह्याची पाने फाडली, वाळवीला खाऊ दिली, सरकारी चौकशीसमितीपुढे गैरहजर राहण्याची आडदाडी केली हे उघडकीस आले आहे.धान्योत्पादनाच्या बाबतीत सस्थाने खालसा करण्याइतकीही धिटाई दिसत नाही. कडक भाषा वापरण्यांत पतप्रधान नेहरू कोणालाहि हार जाणार नाहीत पण ते धोरण प्रत्यक्ष अमलात आणण्याची वेळ आली की त्याचा कठोरपणा कोठे वितळून जातो कोणास ठाऊक ? आपला भारत निर्भेळ स्वातत्र्यात पदार्पण करता झाला तो दोन वर्षांपूर्वी (२६ जानेवारी १९५०) मध्ये त्यानतर अवघ्या दोन महिन्यानी पतप्रधानानी एका जाहीर सभेत घोषणा केली की ' काय वाटेल ते होवो, धरणी दुभग होवो अथवा उल्कापाताचा वर्षाव घडो, पण एक वर्षानतर धान्याचा एक कणहि आपण बाहेरून आणणार नाही ! ' पण या बढाईच्या वाफा तोडातून बाहेर पडत असताच हवेत विरळून जात होत्या. दोन वर्षांपूर्वी पुण्यास भरलेल्या शास्त्रविशारदपरिषदेत पडितजीनी वरील घोषणा केली तेव्हा परिषदेच्या अध्यक्षानीच पडिताना दोन कडू वळसे देण्यास मागें पाहिले नाही " सरकारनें आपल्या देशात किती धान्य पिकतें याची अधिकृत माहिती मिळविल्याचे मुळीच आढळत नाही " असे स्पष्ट

उद्‌गार काढण्यास ते कचरले नाहीत आणि का कचरावे ? १९४८–४९ या वर्षांत परदेशातून धान्य आणण्याकरिता आपल्या भारताकडून किती कोटी रुपये वेचण्यात आले ? तर १२० कोटि रुपये ! आणि धान्याचा एक कणहि बाहेरून आणावयाचा नाही ही घोषणा उत्स्फूर्त होऊन दोन वर्षे होऊन गेली तरी क्रोडो रुपयाचे धान्य बाहेरून भारताकडे वाट चालत येतच आहे हाच प्रकार अन्यत्रहि उदाहरणार्थ सिदरी खतकारखान्याची योजना मूळची ११ कोटीची पण आतापर्यंत तिने २३ कोटी खाऊन फस्त केले आहेत ! आणि एवढेंहि करून झेपत नाहीसे पाहिल्यावर सिदरी खत-कारखाना आता खाजगी कपनीच्या हवाली केला आहे ! घोषणा बेजबाब-दारपणे करावयाची आणि त्या व्यवहारात उतरविण्याची जबाबदारी बेफिकीरपणे झिडकारून द्यावयाची हेच जेथें धोरण तेथे त्याना नावे तरी कोणती ठेवणार ?

## भारताचा भोळसटपणा

पण याहीपेक्षा हादरा देणारा प्रसग म्हणजे उधळपट्टी बेफाम थैमान घालीत असता मूक दौर्बल्याने तिच्याकडे पहात राहणे हा होय दामोदर धरणावर खर्च २० कोटी रुपये मजूर झाला असता पुढे ५५ कोटीला मान्यता मिळाली आणि ३३ कोटी खर्च पडून आजतागायत चतुर्थांशहि बाधकाम उरकलेले नाही ! चौथ्या हिश्याच्या धरणावरच तो सर्व ३३ कोटी खर्च कोलमडून पडलेला पाहातोच ना ? परदेशातून जिन्नस मागविताना परकी-'याना आपणास धूर्ततेने लुटण्याची सधि द्यावी हा तर उघड नामर्दपणा होय अधिक धान्य पिकवा' याच्या जाहिरातबाजीवर लाखो रुपये उधळले गेलेच, पण वाढत्या शेतीकरता बिलायतेतून कागदाच्या पिशव्यातून खत धाडण्यात आले तेही भारतात येईपर्यंतच्या प्रवासातच निरुपयोगी झाले ! आणि त्यात ओढवलेले ४० लक्षाचे नुकसान नाक खाजवून भोळसट सरकार पाहात बसले! जो प्रकार खताच्यासबधी घडला त्याचीच पुनरावृत्ति दुधाची भुकटी मागविण्यांत झाली याही व्यवहारात खोट बसली ती २१ लाख रुपयाची ! उलट याच कालांत अमेरिकेतील कॅनडामध्यें खनिज पदार्थांचे

व तेलाचे उत्पादन तिप्पट–चौपटीने वाढले आहे। आणि रशिया व चीन हे तर युद्धकालीन घोर आपत्ति सोसूनहि धान्याचा कणहि बाहेरून मागावा लागत नाही अशी धान्यसपत्ति देशात निर्माण करू शकले आहेत

मलायात किमती उतरून खाकी शर्ट पाच आण्यास विकला जातो असे आपण वर्तमानपत्राच्या एका स्तभात वाचतो तर त्याच अकाच्या दुसऱ्या स्तभात अत्यत आवश्यक पदार्थ जो गहू त्याचा भाव आपल्या भारतात दुपटीने वाढल्याची घोषणा सरकार करीत असल्याचे वाचून थक्क होतो। धान्याचे भाव का वाढविले? तर उपन्न घसरले म्हणून आणि ते का घसरले? तर दारूबदीचे ध्येयवादी धोरण स्वीकारले व त्यामुळे त्यावरील कराचे उपन्न बुडाले म्हणून दारूबदीमुळें घसरलेले उपन्न थोडें नसून दहा-पधरा कोटीचे आहे दारूबदीचे धोरण यशस्वी तर झाले नाहीच पण खेड्यापाड्यातून घरी दारू करण्याचा उपद्व्याप सुरू झाल्यामुळे स्त्रिया आणि मुलेहि दारू पिऊन झिंगू लागली। चोरून तयार केलेली ही दारू रोगदायक पदार्थापासूनहि बनविली जात असून ती लपवून ठेवण्यास सडास व गटाराचाहि उपयोग करण्यात येतो आणि हा व्यापार चालवितात कोण ? तर गुण्ड आणि बदमाष। सरकारने नेमलेल्या समितीनेच हे स्पष्ट म्हटले आहे। असल्या अव्यवहार्य ध्येयवादाचा अट्टाहास करण्याचे धोरण सर्व प्रातानी स्वीकारले नाही हे योग्यच झाले याचा अर्थ दारूबदी हे ध्येय ठेवू नये असा पक्ष मला माडावयाचा नाही हे सामावयास नकोच. पण वर्षानुवर्ष दारूने झिंगणाऱ्या माणसाला उद्या एक थेबभरहि दारू पिऊ नको असे सागितले असता तो ईश्वरी साक्षात्काराच्या आदेशाने दारू सोडील अशा भ्रमात राहणे म्हणजे मनुष्यस्वभावच आपणास उमगला नाही अशी कबुली देण्यासारखे होणार नाही का? दारूवरील कर वाढवीत जाऊन ती क्रमाक्रमाने महाग करीत गेल्यास व ते चालू असता मद्यपानापासून होणाऱ्या अरिष्टाची चित्रपट, व्याख्याने, लेख या साधनानी जनतेत जागृति करीत राहिल्यास दारूबदी यशस्वी होण्यास मदत होईल. मुबई प्राताने स्वीकारलेले हे दारूबदीचे धोरण भारत सरकारने उचलून धरण्याची घाई केली नाही ते एकदरीत रास्तच होय !

शेतकी वाढविण्याच्या बाबतीत तोच प्रकार शेतकीकरता नांगर मार्गविण्यात आले. त्यातहि सरकारला मनगट चावीत बसावे लागले एका खाजगी कंपनीकडे नांगर पुरविण्याची हक्कदारी देण्यात आली, पण त्या कंपनीने पुरविलेले नांगर निरुपयोगी ठरून सरकारला ४३ लाख रुपयाची ठोकर बसली ! यावरून कारभार कसा चालत असेल आणि सर्वोदयाच्या मार्गास पोहोचण्यास आपणास अद्याप किती पल्ला गाठावयाचा आहे याची कल्पना येईल

# प्राचीन भारतांतील काळा बाजार

काळाबाजार, लाचलुचपत हे प्रकार आपल्या भारताला नवे आहेत असे मात्र नव्हे ख्रिस्ती शकापूर्वीच्या चाणक्य किंवा ख्रिस्ती शकानंतरच्या अकराव्या शतकातील कल्हण हे दोन्ही राजकारणात मुरलेले श्रेष्ठ ग्रंथकार या प्रकारची माहिती स्पष्ट शब्दात देताना आढळतात कौटिल्याने आपल्या अर्थशास्त्राचा २९ वा अध्याय सर्वस्वी याच प्रकाराला वाहिलेला आहे या अध्यायाच्या सुरुवातीलाच तो बजावतो, की कोणत्याहि कार्यक्रमाला सुरुवात द्रव्यापासूनच होते–कोशपूर्वा सभारंभा –म्हणून मुख्य काळजी प्रथम घ्यावयाची ती कोशाची––तस्मात् पूर्वं कोश अवेक्षेत । —पुढें कौटिल्य बजावून सांगतो, की वसूल न करणे व खजिन्यात त्याचा प्रवेशच होऊ न देणे, सरकारी खजिन्यातील द्रव्य खाजगी रीतीनें व्याजाने देणे, कर घेण्याच्या तारखा मुद्दाम मागेंपुढें लावणे, खर्च वाढवणे, सरकारी द्रव्याचा स्वत:करिता उपयोग करणे, शिल्लक असून ती नाकारणे, खर्च वहीत लिहणे पण प्रत्यक्ष सोसण्याचे टाळणे अशा सर्व प्रकारच्या अपराधाना नफ्याच्या दुप्पट, चौपट, बारा पट दंड ठोकण्यास मागें पाहू नये याच अध्यायात कौटिल्याने सरकारी अधिकारी जनतेला कशा तऱ्हेने लुबाडतात व फसवे हिशेब कसे मांडतात त्याचे थोडेथोडके नव्हे, तर चाळीस प्रकार वर्णिले आहेत ‘ तेषां हरणोपायाः चत्वारिंशत्’ तो लिहितो, वसूल केलेली रक्कम त्या वेळेच्या मागें किंवा पुढें दाखवितात, हातांत न आलेला वसूल आलेला दाखवितात व आलेला न आला म्हणून दाखविण्यास कचरत नाहीत एकाकडून आलेला वसूल

दुसऱ्याच्या नावावर घालतात. खजिन्याकरिता आलेली रक्कम त्यात न भरता नुसती कागदोपत्री भरती केली असे दाखवितात. जो वसूल ठोक रकमेने केला पाहिजे तो हप्त्याहप्त्यानी करतात भारी किंमतीची वस्तु देऊन हलक्या किंमतीची घेतात. धर्मादायात लबाडी करण्यासहि मागें पहात नाहीत किमती, वजन, माप या सर्वांत जेथे लुबाडण्यास सांपडेल तेथे लुबाडण्यास सोडीत नाहीत म्हणूनच पुष्कळ द्रव्याचा अपहार केल्याचा बोभाटा झाला असता थोडा भाग सिद्ध झाला असताहि सगळा अपराध त्यावर लागू करावा मोठी रक्कम गडप केल्याची तक्रार असेल तर त्याला देहदंड द्यावा-माफी देऊ नये--नच अनुग्राह्य'-- व आरोपीच्या बरोबर अभियुक्त होणाऱ्या सूचकाला ठार करावा !

अशाप्रकारे लाचलुचपत खाणाऱ्या अधिकाऱ्याना कडक शिक्षा करण्यास मागे पाहू नये असा कौटिल्याने स्पष्ट इषारा दिला आहे आजच्या लाचलुचपतीकडे काणा डोळा करणाऱ्या सरकारने त्याचा अवश्य विचार करावा

## अर्थशास्त्रज्ञ कौटिल्य

अधिकारी नेमताना जें धोरण स्वीकारावे असे कौटिल्य प्रतिपादतो तेहि उल्लेखनीय असेच आहे कौटिल्याला कुटिलमति म्हणून कितीहि नावे ठेवा. पण प्राचीन भारतात अत्यंत व्यापक पण व्यावहारिक दृष्टिकोनांतून जगाकडे पाहणारा कोणी द्रष्टा असेल तर कौटिल्य होय. साम्यशाहीचे तर नव्हेच पण लोकशाहीचेहि युग कौटिल्याच्यावेळी प्रभावी ठरलेले नव्हते पण राजेशाहीचा पुरस्कार करणाऱ्या या कौटिल्याची दृष्टि प्रजाहिताच्या दृष्टीने दूरगामी असल्याने साम्यवादी दृष्टीलाहि त्याच्यात पुष्कळ सुवर्णकण सापडतात म्हणूनच कौटिल्याच्या अर्थशास्त्रातील त्याने दिलेल्या काही सूचना ऐकू या. त्यातून आजच्या आपल्या स्वतंत्र भारत सरकारलाहि काळाबाजारवाल्याविरुद्ध हत्यार कसे उपसावे या बाबतीत पुष्कळ शिकण्यासारखे आढळेल.

# लुटारू वृत्ति

कौटिल्य ३०व्या अध्यायात लिहितो, की अधिकारी नेमावयाचे ते गुणा-प्रमाणे नेमावे ते आपले काम चोख बजावतात की नाही याकडे लक्ष ठेवावे कारण माणूस घोड्याप्रमाणे अस्थिर असल्याने नेमून दिलेल्या कामात तो केव्हा घोटाळा उत्पन्न करील याचा नेम नाही. 'अश्वसमप्रमाणोहि मनुष्य नियुक्ता कर्मसु विकुर्वंते'—जो वसूल दुप्पट करतो तो प्रजेचे नुकसान करतो मजुराचा पगार आपल्या खिशात घालणारास शिक्षा ठोठवावी जो वडिलो-पार्जित सपत्ति फस्त करतो तो मूलहर व जो चाकराना पीडा देऊन द्रव्य उपटतो तो कदर्म त्याचा राजाने प्रतिषेध करावा जो परराष्ट्रात द्रव्य पेरीत असेल त्याचा घात करावा जिभेवर पडलेला मध किवा विष चाखल्यावाचून राहणे जितके अशक्य तितकेच थोडा तरी पैसा खाल्याशिवाय राहणे अशक्य

यथाहि अनाम्वायिदनुं नशक्य जिव्हास्थलस्थ मधु वा विष वा ।
अर्थ तयाहि अर्थपरेण राज्ञ स्वल्पोपि अनास्वादयितु न शक्य· ।।

म्हणून राजाने नेहमी जागृत असावे पुढें ३५ व्या अध्यायात सोनार कसे लुबाडतात ते तो सागतो खोटें वजन करणे, तापविताना भेसळ करणे, खोटा तराजू वापरणे, सोने तापवीत असता मूस फोड-ण्याची चलाखी करणे असे अनेक प्रकार आहेत त्यावर राजाने लक्ष ठेवावे **स्वदेशचा व परदेशचा माल प्रजेला फायदा होईल अशा रीतीने विकाव-यास लाबावा**—स्थूलमपि लाभ प्रजाना औपघातिक वारयेत्। **मोठा फायदा होत असला तरी प्रजेला घातक होईल असा नफा घेऊं देऊं नये** पुढें ४२ व्या अध्यायात कौटिल्य लिहितो की, खोटा छाप मारलेल्या मालावर जकातीच्या रकमेच्या आठपट दड ठोकावा जकातीवरील मुख्याधिकाऱ्याने लपवाछपव केल्यास सामान्य दडाच्या आठपट दड ठोकावा। सूतकामात देवदासी, वेश्या, विधवा याना कामें द्यावींत पण पगार भरपूर घेऊन कामात चुकारतट्टूपणा करील तिचा आगठा कापून टाकावा मालक व मजूर याचा करार झाला असता त्याच्यापैकी जो कोणी तो मोडेल तर त्यास

बारा पण दड करावा मजूरसघातील मडळीनी ठरल्याप्रमाणे वेतनाचे वाटप करावे काम सुरू करून मधूनच मजूर निघून गेला तर बारा पण दड करावा (अ ७१)

प्रव्रज्य सन्यासी स्वैर आचरण करील तर त्यासहि शिक्षा ठोठवावी कारण त्याच्याकडे दुर्लक्ष केल्यास तो राजासच मारतो. धर्मोहि अधर्मोपहृत. शास्तार हन्ति उपेक्षित (अ ७३) वाणी, कारागीर, भिक्षुक हे सर्व मूलत चोर असल्याने ते लोकाना लुबाडणार नाहीत याविषयी राजाने दक्ष असावे(अ ७८)नदीतीरावर राहणाऱ्या लोकानी पावसाळ्यात पुराच्या पलीकडे रहावे आणि जवळ लाकडी फळ्या व नावा ठेवाव्या एखादा माणूस पुरात वाहत चालला असता साधने हाती असून त्यास सोडविण्याचा जो प्रयत्न करणार नाही त्याला बारा पण दड ठोकावा **दुष्काळ पडला असतां राजाने स्वतःच्या किंवा इतरांच्या सग्रहांतून धान्य इतरांस वांटून द्यावें** देशातील प्रजा काही काळ परदेशात पाठवावी, मित्र राष्ट्रापासून मदत मागावी व शेवटी जबरदस्त कर बसवावा किंवा वर्गणी वसूल करावी (अ ८०) प्राताधिकाऱ्यावर लाच खाल्याचा आरोप आल्यास त्यास हद्दपार करावे व ग्रामाधिपति सावकाराला गोत्यात आणून त्याच्यापासून पैसे उपटण्याचा डाव टाकील तर त्याला हाकलून लावावा याप्रमाणे अनेक ग्रामकटकाना हाकलून लावावे (अ. ८१) गुन्हा शाबीत झाल्यावर सक्तमजूरीस जुपावे **पण गर्भवती स्त्री व एक महिन्याची बाळतीण हिला काम सांगू नये** (अ ८५) .जो मनुष्याचे मास विकील त्याचा वध करावा (अ. ८७). राजाला द्रव्याची निकड असल्यास धनिकाच्याकडून अनेक युक्त्यानी द्रव्य लुबाडावे पण हा प्रयोग दुष्टाच्यावरच करावा असे सागण्यास कौटिल्य विसरत नाही—एव दुष्येषु अधार्मिकेषुच वर्तेत नेतरेषंच ( अ. ९२ )

कौटिल्याच्या ग्रथराजात विखुरलेल्या काही ठणठणीत मताचा हा ओझरता उल्लेख होय. त्यातील प्रजेला घातक होणाऱ्या नफ्याचे निवारण करावे, दुष्काळात राजाने धनिकाच्या सग्रहातील धान्य वाटून घ्यावे व बाळतिणीला कामाला जूपू नये या सूचना वाचून कौटिल्याला कुटिलमति कोण म्हणेल ! असो. आता कौटिल्याचा निरोप घेऊन आपण आगऱ्या सरकारकडे वळया

भारतसरकारने काही बाबतीत पुढे पाऊल टाकले आहे. एक म्हणजे लोखंड, कापड, कागद, सिमेंट वगैरेसारख्या काही कारखान्यातील कामकऱ्यानी पगारातून दर महिन्यास भावी तरतूद म्हणून ( प्रॉव्हिडंट फंड) आपल्या उत्पन्नातील ठराविक अल्पसा भाग कारखान्याच्या पेढीत ठेवावा व मालकानेहि त्यात तितकीच भर घालावी हे होय. दुसरे पाऊल म्हणजे कामगाराची आजारपणातील राहणीची तरतूद कारखान्याने करावी हे होय या बाबतीत असे ठरविण्यात आले आहे की, आठवड्याचा पगार रुपये बारा धरला तर आजारीपणात कामगार कामावर उपस्थित नसताहि त्यास सात रुपये देऊ करावे व याप्रमाणे जास्तीत जास्त ८ आठवडेपर्यंत ही मदत चालू ठेवावी.

## सरकारी विमा

याच दिशेने टाकलेले आणखी एक उल्लेखनीय पाऊल म्हणजे पचवीस लाख कामगारासाठी पाचसहा महिन्यापूर्वी आखलेली सरकारी विमायोजना ही असून ती दोन वर्षांत पूर्ण होईल अशी कल्पना आहे या योजने प्रमाणे कामगाराच्या अडचणीच्या काळच्या प्रमुख गरजा भागविल्या जातील. आजारपणात वैद्यकीय मदत तर दिली जाईलच पण आजारपणातला भत्ताहि दिला जाईल. त्याच प्रकारे बाळंतिणी व अपघाताने पगू झालेल्यास व दुसऱ्यावर अवलबून राहणाऱ्याला असा भत्ता दोन ते तीन महिने देण्याची योजना केली आहे काम करीत असता अपघाताने कामगार मृत्युमुखी पडला असता त्याच्या विधवा पत्नीस व मुलासहि भत्ता देण्यात येईल

## कारखान्यांतील करावर नियंत्रण

भारताने आणखी एक पाऊल पुढें टाकले आहे, ते कपनी कायद्यातील काही लुटीच्या पळवाटा बुजवून टाकणे हे होय नियत्रित समाईक मालकीच्या तत्त्वावर चालविलेल्या गिरण्या आणि बड्या कपन्या प्रमुख बड्या भाडवल दाराच्या सर्वस्वी मुठीत असतात हे सागावयास नकोच कायद्याच्या दृष्टीनें असली सस्था सर्व भाडवलदारसमूहाच्या मालकीची, पण प्रत्यक्ष व्यवहारास लाखो रुपये घालणारा एखाददुसरा बडा भाडवलदार व किरकोळ शेअर घेणारे हजारो गरीब भागिदार. या भागिदाराला कपनीतून व्याजी चारदोन जास्त

पैसे मिळाले की तो खूष! याचा फायदा घेऊन भांडवलवाले उमाप पैसे खिशात घालीत असतात कारखान्याची मुख्य किल्ली मॅनेजिंग एजंटच्या हातात असल्याने कारखान्यात कच्चा माल विकत घेताना व कारखान्यातून माल बाहेर विकला जात असता दोन्ही वेळा तो आपले खिसे भरून घेण्यास मागे पहात नाही मग कंपनी नफ्यात चालो की तोटयात चालो! या प्रकाराचा फार गवगवा झाल्यावर सरकारने सी एच भाभा याच्या अध्यक्षतेखाली आक्टोबर १९५० मध्यें चौकशी कमिटी नेमली तिची पहिली शिफारस अशी की मॅनेजिंग एजन्सीचे यापूर्वीचे दीर्घ मुदतीचे करार १५ ऑगस्ट १९५९ पासून रद्द समजले जावे यापुढे १५ वर्षांपेक्षा अधिक मुदतीचा करार रद्द समजावा दुसरे म्हणजे कंपनीला तोटा होत असताहि खरेदी-विक्रीवर मॅनेजिंग एजंट कमिशनचा जो ताव मारीत तो आता खोडून काढून फक्त नफ्यातील जास्तीत जास्त १२।। टक्के कमिशन घ्यावे या मॅनेजिंग एजंटवर कायद्याप्रमाणे डायरेक्टर बोर्ड असते पण एक तर त्याना प्रत्यक्ष व्यवहाराचे ज्ञान अल्प असते आणि मॅनेजर त्याचेहि खिसे थोडेसे भरत असल्याने ते मॅनेजरकडे काणाडोळा करीत असतात कमिटीने शिफारस केली आहे की, डायरेक्टर निवडतांना तो निस्पृह व निस्वार्थी असा निवडण्यात यावा पण असल्या शिफारसी प्रत्यक्ष व्यवहारात उतरतील तो सुदिन! त्या उतरणे फक्त कल्पनेच्या राज्यात शक्य असल्यानें प्रत्यक्ष व्यवहारात अधिक कणखर धोरण स्वीकारले तरच निभाव सहकारी तत्त्वावर असल्या कंपन्या चालवून मॅनेजिंग एजंटचे उच्चाटन करणे हाच खरा मार्ग. त्या मार्गावर आपले सरकार पावले टाकीत चालल्याचे दिसत नाही

उलट सध्याचे आपले सरकार भांडवलदाराकडून सरकारला कर्ज मिळावे यास्तव गरीबाना लागणाऱ्या वस्तूंच्या किंमतीवर कर बसविण्याचे धोरण आंखीत आहे! अन्नधान्य बाहेरून आणण्याकरिता सरकारने जे ९० कोटी रुपये गेली काही वर्षे खर्ची घातले ते यापुढें पंचवार्षिक योजनेनें देशाची साधनसंपत्ति वर्धमान करण्यात खर्चिले जातील असा दावा मांडिला जात आहे उलट मुंबई सरकारनें तर धान्यांच्या किंमती कमी करण्याऐवजी ५० टक्क्यानी वाढविल्य आहेत. कोरियांतील लढाईमुळे कडाडलेल्या

भावाने गरीब आधीच नाडला गेलेला आहे, पण सरकार नवीन भाडवल उभे करणार आहे ते या भुकेकगाल, गरीब पोटातील आणखी एकदोन दाणे काढून घेण्याकरिता सस्थाने, जहागिऱ्या वगैरे बडया खासगी मालकीला निरोप देऊन साम्यवादाच्या दिशेने पावले टाकीत, अगदी हलकी पावले का होईना पण त्या दिशेने टाकीत, चाललेल्या भारतीय सस्कृतीला तू पुन्हा गरीबावर अधिक कर बसविणाऱ्या वाटेने उलटी पावले टाक असा उपदेश करणे कितपत योग्य होईल हे अर्थमत्रीच जाणोत याचा उल्लेख येवढ्याच-करिता करतो की जहागिरदारी व सस्थानशाही अशा काही बडया धेडाना मूठमाती देण्यात आली असली तरी अफाट जनतेचे जीवन सुखमय करण्याच्या दृष्टीने फार मोठा पल्ला गाठावयाचा आहे यावर नजर सारखी रोखून ठेवणे अवश्य होय यामुळे सरकारची विचारसरणी ही प्रतिगामी आहे असे स्पष्ट सागितले पाहिजे.

## दानमुग्ध मंत्री

या प्रकारच्या विचारसरणीचा भोळसट मासला नामदार त्यागी यानी काही महिन्यापूर्वी अहमदाबाद येथें प्राप्तिकर कचेरी इमारतीच्या पायाचा दगड बसविताना काढलेल्या उद्गारात आढळेल ते म्हणाले की लक्ष्मीपुत्रानें स्वत वर बसवलेला हा कर म्हणजे आपली धर्मदाय देणगी असे समजा ! वक्ते त्यागी, करदाते दानशूर लक्ष्मीधर, आणि सरकारी कर ही धर्मदाय देणगी ! अशा त्या त्रिवेणी सगमात अवगाहन करणाऱ्याना जन्मसार्थकता वाटली तर नवल कसले ? प्राप्तीवरील कर ही देणगी असा पक्ष माडताना हा कर देणारे लक्ष्मीवत सरकारवर उपकार करीत आहेत, उदार हस्ताने देणगी देत आहेत असा दावा माडला तर तो क्षणभरहि टिकेल का ? सरकारचे सरक्षण पाठीशी उभें आहे तोवरच या त्यागाच्या लबाडया गप्पा लक्ष्मीधराला मारता येतील सरकारने सरक्षणाचे कवच काढून घेतले की लक्ष्मी ही श्रीमताकडे ढुकूनहि पाहणार नाही यास्तव प्राप्तिकर हे दान नसून सरक्षणाकरता दिलेल्या मदतीची किंमत होय असे स्पष्ट प्रतिपादणे योग्य होय.

जनसमुदाय विस्कळित व हतबद्ध होता तोवर पदर पसरून दानाची भिक्षा मागण्याशिवाय अन्य उपाय नव्हता आता दानाची भाषा सोडून मागणाराचा हक्क व देणाऱ्याचे कर्तव्य ही भाषाच शोभून दिसेल प्राचीन काली दानाची भाषा उठून दिसण्यासारखी असेल महाभारताच्या शांतिपर्वात अनक दानशूर नृपतीचा गौरवपूर्ण उल्लेख आहे तो त्या काली रास्तच होता वृषदर्भी नृपतीने रत्ने दानार्पण केली, युवनाश्वाने रम्य मदिरे दान दिली, शतद्युम्नाने सुवर्णसपन्न गृह मुद्गल ऋषीला अर्पण केले, राजा प्रसेनजित याने शतसहस्र सवत्स गोमातावर दानोदक सोडले या दानाने या सर्वांना स्वर्गप्राप्ति झाली. ' दानयज्ञप्रजासर्गे एतेहि दिवमाप्नुवन् ' असा भारतकार निर्वाळा देतो, तो निर्वाळा शासनसत्तेवर प्रजेचा दाब नसलेल्या भारतकाळी योग्य असला तरी बदलत्या काळात त्याला आता निराळे रूप देणे आवश्यक होय. राष्ट्राची सपत्ति ही लोकसमुदायाच्या सघटित श्रमानें निर्माण होत असल्यानें कर भरणें ही देणगी नसून सार्वजनिक सुखसोयींच्या उत्पन्नाच्या श्रमातील आपला वाटा उचलणे होय.

महाभारतकार हा व्यापक दृष्टीचा व समन्वय वादाचा पुरस्कर्ता असल्यानें नृपतींना स्वर्गसुखाचा आशीर्वाद देऊन न थावता खालच्या व्यापारी शेतकरी वर्गाकडेहि त्यानें लक्ष वेधले आहे त्याने राजर्षी हे व्यापाऱ्याना हीन लेखत व त्यांच्यापासून लुबाडलेल्या सपत्तीतून उदार देणग्या देऊन आपला लौकिक वाढवीत हे दाखवून याची विरुद्ध बाजू म्हणून व्यापाराचाहि पक्ष तुलाधार-जाजली सवादात तुलाधाराच्या तोडून वदविला आहे.

## तुलाधाराची समतोल विचारतागडी

तुलाधार वाणी जाजली ब्राह्मणाला सांगतो की, " तू मला वाणी म्हणून कमी लेखू नकोस वाणीपणाहि सच्चारित्र्याने करता येत नाही असे थोडेंच ? मी लाकरळ, अळित्याचा रग व सुगधी अत्तरे याचा व्यापार करतो. म्हणून तू मला दोष देतोस पण मी तुला सांगतो, पैसे उकळण्याच्या मोहात मी गुतून जात नसून सर्वांशी व्यापार करीत आहे. माझी तागडी मी माझ्या

कडे झुकती न ठेवता समान ठेवतो " "तुला मे सर्वभृतेषु समातिष्ठति जाजले।" गाधीजी व्यापाऱ्याना 'विश्वस्त' या नात्याने वागा म्हणून जो उपदेश करीत त्यातील बीज हेच होय आता हे बीज जर काळाबाजार-वाले उकिरड्यावर फेकून देणार असतील तर त्या उकिरड्यातूनहि भडाग्नी पेटल्याशिवाय राहणार नाही हे त्यानी समजून असावे

वाचकहो, या तुलाधाराच्या तोडचे आणखी दोन शब्द ऐकू या. कारण ते तशाच तोलाचे आहेत शेतकीच्या कामाला हीन ठरविणारे स्मृति-कार बैलाना ठोकून काढून घेणाऱ्याच्या हातून धान्य मिळणाऱ्या धनवताला 'धनधान्यसमृद्धिरस्तु' असा वर देण्यास मागे पहात नसत अशाना उद्देशून तुलाधार म्हणतो, मी रगाचा व्यापार करतो म्हणून तू मला दोष देतोस पण बैलाकडून—वृषभाकडून त्याचे वृषण ठोकून व त्याच्या नाकास भोक पाडून वेसण घालून त्याच्याकडून जें शेत पिकवितोस त्या पिकातले धान्य खाण्यात मात्र तू कमीपणा मानीत नाहीस भ्रूणहत्या हे पाप समजतोस, पण वृषभाच्या पाठीवर कोरडे ओढवून मळलेले धान्य स्वीकारताना तू त्याकडे दुर्लक्ष करतोस. "वाहसपीडिता धुर्या सीदति अविधिना परे। न मन्ये भ्रूण-हत्यापि विशिष्टा तेन कर्मणा॥" गवालभनयज्ञात गाईला अग्न्यार्पण कर-ण्यासहि तू मागें पहात नाहीस याचा अर्थ काय ? शेवटी तुलाधार आपली कीर्ति पसरविण्याकरिता दान देणारानाहि दोष देण्यास मागे पहात नाही तो म्हणतो, "मी यज्ञदानाची निंदा करीत नाही, पण लोभाने यज्ञ केला किंवा लौकिकासाठी तळी, विहिरी बांधल्या तर तो लोभ ठरेल" आपल्या त्यागी पुढाऱ्यानी व मत्र्यानी तुलाधाराच्या ह्या उद्गाराचे चिंतन करावे! तुलाधार हा तोलून धरणारा होता मापथोडें बहुत खालीवर होईल हे तो जाणून असल्यानें श्वासोच्छ्वासाने प्राणहत्या होऊ नये म्हणून तोंडापुढे वस्त्र हलत ठेवण्याचा प्रकार तो प्रतिपादित नाही तर मोकळेपणाने सागतो, की परधर्म किंवा उच्च धर्म म्हणतात तो सर्वस्वाची अद्रोही वृत्ति राखणे हा होय पण तो न साधल्यास अल्पद्रोही वृत्ति ठेवणे हाच परम धर्म होय. "अद्रोहेण भूतांना अल्पद्रोहेण वा पुन.। या वृत्ति स परोधर्मः तेन जीवामि जाजले॥" आज तुलाधार आपणास सांगेल की, बैलाना

ताडित बसण्यापेक्षा ट्रॅक्टर वापरा आणि " सर्वेषा च सुहृद नित्य सर्वेषा च हिते रत " या न्यायाने सामुदायिक शेतीचे प्रयोग करा !

## अफाट व सलग शेती

मैलोमैली सलग पसरलेल्या शेतीवर ट्रॅक्टर वापरा हे वाचून आजच्या आपल्या जमीनदारानाच नव्हे तर सामान्य शेतकऱ्यालाहि धडकी भरल्याशिवाय राहणार नाही याची मला जाणीव आहे रशियाने हा प्रयोग सक्तीने लादल्यावर असख्य जमीनदार तर खाईत लोटले गेलेच पण शेतकऱ्याच्या उत्पन्नातला ठराविक धान्यभाग त्याच्याकडे ठेवून बाकीचा सरकारजमा करण्याची मोहीम सुरू होताच शेतकऱ्यानी स्वतच्या कपाळावर हात मारीत व अधिक धान्य पिकू नये म्हणून स्वतच्या गुराढोराना स्वत कापून काढण्यास कमी केले नाही, याचा उल्लेख मागे केलाच आहे आपणालाहि हा प्रकार अपरिचित नाही म्हणजे आपल्या खेडुतानी गुरे मारली नाहीत पण सत्याग्रह सुरू केला तो प्रकार असा की, इग्रजी अमदानीत धरण बाधण्याची योजना जनतेपुढे माडताच त्या धरणाच्या खाली ज्या शेतकऱ्याच्या जमिनी बुडून जाणाऱ्या होत्या त्या शेतकऱ्याना या सरकारी धोरणाविरुद्ध चिथविण्यास आपल्या काही पुढाऱ्यानी मागे पाहिले नाही पण आज तेच पुढारी ज्याची शेती या नव्या धरणाच्या पायी पाण्याखाली बुडेल त्याचा उल्लेखहि करीत नाहीत. अशा जमिनी योग्य किमत देऊनच इग्रज सरकार विकत घेणार होते पण त्यावेळी परकीय सरकारशी असहकार करण्यावर भर होता आता आपले सरकार असल्याने ज्या शेतकऱ्याच्या जमिनी धरणाखाली बुडणार आहेत त्या बुडू न देण्याचा पुरस्कार करण्यास कोणी पुढारी पुढे येईल का ? तो येत नाही हे जर रास्त असेल तर तोच न्याय लावून सलग असणाऱ्या शेकडो एकर शेतजमिनी सहकारी तत्त्वावर सामुदायिक मालकीच्या करून ट्रॅक्टरच्या साहाय्याने नागरू का नयेत ? भूदानयज्ञाच्या पुरस्कर्त्यांनीहि नुसत्या दानावर भर देऊन न थांबता दान मिळालेल्यापैकी सलग भूमि ही सामुदायिक मालकीची करून ट्रॅक्टरच्या सहाय्याने ती नागरण्याचा प्रयत्न करणे इष्ट होणार नाही का ? वर्षातील

चार महिने जेमतेम पुरेल येवढे धान्य पिकविणारी जमीन असली तरी ती स्वत च्या मालकीची या समाधानात शेतकरी धुद असे आता प्रचड धरणे बाधताना त्याला या धुदीतून जागे करावयाचे आहेच ना ? मग लगोटी लावून लाकडी नागर हाती धरून मूठभर जमीन नागरीत बसण्यापेक्षा सामुदायिक मालकीची शेंकडो एकर जमीन नागरण्याच्या प्रयोगास समति देण्याकडे त्याचे मन आपण वळविण्यास टगळमगळ का करावी ? रशियाच्या धिसाडघाईच्या वाटेने जाणे योग्य नव्हे हे इतर साम्यवादी राष्ट्रेहि जाणून आहेत. पण सलग शेकडो, हजारो एकर जमीन लागवडीखाली आणून उमाप धान्य भूमातेकडून घ्यावयाचे असेल तर या तऱ्हेच्या प्रयोगाला बिचकून जाऊन उपयोगी नाही न बिचकता सामुदायिक शेतीचा प्रयोग केल्यास उपासमारीने मृत्युमुखी पडणाऱ्या हजारोंचे धन्यवाद मिळतील

मानवी स्वभावातील एक वृत्ति सामुदायिक सघटनेच्या मूलत विरुद्ध असते प्रचड सघटनेत व्यक्ति गुरफटून जाईल ही कल्पना तिला आतून टोचत असते या कल्पनेच्या टोचणीमुळेंच रूसो, टॉलस्टॉय, रस्किन, गाधी यानी चरखा फिरविणाऱ्या खेडुताचा आदर्श जनतेपुढे माडला. पण यत्रशक्तीच्या वाढत्या सामर्थ्याने गाधीजीचे लक्ष उत्तरोत्तर वेधून घेतले हे मात्र नमूद केले पाहिजे १९०८साल हे टिळकाच्या मडालेस झालेल्या हद्दपारीने आपणास चिरतन स्मरणीय आहे याच साली गाधीनी 'हिदी स्वराज्य' या विषयाचे आपले विचार जनतेस सादर केले त्यात त्यानी लिहिले आहे की, 'मुख्य मुद्दा लक्षात ठेवण्यास विसरू नका तो हा की यत्र हे मानवावर ओढवलेले सकट असून त्याला हळूहळू हद्दपार केल्याशिवाय आपण राहणार नाही ! १९२० साला नतर गाधीजी अखिल भारताचे पुढारी झाले. त्यानतर चारपाच वर्षांनी 'नव जीवन'मध्ये त्यानी लिहिले की, "माझा उद्देश यत्राचा नाश करणे हा नसून त्याच्या कामगिरीवर नियत्रणे घालावीत हा होय " पुढारी या नात्याने अनेक गिरणीमालक धनपतीशी सबध आल्यानेहि हा विचारपालट झाला असेल कसेहि असो, पुढे आणखी सुमारे दहा वर्षांनी म्हणज १९३५ मध्ये त्यानी यत्रासबधी जे विचार प्रकट केले आहेत ते यत्राकडे पूर्वीपेक्षाहि आपुलकीने पाहणारे आहेत. ते लिहितात, " विजेचा पुरवठा घरोघरी करता आला तर

खेड· ग-न्यानी न खेडुतानीहि आपली साधीसुधी अवजारे विद्युत्शक्तीवर चालविण्यास हरकत आहे असे मला वाटत नाही '' यत्राचा धडधडाट हा मानवी जीवनावर एक आघात आहे असे प्रतिपादन करणाऱ्या महात्म्याने खेडुताच्या खोपटीतील विद्युत्शक्तीने चाललेला धोटा पाहून मोकळेपणाने धन्योदगार काढावे हे महात्म्याची बुद्धि कुठित नसून विकसित होणा । होती हेच दर्शविते. शिवण्याच्या यत्रालाहि अशीच समति त्यानी दिली होती हे वाचकाना सागावयास नकोच

## गिरण्यांचें व पतपेढ्यांचें राष्ट्रीयीकरण

ग्रामोद्धाराला वाहून घेणाऱ्या देशबधूनी विजेची शक्ति खेडोपाडी नेणे हे आपले कर्तव्य आहे या दृष्टीने प्रयत्न केला पाहिजे खेड्यातील आपली घरची बायकामुले घरी टाकून शहरातल्या गिरण्यात काम करण्यास जाण्यापेक्षा आपल्या छोट्या खेड्यात आपल्या नव्या पद्धतीने हवाशीर खोपटीत राहून छोटया शेतीचा व गुराढोराच्या जोपासनेचा व्यवहार सभाळून उरलेल्यावेळी आपल्या खोपटीत घेतलेल्या छोटया विद्युत्-यत्रावर कापड [illegible] काम करणे हे सुखकारक होणार नाही का ? सर्वच कारखान्यातील काम अशा रीतीने खेडोपाड्यातून करता येईल असे नाही पण बरेचसे काम उरकता येणे अशक्य नाही आणि शेती सामुदायिक मालकीची केली तर शेतात कामकरी थोडे लागून उरलेल्याना आपआपल्या झोपडीत विद्युत्शक्तीवर अनेक बारीकसारीक धदे चालविणे अशक्य होणार नाही जपानने हा प्रयत्न यशस्वी करून दाखविला आहे तसेच ज्या कारखान्याना मोठ्या सख्येने मजूर लागतात त्या कारखान्यातील मजुराना सहकुटुब राहण्याकरिता कारखान्याच्या परिसरातच हवेशीर चाळी बाधण्याची मालकावर सक्ति करणाऱ्या दिशेने पावले टाकली पाहिजेत. येवढ्यावरच न थाबता सस्थानकी, जमीनदारी याच्याकडे पाहण्याची जशी कणखर दृष्टि स्वीकारली त्याच दृष्टीने पतपेढ्या, गिरण्या राष्ट्रीय मालकीच्या करण्याचे धैर्य दाखविण्यास बिचकून जाणे उपयोगी नाही इतकी उच उडी एकदम पेलण्यासारखी नसेल तर ज्या गिरण्या व कारखाने यानीं पंचविशी उलटली असेल त्याना अल्प प्रमाणात मोबदला देऊन त्या सरकारी

मालकीच्या करण्याला प्रारभ का करू नये ? रेल्वे व मोटार-वाहतुक राष्ट्रमालकीची केलीच ना ? सोलापूरची गिरणी अफाट पैसा खाऊन झाल्यावर जीर्ण झाली म्हणून लक्ष्मीपतिंनी बद केली असता सरकारने ती हाती घेतलीच ना ?

हे धोरण जाहीर झाले की नवे कारखाने काढण्याची उत्सुकता मुळातच मारली जाईल ही शका येथें टवकारून पाहीलच पण तिला उत्तर म्हणजे पुजीपती हे आपली सपत्ति गाडून टाकू लागले तर त्याच्याकडे हतबुद्ध होऊन न पाहता धिटाईने तोड देणे हेच होय हजार रुपयाच्या नोटा एका सरकारी हुकुमाने रद्द करण्यात आपल्या सरकारने जो धीटपणा गेल्या वर्षीं दाखविला त्याचाच अधिक धिटाईने प्रयोग करावा लागेल तसे केले असता पुढील पचवार्षिक योजनेसाठी लागणाऱ्या ६०० कोटी भाडवलासाठी करवाढ करून गरीबाचा पाय खाली ओढण्याचे लाचारी धोरण स्वीकारावे लागणार नाही. रशियाने गेल्या दुसऱ्या महायुद्धात अखड जनतेची मदत पाहिजे म्हणून काही श्रीमतांना आपली श्रीमती वाढविण्यास मोकळीक दिली पण लढाई सपून शातता नादू लागताच एका तडाख्याने त्याने त्याची साठीव पुजी फुसकी करून टाकली. तो प्रकार म्हणजे काही कमाल मर्यादेपलीकडे ज्याची पुजी साचलेली होती व सरकारी पेढीत लोळत पडलेली होती तिला एकदम सरकारी हुकमाने दसपटीने खाली ओढण्यात आले म्हणजे दहा हजार नोटाची किंमत एक हजारावर आणून सोडली असे कणखर धोरण स्वीकारले तर सरकारला कर्ज न देण्याचे वा नवीन कारखाने काढण्याचे टाळण्याच्या आत्मघातकी धोरणाचा पुजीपतीला डोळे चोळून विचार करावा लागेल. हजाराच्या नोटा रद्द करण्यात धिटाईची जो थोडी चमक आपल्या सरकारने दाखविली ती नुसतीच चमक न राहता तिचा झोत वाहू लागेल तेव्हाच प्रगतीच्या मार्गावर पुढे पाऊल टाकल्याची जनतेची खात्री पटेल. ती पटण्यास बँका सरकारी करणें ही महत्त्वाची पुढील झेप होय

सर्व सपत्ति राष्ट्रीय मालकीची केली म्हणजेहि जीवनातील सर्वच वैषम्य नाहीसे होईल, असल्या भ्रमात राहिलो तर पश्चात्तापाची पाळीहि येईल हेहि येथे रोखठोक सांगूनच पुढें गेले पाहिजे. अन्न-वस्त्र-निवासादि प्राथमिक

गरजा सापत्तिक साम्यवाद भरून काढील, पण विद्वत्ता, लोकमान्यता, सुदरता, याचे समान वाटप करण्यात येईल अशा भ्रमात कोणी राहिला तर तो भ्रमिष्ट ठरेल! रशियातील साम्यवादी वातावरण हे कल्पित साम्यवादापेक्षा फारच खालच्या दर्जाचे आढळून आल्यावर ज्या काहीनी वैतागून रशियातून बाहेर पळ काढला ते काहीसे याच वृत्तीचे असावेत पण अशाच्या प्रचाराने गाजून साम्यवादाचा प्रयोगच नष्ट करावा असे ज्याना वाटत असेल त्यानी आपल्या स्वत ला स्पष्टपणे पुढीलप्रमाणे विचारावे "स्वराज्य मिळाल्यावर जे सुख चाखावयास सापडेल या धुदीत तू होतास त्यापैकी किती तुझ्या तोडात पडले आहे तर मग परकीय सत्तेखाली अधिक स्वस्ताई व सुरक्षितता होती म्हणून तू परकीय सत्तेला पुन्हा आमत्रण करशील का ? केव्हाहि करणार नाही, असेच ना तू उत्तर देशील ? मग त्याचाच खोलपणे विचार कर आज आपल्या राष्ट्राचा पाय काही बाबतीत खाली रुतत चाललेला आढळला तरी आपले राष्ट्र हळूहळू कणखर बनून धान्याचा कणहि बाहेरून न आणण्याचे धोरण व्यवहारात उतरवले जाईल असा आशावाद तू स्वीकारणार ना ? मग तोच आशावाद साम्यवादाला लागू कर " गेल्या हजार वर्षात अनेक वेळा परदास्याच्या शृखलात आपण डाबून टाकले गेलो असल्याने मोकळ्या वातावरणात आल्यावर प्रथम थोडा वेळ आपले पाय लटपटू लागले तर नवल नाही पण लवकरच प्रचड उत्पादन खाती राष्ट्रीय मालकीची करण्याचे धिटाईचे धोरण आपण स्वीकारले तरच स्वातत्र्याच्या उभारणीत जोर येऊ लागेल

## बुद्धिवादानें कणखर बना

सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे हा जोर नुसत्या हातापायात अथवा राजकारणातच विरून न जाता त्याने जीवनाकडे पाहण्याची दृष्टीच अधिक वास्तविक व यथार्थदर्शी करण्यास झटले पाहिजे ही होय 'ठेविले अनते तैसेचि रहावे', हा मत्र म्हणत अथवा 'धाव विभो करुणाकर माधव' अशा माधवींत गूगून जात किवा 'जो त्रिविध तापे पोळला तोचि साधु झाला' असा आदर्श माडीत काळ कठण्याची वृत्ति आता साफ पालटून

टाकली पाहिजे. अलिकडे काही श्रेष्ठ विज्ञानवंतहि विश्वाचे कोडे सोड-विण्यात दिग्मूढ झालेले दिसतात. नक्षत्राचे आणि ग्रहाचे आपल्या जीवना-वर परिणाम होत असतील विश्वव्यापी कॉस्मिक् किरणाच्या शोधानी विश्वातील आदोलने व इलेक्ट्रॉनमुळे परमाणूतील आदोलने यामुळे काही विज्ञानवेत्तेहि गोधळून गेले आहेत अशा स्थितीत त्याच्या आहारी न जाता जे शतायु आयुष्य इहलोकी आपणास लाभले आहे ते सुखमय करू या, ते स्वप्नमय असले तरी या स्वप्नातहि एकमेकाच्या सपत्ति लुबाडण्याचे धोरण हे हतबुद्ध होऊन कपाळावर हात मारीत दुर्बळपणाने पहात न बसता ते गाडून टाकण्यास कबर कसू या अशी आत्मविश्वासाची जाणीव जागृत करणेच इष्ट नाही का ? ग्रहाचे आपल्या जीवनावर काय परिणाम होत असतील ते होवोत पण त्याच्या नादी न लागता मिळालेल्या बुद्धीने जीवन सुखमय करण्यास झटण्यातच खरा आनद नाही का ? जपजाप्यात गुग होण्यापेक्षा जनताजनार्दनाची सेवा करून ‘ अवघे धरू सुपथ ’ हे समाजाच्या उत्कर्षाला सहाय्यक नाही का ? आपले नेते टिळक, गाधी, सुभाषबाबू कुडली पहात बसले नाहीत तर सर्व आयुष्य जनसेवेला त्यानी अर्पण केले गाधीना व सावरकराना स्वातत्र्याचा झेडा उभारलेला पाहण्यास तरी सापडला. टिळक–सुभाषबाबूना व त्याच्याप्रमाणेच धिटाईने प्राण पणास लावून झगडणाऱ्या व फाशीची शिक्षा हसतमुखाने स्वीकारणाऱ्या अनेक देश-भक्ताना, हा झेडाहि पहाण्याचे सुख मिळाले नाही म्हणून त्याचे जीवन दु खमय होते असे म्हणण्याचे कोण धाडस करील ? जनहिताकरिता झगडण्यात ते रमले होते आत्मविश्वासाने सकटाशी झगडण्यात सुख नसते तर या पुढा-ऱ्यानी आपल्या देहाला कष्टाला कशास वाहून घेतले असते? याच्यावर स्तुति-स्तोत्राची सुमने वाहणाऱ्या वर्तमानपत्रकारानी कुडल्याचे भविष्य छापण्यात आपला कागद खर्चून समाजातील मनोदौर्बल्य वाढविण्यास हातभार लावणे इष्ट आहे का याचा ते विचार करतीलच त्याना चाणक्याच्या उद्गाराची पुन्हा एकदा आठवण करून देतो चाणक्य बजावतो की, नक्षत्राच्या सारखे पाठीमागें लागणाऱ्या भोळयाला नक्षत्र केव्हाच मागें टाकून पुढें जात असते, कारण सपत्ति सपादन हेच सपत्तीचे

नक्षत्र तेथे आकाशातील तारका काय करतील ? नक्षत्र अतिपृच्छत बाल अर्थं अतिवर्तते । अर्थोऽहि अर्थस्य नक्षत्र किं करिष्यन्ति तारका ।। चंद्रगुप्ताला राज्यसिंहासनावर बसविण्यास सर्वस्वी झटणाऱ्या पण स्वतः स राजकारणात गुतवून न घेणाऱ्या निस्पृह कौटिल्याचे हे उद्‌गार होत आणि समर्थांनी स्वत निस्पृह राहून समाजापुढे आदर्श माडला तोही 'यत्न तो देव जाणावा' हाच ना ?

## आधुनिक विज्ञानयुग

रामदासाच्या काळापेक्षाहि तीन शतके मानवी समाज पुढे चालत आलेला आहे आणि ही तीनशे वर्षे म्हणजे अर्वाचीन युगातील मानवाने नवतारुण्यात पावले टाकण्यास प्रारभ केला त्या खडातील होय गेल्या तीन शतकात विज्ञानाच्या खोल दरीत बुडी मारून शास्त्रज्ञानी जी अमोल विज्ञानरत्ने हस्तगत केली आहेत, त्याचा उपयोग केल्यास अखड मानवतेच्या सर्व प्राथमिक गरजा पुरविणे हे हातचा मळ होऊन बसेल. म्हणून ज्या ईश्वराने आपणास अशा प्रौढ बुद्धीची देणगी दिली त्याची आळवणी करीत न बसता ती बुद्धि सार्वजनिक, सामुदायिक सुखवृद्धीच्या कामी लावली तर ईश्वराला कौतुकच वाटेल देव भावाचा भुकेला ही भुकेल्या देवाची कल्पना आता दूर सारा आत्मविश्वासाची व बुद्धिप्रामाण्याची जाणीव आपणात प्रखर होऊ लागली नाही व भुताखेताची आणि रामकृष्णाची प्रार्थना करीत बसलो तर जगात आपण कायमचे मागासलेले राहू हे विचारवतानी जनतेला पटवून दिले पाहिजे हे पटवून देण्याची आजही आवश्यकता आहे कारण मुलाचा खून करून त्याच्या रक्ताने शिवलिंगावर अभिषेक करणारा भिल्ल, नागास समुद्रात फेकून देऊन रोग बरा करण्याच्या आमिषाने व्यापाऱ्याकडून चाळीस हजार रुपये लुबाडणारा साधू व भोलानाथ नदीबैलाकडून परक्याचे विचार जाणून घेण्याचा आव आणणारा भोदू हे अद्याप आपणात वावरत आहेतच.

या बाबतीत गेली हजार दीड हजार वर्षे आपल्या भारताची बुद्धि मरगळलेली आहे पृथ्वी सूर्याभोवती फिरते या आर्यभट्टाच्या तर्कशुद्ध मताचा

उपहास ब्रह्मगुप्ताने कसा केला, शत्रूशी लढताना दाहीरने बुद्धाची सुवर्णमूर्ति कशी पाठीशी बांधली वगैरे हकीकत जिज्ञासूनी 'संस्कृति संगमात' पहावी विज्ञानेश्वर म्हणतो कल्याणनगरीसारखी नगरी पृथ्वीवर नाही आणि अल्बेरुणीच्या काळचा हा पंडित ठोकून विधान करतो की, आपल्या शास्त्रासारखे शास्त्र अन्यत्र नाही ही दर्पाची वृत्ति सोडून आपणहि जगाच्या बरोबर विज्ञानात उच्च स्थान मिळवू व त्याचा सदुपयोग करू अशी वृत्ति स्वीकारू या देवाची करुणा भाकण्यापेक्षा जनतेची सेवा करीत असलेला पाहून जनताजनार्दनाला संतोषच होईल. जे जे विभूतिमत् तो तो देवाचा अंश असे गीताकाराने व्यापक तत्त्व मांडले व पशुयज्ञाच्याऐवजी ज्ञानयज्ञ, तपोयज्ञ यांचा पुरस्कार केला त्याच न्यायाने व्रतवैकल्ये याना रजा देऊन आता जनसेवेचे व्रत घेऊ या व पुराणातील भाकड कथाना मूठमाती देऊन विज्ञानाची वाढ करू या लोकहितवादी, चिपळूणकर, आगरकर याना समाजाला तडाखे द्यावे लागले ते याचसाठी लोकहितवादीनी भट-भिक्षुकाच्या संकुचित दृष्टीवर, आगरकरानी सनातन्याच्या बालविवाहादि चालीरीतीवर आणि चिपळूणकरानी भुताखेताची आळवणी करणाऱ्या भोळसट लोकभ्रमावर कडाडून लिहिण्यास मागे पाहिलेले नाही पतिव्रता विधवेचे दर्शन अमंगळ आणि कायमच्या सौभाग्यवती बाजारबसवीचे दर्शन मंगल असली खुळचट विचारसरणी आता गाडून टाकून ज्याला आपगिता नाही त्याला जवळ करील तो देव होय ही तुकोबाची वाणी आता मस्तकी धरू या. दुष्काळात आपले धान्यकोठार उपासिताना उघडपणे लुटून देणाऱ्या दामाजीची अखंड आठवण ठेवू या महार दरवाज्याबाहेर, आणि ब्राह्मण आत असा पक्षभेद करू नका असे ठासून बजावणारे विष्णुबोवा ब्रह्मचारी व ज्योतिबा फुले याचे स्मरण करू या जुनें ते सर्व चांगले, ही कल्पना टाकण्यास व सज्जनावर शस्त्र रोखणार नाही, पण दुबळ्यांना पिळून काढणाराना ठोकण्यास मागें पहाणार नाही, 'आर्तत्राणाय न शस्त्र न प्रहर्तु अनागसि' ही कालिदासाची काव्यमय पण गंभीर वाणी आत्मसात करू या

अखंड हिंदुस्थानची प्राचीनतम भाषा म्हणून संस्कृत भाषेला व हिंदी काव्यातहि भर टाकणाऱ्या नामदेवांना स्मरून हिंदी भाषेला मान देत

असताहि आपल्या प्रांतनिष्ठ ज्ञानोबा, तुकोबा साधुसंताच्या वाणीचा अभिमान राखू या व त्याचबरोबर दहा कोसावर बदलणारी व अनेक रूपें धारण करणारी भाषा तीच जनतेची भाषा, असल्या अदूरदृष्टि-कल्पनेच्या आहारी न जाता अखंड भारतात उमगली जाणारी संस्कृत-प्रधान भाषा ह्रीच प्रांतीयभाषा रूढ करू या खेडुताची भाषा तीच प्रांतीय भाषा अशा कल्पनेच्या आहारी काही विद्वान् जातात आपल्या भास्करराव जाधवासारखे विद्वान् जसे गेले होते तसेच साम्यवादी रशियातील मार (Marr) नावाचे श्रेष्ठ भाषाशास्त्रज्ञहि गेले होते पण भाषेच्या प्रांतात श्रीमंताची भाषा व गरीबाची भाषा हा भेद अवास्तव होय ह्या तत्त्वाचा उघड पुरस्कार स्टालिनने दोन वर्षांपूर्वीच Concerning Marxism in Linguistics यात स्पष्टपणे केला आहे तो यथार्थ होय

उद्याची संस्कृति ही कुटुंबाच्या तत्त्वाचीच व्यापक आवृत्ति ठरू द्या कुटुंबात धनाचे वाटप आपण आज हजारो वर्षे सर्वांना सारखे देत आलो आहोतच ना? तेच तत्त्व आता राष्ट्राला लागू करण्यास झटू या व महत्कार्यावर भर देऊ या बुद्धिपरत्वे, रुचिपरत्वे कामाचे वाटप अवश्य असताहि ते पूंजीपतीच्या लोभी वृत्तीवर न सोपविता अफाट जनतेचे जीवन सुखी करण्यावर दृष्टि रोखणाऱ्या, 'यत्न तो देव जाणावा' यावर भर देणाऱ्या आणि आद्यतम विज्ञानाला हस्तगत करून त्याचा दुरुपयोग करणार नाही पण परकीयानी केल्यास प्रतिकारास हरणार नाही असा आत्मविश्वास निर्माण करणाऱ्या दिशेने आपली उद्याच्या संस्कृतीची पावले टाकू या. म्हणजेच 'सर्वेन. सुखिन संतु सर्वे संतु निरामया' हे जे आपल्या प्राचीन ऋषिवर्यांचे ध्येय ते आपल्या राहणीत व विचारसरणीत उतरविण्याच्या योग्य वाटेने आपण जात चाललो तर 'शुभास्ते पथान संतु' व 'शांतिरस्तु पुष्टिरस्तु तुष्टिरस्तु' असा त्यांचा आनंदगर्भ आशीर्वाद आपणास मिळेल. तो मिळेल त्या दिनी उद्याच्या संस्कृतीच्या उष कालास प्रारंभ झाला असे यथार्थतेने म्हणता येईल.

# प्रा. द. के. केळकरकृत

## १ काव्यालोचन ( दुसरी आवृत्ति )

लेखकाचे परिश्रम, बुद्धिमत्ता व विषयप्रतिपादनकौशल्य या गोष्टी पुस्तकातील कोणतीहि चार पाने वाचली असता कळून येतील.

—प रगाचार्य रड्डी (विविधज्ञान विस्तार)

ज्या पुस्तकाचा मराठी भाषेला अभिमान वाटेल अशा प्रकारचे हे पुस्तक आहे —रा प्र कानिटकर (चित्रमय-जगत्)

प्रो फडके व केळकर याच्या पुस्तकानी टीका वाङ्मयात मिळविलेले प्रशस्त स्थान अढळ आहे

—लक्ष्मणशास्त्री जोशी (प्रदक्षिणा)

## २ संस्कृतिसंगम ( दुसरी आवृत्ति )

झोपी गेलेल्यास जागे करणारा व जागे असणारास उभे करणारा असा हा ग्रथ आहे. —डे व्ह. ट्रा सोसायटीचे परीक्षक

खऱ्या विद्वानाचे चर्मचक्षु वर्तमान स्थितीचे परीक्षण करण्यात गुग ज्ञानचक्षु पूर्वेतिहासात मग्न, तर तर्कचक्षु भावी स्थितीकडे वळलेले असतात सस्कृतिसगमात आटळणारी विद्वत्ता खरोखरीच त्रिनेत्री आहे

—शि ल करदीकर (सह्याद्री)

भाषा चटकदार असल्याने नवे विचार खच्चून भरलेली प्रकरणे वाचीत असता मेंदूला शीण न वाटता गुदगुल्याच होतात —केसरी

पट्टीच्या वकीलाने अशीलाची बाजू कुशलतेने माडावी तसा हा ग्रथ केळकरानी लिहिला आहे तो वाचल्याशिवाय कोणीही राहू नये अशी आमची शिफारस आहे —महाराष्ट्र

## ३ वादळी वारे ( तिसरी आवृत्ति )

विचाराच्या भारदस्तपणामुळे व प्रमाणाच्या पायाशुद्धपणामुळे नवी दृष्टि व विचारसरणी देणारा हा ग्रथ आहे. —विविधवृत्त

सनातनी व सुधारक याचे दोष दाखविण्यात जी ऋजुता व सौजन्य केळकरानी दाखविले आहे. ते टीकाकाराना कित्त्या दाखल होण्यासारखे आहे

—धनुर्धारी

ग्रंथकाराची काव्यसुधा प्रत्येक पानात पाझरत आहे. —केसरी

सर्व लेखात स्वतंत्र विचारशक्ति व मनोवेधक लेखनपद्धति याचा ठायीठायी प्रत्यय आल्यावाचून राहत नाही —महाराष्ट्र

साहित्यचर्चेत रंगणारी लेखणी शास्त्रीय चर्चासुद्धा पराकाष्टेची सुलभ करू शकते याचे 'वादळी वारे' हे उत्कृष्ट उदाहरण होय —लोकशिक्षण

## ४ साहित्य-विहार

खोल व्यासंगामुळे आलेला विचाराचा पक्केपणा व वावदूकतेपेक्षा युक्तिवादावर भर देण्याची प्रा केळकराची पद्धति विलोभनीय आहे पुस्तकातील वाङमयातील अमरता वगैरे लेख मौलिकतेच्या दृष्टीने महत्त्वाचे वाटतात

—लोकमान्य

## ५ विचारतरंग ( प्रतिभा प्रकाशन, मुंबई २८. )

या ग्रंथात विषयाची विविधता इतकी आहे की हा ग्रंथ म्हणजे छोटासा ज्ञानकोशच आहे असे म्हणणे वावगे होणार नाही विषयाची विविधता व वैचारिक खोली पाहिली म्हणजे प्रा केळकराची विद्वता व व्यासंग याचा पुन्हा अनुभव येतो शास्त्रीय विषयाची भाषाहि ते लालित्यपूर्ण व सफाईदार ठेवतात याचे खरोखरच आश्चर्य वाटते 'दोन प्रवासी' हा लघुनिबंध नितांतसुंदर झाला आहे 'गुरुशिष्य संबंध' या मौल्यवान् लेखाची पारायणे केली पाहिजेत अशा लायकीचा हा लेख आहे

—जयवंत दळवी '**लोकमान्य**'

प्रतिपक्षाचे गुणदोष प्रा केळकर मार्मिकपणे स्पष्ट करतात आचार्य भागवताच्या लेखसंग्रहाचे परीक्षण करताना विवेक व श्रद्धा याविषयी आचार्यांनी कसा गोंधळ केला आहे ते केळकरानी चांगल्या प्रकारे विशद केले आहे व आचार्यांच्या भूमिकेतील मूलभूत दोष स्पष्ट केले आहेत अशा चिकित्सक लेखाच्या जोडीला तात्यासाहेब केळकर व सावरकराची कविता असे रसिकतेचे द्योतक लेखहि संग्रहात आढळतात असा हा उद्बोधक व आनंददायक लेखसंग्रह वाङमयाच्या विद्यार्थ्यांना विशेषच आवडेल

—गोविंद तळवलकर '**लोकसत्ता**'

आचार्य भागवताच्या 'जीवन साहित्य' यावरचे आपले परीक्षण अत्यंत मार्मिक व सत्यान्वेषी आणि म्हणूनच अभिनंदनास पात्र आहे

—डॉ. वा. वि. आठल्ये, सातारा.

# मनोहर ग्रंथमालेचीं प्रकाशनें

| कादंबऱ्या | किंमत | साहित्यविषयक | किंमत |
|---|---|---|---|
| ठेंगणे अस्मान | ४ | काव्यालोचन | ५ |
| पाऊलवाट | ४ | साहित्यविहार | ३ |
| प्रतारणा | २ | वादळी वारे | ४ |
| चपी आणि मोत्या | १॥ | जीवनविहार | २ |
| क्रांतिकाल | ४ | काव्यविहार | ४ |
| रत्नाकार | २ | नवकाव्यसमीक्षा | ।॥। |
| **कथा व ललितलेख** | | नवे अलंकार | १॥ |
| रानोमाळ | २॥ | स्त्री–गीते | ३ |
| मानसचित्रे | २॥ | संस्कृत काव्याचे पंचप्राण | ६ |
| हसरा निर्माल्य व चिमण्या | २ | गोकुळच्या गौळणी | २ |
| उपायन | २॥ | **इतर** | |
| टालडुप्पो वाँगिमाडऽऽ | ३ | संसारसोपान | १। |
| आंबटगोड | २ | फ्रेंच राज्यक्रांति | २॥ |
| कमलाक्षीची कहाणी | ।॥। | गावरान गीता | २ |
| मा थेन् थन् व इतर गोष्टी | ३ | ज्ञानेश्वरी–सर्वस्व | ५ |
| गुन्हेगाराच्या जगात | २ | संस्कृतिसंगम | ६ |
| **कविता** | | तिसऱ्या महायुद्धाच्या छायेत | ५ |
| राका | १। | हिंदी क्रिकेट | ५ |
| **चरित्र** | | हिंदी हीच आमची राष्ट्रभाषा | ३ |
| 'नरसिंह' केळकर | १॥ | एकेकाचा स्वभाव | २ |
| **आत्मवृत्त** | | उद्याची संस्कृति | ६ |
| स्मरणसाखळी | ६ | | |

[ एकूण ६८ प्रकाशनांपैकीं येवढीच शिल्लक आहेत ]

**मनोहर ग्रंथमाला : टिळक रोड, पुणें २**